करिता. ॥ ३२ ॥ मायेचापें त्रिऊनि वेगळी जाली; । परि परमार्थवाट तुझा दाखविली; । जैसी भास्करें पाहविली । प्रभात डोळ्यासि. ॥ ३३ ॥ तुज पूर्णचंद्राचे स्नेहकर । मज सोमकांती स्पर्शले अपार, । तेणें प्रज्ञाजळें हें जिव्हार । प्रेमधारीं द्रवलें. ॥ ३४ ॥ जरि न्ही चक्षूंविण उजिवडे, । जीवनेंविण बीज वाढे पवाडे, । तरिच श्रीगुरूंविण सांपडे । परमार्थाचा पंथु. ॥ ३५ ॥ श्रीगुरूविण सुमार्गु असे । हें वाक्य त्रिभुवनीं न दिसे । सिद्धी पावले अवतार कैसे । श्रीगुरूचेनि उपदेशें. ॥ ३६ ॥ म्हणऊनि श्रीगुरूंविण सर्वथा । न मिळिजे चिंतिलिया पदार्था; । आणिक भवदावाग्नि-व्यथा । काय निरसूं सकेल ! ॥ ३७ ॥ म्हणोनियां जी श्रीगुरुराजा, । तुझेनि सफळ जन्म माझा, । मी प्राणही अर्पीन परि तुझा । उत्तीर्ण नव्हे उपकारु. ॥ ३८ ॥ सुमनमाळा माझी वाणी । रुळत राहो तुझिये चरणीं. । तुझें यश माझे श्रवणीं । भूषणरूप राहो. ॥ ३९ ॥ मंदबुद्धि भ्रांत वेळा । निरसीं म र्शी तूं दयाळा. । परम गुह्य निधि डोळा । दाखवी पा मजलागीं. ॥४०॥ तुझे सेवेचें सिरावण; । रंगित माझें अंतःकरण; । हृदयमादुसे तुझे गुण । रत्नरूप हो जाले. ॥ ४१ ॥ तूं ज्ञानसुधारसाचा सागरु. । धैर्य वैराग्याचा मेरु, । सिद्धिबुद्धीचा आगारु । अतिशयेंकरूनि. ॥ ४२ ॥ तूं नियानेटीचें नंदनवन, । तूं कीर्तिचंद्राचें गगन, । तू गुणरत्नाचें भुवन, । सूर्य साहित्य-सृष्टीचा. ॥ ४३ ॥ ऐसें परिसोनि श्रीगुरुराजा । ह्मणे, 'पुरे पुरे,' नृसिंहात्मजा. । निर्भरता देखोनि, द्विजा । येत आनंदभरितें. ॥ ४४ ॥ आतां चालवीं कथा रामायणीं, । जैसी शर्करा पचवी सुगरिणी; । साहित्य रूपमालाद्विय वाणी । श्रोतयांतें दाखवीं. ॥ ४५ ॥ ऐकूनि ऐसें श्रीगुरूचें वचन । साहित्यें निवरों लागलें मन, । जैसें अमृतवल्लीआळां जीवन । राहाटपाटाचेनि पंथें. ॥ ४६ ॥ आता सादर अंतःकरणें । करूनियां श्रोतयांसि विनवणें । करिन्च त्याचेनि अव-धानपणें । पवित्रप्रकार होये. ॥ ४७ । जी, हे माझी आदर बोलिली, । वरि लिपर्ताची नाहीं चोरी; । ऐसीही तुम्हीं स्वीकारिली । माझिये प्रीती करूनि. ॥ ४८ ॥ जैसें रानवट पक्षि शुकें, । समर्थ गृहीं करी कौतुकें; । मुरत साते मानिती

---

१. अ मागुं २. अ मभे ३. अ. ध्यानीं रमला ४. अ कृद्वैभवाचा. ५. ब. साहित्यें विवरीं ६. अ पवित्र आणि पोटेकर ७ अ दोन चोट... संपूर्ण नाहीं । चालीमीन गेलील शब्द ८ अ एक

लोक । शब्द पारखोनी तयाचे. ॥ ४९ ॥ वक्त निपति मत्त, मुद्रा. ।
शोधितां साहित्यमुद्रा, । ते शब्दरत्नपरीक्षी महींद्रा- । परिस अधिक तुम्ही.
॥ ५० ॥ गुणज्ञ सुविद्य तुम्ही श्रोते, । कवित्वमुद्रा योग्य तुम्ही भोक्ते, ।
तुमचे सुजाणी देखोनि वक्ते । सादरीन मागिजे ॥ ५१ ॥ तुम्ही ज्ञान
जळाचे निधि; । विवेकवैराग्यगिरीचे हिरे, । नाना. भगवत्कथामृता थोरे ।
तुम्ही सुजाणें सर्वथा. ॥ ५२ ॥ तुमचे रूपदानतळें बोल्डावे । माझे बुद्धिज्ञान-
व्यापारवन पाल्हावे । तेथें जनें सकुळ निवे । नवरस फळें सेविना. ॥ ५३ ॥
वक्ता अतिपाडें अनुवादे । आणि श्रोतया मनीं व्यग्रता नादे, । तरि कविन्व
रसरान मंदे । जैसा जळेविण अंकुर. ॥ ५४ ॥ गौल्यता पियूषासि
मोठी । ऐसीं अन्नें निस्तारिलीं ताटीं, । अग्नि मंद भोक्त्याचे पोटीं, । तरि तें
व्यर्थचि गेलें. ॥ ५५ ॥ स्वर्गागनाहूनि अधिक । होतसे नृत्याचें कौतुक, ।
सुषुप्तीनें व्यापिलें सभानायक । तरि तें व्यर्थचि गेलें. ॥ ५६ ॥ जिंतिली
किन्नराची गीतशाळा । ऐसी होतसे गायन कळा, । बधिरत्व ऐकत्याच्या
कर्णनिळा । तरि तें व्यर्थचि गेलें. ॥ ५७ ॥ सौंदर्य पाहतां लाजे मेनका । ऐसी
शृंगारिली नायका, । चिंतातुर पति आरूढे पर्यंका । तरि तें व्यर्थचि गेलें. ॥ ५८ ॥
म्हणउनियां श्रोतेहो तुम्ही । कथेसि लुब्ध, जैसे भृंग पद्मीं, । तरिच माझा
हरप व्योमीं । माईल्ना, ऐसें वाटे ॥ ५९ ॥ सपूर्ण हे पूर्णमेचि निशी, ।
तेथें उदेला कवित्वशशी, । आतां तुमचिया सुखसमुद्रासि । भरितें तुरं-
ळेल ॥ ६० ॥ सदा साहित्यासि दद । ऐसे जोडती जरि मतिमंद, । तरि
कवित्वाचें निरे दोंद, । चडनातें जैसें अभ्र. ॥ ६१ ॥ मतिमंदाचे हृदयीं
साक्षेपुं । तरि वाग्विलासीं जेंड सतापु, । जैसा शून्य मंदिरीं दीपु ।
पाजळिला व्यर्थ. ॥ ६२ ॥ चिताभूमीसि घालिजे मंडपु । कीं पंका
ठेविजे रत्ननिक्षेपु । कां कामधेनूचे क्षीरें भस्मकूपु । भरिजे जैसा.
॥ ६३ ॥ गर्भांधाचे पुढें जैसा । काढूनि दाविजे आरसा, । का अमृत
फळाचा रस वायसा । कनकपात्रीं वाढिला. ॥ ६४ ॥ द्राक्षफळाचिया

---

१ ब कवि २ अ. गुणज्ञ सविद्या ३ अ कुल कवित्व मुद्रिकायोग ४ अ
सुजाणा ५ अ मागतों ६ अ. तुमच्या रूपाजळें बोल्हावें ७ अ जनसगकुळ
निवे ८ अ जिंकीला किन्नरांची शाळा ९ अ विरे दाद १० ब सारा जैसा
क्षेपु । तरी वायांवाण सिंपिजे. ११ अ कीं पंका लाविजे रत्ननिक्षेपु

रासी । केलिया उष्ट्रमुखापाशीं; । मृत्तिका भक्षिती किरवळें त्यांसि । शर्करा हे समर्पिली. ॥ ६५ ॥ ह्मणोनि जेथें मूढमतिसांजवेळ । तेथें बुडे साहित्य सूर्यमंडळ, । पदार्थांचे प्रगट झळाळ । सरिसी लोपोनि राहे. ॥ ६६ ॥ दरिद्री निजले तृणसेजे, । त्यांतें षोडशोपचारें पूजिजे; । तेंवि काव्यकुशलता बोलिजे । हृदयशून्यापुढें. ॥ ६७ ॥ असो. ऐसिये रीतीचे जन । वृद्ध होत्साते बाळका समान; । परि न भेटावे अंतर्मलीन । कापट्यसागर साच ते. ॥ ६८ ॥ गुण ऐकूनि लक्षावधि । वरतें ना बोलती कुबुद्धि; । येकु दोष देखोनि वृद्धि । करितील आपुलेनि मुखें ॥ ६९ ॥ पद्मिणीचीं पवित्र फुलारें । सुगंधें, राजसें, मनोहरें, । तीं पंकवासीय दर्दुरें । काय भोगूं जाणतील ? ॥ ७० ॥ जालिया वसंत ऋतु प्राप्त । वदनीं वायसाचे वेथा उद्भवत, । तैसें निंदकाचें भंगतसे चित्त । परकाव्य परिसतां. ॥ ७१ ॥ निंदकासि दोषांची धणी, । परि मज वाटतसे हित अंतःकरणीं; । जे पातकांची करी क्षाळणी । मौल्यातें नेघोनि. ॥ ७२ ॥ आणि सुजनासि प्रिय गुणपुष्टी । दोष असल्या परि नये दृष्टी; । जैसा कलंकु चंद्राचे संपुष्टीं, । चकोरा चाड पीयूषाची॥ ७३ ॥ कुरूप जननीचें वदन । पाहतां न भंगे बाळकाचें मन; । तें करितां तृप्ती स्तनपान । रिघे वोसंगा पुढां. ॥ ७४ ॥ पंकें वोळिला पद्मिणीनळु । हा विचारुनि करी अळिकुळु । तयासि प्रिय तो परिमळु । म्हणऊनि झेंपावतु पद्मिणी ॥ ७५ ॥ कोकिळा नाहीं रुपवंती । म्हणऊनि कर्णासी कैची खंती ? । तयातें लागली असे अति प्रीति । मधुरस्वरआलापीं. ॥ ७६ ॥ म्हणऊनि सुजन पंडितासि । गुणमाधुर्य घेणें मानसीं, । जैसें तोय त्यजूनि राजहंसीं । पय प्राशन कीजे. ॥ ७७ ॥ असो. हें बोलिलें सहज. । पुर्वी बोलिला वाल्मिक राज । तेंचि उच्छिष्ट कथितां बहुत लाज । लौकितो महाप्राणासि. ॥ ७८ ॥ तरि लज्जा न लागावयाकारणें । वाग्देवीनें केलें धांवणें; । कथामार्गीं चाळतां उणें । पडों नेदी सर्वथा. ॥ ७९ ॥ उपमा, लालित्य, अर्थगौरव । तेंचि जाणावें दुष्प्रमुद्राकाव्य; । ज्याचिये गर्भीं जे जे भाव । तेंचि चतुरीं निवडूनि घ्यावे. ॥ ८० ॥ जैसे पद्मगर्भाचे पराग । येक भेमुं

---

१. अ. मृत्ता भक्षीति कीरीविळें २. अ. पदार्थासी प्रचांकटे. ३. अ. काव्यवृत्ति हें. ४. अ. अहितकरणी. ५. अ. होतसे. ६. अ. साहित्य कारीगर. ७ अ. लाविता श्रोते जन

जाणती भृंगें. । तेथें काय करावें मातंग । वृथा पुष्पनाशक. ॥ ८१ ॥ जे करितां नाहीं व्युत्पत्तिविलासु । तो कथेसि कीचा तुरळ रसु [1] । तरी श्रोता नव्हे उदासु । ऐसें बोलिलें पाहिजे ॥ ८२ ॥ बोलिजेल आता श्रोत्रणें परिमिता प्रष्टिका होय पारणें । ये पदप्रबंधींचि [2] अक्षरें गुणें । आणितां रत्न पुंसांसी ॥ ८३ ॥ नाना अक्षरें नगरमाळे । कथा कल्पवृक्षांचीं फळें; । जयाचें भाग्य आगळें । ते स्वइच्छे सेविती. ॥ ८४ ॥ कथा रामायणी विचित्र, । वाराणसी परीस सुक्षेत्र; । विचारिता होय पवित्र । गंगेहूनु आगळी. ॥ ८५ ॥ सुधारसा हूनि गौल्य । क्षीरनिधीपरीस सखोल । उत्तम रत्नाहूनि अमोल्य; । कथा रामायणी. ॥ ८६ ॥ शीतकराहूनि शीतळ; । तमातकापरीस तेजाळ; । व्योमाहूनि विशाळ । अर्थविषयीं ॥ ८७ ॥ कंदर्पकांतापरीसें निर्मळवती । वैकुंठवनितेपरी; भाग्य देती । गौरीच्या अपेक्षा गुणवंती । शिवासि प्रिय होय. ॥ ८८ ॥ गौरीहूनि आगळी गुणें । शिवासि प्रिय पदार्थी कवणें ? । म्हणऊनि श्रोतयाचें आक्षेपणें । सहजेंचि पैं जालें. ॥ ८९ ॥ वक्ता विनवी जोडला करीं, । जें मथन जालें क्षीरसागरीं । तें हालाहल निघालें बाहेरि, । तेणें सृष्टी आहाळली; ॥ ९० ॥ ऐसें देखोनि शिव दयाळ । मग प्राशन केलें हाला-हल, । तेणें तनु निर्मळ । गदगदों पैं लागली; ॥ ९१ ॥ पुढें पिनाकपाणी काय करी, । शीतळ गंगा शिरीं धरीं, । तिणें न निवेचि; मग मौळीचा पारीं । चंद्रकळा ठेविली. ॥ ९२ ॥ फळद नव्हे ऐसेपरीहीं प्रेत्न; । मग त्या हिमा-लयाचें कन्यारत्न । तिशीं शिव दे आलिंगन, । परि न तुटे उष्णता विषाची. ॥ ९३ ॥ मग नेणों कैसेनि मनें [3] । रामकथा आणिली श्रवणपथें; । कंठीं धरिली सुखस्वार्थें । तेणें सर्वांग निवालें. ॥ ९४ ॥ ऐसी हीं कथा रामायणी । भक्तिज्ञानवैराग्यवेणी । प्रयाग वाल्मीकाची वाणी । पूर्वदत्तें प्राप्त होय. ॥ ९५ ॥ तरि या वाल्मीकऋषीचा महिमा । बोलिजे तितुक्या न्यून उपमा । जे भविष्य काव्य रघुत्तमा । रायाचें कथिलें. ॥ ९६ ॥ महाकाव्य हें अर्थगुप्त । वाल्मीककृत; शिवें मानिलें श्रेष्ठ । तेंचि परिसा मान्हाष्ट्र । भवच्छेदक, सुखदातें. ॥ ९७ ॥ मान्हाष्ट्र ऐसें वाटे लोका, । परि हे *वाल्मीककाव्याची शुद्ध टीका; । येक येक अक्षरें देखा ।* महापातकें

---

[1] अ. एक भोगुन जाती [2] अ पुन अमगळ [3] अ. पदें युद्धांचीं [4] अ. भुजामा [5] अ हनो रमवनी [6] अ तिणें सर्वांगी निवाला

नाशती. ॥९८॥ आणिके नाना व्रतें तपें । आचरतां बहुत कष्टरूपें, । पुढें क्लेशातां पूर्वसंकल्पें । इच्छाफळ पाविजे. ॥९९॥ तैसी कथा नव्हे रामाची. । परिसता पीयूषापरि रुचि; । आणिक हे चहूं अर्थाचीं । फळें भोगवित असे. ॥१००॥

कथापंथीं महाराष्ट्रवचनें, । परि हीं रसिकें, अति गहनें, । जैसीं वनमक्षिकाचीं वदनें । मधूतें स्रवती. ॥१॥ नाना, संस्कृत हें चंद्रमंडळ, । महाराष्ट्र चंद्रिका केवळ; । संस्कृत स्वातीचें जळ, । मराठी मुक्ताफळें. ॥ २ ॥ जैसें दधीचें मथन केलें, । त्यातूनि नवनीत निवडिलें; । तैसें संस्कृतापासूनि जाहलें । महाराष्ट्रकवित्व. ॥ ४ ॥ इक्षुदंड रसनायकु, । शर्करा पुढें तयाचा पाकु; । गौडीचा विचार अधिकु । रसनायकां जाणती. ॥ ५ ॥ आमुची देशभाषा मराठी; । वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं, । म्हणोनु कौतुकें वचनरहाटी । ऐसी पदोत्तराची. ॥ ६ ॥ असो. हें बोलणें वाउगें. । आता वदूं[3] कथेचेनि मार्गें; । श्रोतियाचें मंडल साहित्यरंगें । शृंगारूं हळू हळू. ॥७॥ विचित्र वाल्मीकीनें कथिलें । मागें सुंदरकांड संपादिलें. । आता युद्धकांड आरंभलें, । जें अपूर्व सप्तमध्यें. ॥ ८ ॥ रत्नमाळेचा मध्यमणि, । कीं ग्रहसमुदायामाजी तरणि, । तैसें युद्धकांड रामायणीं । रसाळ बहुसाल. ॥ ९ ॥ कपेश्वराची बैसली सभा । सूर्य लोपे त्याचिया प्रभा; । कोटिचंद्रासमं धवळीत शोभा । उजळिल्या दाहि दिशा. ॥ ११० ॥ मनें सृष्टी, मनें संहारु, । ऐसा येक येक कपेश्वरु; । पृथकें सागता होईल विस्तारु, । कथा पडेल पाल्हाळीं. ॥ ११ ॥ ऐसिया कपेश्वराप्रति । वदे वाल्मीकिगिरा सरस्वति; । तेंचि गौरीस उमापति । कैलासीं सांगतु. ॥ १२ ॥ ब्रह्मा वदे नारदाजवळी । आणि वासुकि परिसतु पाताळीं, । तरि रामकथा[4] भूमंडळीं । पवित्र जन परिसती. ॥ १३ ॥ मऱ्हाटी वक्तृत्वीं असे रुचि । ऐसी संस्कृतामाजी केंची ? । यद्विषयीं स्वर्ग दृष्टांताची । साक्षी आइका. ॥ १४ ॥ इति श्रीयुद्धकांडकथा रामायणीं । वाल्मीकिकृत भवतारिणी; । ते परियेसा श्रवणीं । कृष्णदाससुद्गल म्हणे. ॥ ११५ ॥

---

१. रसनायक जाणतीच २ ब व्यसन. ३. ब वदों. ४. ब. चांगे । शृंगार हळुहळु. ५ अरण्य ६ अ. सतवेत.

## प्रसंग २.

ॐनमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः ॥ श्रीगुरुनागेशराजाय नमः ॥ बंधु-समवेत सीतारमण । ऋष्यमुकपर्वतीं केलें येणें; । हनुमंतें सीताशुद्धि करून येणें । तंववरि अवधि तेथें. ॥ १ ॥ सुग्रीवें सप्तद्वीपांतरींचे । वानर मेळविले प्रतापाचे, । जे साक्षात अवतार देवांचे । पर्वतांसमान ते. ॥ २ ॥ अपार तयांचें बळ, । पाणितळें झेलिती शैल; । अगळग येकयेकाचें दळ कोटिच्या कोटी कपि. ॥ ३ ॥ इंद्राची संपत्ति क्षीरसागरीं । पडली होती बहुकाळवरी, । तीस काढावया बाहेरि । सुरासुर मिळाले. ॥ ४ ॥ तैसेचि या नरवैडुर्यातें । कृतकार्य जें, कल्याण देवांतें, । ह्मणऊनि उत्कंठित स्वामीचे निमित्तें । कौतुकें कपि मिळाले. ॥ ५ ॥ बृहस्पतीहूनि अधिक बुद्धि । तो हनुमंत तरोनि जलनिधि । लंकेसि करूनि सीताशुद्धि । रघुराजा जवळी आला ॥ ६ ॥ जैसें मार्तंडाचें मंडळ । निघालें गगनमार्गें उल्लंघोनि शैल । पार्थिवें क्षीराब्धि निर्धमूळ । तयासि भेटी दिधे. ॥ ७ ॥ परमयोगी आत्मज्ञानी । महामाया मागें सांडूनि । स्वरूप पावे प्रयत्नीं । परम आनंदमय जे ॥ ८ ॥ तैसा तो अंजनीचा कुमर । पुनरपि तरोनिया सागर । जेथें स्वामी अवनिजावर । तेथें वानरेंसीं आला. ॥ ९ ॥ आतां सीताशुद्धि जाली ह्मणऊनि । हनुमंतु विराजमानु सुचिन्हीं; । जैसें निगमनसाध्य साधका वदनीं । कळा घनवटित ॥ १० ॥ उभारला दक्षण भुज । तोचि का सिद्धीचा ध्वजु, । सन्मुख देखोनि रघुराजु । हनुमंत गाढें बोले. ॥ ११ ॥ म्हणे, 'जानकी म्यां देखिली, सर्वोत्तमा, । कल्याणरूपेसीं, श्रीरामा । लंकापुरपति रावणनामा । तेणें वाटिके रक्षिली.' ॥ १२ ॥ म्हणे[1] 'जैसा ऐसें रत्न बरवें । तें रत्न ठेविलें बुद्धिभयें, । तैसें सांनिध्यगीं दशग्रीवें । अशोकवनीं रक्षिलें.' ॥ १३ ॥ ऐसें हनुमंतु बोलिला, । दंडवतें नमस्कारु केला, । तंव रघुनाथ आनंदें उचंबळला । शुद्धि सीतेची झाली ह्मणऊनि. ॥ १४ ॥ देखूनि हनुमंताचें मुख । बहुत वाटलें श्रीरामा सुख । जानकीवियोगाचें दुःख । दिग्मंडळाबाहेरि गेलें. ॥ १५ ॥ लक्ष्मणु सुग्रीवु आनंदले कैसे, । क्षुधार्थी क्षीरसिंधु पावले जैसे, । चंद्रोदयीं चकोर तैसे । कपि संतुष्टले. ॥ १६ ॥ याउपरि रघुनंदनें । पीयूषापरीस रचिनलें । बोलों आरंभिलीं वचनें । हनुमंताप्रति, ॥ १७ ॥ म्हणे 'गा

---

१ ब निहिनें २ अ सागरु प्रणिपातु केला

मारुति स्नेहाळा, । काय उपमा द्यावी तुझिया वळा ? । उडोनि गेलासि अगाध जळा. । सीताशुद्धि तुवां केली. ॥ १८ ॥ जळनिधि तरीजे उडोनि । ऐसा सकल्पु न धरवे मनीं. । धन्य धन्य तुझी माता अंजनी । प्रसन्नली तुज गा. ॥ १९ ॥ तुवां उपजता बाळपणीं । ग्रासू आरंभिला तरणि. । करिता महार्णवाची कडसणी । तुजसारिखा न देखों. ॥ २० ॥ महाभीम हा वरुणालयो । त्रिवर्गेचि लघोनि पावले ज्यो, । तू हनुमत, गरुड आणि वायो, । चौथा दोखिला नाहीं. ॥ २१ ॥ धाडोळितां भुवनत्रय । परि अद्भुत तुझें बळवीर्य. । सुग्रीव कपिरायाचें दूताकार्य । सर्व सिद्धी नेलें. ॥ २२ ॥ परि ऐकें गा, हनुमता, । तुवां सत्य देखिली सीता । आता माझिये अंत करणीं चिंता । थोर वाढिनली. ॥ २३ ॥ अमृत असे अमरा गृहीं । तें महीवासियातें प्राप्त नाहीं, । तैसी लंके असे वैदेही, । ते कैसेनि पाविजेल ? ॥ २४ ॥ असख्यात हें वानरदळ । कैसेनि तरेल अगाध जळ, । म्हणऊनि ये काळीं प्रबळ । उद्वेगें मज वाटे. ॥ २५ ॥ निधान वेष्टूनि राहे विवसी, । तैसा महोदधि आड वल्लभेसि, । याच कारणास्तव मानसीं । मज चिंता वर्तली '. ॥ २६ ॥ ऐशा उत्तरीं रघुराजु । बोलत आहे हनुमता उजू । तव अधोदृष्टि मारुतात्मजु । क्षण एक राहिला. ॥ २७ ॥ रघुनाथाचा अतर्भावो । जाणोनि बोलिला किष्किंधरावो । ' समुद्र तरावयाचा परियावो । का नेणाहो समर्था ? ॥ २८ ॥ रणरंगधीरा रघुनाथा । कृपणु धरी जैसा अर्था, । तैसी धरिली उद्वेगव्यथा । प्रतापातें साडूनिया. ॥ २९ ॥ राया, बोलिलासि जीं वचनें । असत्वृत्तीसारिखीं हीनें । तेथें रणपंडिताचीं मनें । नाल व्ती काहीं. ॥ ३० ॥ तेज पुंजु वैश्वानर धडाडी । तयासि बाधी हिंवाची हुडहुडी, । रविमंडळीं तमाची झापडी, । हें कहींच न घडे. ॥ ३१ ॥ तूंचि धनुर्धरु सज्ज करिसी मेढा, । तें कापती अंतकाच्या दाढा, । तू कोपलिया जलसिंधूचा वोढा । निमिषात जाळिसी. ॥ ३२ ॥ तुझें कार्य कर्ता तूंचि, गा, जाण । सदा यशवंत तुझे बाण. । करिसी शत्रुसमुद्रासि निर्वाण । मग पावसी सीतेतें. ॥ ३३ ॥ अरुणकाळीं दिसती मेहुडीं । तीं चंद्ररात निमिषात तोडी, । तैसा उद्वेगु देशधडी । प्रतापें करीं, राया. ॥ ३४ ॥ पूर्वेहूनि पावावया पश्चिमा । नक्षत्रेंसि लघी,

---

१ अ सर्व रूप २ अ तरवेल ३ अ मज उद्वेल वाटता ४ अ कपिरावो ५ अ असत्प्रवृत्तीसरिखीं ६ हा शब्द अ प्रतींत नाहीं

गा, चंद्रमा; । तैसा कपींसहित तूं, जयरामा, । सागर बोळां-डिसी. ॥ ३९ ॥ हे हरिपुंगव असंख्यात, । वळिये मीनले, जैसे पर्वत. । तुझा कार्यसाध्यसमयो इच्छित, । जैसे मयूर मेघातें. ॥ ३६ ॥ तुझे आज्ञे-स्तव चापपाणि । काढिती ब्रह्मांडाची गवसणी. । करितां त्रिकूटाची चाळणी । यातें घटिका न लागे. ॥ ३७ ॥ सागरीं बांधलिया सेतु, । पुरेल लंकावानियां अंतु; । मग, 'रामा, प्रिये देऊनिया हस्तु । वामांगीं बैसवीं.' ॥ ३८ ॥ मज मानसीं उदेलें चिन्हफळ, । जे वानर तरले अगाध जळ. । युद्ध जालें अति तुंबळ; । तुझे शत्रु निमाले. ॥ ३९ ॥ हनुमंतु, अंगदु, जांबवंतु, । नीळु, सुषेण, धर्मसुतु, । या सर्वांचा पराक्रमु अद्भुतु । सिंह शत्रुगजांसि. ॥ ४० ॥ यांसहवर्तमान, रघुनाथा, । अरिपुरी जिंकिसी, समर्था, । स्वप्न सरे-जागृतीं ऐसी वेथा । चिंतेची न्यर्जा, नृपती. ॥ ४१ ॥ ऐसीं कपिनाथाचीं वचनें । रामासि मानैतीं प्रीतिलक्षणें; । जैसें गुरुवचनामृतें पारणें । मुरुपनीमि होते. ॥ ४२ ॥ मग रघुनाथ म्हणे, 'गा प्राणसखया, । भाग्यास्तव जोडलासि, मित्रराया. । तुझियानि शब्दरसें माझी काया । शोका वेगळी झाली. ॥ ४३ ॥ माझा प्रतापअग्नि पेटला; । वरि तुझा विक्रमवायो साह्य झाला; । आता मुळार्थीहूनि अंतु पुरला । राक्षसवनवाडियेचा. ॥ ४४ ॥ मी आपुलिये वडवानळमार्गी । हा वरुणालयो करीन निपाणी; । जैसी अनावृष्टिदेशीं धरणी । शुष्क असे. ॥ ४५ ॥ ऐसा आवेशु आला रामा-मनीं; । आरक्तता उदेली राजीवलोचनीं; । मग हनुमंतातें अवलोकूनि । प्रश्न करिता जाला. ॥ ४६ ॥ अगा रुद्रा, तूं मारुतकुमर; । अद्भुत बळाचा मेरु; । प्रतापतेजाचा भास्करु; । चातुर्यनिधि. ॥ ४७ ॥ शत्रु जेथें वसती । करीं तेथें ज्ञानाची युक्ति; । तरि ते कैसी लंका निगुती । तें सर्व सांगे मज-पुढें. ॥ ४८ ॥ कैसी आहे दुर्गाची रचना, । माजी गुप्त किती निशाचरसेना । कवण स्थिती, ते विवेचना । समग्र सांग वहिला.' ॥ ४९ ॥ ऐसा नरेन्द्राचा आक्षेपीं । कर जोडी अंजनीनंदन कपि; । मग आपुलेनि मुखें निरोपी । वार्ता रावणपुरीची. ॥ ५० ॥ परिस, राया जगजेठी, । ते समुद्रामध्य बेटीं । अनिरमर्गी-

---

१ अ. विदारणी. २. अ. चिंतिमा तें, नृपति ३ ब मानती ४. अ राक्षसवाडियेचा ५. अ. देशरी धरणी अकस्मात असे ६. ब तेथें ज्ञानाची करूनि युक्ति. ७ ब. समुद्राचिमध्यें बेटी. ८. ब अनिरसाढ

करचना त्रिकूटा । विश्वकामयान केली. ॥ ९१ ॥ त्रिदश योजनें लांबी पाठारीं; ।' रुंदी द्वादश योजनांवरि; । तेथें उभविली लंकापुरी । नंदनवनासारिखी. ॥ ९२ ॥ महादृढ दुर्गांचिया पाळी । उंचा गेलिया अभ्रांजवळी;. । तयां बाह्य प्रदेशीं तळीं । परिघ खोली वेष्टीत. ॥ ९३ ॥ तया ,पाठारपर्वतावरि । चरियांची वेष्टित हारी; ॥ अनुपम्य तयांची कुसरी । शेषफणा ऐशा. ॥ ९४ ॥ पाची, गोमेद, वज्र, प्रवाळें । रत्नखचित तयांवरि कमळें; । चित्रविचित्र तेज आगळें । पंच रंगीं झळाळे. ॥ ९५ ॥ ह्या कनकचिरियाचे किरणीं ।.नभोमंडळीं निस्तेज तरणि; । लंकेमध्यें वाहे गवसणी । जैसे अग्नि शिखामय ॥ ९६ ॥ ,चहूं दिशां उजू चत्वारि द्वारें । भासती नभा ऐसीं थोरें; । जैसीं काळवक्त्रें भयंकरें । परातें दिसती. ॥ ९७ ॥ द्वारीं कलश, गोपुरें,, वर्तुळ । येकावरि येक रचिलीं स्थूळ । जांबूनदीं; रत्नखचित झळाळ ।.लावण्यमय दिसे. ॥ ९८ ॥ द्वारीं उभय कपाटजोड, । जैसीं झांकणीं निधानाआड. ।, तीं चित्रविचित्र पुरें कोड । पाहतां डोळ्यांसि. ॥ ९९ ॥ द्वारपाळ राक्षस महाधीर; । शस्त्रपाणि अहोरात्र चेईर. । जैसे ते काळाचे म्हणियार । अति भीम विक्राळ मुखें. ॥ ६० ॥ पूर्वद्वारींचे राखणाईत, । संख्या त्याची येक अयुत । महामेघवर्ण, शुभ्रदंत, । वायो नेदिती प्रवेशों. ॥ ६१ ॥ उत्तरद्वारपाळ निशाचर, । अर्बुद संख्या महाक्रूर, । शस्त्रेंवांचूनि कोणाचे कर । देखिले नाहीं नेत्रीं. ॥ ६२ ॥ पश्चिमद्वारपाळ येक अर्बुद । सुरापानी, सुरारि, क्रूर; मंद, । तयाचे निरंतर कर स्कंध । गदामुद्गलमंडित. ॥ ६३ ॥ दक्षिणद्वारींचे रक्षक नियुत; । विरूपाक्ष, विकटबाहु, गदानाथ, । बलाढ्य, स्थूळ जैसे पर्वत, । अव्यग्र बैसले तेथें. ॥ ६४ ॥ राजधानींचें मध्यमंडळ, । तेथें शतांचें सहस्त्रदळ । संख्या केली असे सकळ । वाल्मीकिऋषेश्वरें. ॥ ६५ ॥ आपुलेनि पुरुषार्थपणें । सेना पाळिली रावणें । तिची संख्या कराबी कवणें । रथगजवोडियांची? ॥ ६६ ॥ लंकावासियांचीं निजमंदिरें । सुसीतळें, रम्य, मनोहरें, । सुवर्णमयें, दीर्घें, सुंदरें, । नानाविधें विचित्रें. ॥ ६७ ॥ मुख्य राजगृहींची रचना । पाहतां,, उणीव चित्ररथरचना. ।

---

१. अ. रसाळ. २. ब. लंका कुसरी. ३. ब. शेषवल्लीपर्णा ऐशा. ४. अ के वाहे मध्यें गवसणी । जैसी अग्निशिखांमध्यें. ५. ब. उदासें.
६. अ. शतांचीं. ७. ब. महाअद्भुत वस्त्री. ८. ब. मार्गे जीवांसि विश्रांतिपरें.

अशोकवाडिये पद्मनयना । तेथें सीता असे. ॥ ६८ ॥ चंद्राआ मेघाचीं पडळें, । निधानाचे स्थानीं मूर्ते विशाळें, । तैशी जानकी रक्षिले खळें । महानिशाचरीं. ॥ ६९ ॥ ऐसी रावणपुरी लंका । म्यां देखिली रघुकुळटिळका. । मग ते दग्ध केली, जैशा शुष्का । राशी इंधनाचिया ॥ ७० ॥ रिपुराजधानी ते लंका, रघुनाथा, । अप्रयासें जिंकाल, समर्था. ऐसें बोलोनि कपि खालता माथा । मौन्यमुद्रेसीं राहिला. ॥ ७१ ॥ ऐसे हनुमंताचेनि वार्तापंथें । लंका जाणितली रघुनाथें. । मग सुग्रीवा सन्मुख स्वपमार्थे । वचनें बोलता जाला. ॥ ७२ ॥ पुंर्ण फळा आलिया पेरणी, पुढां इच्छा करिती सवंगणी; । तैसा अरि युद्धीं खंडूनि बाणीं । राशी (?) करीन खळांची. ॥ ७३ ॥ भूतें प्राशावयालागुनि । इच्छीत. असे प्रळयवन्हि; । तैसी तृष्णा असे माझिये मनीं । राक्षसवधाची होय ती. ॥ ७४ ॥ अहो सुग्रीवा, वानरेश्वरा, । अवघे चला निरुतारा; । सेना येकवटा, जितुकी हीरा । वमली शाखामृगांची. ॥ ७५ ॥ ये समयीं असे विजयकाळु । मुहूर्तसाधनीं न लावी वेळु, । अंबरीं निरभ्र, निर्मळु, । माध्यान्हींचा सूर्यो. ॥ ७६ ॥ उत्तराफाल्गुनी असे नक्षत्र, । हें सर्वार्थी जयपत्र; । तृतीयेचा चंद्रु अमोघ, पवित्र, । प्रयाणीं आम्हां सिद्धि होय. ॥ ७७ ॥ सांगा शीघ्र नीळसैन्यनाथा, । 'शोधन करणें दक्षिणपंथा; । मग क्षेमें चालती चळथा । कपिपुंगवाचिया.. ॥ ७८ ॥ गज, शरभ, गवय, गवाक्ष, । गंधमादन, सुषेण, पनस, । हे मुख्य होऊनि हरिवाहिनी पक्ष । दोहीं भागीं चालावे.' ॥ ७९ ॥ ऐसी सीताप्रियो आज्ञा करी, । ते किष्किंधा-रावो मुकुटीं धरी; । जैसा त्रिनयनु इंद्रवचन शिरीं । वाहता होय. ॥८०॥ ऐसे उतावेळे ते निघाले, । जैसा चंद्र नक्षत्रांसहित चाले; । तैसे रामलक्ष्मणांमध्यें मिरवले । वानरवीरसीं. ॥ ८१ ॥ नीळसुग्रीवाचे आज्ञेन्तर । कुंचों फिरवी कपिपुंगव. । भुभुःकार देऊनि सर्व । दक्षिणमार्गे निघाले. ॥ ८२ ॥ देखोनि रामाचा प्रतापरवी । कपिमुखीं आली टवटवी; । आनंद हेलावे सर्व जीवीं, । जैसा सिंधुलहरिया. ॥ ८३ ॥ मुहूर्तें उठिला महीतळींकांतु ।

१. ब. पद्मान (ना) ना. २. ब. दुर्भार्थे ३. ब पूर्ण फळीं आली पेरणी । पुढें इच्छा करिती सवंगणी । तैसें अरिऔषधि संहार वाणीं । राशी स्थान गळीं.
४ अ चंद्रसूर्यो ५ अ कुचावले

तयासि स्कंधीं वाहे हनुमंतु, । जैसा ऐरावती चौदंतु । इंद्रासि घे पृष्ठीवरि. ॥८४॥ महाविष्णूसि वाहे खगेश्वरु, । कीं नंदीवरि बैसे शंकरु, । पुष्पकीं पूर्वी कुबेरु, । तैसा राम कपिस्कंधीं. ॥ ८५ ॥ ऐसियापरी भुवननाथें । हनुमंताचे स्कंधीं समर्थें । आरूढ होवोनियां दक्षिणपंथें । प्रयाण केलें. ॥ ८६ ॥ हंसाचे पृष्ठीवरि चतुराननु, । कीं अश्वारूढ अत्रिनंदनु, । नाना तो मूर्तिवंतु पवनु । मृगासनीं जैसा. ॥ ८७ ॥ अंगदाच्या स्कंधावरि । लक्ष्मण आरूढला ऐसिये परी. । वामभागीं रघुराजा समभारीं, । कपिचक्रातु चालला. ॥ ८८ ॥ ऐसे निघाले शीघ्रगति. । परिवेष्टित कपि कोण जाणे किती ! । इंदुसभवंते चालती । उडुगण जैसे. ॥ ८९ ॥ जिंकावया तारकासुरु । दर्वसीं चाले वज्रधरु, । तैसा कपींसहित सीतावरु । निघाला रावणावरि. ॥ ९० ॥ सर्वांपुढें नीळु सेनापति, । मागें कपिचक्रें चालती; । जैसे समुद्राप्रति धांवती । सरितांचे तुंबळ पूर. ॥ ९१ ॥ सेनामध्यमंडळीं दाशरथी. । त्यासन्निध्र दक्षिणपंथीं । वीर चालती पुरुषार्थी. । परिसा त्यांचीं नांवें. ॥ ९२ ॥ मुख्य सुग्रीव, किष्किंधराजु, । नळ, विश्वकर्मियाचा तनुजु, । जांबुवंतु जो पूर्वजु । ऋक्ष यातीचा; (१) ॥ ९३ ॥ गवय, गवाक्ष, द्विविदु, । गंधमादन, सुषेण, मैंदु, । पनस, केशरी, कुंभ, कुमुदु, । हे आत्मभारेंसीं. ॥ ९४ ॥ मारुतिवाहनाचां दक्षिणमार्गीं । हे प्रसिद्ध संनिध मार्गीं । वामें चालति वीर वज्रांगी, । इतुके एका. ॥ ९५ ॥ दधिमुखें, गोमुखें, पावकलोचनु, । गज, ऋषभ, सनादनु, । शरभु, प्रभंजनु हेमुकुट, नंदनु । जो पश्चिमनाथाचा, ॥ ९६ ॥ हे आत्मदळेंसीं इतुके जाण । श्रीरामा वामांगीं वीरगण. । पुढें चालती ते कोण कोण, । परिसा परम योद्धे. ॥ ९७ ॥ तळपन, ध्वजजंघ, क्रथनु, । विनतु, प्रमादि, रक्तलोचनु, । सुमुख, दुर्मुख, भीमवदनु । दीर्घशरीरी. ॥ ९८ ॥ हे वानर विक्रमरंगें । अंगलगेसीं अग्रभागें, । कृतांतातें म्हणती उगें, । चालती तरपाणि ॥ ९९ ॥ सिंहजितु, शार्दूलजितु, । अरिदहनु उन्मातु, । द भरतामजपृष्ठीसि चालतु । दळेशाचे आज्ञेस्तव. ॥ १०० ॥ किरणचक्रांतु गगनदीपु, । कीं सुरसमुदायीं वृत्रारिपु, । ज्या फेनधवलवपु । तो निजगणांत जैसा, ॥ १ ॥ ऐसा महीतळीं मनोहर । वानरवाहिनीमध्यें धनुर्धर, ।

१. ख. ज्याचें वहन धवलवपु.

देर्शादेर जो ईश्वर । मन्त्री ऐश्वर्याचा. ॥ २ ॥ अमित दळ प्रयाण स्माल्तां, रजीं भरलें व्योम, । यास्तव तेजोराशीचे रम्य । अंतें मं जाले. ॥ ३ ॥ प्रत्ययपातकाचें धुम्रभारितें । गवनगी धाविती पोकळतें, कपिपदधुमें दिसतें । दाटले तेंसें. ॥ ४ ॥ ऐसी चौरिशीं हरिवाहिनी । भ दाटली मेदिनी । फणी दडपला; शेषामनीं । भय, आश्चर्य वाटे. ॥ ५. कूर्म हृदयीं विचारितु । भार काय पां आजि बहुतु ! । नाकीं मंदार मागुत नावतु, । सकळ शैल्यसहितु. ॥ ६ ॥ वानर गर्जती भभुकारनादें. तेणें हेंलली दिग्गजाचीं पेदें. । खेचरांभूचरांचीं मदें । धैर्ये हीरोनि ठेलें ॥ ७ ॥ असंभाव्य वीरचक्र चालें; । वानर वानरापुढें वहिले । सहज परस्पें दाविते जाले । विक्रमाटोप पैं हा. ॥ ८ ॥ पायरां हाणोनि द्रुम पाडिती, । सवेंचि आकाशीं उड्डाण घेती, । येक मार्गींच्या शिळा झेल्ती, । नारिकेळी ऐसिया ॥ ९ ॥ तुळित चालिले भुजबळें. । म्हणती फरूं मेरूचीं हेकुळें । चरणघातें पैं पाताळें । काय दडपूं परतीं. ॥ १० ॥ ऐसा वाहिनीचा वाग्महिमा । परिसोनि सुरस श्रीरामा. । इंद्रियाचेनि भोगें निजे आत्मा । तैसा हरखत थाहे. ॥ ११ ॥ कपिसेनाश्री हेचि देवता, । अपूर्व ईची स्वरूपता. । प्रसंगें सांगेन सादराता । परिसा, पंडितहो. ॥ १२ ॥ सेनाश्रीचें शीर सुग्रीव जाणा, । अंगद किष्किंधयौवराणा, । नेत्र नळ, नीळु या खुणा । बुद्धिद्व का श्रोते ! ॥ १३ ॥ गवाक्ष आणि गवये । हे सेनाश्रीचें कर्णद्वय; । घ्राण गंधमादन, हृदय । सुषेण सर्वथा. ॥ १४ ॥ उदर सनादनु, नाभि मैंदु, । कुक्षी गजु आणि कुमदु, । कटी तो दधिमुख हा शब्दु । सहजचि आला; ॥ १५ ॥ हनुमंतु पवनात्मजु, । तो सेनाश्रीचा दक्षिण भुजु, । जांबुवंतु ऋक्षराजु, । वामवाहो बाणावा; ॥ १६ ॥ पनस, केसरी, जानु दोन्ही; । सुमुख, दुर्मुख, गुल्फस्थानीं; । शरभ, ऋषभ, वीर मेदिनी । चरण ते योजिले; ॥ १७ ॥ सेनाश्रियेचा आत्मा श्रीरामु, । मनु तो लक्ष्मण - हा नेमु, । हा जाणावा या स्वरूपाचा क्रमु. । भूषणें आतां बोलों. ॥ १८ ॥ धैर्याम्बराची कास घातली, । सत्वाची कंचुकी लेइली, । प्रतापाची खड्गलडी । मिरवली हस्तीं. ॥ १९ ॥ विक्रमाचें कंकण करीं, । जयाचें बीद भुजेवरि । यशोलक्षण शोभे शिरीं ।

१. अ कपिपदधुमें दिसतें दाटलें तेसें. २. अ. प्रतींत ही ओंवी नाहीं.
३. अ चालें. ४ अ दळली

प्याचियासारिखें ॥ १२० ॥ निर्भयाची घालूनि बुंथी । चालत आहों दक्षिपंथीं । उचंबळे हे मनोरथीं । वैरी वधावया. ॥२१॥ असो. मर्यादा सांडी सागरा सा गजरें चाले दळभारु; । तंव वचन बोलिला सीतावरु । सुग्रीवालक्ष्मणांसि. ॥ २२ ॥ 'लंकेसि जाताति हे द्रुमपाणि; । जरि मार्गु नेदी लवणपाणी । तरि याचें शोषण करीन बाणीं । अगस्तीनें केलें तैसें. ॥ २३ ॥ आम्ही चालिलों वैरियावरि । हे वार्ता श्रवण करील सुंदरी, । मग प्राणत्याग करितां ते अवसरीं । रक्षील आपणातें. ॥ २४ ॥ ऐकें, गा कपिकुळटिळका, । बाणीं निराक्षसी करीन लंका; । मग पावेन ते नायका, । मंजुळ, खंजनाक्षि' ॥ २५ ॥ तंव लक्ष्मण ह्मणे 'गा पूर्वजा, । रिपु वधिसी, रघुराजा, । कीर्तिसहवर्तमान जनकात्मजा । निज नगरासि नेवो. ॥ २६ ॥ आम्हांसि मार्गीं, अयोध्यापति, । जयोचिन्हें पहा मंगळें देती. । सेनेसन्मुख येतो मारुती. । अमोघ सुशीतळु. ॥ २७ ॥ अवरीं नाहीं मेघपटल, । शुद्ध दिसतें सूर्यमंडल, । अष्ट दिशा देती झळाळ । सूर्यासारिख्या भासती. ॥ २८ ॥ पूर्वदिशे जाती चाष, भरद्वाज; । शुभ शब्द करिती मयूर सहज; । आदरें स्फुरती दक्षिण भुज । आम्हा अवघियांचे. ॥ २९ ॥ ऐसीं चिन्हें पाहें, रघुनाथा, । जे जयासि सांगती सर्वथा; । हें वचन माझें न मानीं अन्यथा, । कृपेचिया महोदधि. ॥ १३० ॥ ऐसें लक्ष्मणशब्दाचें शयन । तेथें विश्राम पावलें रामाचें मन, । जैसें पंचाग्निसाधका तपन । शीतळ जीवनें जाळे. ॥ ३१ ॥ उल्हासें चाले कपिदळमेळु, । तंव पुढें देखिला विंध्याचळु । दृष्टीं न लक्षवे ऐसा विशाळु । विस्तीर्ण शृंगीं शोभतु. ॥ ३२ ॥ नाना जातींचे तरुवर, । फळीं, पुष्पीं, सचित मनोहर । परउपकारी सर्वस्वें उदार । नृपतिहानि आगळे. ॥ ३३ ॥ महाचक्रवर्तीच्या संपत्ति । तैशा लता आफळती; । चित्रविचित्र सुमनीं शोभती, । रुंजी करिती भ्रमर. ॥ ३४ ॥ द्रुम वाढिनले अति सरळे । मुक्ताफळासारिखे पोटेळे; । वायोसरिसे देती हिंदोळे । परस्परें शाखांसि. ॥ ३५ ॥ तरुवरातळींची भूमी । देखिली नाहीं सूर्याचा रश्मीं; । इतुका विस्तारु दाटला द्रुमीं । जैसीं जैसीं अभ्रें मिळालीं. ॥ ३६ ॥ तयामाजी पक्षिकुळें अपारें । नाना शब्द करिती

---

१ अ. मज लज्जा रवजनांची. २. अ. मगळदातीं ३. अ तास ४ अ निरतर. ५ अ. तरुवरांची

भनि गंभीरें. । विचरनि विशाळ वनचरे, । सिंह, शार्दूल गर्जती. ॥ ३७ ॥ ऐसा मार्गे भेटला विंध्यागिरि; । देखोनि वानर वेंघले तयावरी, । जैसे मेरूचा वहुन पाठारीं । निबुध वळघती. ॥ ३८ ॥ तेथें कपि गर्जिन्नले भुभु कारें, । अंबरीं पळालीं गिरगमवनचरें; । फळें वृक्षांचीं अपारें । रिपुगर्तीं भक्षिलीं. ॥ ३९ ॥ ऐसा विंध्याद्रि सांडूनि मार्गे । कपिसेना निघाली वायुवेगें; । पंथु क्रमिता देखिलीं शृगें । पुढें मलयाचलाचीं. ॥ १४० ॥ तया मलयाचळावरि वेंघोनि । निनादें पाठार पाहिलें लोचनीं; । पुनरपि चालिली कपिवाहिनी । दक्षिण मार्गे सिंधूचे. ॥ ४१ ॥ सेनेमहर्नमान सीताप्रियो । चालता पश्चिमे गेला सूर्यो. । होतु असता अस्तुसमयो । समुद्रतीर टाकिलें. ॥ ४२ ॥ वानरगण कोट्यानुकोटि । भार लोटले येक येका पृष्टीं; । दश योजनें समुद्राचां तटीं । सेनासमुदायो थोकला. ॥ ४३ ॥ तो दुसरा वानरसिंधु लोटला, । जळनिधीसि भेटावया आला; । जैसा देवा दैत्याचा मेळा मिळाला । पूर्वी सिंधुमथनीं. ॥ ४४ ॥ पाहता ऊर्ध्व मध्यरात्रीं । गगन व्यापिलें नक्षत्रीं । तैसीं करूनिया धरित्री । वानरभारें राहिले. ॥ ४५ ॥ जैसे सिंधुभरितें वळें धावे, । तें मर्यादा देखोनि स्थिरावे । तयाचे परी थोकले थेवे । कपींचे उत्तरपारीं. ॥ ४६ ॥ पुढें सागरु देखिला तुंबळ । व्योमासारिखा महाविशाळ. । लहरियामागें लहरींचा उसाळ । जैसे गिरि उसळले. ॥ ४७ ॥ वडवडायमानें भीम गर्जे । तयाची उपमा तयासीच साजे । आणिका नद नदियासि देइजे । तरी तो जळनिधी जाणा. ॥ ४८ ॥ तेथें असल्यान जल्चर, । कूर्म, मच्छ, नाडेलावज, मगर । जैसे उलथले गिरिवर. । तैसे वळें उसळती. ॥ ४९ ॥ अवलोकिता परस्थान । जळीं बुडालें दिसे गगन, । जैसें मायाचक्रें त्रिभुवन । वेष्टिलें भ्रमें भासे. ॥ १५० ॥ ऐसा डोळा देखोनि सागरु । आश्चर्य करी श्रीरघुवीरु. । म्हणे पहा हो नद नदेश्वरु, । कपिराया, सौमित्रा. ॥ ५१ ॥ पाहोनि उच तटाकीं ठावो, । तेथें उतरला रघुरावो. । थोर कपींचा समुदावो, । सुग्रीवापाशीं बैसला. ॥ ५२ ॥ सेनापति पावकसुतें । स्वस्थानीं बसविलें कपिदळातें. । पर्वतासारखिया हरिपुंगवातें । सेनेप्रदेशीं ठेविलें. ॥ ५३ ॥ सिंधुलहरिया जळ उसळे । तेंचि पाहती कपींचे डोळे, । कोणाचें पातरा पातें न मिळे, । जक्ष खेचरांचें जैसें. ॥ ५४ ॥

१ अ धाव घेतली देखोनि वानरी २ अ घोर्वे ३ ब वृक्षांचीं तोडूनि.
४ अ उभे

कीं जैसे वैरागी महामुनि । अढळ बैसले पद्मासनीं, । तैसा [illegible] वारेलें मौनीं; । परस्परें न बोलती. ॥ ५५ ॥ या उपरी राम चापपाणी । सीतां-शोक ओठरी अंतःकरणीं, । मम बंधूसी विलापुवाणी । बोलता होय. ॥ [illegible] ॥ ऐकें, गा सौमित्रा, बंधुराया, । त्वरें पालाणूं वरुणाल्या, । शत्रूतें पाववीन पराजया । रणागणीं सत्य जाण. ॥ ५७ ॥ परी येक अवस्थे पीडे माझें मन, । व्यर्थ जातें कांतेचें यौवन, । हे महाहानीसमान । नित्य नित्य होतसे. ॥ ५८ ॥ जैसें पूर्ण असतां इंदुमंडळा । मग कृष्णपक्षीं तुटे येक येक कळा; । अमावास्येसि पाहतां डोळां । बिंबीं वसे शून्याकार. ॥ ५९ ॥ पर्जन्यकाळीं नद, नदिया । पुरें वोसंडती दों थडिया । पुढें शरदृतुंकाळ प्रवर्तलिया । जळ वोहटतें नित्य नित्य. ॥ १६० ॥ ऐसियेपरी मुग्धेचें । अहोरात्र तारुण्य वेंचे; । म्हणूनिया ते धन्य धन्य पुरुष भाग्याचे । अंतःपुरवासी. ॥ ६१ ॥ आतां सीतेपासूनिया मलयानिळु । मज लागो येऊनियां सुशीतळु, । तयास्तव विरहानळु । शम होईल अंगींचा. ॥ ६२ ॥ विष भक्षिलिया आहाळे जिव्हार, । वरि तीव्र उष्णें पीडे शरीर, । तैसी मज व्यथा होतसे थोर, । जानकीवियोगें. ॥ ६३ ॥ वैदेहिमुखचंद्रा आड । राक्षस अभ्र आलें दृढ; । तें मी प्रतापवातें तोडीन; चाड । मज जानकी पाहवयाची. ॥ ६४ ॥ कंदर्पानिलास्तव, लक्ष्मण, । अत्यंत आहाळण होतसे प्राणा, । जैसा सोमकांत रविकिरणा- । पासाव तप्त होतसे. ॥ ६५ ॥ जानकी अमृताची पुतळी । यौवनदशे मज वेगळी । तिचिया सुखाची नित्य नव्हाळी । स्वप्नप्राय मज जाली. ॥ ६६ ॥ सीतावर्णन किती करावें [1] । तीचें लक्षण काय सांगावें [2] । सुरतरंग सगुण अनुभविला जीवें । तो आठवे अहोरात्र. ॥ ६७ ॥ सीता सौंदर्यपाठाणीची शोभे शर्वरी । कीं लावण्यसागरींची लहरी, । शृंगारवनींची साजिरी । कल्पवल्ली होय. ॥ ६८ ॥ कीं ते सामुद्रिक लक्षणाची करणी, । कीं ते यौवनगगनींची चांदिणी, । कीं ते कामचक्रींची योगिणी, । महासरिता नदीची. ॥ ६९ ॥ कीं ते सुकुमार तरूची सुमनकलिका, । कीं मंगलमंदिरींची नायका, । कीं ते नानासंभोगदायका । अंतरली, बंधु. ॥ १७० ॥ कीं ते चातुर्यद्वीपांतरींची निधि, । कीं ते कृपावल्लीची औषधि । कीं ते नानामनोरथाची सिद्धी, । प्राणप्रिया

---

[1] अ. वाढवी [2] अ. शीतकाळ. [3]. ब सांगोंचें.

जानकी. ॥ ७१ ॥ पूर्णानंदाचे पूर्णिमेसि । केधवां प्रकाशेल सीतावदन-शशि ? । मग माझिया चक्षुचकोरासि । पारणा होईल, बंधु. ॥ ७२ ॥ ऐसें अवस्थाभूत रामाचें मन । जागोनि माऊलें दिनमान. । पुढें काय जालें तें कथन । वाल्मीकि केलें असे. ॥ १७३ ॥ कृष्णदास मुद्गल म्हणे श्रोतयातें । प्रार्थितों आदरें बहुतें । लंकेसि वर्तलें तें येकचित्तें । परिसा पंडितहो. । ॥ प्रसंग २ समाप्त ॥

प्रसंग ३

ॐ नमो श्रीमच्चिदानंदाय नम । श्रीगुरु काशीराजाय नम । आन-ंदूनि या अख्यासुतातें । पूर्वी मारिलें हनुमंतें, । तया दुःखाचें दाटलें भरितें । देवी मंदोदरीच्या हृदयीं. ॥ १ ॥ ते नगरनृपतीची शेंतुरी । पडली चिंतेच्या सागरीं, । मग बिभीषणा ते अवसरीं । मंदिरासि बोलाविलें. ॥ २ ॥ बृहस्पतीसि बोलावूनि । जैशी शची बोले सुवचनीं, । कीं हिमाल्याची नंदिनी । नंदीप्रति वदे, ॥ ३ ॥ तैसी देवी मंदोदरी । देवराप्रति ते अवसरीं । बोलती जाली देंदरीं । जो भावो होता. ॥ ४ ॥ म्हणे, अहोजी धर्ममूर्ति, । बिभीषणा, नैर्ऋत्यपति, । मी पीडिलें चिंतेचे आवर्ती । तो परिसा अभिप्रावो. । ॥ ५ ॥ लंकानाथें तामसभक्ति । पूर्वी प्रसन्न केला गिरिजापति, । तपास्तव प्राप्त जाली संपत्ति । छप्पन्न युगांची. ॥ ६ ॥ ते हे भोगितां ऐश्वर्यदशा । सर्वेंचि उठिला विघ्नवळसा । जैसें सवटता वेळूवंशा । दाहकु प्रगट होये. ॥ ७ ॥ राया विषयाचें आवडा, । अविवेकें बुद्धि केली कुडी । सीता काकुस्थभार्या बापुडी । हरूनि लंकेसि आणिली. ॥ ८ ॥ तो सीताप्रियो धर्मात्मा रामु, । भुवनैत्रयीं नरामध्यें उत्तमु, । उडुगणामध्यें जैसा सोमु, । पौर्णिमे निशीचा. ॥ ९ ॥ रामें काय केला अपराधु ? । मग रायें आरंभिला विरोधु, । छेदों बोलाडूनिया सिंधु । चोरोनि आणिली सीता. ॥ १० ॥ ऐसें निंद्य कर्म नृपतीस घडलें. । रामा आणि जानकीसि विरहिलें । जैसें लुब्धकें पैंसीं गवसिलें । मृगीरोंढें मृगीनें. ॥ ११ ॥ तें दंपत्यें एकमेक । अहोरात्र प्रेमनी शोकें । जैशी निशा जालिया चक्रवाकें । दुःखियें दोहीं तीरीं ॥ १२ ॥

---

१. मंदोदरीनें २ बोले ३ अ भवनीं ४ अ 'अहो' हा शब्द नाहीं. ५ अ, लंकेनायकें केली तामस भक्ति ६ अ उत्क ७ ब भुवनीं नरामध्यें उत्तमु ८ क पौर्णिमेचा ९ ब केला १० ब पाश बंदिकासि ११ ब अहोरात्रि शोक करिती दुःखें १२ ब दुस्तर

परि तें चक्रवाकि करुणास्वरें । विघडलींच बोलती परस्परें; । पुढें प्रभात जालिया आदरें । येके ठायीं मिळती. ॥ १३ ॥ ऐसें ही तया दोघांतें नाहीं. । रामु नेणे कोठें वैदेही । पडलीं दुःखसरिते प्रवाहीं । ऐसें कृत्य रायें केलें. ॥ १४ ॥ सीता हरिली येणें दोषें । विघ्न उदेलें वानरवेषें, । रत्न निर्दाळिलें अखया ऐसें, । दाहो केला नगरीचा. ॥ १५ ॥ परकांचन, परांगना, । येस्वथीं रमे वासना, ते दीर्घदोषिये नाना । विघ्नें अरपड होतीं. ॥ १६ ॥ शिळा बांधोनि वक्षस्थळीं । उडी घालिजे अक्षोभ्य जळीं, । कैसेनि पाविजेल पैल. माळी । तुंबळ जळ पुराचीं ! ॥ १७ ॥ विष भक्षिलिया क्षुधा हरली, । वन्हिदायनावरि काया निवाली, । परस्त्रीअभिलाषें कीर्ति जोडिली, । हें श्रवण जालें नाहीं. ॥ १८ ॥ जरि नांदावयाची चाड तुम्हां । तरि जानकी नेऊनि द्यावी श्रीरामा । हें न करितां सर्वथा संग्रामा । मध्यें आटती राक्षस. ॥ १९ ॥ तरि, बिभीषणा, तूं धर्मिष्ठु, । महापंडितांमध्यें श्रेष्ठु, । राक्षसराजा बुद्धिभ्रष्टु । तुम्हीं विवेकें शिकवावा; ॥ २० ॥ मदें मातला महादंती । वरि अंकुशें आरूढले आवरिती, । तैसा लंकानाथ धर्मनीती । वळी परमार्थेसोई. ॥ २१ ॥ भरतें भरले सागरीं । तें ओटी पाहे पृथ्वीवरि, । पुनरपि तो मर्यादा थांवरी, । तैसा बळीराजमदु. ॥ २२ ॥ त्यां जरि शिकवावा दशग्रीव, । मज न बोलवे भयास्तव । रायासन्मुख राक्षस सर्व । अधोदृष्टी बोलंगती. ॥ २३ ॥ राहोवदन देखोनि शशांकु । कंपायमान, षोडशकळिकु, । तैसा दशमुख पाहतां साशंकु । मन माझें होतसे. ॥ २४ ॥ ऐसी देवी मंदोदरी । बोले धर्मनीतीच्या उत्तरीं. । परिसोनि अति आश्चर्य करी । बिभीषण मनामाजी ॥ २५ ॥ बिभीषण म्हणे, 'वो राजकांते, । महापवित्रे, पतिव्रते, । बरवें बोलिलीस, वो ज्ञानसरिते; । हृदय निवालें माझें. ॥ २६ ॥ तूं जें सांगसी मंदोदरी । मज मानसीं ऐसेंचि अवधारीं; । आतां धर्मनीतीच्या उत्तरीं । बोधवीन नृपतीतें. ' ॥ २७ ॥ ऐसे बिभीषणाचें वोलें । मन मंदोदरीचें आनंदलें; । जैसें वैद्यें अभया दिधलें । तेणें व्याधिग्रस्ता संतोषे. ॥ २८ ॥ बिभीषण म्हणे आपुल्या मनीं । जे 'हे, मंदोदरी रावणाची राणी । हे विवेकाची करणी ।

---

१. च येस्वार्थी होय रम्य ज्याची वासना २ अ नदीत हा शब्द नाही.
३. ब. धर्मनिष्ठ ४. भरे मध्ये ५ अ तो देखोनि मर्यादि सावरी ६ ब. मानीं.
७. अ. ज्ञान कांत. ८. अ. हा शब्द नाही ९. अ. तेणें हा शब्द नाहीं !

जैशी क्रूरकर्मावरीं शांति, क्षमा[1] ॥ २९ ॥ मग आज्ञा मागोनि बंधुप्रिये । बिभीषण निजगृहासि जाये, । बिभीषणें केलें काये । प्रात:काळ जालिया. ॥ ३० ॥ राजानुज्ञ तो धर्ममूर्ति । निघाला रावणगृहाप्रति, । जैसा प्रवेशला बृहस्पती । इंद्राचे निजमंदिरीं. ॥ ३१ ॥ ते राजभुवनींची रचना । पाहता पारणें होय लोचना. । मुख्य नांदणूक दशानना । पुत्रकलत्रासहित. ॥ ३२ ॥ केवढें, हो, दैवाचें गौरव ! । रावणराज्याची लावण्यठेव ! । स्वर्ग सांडूनिया देव । सेवावृत्ति करिती ! । ॥ ३३ ॥ नाना रत्नें जडिलीं कुसरी । रावण बैसे त्या सिंहासनावरी. । अपूर्व भोग किन्नरीं । ते काळीं आरंभिले. ॥ ३४ ॥ उंच पर्वताचीं शिखरें । तैसीं मुकुटमंडित दाही शिरें, । नेणों, नेत्रांमध्यें स्थानर । वसिजे भयास्तव. ॥ ३५ ॥ प्रचंड शाखा लागल्या द्रुमा । तैसी दोर्दंडासि उपमा, । सर्वां जैसी कालिमा । तैसी शोभे अंगकांति. ॥ ३६ ॥ चर्चित उटी चंदन आरक्त, । अलंकार लेइला रत्नखचित. । आभरणें दिव्यांबरें, श्वेत, । ऐसा असे लंकानाथु. ॥ ३७ ॥ तव बिभीषण आला ते अवसरीं । करद्वयें प्रणिपातु[2] करी, । राक्षसराजा याउपरी । आज्ञा दे बैसावया. ॥ ३८ ॥ आला प्रधानांचा समुदावो, । तेही नमिला प्रीतीनें रावो. । मग जो जयाचा अधिकारठावो । तेथें ते बैसले. ॥ ३९ ॥ [3]ते सर्वही पूजिले किन्नरीं, । तांबूल दिधले हडपेकरी, । तव बिभीषण ते अवसरीं । उपक्रम करी बोलाचा. ॥ ४० ॥ पुढें प्रेरूनि धर्मकथा, । अवलंबूनिया परमार्था, । बिभीषण म्हणे ' लंकानाथा, । परियेसीं सुचित्त. ॥ ४१ ॥ ज्या समयापासूनि, राया, । लंके आणिली रामभार्या, । तेथूनि सागती महद्भया । अरिष्ट बहु जाले. ॥ ४२ ॥ हुताशनु मंदु जाला, । प्रासादीं नित्य कलहो आरंभिला, । परिवार सर्वांचा जाला, । चतुरंग कैसा ॥ ४३ ॥ गजमदें मातले सकळ । तुरंगम जाले हो निर्बळ, । भंगलें पदातीं दळ, । रथ आणि जडजात ॥ ४४ ॥ सभामंडपीं न दिसे शोभा, । खचित रत्नांचि लोपली प्रभा । अहोरात्र शोकयुक्त नभा । उगलियाच होती. ॥ ४५ ॥ वर्षे कोरडी मेघांची पटलें. । निर्धी दिसती सोमसूर्यांची मंडळें । पतित सर्व

---

१ ब गंधर्व

२ अ येऊन लागे ३ अ तव विडे दिधले हडपेकरीं । तव बिभीषणु उपक्रम करी । वर जाइन उत्तरीं बोलावयाचा ॥ ४ ब सामर्थ्यमंडल

नक्षत्रें सकळें । अवरीं भासती डोळा ॥ ४६ ॥ धुरधीळया अष्टही दाही दिशा । सागरु फेनावला कैसा, । न्याहळिता ऊर्ध्व आकाशा । काहु दिसे निरंतर ॥ ४७ ॥ लंकानगरी दिसे उदास, । शुष्क काष्ठीं वैसरती वायस, । दिवसा उलूकें महुरस । तुंगीं वैसोनि बोभाती ॥ ४८ ॥ भालुका भुकाति योरटे नादें, । पिंगळे रवति अशुभ शब्दें, । महाद्वारीं मृगें क्रव्याद । गर्जन करिती ॥ ४९ ॥ ऐसें अशुभ अरिष्ट उदैलें, । शांतिप्रायश्चित्त पाहिजे केलें, । तरि सर्व राज्यासि होईल भलें । यथार्थ, जी नृपति ॥ ५० ॥ तरि शान्तिप्रायश्चित हेंचि करावी, । जे वैदेहा रामासि द्यावी, । ऐसी जगीं कीर्ति उरावी । धर्मबुद्धि करूनिया " ॥ ५१ ॥ ऐसें बिभीषण बोलिला । ऐकता रावणास कोप आला, । जैसा वैश्वानर प्रजळला । वारियाचेनि मेळें. ॥ ५२ ॥ बिभीषणाचीं धर्मवचनें । रावणें उल्लिलीं अभिमानें, । जैसा धार्मिकासि दुर्जनें । मिथ्या दोष लाविजे ॥ ५३ ॥ रावण म्हणे, ' बिभीषणा, । माझिया प्रतापें येमु आकणा, । विबुध जिंकिले आगरणा । हें तुवां डोळा देखिलें ॥ ५४ ॥ केला केला वैश्रवणु देशघडी, । लंका, पुष्पका घेतलें प्रौढी । ऐसी माझ्या प्रतापाची गुढी । तपे मुगुटीं सूर्याचे ॥ ५५ ॥ नदी चाले सिंधूनु उगमा, । पश्चिमे उगवे चद्रमा, । तरि जानकी दे मागुती रामा । जाण तूं बिभीषणा ' ॥ ५६ ॥ ऐसें बोलिला दशवक्त्र, । अग्निकुंडासारिखे नेत्र । तव त्या आठवलें चरित्र । तया हनुमंताचें ॥ ५७ ॥ म्हणे, अहो, आले येक वानर, । अखया वधूनि जाळिलें नगर, । देवा अजिंक्य हे निशाचर । परि न जिंकवे तयातें ॥ ५८ ॥ करूनियां जानकीची शुद्धि, । लंघोनि गेला महोदधि, । ऐसी त्याची विचारबुद्धि । ये काळीं प्रधानहो ॥ ५९ ॥ रिपु न्हस्व अथवा थोर, । परि त्याचा करावा विचार, । तिळतुल्य वैश्वानर । वाढता, वेळु न लागे. ॥ ६० ॥ उत्तम, मध्यम, अधम, । हे, हो, त्रिविध पुरुषधर्म, । आता जे जयासि बुद्धि परम । ते सांगा आम्हाप्रति ॥ ६१ ॥ तंव राक्षस म्हणतो, लंकानाथा, । रिपु-

---

१ ब धुधरलिया आष्टही २ अ वसरता ३ ब मिळणी ४ ब एशीं वि० ५ अ मेह ६ अ तों ७ अ आलें हात ८ अ निर्जीव हात ९ ब अद्यापि नाहीं गज शुद्ध । ये काळीं परधाडा ॥ १० ब यांत दुसरा चरण नसून रा आहे ऐसें स्वाम। सवथा

मंत्र विचारणा वृथा । जंवुकीं सिंह साधिला हे कथा । श्रवण जालें नाहीं ? ॥ ६२ ॥ चित्रीं चित्रकरें लिहिली चमू, । ते उठोनि करी सग्रामु, । तरि शाखामृग आणि रामु । लंकेवरि चालती. ॥ ६३ ॥ तुम्हीं स्वर्गींचे जिंतिले निर्जर, । आणि भूमंडळींचे नृपवर, । पाताळीं नागचवार त्यासि केला पराजयो. ॥ ६४ ॥ हा उतरोनि महोदधि, । तुम्हासि राम जिंकेल युद्धीं, । तमें काळवंडे तेजोनिधि । तैंच हें घडों शके.' ॥ ६५ ॥ याउपरि बोलें प्रगल्भु । प्रहस्तु नामा, महानितंबु, । मंत्रियामध्यें मुख्य मानु । राक्षसराजें दिधला. ॥ ६६ ॥ प्रहस्त म्हणे जी चक्रवर्ती, । रविकिरें व्याप्त जितुकी क्षिति, । तेथें न देखों येकही नृपति । तुम्हातुल्य प्रतापी. ॥ ६७ ॥ राया, तुझियानि संकल्पें, । आणि मी आपुले-नि प्रतापें । मेरुप्रदेशींचीं सातही द्वीपें । निक्षेत्री करीन. ॥ ६८ ॥ मृगजळाचेनि महापूरें । बुडोनि विरती गिरिशिखरें, । तरि तें नरवानरें । जिंकों शकती युद्धीं.' ॥ ६९ ॥ ऐसें प्रहस्त बोलों सरे, । तंव दुर्मुखासि आवेशु न वरे, । रावणासन्मुख बोलता त्वरें । पुरुषार्थवचनें. ॥ ७० ॥ "परियेसीं नगरनायका, । जेणें कपीनें जाळिली लंका. । आणि वधिलें कुळटिळका । अक्षया कुमारासी. ॥ ७१ ॥ तोचि वानरु दावीं अन्याई । आता शोधीन असेल जे ठाईं, । तो खंड खंड गदाघाईं । करीन तिळतुल्य सर्वांगीं. ॥ ७२ ॥ वज्रदंष्ट्री बोले याउपरि । 'राया' प्रतिज्ञा माझी अवधारीं । तुझिया शत्रुसमुदायासि पुरी । दाखवीन यमाची. ॥ ७३ ॥ अग्निहतु म्हणे 'जी नृपवरा, । मीं तव अंतकु दुसरा, । मनुष्य, कपि, मैंज आहारा । निर्माण जाले निर्भ्रांत. ॥ ७४ ॥ मी आपटीन पाणिप्रहारें । फोडीन अष्टकुळाचळाचीं शिखरें. । तेथें बापुडीं नरवानरें । मारिता काय शका ? ॥ ७५ ॥ अरे. रजनीचरहो, तुम्हीं । क्रिया भोगीत रहा आश्रमीं । शत्रुसंग्रामीं ये काळा मी । रानाझिन जाईन ॥ ७६ ॥ आगळें बोले अग्नितनु. । ऐकोनि मनीं दशाननु । तव कुंभकर्णाचा नंदनु । अनुवाद करी. ॥ ७७ ॥ राया न अरण्यचरें, निरंकें, । यांवरि काय बोलों आगळें । विरंचीअंड हें येकवेळे । सर्वांगसरीं खिळीन. ॥ ७८ ॥ तंव निकुंभ म्हणे, 'जी नृपती, । फट उद्धरे माझिये हातीं, । माझें मन अहोरात्र चिंती । संग्रामाचा समयो ॥ ७९ ॥ सिंहाचेनि चपेटप्रहारें ।

१ अ नरवानरजितें २ च काळ ३ ब माझिया ४ अ महर्ज

मातंगगाढस्थळें होतीं चूरें, । तैसें पीठ करीन कपींचीं शिरें । मुष्टिघातें करूनिया ॥ ८० ॥ तंव सरभु बोले पुरुषार्थशब्दें, । 'अहो, माझीं सुरवर चरि आर्दे, । तेथें बापुडीं नरकपिवृंदें । मशकासमान ॥ ८१ ॥ येमहनु, सतघ्नु, महोदर, । हे रायासन्मुख बोलती क्रूर । म्हणती, "वार्णी फोडून अमर । पाडू पृथ्वीवरि." ॥८२॥ तंव अनुवादे इंद्रजितु । सुरारि, प्रतापी, पंडितु, । 'सांडा, रे वीरहो, मिथ्या मातु, ।सुखें बोळगा रायातें ॥८३॥ मज इंद्रजिता असता । तुम्हास कायसी शेनूची चिंता? । निर्जरासारिखे तुम्हा देखता म्या । जिंकिले समरांगणीं ॥८४॥ तरी ते दशरथाचीं लेंकुरें मेळवूनि येताति वानर, ।प्राणातें मुकवीना एके शरें । गुणीं न लावीन दुसरा ॥ ८५ ॥ राया लघूनिया जळनिधि । वानरु आला लंकेसि बुद्धि, । केली जानकीची शुद्धि, । तें सर्व भ्रांत होतीं ॥ ८६ ॥ केलें होतें मदिरापान, । चचळचर्मी पडलें मन, । झांपेडिया खिळिले लोचन, । ऐसा होता तो काळु ॥ ८७ ॥ तें वानरें अखयातें वधिलें, । अवचट अघटित घडलें ! । धेनूचेनि पुत्रें डिंगिलें । व्याघ्रासि जैसें ॥ ८८ ॥ गेला घेतली थोर, मर्कटें, । लंका दग्ध केली कपटें, । कृष्णवर्ण करूनिया मुखवटें । पळोनि गेलें ॥ ८९ ॥ तो जरि भेटे मागुता वानरु । तरि मुखवातेंचि भस्म करूं, । तयावरि घेइजे हालिथेरु । हेंचि उणीव आमुतें ॥ ९० ॥ ऐसें बोल्ती निशाचर सकळ, । महाक्रूर, दुरात्मे, खळ, । शस्त्रपाणी, ते तत्काळ । उभे राहिले आवघे ॥ ९१ ॥ 'आज्ञा दीजे, लंकानाथा । निरचीगोळ घालू पाल्था, । नेली क्यातें पावनू व्यथा, । सूड घेऊ कुमराचा' ॥ ९२ ॥ ऐसें बोले मंत्रि पाचा समूहो । इच्छित अंतवे अरिनिग्रहो । तंव बिभीषण म्हणे, प्रधानहो,। वैसा वैसा स्थिर स्थिर ॥ ९३ ॥ राजा राजश्रियेस्तव विवेक नेणें । म्हणोनी मंत्रि असावे शाहणे, । तरि तुम्हामध्यें धर्मनीति जाणे । ऐसा एकही न देखों ॥ ९४ ॥ वातचक्रभ्रमे भूमंडळीं । तेणें रज उधळती अंतराळीं, । तैसे प्रचंड पाषाणशिळीं । केसेनि उडिनैल ? ॥ ९५ ॥ तुम्ही दृष्टीं नाणा तो वानरु । जो शतयोजनें उतरला सागरु, । जैसा पर्वत शृंगें दिनकरु । लघूनिया जात असे ॥ ९६ ॥ हनुमंत आला जे अवसरीं । तें कायि निरीक्षसी होती लंकापुरी ? । म्हणोनि तुम्ही प्रतापाचा उत्तरीं ।

---

१ अ सुरप्रतिनापपडितु २ अ शत्रुचिंता ३ ब शापडा पडले ४ अ कृष्ण ५ अ समुदाहो ६ अ प्रतीत हा शब्द नाहीं ७ ब पाचिरिया

बोलविलों नृपतीनें ॥ ९७ ॥ उभे ठाकून रावणासमोर । मग वीज बोलिले उत्तर; । तरिच पुरुषार्थाचें शिखर । त्रिभुवनीं वर्णीजे ॥ ९८ ॥ आगमन जयाचें ऐकोनि । तेचि परतोनें दृष्टी न आणी. । मग रामासी देखोनि रणीं । पृष्ठी दावी आपुली. ॥ ९९ ॥ त्या येकल्या रामदूतें । थोर ख्याति केली हनुमंतें. । ते समर्थी सत्यें निश्चित्य । काय तुमची होती ? ॥ १०० ॥ कद्रूनें जिंतिली विनता माये । तें गरुड गेला अमरालये; । सुरांस अमृत साधूनि, कार्य । सिद्धी नेलें आंगवणें. ॥ १ ॥ तयाचिपरी तेणें कपि-वीरें । सीताशुद्धी केली रणरंगधीरें. । वधिला अखया आणि वनकरें, । दाहो केला नगरीचा. ॥ २ ॥ येवढें तया एकलें याचें बळ; । ऐसें असंख्यात कपिदळ; । तें आलिया शोधील मूळ । त्रिकूटाचळाचें. ॥ ३ ॥ अरे, जंव वानरवीरीं तेहीं । लंका पुरी देखिली नाहीं, । तंव तुम्ही द्या, रे, वैदेही । दशरथात्मजाची. ॥ ४ ॥ तुम्ही भले मंत्री बुद्धिवंत, गा, । रायासि धर्मनीति सांगा; । जेणें थोरीव ये आंगा । कीर्ति आणि येशाची. ॥ ५ ॥ अहो राजया, नगरनाथा, । मज बोलतां न मनीं अन्यथा. । परस्त्री आणूनि वृथा । विग्रहो आरंभिला. ॥ ६ ॥ ऐसे बंधूचेनि उत्तरें । मौन्य धरिजे दशशिरें, । पूर्ण भरिलें जैसें सागरें । आवरिजे ठाईंचा ठाईं ॥ ७ ॥ मंदावला मानसींचा उत्साहो; । मग उठिला राक्षसरावो; । सारमा मंत्रियाचा समुदावो । महामंडपा निघाला. ॥ ८ ॥ राया रावणाची दशवक्त्रें । त्रिभुवनीं जनीं आल्हादित छत्रें । पूर्ण इंदु ऐशीं शुभ्र विचित्रें । कळस रत्नखचित ॥ ९ ॥ सारथि रथ केला सज्जु. । रत्नखचित तेज पुंजु. । तेथें स्थावर असे ध्वजु । श्वेतांकुशीं मंडित. ॥ १० ॥ धुरे जुंपिले अश्वोत्तर । ते पृथ्वीस न लागती खूर । चलाढ्य पुढील आणि सुंदर । अपूर्व शृंगारिले. ॥ ११ ॥ ऐसिये रथीं लंकेश्वर बैसे । राक्षस चालिले तयासरिसें । जैसे किरण पश्चिम दिशे । जातां वेष्टिती सूर्यातें ॥ उभयभागीं चाले चतुरंगवाहिनी, । जैसे खगेश्वराचे पक्ष दोन्ही. । वाजिन्नलीं वाद्यांची ध्वनी । तेणें कर्ण बधिरावले ॥ १२ ॥ मिरवत जायसे लंकानाथु । शोधिला संपूर्ण राजपथु. । वाहिनीवेष्टित नृपनाथु । भेटपद्दारीं पातला.

१ अ. नीट असावें २ ब. मनीं हा शब्द नाहीं ३. ब. न मानावी व्यथा. ४. अ. परि जानकी ५ अ मद्ला ६ ब. चालला. ७ ब. सभामंडपाप्रति पाहो पात्रे त्वरकरूनि या ८ ब मनात ही ओंवी नाहीं ९. अ. श्वेत तुरवर. १०. ब मनांत हा शब्द नाहीं

॥ १३ ॥ सभामंडपीं अनुपम्य शोभा । शुद्ध कामनिला जाबूनदगाभा, । रत्नजडित तयाची प्रभा । पडे लकेवरि. ॥ १४ ॥ ते मडपींचे मर्गजस्तभ । उंचिवे चुंबू म्हणती नभ. । तुळवट तोळवे स्वयभ । गोमेदाचे चौवारे. ॥१५॥ भूमि पाचीवरिनी घोटा. । भिंती सुवर्णाचिया सदटा. । सतरगीं चिंतारिला गोमटा । विरचीचा प्रपचु. ॥ १६ ॥ दिव्यांबराचे बांधले चादवे. । सोडिले मनोमुखवेंस बरवे. । नाना रत्नांचे मेळावे । अलोलिक गुफिले. ॥ १७ ॥ पाहता गाजीत्रिभुवना । निरोपम्य लकेची रचना, । आवलोकिती त्याचिया नयना । पूर्ण सुख होतसे ॥ १८ ॥ चित्रविचित्र मुडपे गादिया । घातल्या तेथें बैसा वया । रत्नजडित चाडरिया । ठाई ठाई असती. ॥ १९ ॥ मध्यामडळीं महाथोर । राजसिंहासन अति सुदर, । तयासि विश्वकर्मयाचे कर । स्वयें निर्मिते जाले. ॥ १२० ॥ वज्र, गोमेद, मौणिक, नीळ, । पाची, पेरोजे, वैडूर्य, प्रवाळ, । ऐसे नाना रत्नांचे झळाळ । जडिले शुद्ध हेमीं ॥ २१ ॥ मग रावण ते अवसरीं । येऊनि बैसे त्या सिंहासनावरि । अति अगळग निशाचरीं । उभे असिजे पृष्ठभागीं ॥ २२ ॥ रत्नखचित चाउरियावरि । मत्री बैसले उभय हारी । आणिकही कितियेक थोरथोरीं । अष्टकोनीं बैसिजे. ॥ २३ ॥ मेरू सभोंवते कुलाचल । अढळ राहिले, विशाल, । तैसे रायाप्रदेशीं सकळ । क्रूर राक्षस बैसले ॥ २४ ॥ कीं पाताळीं फाये वासुगी । परिवेष्टित वैसिजे भुजगीं, । तैसें रावणाचे पृष्ठ भागीं । निशाचर बेसले. ॥ २५ ॥ सर्व सभा झालियेवरि । उपभोग आणिले किन्नरीं. । लंकेनाथ पूजिला आदरीं, । अनुक्रमें येरा भोगु ॥ २६ ॥ नाना जातीचा गध उगळला । तो मद वायो भोगविता जाला, । तेणें सर्वांचा मनु निवाला । घ्राणेंद्रियाद्वारें. ॥ २७ ॥ असा जाला लकानाथा । हृदयीं धरिली बिपरीत व्यथा । पुढील कैसी वर्तेली कथा । त ऐका श्रोतेहो ॥ २८ ॥ वाल्मीकवाणी अमृतवल्ली । वहुत भाग्यें फळासि आली । हे ते रसैद्रुमीं पाहिजे सेविली. । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ १२९ ॥ प्रसग ३ समाप्त ॥

१ अ उचुवा २ अ विस्तारला ३ अ मुड ४ अ मांडलिया ५ ब आणि ६ पृष्ठीसि अ प्रवेष्टित ७ अ वेस ८ ब पृट ९ अ जाली १० वरा ११ अ लंकानाथ पूजिला बहुतावरी १२ ब घ्राणेंद्रियाचेनि द्वारें १३ अ ते हे रसवृत्ति सेवों वाहिला

प्रसंग ४

ॐ नमो श्रीमच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । सभाश्रेष्ठें दशाननु । अगाध गर्वे अभिमानु । पुढें पाहोनि प्रहस्त प्रधानु । तयाप्रति बोलत जाला. ॥ १ ॥ 'अगा प्रहस्ता, सुलक्षणा, । तूं मंत्रियामध्यें शाहणा. परि बहुत मतें विचारणा । केली पाहिजे ॥ २ ॥ लंकावासी जितुके निशाचर । नामाथिले थोरथोर, । जेहीं पराभविले निर्जर, । तयांसि बोलाउं धाडिजे.' ॥ ३ ॥ ऐशी लंकेशें आज्ञा करी, । ते शीघ्र प्रहस्त अंगिकारी. पुढें तिष्ठत होते कामारी । तयांसि प्रेरिता जाला. ॥ ४ ॥ प्रहस्त म्हणे राजदूतासि । नृपतीची आज्ञा जाली ऐशी । लक्षावध जितुके नगरवासी । ते वेगवत बोलाविजे. ॥ ५ ॥ असें प्रहस्तवचन वार्तिकीं । आदरें वेगिले मस्तकीं. । हेमदंड धरोनि हस्तकीं । शीघ्र निघते जाले. ॥ ६ ॥ अतिवेगाची मनोवृत्ति । लंघूनि त्या दूताची अधिक गति, । राक्षसांचिया गृहाप्रति । तात्काळ येते जाले. ॥ ७ ॥ राजदूत म्हणती, 'सुरारीहो, । सिद्ध करा सेनासमुदावो । महासभेसि शीघ्रें चला, हो, । विलंबु न लावावा. ॥ ८ ॥ तत्वता नेणिजे कवण्या कामा । नृपतीनें बोलाविलें तुम्हा । प्रहस्तें पाठविलें आम्हा । तरि आता चाला वेगीं.' ॥ ९ ॥ ऐसें ऐकता निशाचर । नामाथिले, थोर थोर, । वाहिनीवेष्टित, महाक्रूर, । सभेसि येते झाले. ॥ १० ॥ कुलाचलाचिये कंदरीं । तेथें प्रवेशती केसरी, । तैसे राक्षस मंडपद्वारीं । शीघ्र प्रवेशती वेगेंसीं. ॥ ११ ॥ नद नदिया लंघिती क्षिती, । थोर प्रवाहीं सागरीं मिळती, । तैसे राक्षस प्रवेशती सभामंडपद्वारीं. ॥ १२ ॥ नक्षत्रें चाळती आकाशें । ते लोपती पश्चिम दिशे, । तसा राक्षससमुदाव प्रवेशे । सभामंडपमध्यीं ॥ १३ ॥ दशाननाचा सोयरा बंधु, । त्रिशुधारि, महाप्रसिद्ध, । तो कुंभकर्ण वळें अगाधु । समर्थ आला सभेसि. ॥ १४ ॥ त्रैलोक्यासि न लेखी आगवणा, । मत्त्वासि मैत्री सुरगणा, । तो कुंभकर्ण नमूनि रावणा । सैंभेसि बैसता जाला. ॥ १५ ॥ कुंभ, निकुंभ, तयाचे कुमर, । पितयातुल्य बळवंत

१ ब प्रवेशोने २ अ देखिलें ३ अ महाबळवंत ४ अ दशग्रीव ५ ब बाहिल ६ अ नेशा दूतांची अति गती ७ अ अर्थानि हा शब्द नाहीं ८ ब लावावा सर्वथा ९ अ नेणवे कवण १० अ समुद्रीं रिघती ११ अ तैसे मंडपद्वारीं प्रवेशती । वेगेंसीं रजनीचर १२ ब द्वारीं १३ अ प्रतीत हा नाहीं १४ अ अर्थान हा शब्द नाहीं

धीर, । रायासि करोनि नमस्कार । सन्निध बैसते जाले. ॥ १६ ॥ तव आला राजज्येष्ठपुत्रु । इंद्रजित नामें शैलोरिशत्रु, । तेणें प्रणिपातोनि पितृ- । उन्मुख बैसता जाला. ॥ १७ ॥ अतिकाया, त्रिशिरा, महोदरु । विद्यु-ज्जिव्हा, विरूपाक्ष वीरु, । स्वामीसमेत परिवारु । सभेसि आले राक्षस. ॥ १८ ॥ कनकरथु रत्नजडित । वरि आरूढला पुष्पें पटित, । नामें बिभीषण विख्यात । सभें आला प्रधानेंसीं ॥ १९ ॥ नेत्रीं देखों राक्षसराजु । बिभीषणें नमिला पूर्वजु. । मग स्वस्थानीं नृपतीउजु । जाऊनिया बैसला. ॥ २० ॥ सभा घनदाटली निशाचरीं, । जैसे येकवटले महागिरी. । मग तया सर्वांतें किन्नरीं । नाना गंधीं पूजिलें ॥ २१ ॥ सभामंडित दशवक्त्रु, । जैसा सुरामध्यें सहस्रनेत्रु, । मग प्रहस्तेसि प्रगट मंत्रु । बोलता जाला स्वयें, ॥ २२ ॥ ‘ अगा ये प्रहस्ता, ये समयीं । पदातिदळातें आज्ञा देई, । अहो-रात्र महाद्वाराचेठायीं । तुवां रक्षणें ठेवावीं. ’ ॥ २३ ॥ ऐकोनि रायाचें उत्तर । प्रहस्तें निवडिले निशाचर. म्हणे, ‘ तुम्हीं राखावें महाद्वार । अव्यग्र होवोनिया. ’ ॥ २४ ॥ ऐशी प्रधान आज्ञा करी. । मग बळिये राहिले महा-द्वारीं. । शस्त्रें धरिलीं करीं । विकटरूप, विशाळ. ॥ २५ ॥ यानंतरें लंका-नाथु, । कल्पूनिया विषयाचा स्वार्थु, । म्हणे, ‘ आइक, गा प्रहस्ता. मनोरथु । अद्यापि फळद नव्हेचि. ॥ २६ ॥ वस्तु प्रयत्नें मिळविली । ते असताचि अलभ्या जाली, । तया क्लेशाची उरीच उरली । इतुकेंचि देखें. ॥ २७ ॥ प्रयत्न केलियांचें कोड पुरे । तरिच देहाचा श्रम उतरे, । नाहीं तरि अहो-रात्र भरणें भरे । हृदयीं महाशोकाचें. ॥ २८ ॥ म्यां रुपेनिया जळनिधि । जनकात्मजा आणिली बुद्धि, । परि तिचिया भोगास्तव व्याधि । मज घडला कामाचा. ॥ २९ ॥ भुवनत्रयीं मज पाहता । सीतेसारखी नाहीं वनिता. । ते मज वश होय, गा प्रहस्ता, । ऐसा करीं उपावो. ॥ ३० ॥ दोंचि पदार्थी माझा संकल्पु । निर्मूळ करावा राम रिपु, । सीतासंभोगाचा साक्षेपु, । इतुकेन कृतकृत्य. ॥ ३१ ॥ तुम्ही स्नेहाळ सर्व मजलागीं, । आणि असा रायाचे विभागी, । तुमच्या समुदायास्तव मी जगीं । काळाहूनि अधिक.

१ अ शक्रशत्रु २ च भयंकर ३ अ घनवट ४ ब वर्णे ५ अ पूजिले ६ ब उपरें ७ अ प्रतीत हा शब्द नाहीं ८ अ रजनीचर ९ ब मग मुद्गलद्वारीं । वितण्डा, विशाल १० अ नगरनाथु ११ ब केलया १२ च इतुक्यानें

॥ ३२ ॥ यक्ष, पिशाच, गुह्यक, किन्नर । सुरअसुरगण, विद्याधर, । मंजसीं झुंजतां त्यांचे, कर । जयानें पावलीना. ॥ ३३ ॥ तेथें काय म्हणविते नर वानर । शत्रु आम्हांते हे अपूर्व घोर । सिंहासि घटनी कुंजर । तरि ते पावती जयो. ॥ ३४ ॥ निशाचरांचे भक्ष्य मानवी । हें तों विधिनें निर्मिलें पूर्वी; । म्हणूनि रामासि जयोपदवी । मजपासाव नाहीं. '॥ ३५ ॥ ऐसें बोलिजे रावणें. । गर्वे ब्रह्मांड मानी ठेंगणें. । तुकें ऐकोनि कुंभकर्णे । बोलों आरंभिलें. ॥ ३६ ॥ ऐकें, राया गर्वनिधि, । विनाशकाळीं भ्रष्ट बुद्धि, । तयास्तव जोडे उपाधि, । ते प्राप्त करी दुःखातें. ॥ ३७ ॥ जगीनिंद्य जितुकें कृत्य, । तें अनहित आपुलेंच सत्य. । अकल्पित होईल विघ्न प्राप्त । येदर्थी संशयो नाहीं. ॥ ३८ ॥ विषमिश्रित भक्ष्य आणिलें, । तें मंदबुद्धीस्तव स्वीकारिलें; । तैसें, राया, तुम्हांसि घडलें, । ऐसें मज वाटत असे. ॥ ३९ ॥ नीतिधर्मे राज्य करावें, । हें तंव राहिलें असावें. । आतां संकल्प धरिला तेणेंनि जीवें । तोचि जाणा सिद्धी. ॥ ४० ॥ कुमंगळ केलें, लंकानाथा, । हेंचि सुफळ हो, गा समर्था. । तुज मानसीं उद्भवली व्यथा । ते पावसील शेवटीं. ॥ ४१ ॥ उत्तम, मध्यम, कनिष्ठ, । तुम्हीं अंगीकारिलें तेंचि श्रेष्ठ. । आतां माझिया भुजबळें संतुष्ट । सदा असावें, राया. ॥ ४२ ॥ तुझिया कार्याकारणें, नृपति, । करीन भुवनत्रयाची शांति. । शत्रुसमुदायातें रणक्षिती । प्राशन करीन, जाणा. ॥ ४३ ॥ म्यां आपुलिये प्रौढी । कुबेर केला देशधडी, । लंका पुष्पक घेतलें प्रौढी । तुज राज्य करावया. ॥ ४४ ॥ कपि आणि दशरथात्मज । सिंधु उतरोनि युद्धा येती तुज. । हा आहार निर्माण झाला सहज । माझिये क्षुधेकारणें. ॥ ४५ ॥ ऐसे कुंभकर्णाचेनि बोलें । रावणाचें चित्त भरोन संतोषलें, । जैसें निर्भर्त्सूनि बुझाविलें । आर्भपणें पुनरपि ॥ ४६ ॥ रावण म्हणे, ' गा बंधुराया, । वर्ठे अंतकाहूनि आगळिया, । वज्रासारिखी तुझी काया । सदा अभंग असो. ॥ ४७ ॥ सूर्योदयाचा अवसरीं । अंधकार सृष्टीचा निवारी. । तैसे तुझिये निद्रांतीं वैरी । नासोनि जातील. ' ॥ ४८ ॥ ऐसें बंधूप्रति दशशिरें । अनुवादिलें

१ अ युद्धें करित त्याचे २ अ हो ३. अ मक्षण ४ ब बोनोनि ५ अ मानिलें उणें ६ अ इतकियानें ७ अ म्हणें, मेकाहो ८ अ जे जगीं विपा घडे ९ अ ये संदेहो नाहीं १० अ घेतला ११ ब सिद्धीतें १२ अ तुतें १३ अ पत्राक्षरीं १४ अ मसन १५ अ रायाचें १६ अ. आर्ते. १७. अ कुंभकर्णाप्रति

स्तुतिउत्तरें. । इतुकें ऐकोनि पार्श्व निशाचरें । बोलों आरंभिलें. ॥ ४९ ॥ म्हणे, ' आइकें गा राया, लंकानाथा, । ईश्वरा ईश्वर नाहीं सर्वथा. । सूर्याहूनि आगळें पश्चिमपथा । कवण आहे तेजाचें ? ॥ ५० ॥ नद नदिया [illegible] असती; । परि सिंधुसमान कैसेनि होती ? । उंचउंचाळे पर्वती । री न ये मेरूसि. ॥ ५१ ॥ म्हणूनि जी नृपवरा, । अतिमानें थोराहूनि [illegible], । तुम्हातुल्य प्रतापी दुसरा । भुवनत्रयीं न देखों. ॥ ५२ ॥ मनुष्य [illegible]म दशरथपुत्र, । तो तुम्हालागीं झाला शत्रु, । तयाचा पुसता मंत्रु । प्रह-[illegible]प्रमुखासि ॥ ५३ ॥ केवढें, नृपति अपूर्व पा हें, । जो गजकुंभस्थळें फोडित आहे । तो सिंहु मानसीं चिंता वाहे । शृगाळशत्रूंची ! ॥ ५४ ॥ तुम्हीं समार्गी साविले शूर, । तेथें काय म्हणावे नरवानर ? । लंघूनी येती सिंधूचे पार । हें न घडे, जी, सर्वथा. ॥ ५५ ॥ रामलक्ष्मण साडवले पुरुषार्थें, । राज्यभ्रष्ट केलें भरतें, । ते हिंडत असती अरण्यपथें । वैदेहीदु:खास्तव. ॥ ५६ ॥ हिंडत असतां वनवासी, । शोधीत असता सीतेचे पदवीसि । मैत्री जोडिली वानरेसीं । ते किष्किंधापर्वतीं. ॥ ५७ ॥ वैरुणालयो आड महाथोर. । पक्षि लंघूनि न पावे पार, । तेथें मनुष्य आणि वानर । काय लंघों शकती ? ॥ ५८ ॥ महामूर्ख ते पाळेखाईरें । रामासरिसीं चालिलीं अपारें. । युद्धीं एक राक्षसाचेनि करें । प्रेतपुरी पावती. ॥ ५९ ॥ राया, आतां हाचि विचारु, । जानकीसि कीजे बलात्कारु. । अंतुरीपणाचा अधिकारु । शीघ्रकाळें देइजे. ॥ ६० ॥ कायसी सीतेची प्रार्थना ? । बुद्धि नलगे आणणें मना. ' । ऐसें ऐकोनिया पार्श्ववचना । रावण संतोषला. ॥ ६१ ॥ " भला गा भला, पार्श्वा. । तुवां मंत्र उपदेशिला बरवा. । प्रमाण मानलें माझिया जीवा, । परि हें भलें नव्हे. ॥ ६२ ॥ बलात्कारु मी न करीं सर्वथा, । ते आईकें, गा, मूळ कथा. । येके अवसरीं स्वर्गपंथा । देवस्त्री जात होती. ॥ ६३ ॥ मज अवलोकिता तिचेनि स्वरूपें, । व्यसनभूत केलें कंदर्पें. । मग करीं धरिली साक्षेपें, । तंव ते दु:खित झाली. ॥ ६४ ॥ बलात्कारें धरी धरिली । [illegible] आफ्दली. । म्या सोडिल्यानंतर

---

१. ब. स्तुत्युत्तरें. २. अ. नव ३ अ प्रतीत हा शब्द नाहीं. ४. ब उंची रचल्ली ५ अ सम तुल्य सा ६ अ प्रतीत हा शब्द नाहीं ७ ब प्रतीत ही ओवी नाहीं ९ ब सिद्ध १. ब. आणिमे १० ब. बोलता झाला

गेली। ब्रह्मभुवनाप्रति ॥ ६५ ॥ मग वृत्तांत सांगे चतुराननां. । म्हणे' मी येत होतीं तुझिया भुवना. । मार्गी आरूढोनियां विमाना। मज रावण भेटला ॥ ६६ ॥ पाहिला असतां येकांतु । मजवरी घातला दुष्ट हस्तु, । पुरला होता देहाच अंतु । परि भाग्यें सोडिलें. ॥ ६७ ॥ ऐशी कृपा भाकी दैन्यवचनें; । मग आश्वासिली चतुराननें. । श्रापाचेनि अनुसंधानें । तीस अभय दिधलें ॥ ६८ ॥ मग ब्रह्मा तये अवसरीं । श्रापपूर्वक मज आज्ञा करी. । म्हणे, 'बळें रमसी परनारी । तरि शतचूर्ण होसी. ' ॥ ६९ ॥ अंबुनिधि मर्यादा आवरिला, । कीं मदोन्मत्त अंकुशें आकळिला; । तैसा श्रापपाशीं बांधला । माझा काममदु. ॥ ७० ॥ श्रापास्तव पार्श्वी चतुरा । मी न प्रवर्ते बलात्कारा. । म्हणोनि बुद्धीचि वश करा. । मनुष्यागमनेंसीं ॥ ७१ ॥ ब्रह्मशापाचेनि प्रसंगें । जाला वज्रपाणी सहस्रभगें, । म्हणौनि सर्वथा सानुरागें । सांनितें वश करा, हो. " ॥७२॥ रावण प्रधान परस्परें । बोलती अधर्माचीं उत्तरें, । ऐसें ऐकोनि क्रोधें थोरें । बिभीषण बोलिजे. ॥ ७३ ॥ म्हणें रायासहवर्तमान मंत्री तुम्ही । सारे प्रवर्तलेति अधर्मी; । परि ते थोरथोरी संग्रामीं । जयो नेदील तुम्हा. ॥ ७४ ॥ रघुनाथ जो अयोध्यानृपु, । त्याची भार्या सीता सर्पु । हीं जळें तुम्हीं आणिला काळरूपु । समस्तासि डंखावया. ॥ ७५ ॥ पंचागुळिक दक्षिण पाणी । हेचि सर्पाची पंचफणी। चिंता धरी अंतःकरणीं । हेंचि विष वदनींचें.॥७६॥ श्वास उश्वास मुखीं घ्राणी, । हेचि धुधुकाराची साडणी, । ऐसा सर्प धरिला; परि निर्वाणीं । सर्वांसि डोखटे; सागे. ॥ ७७ ॥ जाणतां जाणतां ऐसा विवेकू । रायें पदरीं बांधिला पावकु । हा पेटलिया येके येकु । निशाचर भस्मेल. ॥ ७८ ॥ तुम्हीं म्हणाल राम मनुष्यरूपु. । परि तो पार्वतीपतीचा जपु. । हा मतिमंद जाला लंकानृपु । त्याची भार्या हरिली. ॥ ७९ ॥ रामधनुष्याचेनि टणत्कारें । पावकाआगी भेर थोरें, । दणाणती अष्ट दिगंतरें, । भूमि टळमळूं लागे. ॥ ८० ॥ तयापासाव सुटतील बाण । अनिवार, तिखट, दारुण, । ते तुम्हासि न करिती निर्वाण । सीता द्या रे रामाची ॥ ८१ ॥ कंक पिनारे विगूळ भातीं । तेणें तुमचीं देहें नाहीं छेदिरीं, । तव घेऊनि जा, रे, वोहटी । सीता भेटवा रामातें. ॥ ८२ ॥

१ अ वर्तीत हा शब्द नाही २ अ बांदिला ३ व इनुकोन ४ अ. बांलिले. ५ व वर्तीत हा शब्द नाहीं ६ अ वर्तीत हे शब्द नाहीत
. ७.अ चारणेत आणावा हा ८ अ मधे ९ अ भूमिमंडळ डळमळा

' प्राणहरण ' तया बाणाचीं नामें, । मातें भरिले रघूत्तमें । ते तुम्हांसि रेतील नेमें । जरि हें त्यजाल त्रैलोक्य ॥ ८३ ॥ बळाढ्या वानरें । स्पर्शिलीं नाहीं लंकापुरी, । तव सोडा वैदेही झडकरी । दशरथाजाची. ' ॥ ८४ ॥ रायासि लागला कामव्याधि । पाचरा करीतसे बुद्धि । तरि देऊनि विवेकऔषधि । आरोग्य करारे मंत्रीहो ॥ ८५ ॥ तीं विभीषणाचीं वचनें । ऐकोनि उद्वेगिजे दशाननें. । त्यासि प्रत्युत्तर, मानें । प्रहस्तें बोलिजे. ॥ ८६ ॥ अहो, राजभ्राता, विभीषणा,। तुम्ही सभेमें बोलों नेणा । आजि तुमचेया चतुरपणा । निवाड होऊनि ठेला. ॥ ८७ ॥ म्हास उतरवयाचें वर्तमान । परि बुद्धीनें असा बाळकासमान. । मान मर्यादा सांडूनि अन्योन्य । बोलत असा सभेआत. ॥ ८८ ॥ जें राजयासि अति प्रिय, । निवे मांडलिकाचें हृदय, । ऐसें बोलिजे, तरिच चातुर्य । असाधारण मर्गी. ॥ ८९ ॥ स्वामीतें सर्वथा सुख न वाटे, । परिवाराचें तुक तुटे, । ऐसें बोलता, [3]तो शीघ्र भेटे । मृत्यूतें. ॥९० ॥ म्हणोनिया विभीषणा उगे रहा, । होत असे तें कौतुक पहा, । मौन्य न धरवे तरि जावें गृहा । शीघ्र गति आपुलिया ॥ ९१ ॥ रायें जिंकिलें भुवनत्रय, । तयासि काय सांगता मनुष्यभय ? । तुम्हास बोलता सवचि हृदय । कोणें व्याप्त जालें. ' ॥ ९२ ॥ ऐसे प्रहस्ताचा वचनीं । विभीषण दुखावला अंतःकरणीं, । जैसें शराचा सधानीं । जिव्हार खोंचलें. ॥ ९३ ॥ विभीषण म्हणे, ' अधमा, । जळो जळो तुझा मंत्रमहिमा ! । तू दीर्घद्वेषिया, पापात्मा, । तुवा बुडविलें राज्यातें. ॥ ९४ ॥ राष्ट्राचें पाप रायास लागे, । आणि नृपतीचे दोष मंत्रियास भोगे,। तरि तुझ्या ठायीं नित्य जागे । पातकाचा पैंवाडा ॥ ९५ ॥ वन्हि लागला असे पर्वतीं । त्यास साह्य होय पवन प्रीतीं, । तैसा कामातुर लंकापती, । तू देशी अनुमोदनु. ॥ ९६ ॥ राम कोदंडाचा तिखट बाणीं । छेदिजे तुझी आगैवेष्टणी, । मग आठविशी माझी सत्य वाणी । प्राणत्याग करिता. ॥ ९७ ॥ कुंभकर्णु, इंद्रजितकुमरु, । देवांतक, नरांतक, महोदरु, । न होता इतुकियाचा सहारु, । तव सीता द्या, रे, रामाची. ॥ ९८ ॥ अनिवार राघवाचा बाणीं । एकें एक देखता न पडता रणीं, । तवंवरि पतिव्रताशिरोमणि । भेटवा तुम्ही

१ अ जाल त्रिलोकीं २ अ मतील ही ओंवी नाहीं ३ अ शाघ्र भेटे मृत्यु त्याचे आंगी ४ सिांकिलें ५ घ हागु ६ अ तीक्ष्ण ७ अ आंगवस्त्रणी ८ अ एकु एकापुढें पडाल रणीं ९. अ ते

रामासि. ' ॥ ९९ ॥ बिभीषणाचीं उत्तरें तिखटें, । श्रवणें इंद्रजिताचें हृद फुटे, । जैसे मंत्रांचे घायवटे । विखें सर्पांगीं. ॥ १०० ॥ वनीं लागली वणवा । वरि पडे घृताचा श्रवा, । मग उठी अग्निशिखाचा उठावा, । तैसें कोपु उमळला. ॥ १ ॥ इंद्रजित म्हणे, ' रे बिभीषणा, । मर मर, मूर्खा, निर्गुणा ! । कलंक लाविला, राक्षसराणा । तुझिया बापुडपणें. ॥ २ अरे तू राक्षस मिहाचा वंशीं । शशकु केवळ जन्मलासी. । भय पृथ्वीभार असली. । व्यर्थ जननी श्रमविली तुवां. ॥ ३ ॥ निंदा बोल्सी जेणें तोंडें करीन मी त्याचीं शतखंडें, । परि तुजवरि न वाहिजे दोर्दंडें । राजन् म्हणौनिया. ॥ ४ ॥ त्रिभुवनींचें भय एकवटलें, । तें तुझ्या हृदयीं बैसलें. तुझा पुरुषार्थ धैर्य कोळसा झालें । म्हणूनि भयेंच बोलसी. ॥ ५ ॥ निशाचराचें भक्ष्य सहज । तयामि वर्णिता न धरिसी लाज, । हें ऐकोनिया पूर्वज । कटकटा करिती. ॥ ६ ॥ महत्व देसी त्या दशरथपुत्रा, । अरे, तू राक्षसामध्यें अपवित्रा, । प्रभाते तुझिया वक्त्रा । अवलोकू नये. ॥ ७ ॥ सुरा सहित वज्रपाणी । म्या त्रासिला आपुला वाणीं, । मुरकुंडी पाडिली धरणीं, । शरणागतु पैं केला. ॥ ८ ॥ मेरुसारिखा गिरावती । म्या धरिला स्वहस्तीं, । पीळु घालूनि चौदातीं । पृथ्वीवरि पाडिला. ॥ ९ ॥ मी देवासारिख्याचा अनड्ठु, । दैत्याचा कार्यकर्ता मीच एकु, । आता नरवानरवाटिकेसि पावकु । मीच लागेन. ॥ ११० ॥ ये भयभीता बिभीषणा, । निंदा बोलता मुकसी प्राणा, । जैसें देशवडी वैश्रवणा, । तैसें तज करीन ' ॥११॥ ऐसा इंद्रजिताचा बोलीं । रायासहित सभा आनंदली, । परि अंतरीं चित्तवृत्ति टुवाळली । धार्मिष्ट बिभीषणाची. ॥१२॥ वक वायसामध्यें राजहंसु । एक पडले पाये त्रासु, । तैसा पातकियामाजी निर्दोषु । बिभीषण सर्ता पला. ॥ १३ ॥ गभीरा वाचा ते अवसरीं । इंद्रजिताची छळणा आदरी, । जैसा पूर्ण पंडित निवारी । पाखांडवचनें ॥ १४ ॥ अरे दीर्घदोषिया, राजपुत्रा । हानि केली आयुष्याचिया जन्मक्षेत्रा । क्षयो निर्माण झालासि गोत्रा । वृथापुढा, अमंगळा. ॥ १५ ॥ राजयाचें हित माझें बोलणें । तुज अमह्य झालें कोटिगुणें. । नृपतीचें भाग्य आहे उणें, । म्हणोनि तुज बुद्धि

१ अ शस्त्राचे २. ब प्रतीत हा ओंवा नाहीं ३ अ. धर्मी वीं कां (?)
४ ब असतोपला ५ ब मग गमारा धावा ६ अ प्रभात हा शब्द नाहीं.

ऐसी. ॥ १६ ॥ अंधापुढें धरिली दिवटी । तरि तम न सांडी तयाची दृष्टि; । रोगियासि. मिष्टान्न वाढिलें तार्टी । मुखीं घालितां विष वाटे; ॥ १७ ॥ तैसें मज बोलतां तुमचें हित, । तुम्हां सर्वांस वाटे दुःख बहुत. । होणार आरंभिलें बळिवंत । तयासि म्यां काय करावें ? ॥ १८ ॥ तारकासुर अजिंक्य त्रिजगीं. । तो देवां त्रासूनि स्वर्ग भोगी. । पुढें तयाचिया वधालागीं । स्वामी कार्तिकु जाला. ॥ १९ ॥ तैसें तुम्हीं शत्रुवैरें । त्रैलोक्य पीडिलें बलात्कारें; । आतां राक्षस वधावया. निर्धारें । राम अवतरला असे. ॥ १२० ॥ ऐशीं बिभीषणाचीं उत्तरें । श्रवणें केलीं दशशिरें. । उसळलें क्रोधाचें काविरें, । मग बोलता झाला. ॥ २१ ॥ म्हणे, ' आलेया वसंताचे दिवस । तैं मंजुळकंठ, सुरस. । आम्रवनीं गायन करिती वायस । हें कैसें घडेल ! ॥ २२ ॥ आच्छादूनि अवघें अंबर । घन गर्जना करिती गंभीर; । तैं पर्वतीं नृत्य करी खर । हें कैसेनि घडेल ! ॥ २३ ॥ प्रवेशूनि पुष्पजातींच्या वनीं । शांति क्षमा अवलंबूनि । कुंजर बैसेल पद्मासनीं; । हें कैसेनि घडेल ! ॥ २४ ॥ व्याल्वैखरीहूनि अमृत स्रवे, । परम दुःखास्तव पाषाण द्रवे, । तरिच दुष्ट दाइज हृदयीं निवे । कुळींचा नांदतां. ॥ २५ ॥ रथ, पदाती, वारण, वाजी, । कुळींचा नांदता राज्यीं । देखोनि सुख मानिजे गोत्रजीं, । हें कैसेनि घडेल ? ॥ २६ ॥ सरिता मातली जात आहे । ते जन्मभूमीची वास न पाहे. । तैसें दुष्टांचें चित्त न राहे । कुलवृत्तीच्या ठायीं. ॥ २७ ॥ बिभीषणा तूं होसी माझा बंधु, । परि कुळनिंदा विषयीं अगाधु । करूं आवडे तुझा वधु । परि गोत्रहत्या लागेल. ॥ २८ ॥ अरे, त्या मानवियांचेनि बाणीं । शब्दें राक्षस मारिसी रणीं. । दग्ध होकां तुझी वाणी, । जे स्तवते विपातें. ॥ २९ ॥ राक्षस राज्य करिती सुखें, । परि तुवां वधिले आपुलेनि मुखें. । तूं बोललासि तेणें दुःखें । हृदय फुटत माझें. ॥ १३० ॥ तूं आमुचाचि निंदिशी आम्हां । थोरावसी वानरां रामा । कुलपाषाण दुरात्मा, । मुख आच्छादीं आपुलें. ॥ ३१ ॥ ऐसें क्रोधें बोलोनि रावणें । स्पर्श केला वामचरणें. । अपमान देखोनि बिभीषणें । शीघ्र गंतव्य आरंभिलें. ॥ ३२ ॥ चौघां प्रधानांसहित उडाला, । सभेऊर्ध्वं अंतरिक्षीं

१. ब. उजळूनि. २. अ. पडूस ३. ब. प्रतींत हा शब्द नाहीं. ४. ब. असे. ५. अ. अजितु. ६. अ. करिणें, ७. अ. मंजुळ स्वरीं. ८. ब. उल्हघूनी. ९. अ. मस्तल्ला.

राहिला, । तयूनि वचन बोलता झाला, । विभीषण बंधुप्रति. ॥ ३३ ॥ 'तूं आइके[1] गा लंकानाथा, । माझेनि बोलें पावलेति व्यथा; । परि सिद्धांत हा सर्वथा, । अंत आला राज्याचा. ॥ ३४ ॥ तूं ज्येष्ठ भ्राता होसि, । म्हणवूनि मागुती करितों पुसी. । ममता[1] झळंबते मानसीं । परि मी न राहें येथें. ॥३५॥ माझी चाड तुज आहे कीं नाहीं, । हें सांगा,जी उगलाहीं. । वायांचि पडलासि प्रवाहीं । गर्वसरितेच्या. ॥ ३६ ॥ सहपरिवारीं रणभूमीं । निद्रा कराल सर्वही तुम्ही. । हें पहावया समर्थ नव्हे मी। परि तेंचि प्राप्त झालें मज. ॥ ३७ ॥ म्यां सांगितलें सर्वांचें हित । परि अधर्मी रमे तुमचें चित्त. । होणार आरंभिलें बळिवंत । आतां होचि लागेल. ॥ ३८ ॥ आतां बोळिलों तिहुंकें करिजे क्षमा; । मजवांण कल्याण असावें तुम्हां । ऐसें बोलोनि पांचही व्योमा । माजी संचरले. ॥३९॥ इंद्रियें सांडुनि जाती पांचही प्राण, । तैसे भरले पांचहीजण. । सुहृदस्नेहबंधें केलें निर्याण, । निराशा अवलंबिली. ॥ १४० ॥ सुवर्णपक्षियांचें स्थान निर्दोष । तेथें कुत्सित येवोनि राहिले वायस; । मग स्थान सांडिती राजहंस । तसे उडोनि गेले. ॥ ४१ ॥ इति श्रीयुद्धकांड रामायणें । पुढील कथेसि सादर होणें । वाल्मीक काव्य आश्रयो म्हणे । कृष्णदास मुद्गल. ॥ १४२ ॥

---

प्रसंग ५

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । पांचही जाती गगनमार्गें । त्वरें करूनि मानसवेगें. । सर्व सभा पाहतसे मार्गें । ऊर्ध्व वदनें करोनिया. ॥ १ ॥ पंचाननें[4] हेमगिरीचीं शिखरें । तेजोमय उचललीं महाथोरें, । तैसेचि येताति रजनीचर, । ते सुग्रीवें लक्षिले. ॥ २ ॥ वानरातें दावी कपिराजु । 'पैल पहाहो नभा उजू. । महाचेरोसीं तेज.पुंजु । पंचमेरूंऐसी[5] येतु असे.' ॥ ३ ॥ तंव उदित जाले प्लवंगम । करीं घेऊनियां[6] शिळा, द्रुम. । भुभुःकार देऊनियां व्योम । नादें संपूर्ण केलें. ॥ ४ ॥ वानर ऊर्ध्व पाहती यत्नें. । तव गरुडा ऐसा झेंपावे, । अकस्मात कचोपर्ये खालावे । याना विभीषणाचा. ॥ ५ ॥ अंबुनिधीचें उत्तरपार । तेथें उतरले

---

१ अ. ममत्व. २. अ. योग्य. ३. अ इति श्रीयुद्धकाण्डकथामृत । वाल्मीकिकाव्य सुरस बहुत । पुढें आइका देवोनि चित्त । कृष्णदास मुद्गल म्हणे. । ४. अ. पचानन. ५. अ. पचमेरु येतुसे. ६. अ. घेतले. ७. ब. कोंदले:

पांचही निशाचर. । आंगेसीं भिडों म्हणती वानर, । तंव तो बोले मधुरा गिरा. ॥ ६ ॥ अगा, ये सुग्रीवा, वानरपति, । तुज कल्याण हो गा धर्ममूर्ति. । रामासीं सख्य झालासि हे कीर्ति । लंकेमध्यें सांगों आली. ॥ ७ ॥ केवढी पूर्वदत्ताची करणी ! । तुझिया भाग्या नाहीं मोळणी. । जो रघुनाथ चापशरपाणि । मित्रत्वें जोडिलासि. ॥ ८ ॥ मित्रीचें फळ सुग्रीवा जाण । सेचि सत्य केलें श्रीरामार्पण. । अमित मेळवूनि कपिगण । लंकेवरी चालिलेति. ॥ ९ ॥ महाबळिया किष्किंदनाथा, । परियेसीं माझी मूळकथा. । मी राक्षस म्हणोनु अन्यथा । मानूं नको. ॥ १० ॥ रावणु, लंकेचा नृपवरु । तो मज होय ज्येष्ठ सहोदरु. । अधमामध्यें अधम थोरु, । पापात्मा, पापकर्मी. ॥ ११ ॥ कपटें आणिली रामकांता, । सतियां शिरोमणि, पतिव्रता, । म्हणवूनि शिकविलें युक्ति बहुता । परि आमुचें नाइके. ॥ १२ ॥ सत्यबुद्धि नावडे दुर्जनासि, । तस्कर विटे देखोनि शशी. ॥ तैसें दुःख रावणा मानसीं । मज नीति सांगतां. ॥ १३ ॥ मग मज रावणें अपमानिलें, । हीनाचियापरी निर्भर्त्सिलें; । या उपरी माझे हृदयीं वाढलें । गुल्म अभिमानाचें ॥ १४ ॥ ऐसियास्तव, कपिनायका, । म्यां सुहृदांसहित त्यजिली लंका. । शरण रिघेन रघुकुलतिलका, । ऐसा संकल्पु धरिला मनीं. ॥ १५ ॥ चत्वार मंत्रियांसहित, कपींद्रा, । येथ आलों तरूनु समुद्रा. । मी राक्षस दिसें बाहिरमुद्रा । परि अंतरीं शुद्धात्मा. ॥ १६ ॥ बिभीषण सत्य नाम माझें, । तुम्हां मित्रांपासीं केलें बिजें; । आतां दासत्वाचीं चरणांबुजें । त्या रघुपतिरायाचीं. ॥ १७ ॥ ऐसीं बिभीषणाचीं उत्तरें । श्रवण केलीं वानरेश्वरें. । मग प्रतिवचन म्हणे, ' मह्य बरें. । स्थिर तैसा नावेक. ' ॥ १८ ॥ मग सुग्रीव जाऊनि झडकरी । म्हणे, ' जी रघुपति, अवधारीं. । राक्षस कपटवेषधारी । सर्वथा विश्वासों नये. ॥ १९ ॥ वर्तला येक अपूर्व वृत्तांतु । राक्षेसीं चौघीं परिवारितु । उत्तरपारीं अकस्मातु । व्योमपंथें उतरला. ॥ २० ॥ त्यासीं भिडों पाहती द्रुमपाणि । तंव तो बोले मधुरा वाणी. । म्हणे, ' मी नेणें कपट अंतःकरणीं । शरणागत रामाचा. ॥ २१ ॥

१ अ. रजनीचर. २ अ. पाहतातो. ३ अ. तंव बोले बिभीषणु. ४ अ मवणी. ५ अ. तुवां. ६ अ. चाली केली. ७ ब. मी सांगेन मनींचा अवस्था, । तै नू नुपेसीं राक्षस म्हणउनि । ८ ब. पाहू. ९ अ. अतःकरणी. १० अ. मंत्रांपासीं. ११ अ. असे. १२ म्हणनी. १३ ब. निःकपट.

मज अपमानिलें लंकानार्थे। म्हणोनु सांगों आलों येथें. । आतां सनाथ करोंवें समर्थे, । रघुनाथें मजप्रती. ॥ २२ ॥ नाम माझें बिभीषण जाणा. । अनुज बंधु होये रावणा. । ऐसें अत्यंत चोजें करुणा. । म्हणे भेटवा रामातें. ॥ २३ ॥ कवण जाणे कवणें उद्देशें । नैर्तिक प्रेरिला लंकेशें ! । क्षमा अवलंबिली राक्षसें । सेनेमध्यें आला असे. ॥ २४ ॥ ऐसें ऐकोनि कौसल्यासुनु । अवलोकी लक्ष्मणा वजू. । म्हणे काय बोलतो कपिराजु । तें परिसिलें तुम्हीं. ॥ २५ ॥ समर्थी जया कपीचे भरंवसे । अयोध्यापति तयातें पुसे । तम्हां काय हो मंत्र प्रतिभासे ? । तो साच सांगा ये अवसरीं. ॥ २६ ॥ तंव हरि बोले शरभु नामा । गुणनिधि, जी, तूं जयरामा. । महत्त्व देऊनि प्लवंगमां । मंत्रबुद्धि पुससी. ॥ २७ ॥ कोदंडपाणि तूं जगद्गुरु । विरंची सुद्धा अज्ञाधारु । जो तुम्हा मानसीं गमे विचारु । तो सर्वांसि मानला. ॥ २८ ॥ तंव जांबुवंत म्हणे' गा सैन्यपति । ऐसी असे राजनीति; । वैरियावरूनु आलिया मार्गी । तो हि स्वीकारूं नये. ॥ २९ ॥ चालतां अमित्रासीं विरोधु । प्राप्त झालिया संग्रामसंरंभु । समयीं अंतर दे पुत्र बंधु । हे अघटित वार्ता. ॥ ३० ॥ हा मानकरु, जी, रावण भ्राता ।- सत्य, जाण, गा भगवंता । ऐसियासि जरि राखता, । पुढें बोखटें, साचेल. ॥ ३१ ॥ जैसी कचें शुक्रसेवा करोनि । साधिली अमृतसंजीविनी, । आणि वायसें दारिला अग्नि । उलूकांचिया कोटरां. ॥ ३२ ॥ तैसा अमित्रसंग हो सर्वथा । करणें न घडे, जी रघुनाथा. । सन्निध असता अकस्मात व्यथा । करूनि जाती. ॥ ३३ ॥ वैरियांनि देता आश्रयो । मग कैसा पाविजेल जयो ॥ ऐसें ऐकोनि सीताप्रियो । निवांत राहिला. ॥ ३४ ॥ तंव मैंदु म्हणे, ' रघुनंदना, । राक्षसअभिप्रावो आणिजे मना. । कपिकुळाची अमित सेना. । याच येथें काय चाले? ॥ ३५ ॥ बहुत झोंबती पिपीलिका । तरि प्राणें घेती सर्पा येका. । आम्हीं काळतुल्य, रघुकुलतिलका । मशकप्राय राक्षस. ॥ ३६ ॥ ऐकोनि मैंदाचीं उत्तरें, । हनुमंतु पाहिला रघुवीरें । स्वामिचरणीं लक्ष लावूनु येरें । सादर राहिजे. ॥ ३७ ॥ नरनाथाचिये गौरवदृष्टी । रुद्र संतुष्टला हृदयसपुटीं; । जैशी अमृतधाराबृष्टि । मुखामध्यें झाली. ॥ ३८ ॥ हनुमंतु स्वामिगौरवें । थोर संतुष्टला जीवें. । पुढें रघूत्तमाप्रति बरवें । मधुर बोलता जाला. ॥ ३९ ॥ श्रुतिशास्त्रें स्तवन

१ अ दूत २ अ अकल्पित ३ अ ऐसियासि. ४ अ. श्रुतींचीं शतें

कीर्ती, । परि मौन्य मुद्रा धरिली वेदांप्रति । तो तूं सर्वात्मा, मंगळमूर्ति, । मंत्र पुससी कवणातें ॥ ४० ॥ जगत्रयीं आदित्य राहटे । आत्मा इंद्रियाआधीन चेष्टे । म्ज मानसीं तेसें वाटे, । अयोध्यापुरपति. ॥ ४१ ॥ ये काळीं तुझा प्रधान-[महि]मा । प्रान झाला सर्वां प्लवंगमा. । आता कांहीं एक मिळे धर्मा । [ऐ]सें बोलतों जी. ॥ ४२ ॥ रघुनाथु तूं जी रणरंगधीरु, । शरणांगता-[सि] वज्रपंजरु । दुष्टांचा करिसी संहारु, । ऐसी कीर्ति त्रिभुवनीं. ॥ ४३ ॥ [अ]न्य, मिथ्या; शरणागतु म्हणवी, । त्याची उपेक्षा कैसी करावी ? ॥ तुम्हीं [ज]सें पूर्ण गोसांवी. । मी आगळें काय बोलों ! ॥ ४४ ॥ ' चंद्रमा साडी आर्गीची शीतळता; । गोड होईं, गा अमृता; ' ॥ ऐसें विनवावें नलगे तत्त्वता. । त्यांचा सहजचि गुणु. ॥ ४५ ॥ विभीषणु रावणें अपमानिला. । मग तुम्हासि शरणागतु आला. । तरि त्यावरि पाहिजे केला । अभयअनुग्रहो ॥ ४६ ॥ हा नीति सांगतां धार्मिष्ठु, । तें रावणु न साहेचि दुष्टु, । मग तेणें दुखें स्थानभ्रष्टु । विभीषणु जाला. ॥ ४७ ॥ पीडिलिया दुर्जनासि संगु । क्षणक्षणां होये मानभंगु; । म्हणऊनु सर्वथा देशत्यागु । करणें घडेचि, [नृ]पति. ॥ ४८ ॥ राक्षस लंघूनि आला समुद्रा । तेथवाचि लक्षिली याची मुद्रा । परि हा पुण्यपुरुष, रामचंद्रा, । मायिक नव्हे सर्वथा. ॥ ४९ ॥ मायिकु जरि असता । तरि आपुलें नाव न सांगता । प्रकट सेनेमध्यें न प्रवेशिता । शंकेनें झाकोळता. ॥ ५० ॥ हा निःकपट प्रसन्नवदनु, । जैसा दिसे घनवर्जित भानु. । बोलतां वाटे गहनु । बृहस्पति जैसा. ॥ ५१ ॥ आतां रघुनायका भूपाळा, । राक्षेसु बोलाविजे जवळा. । काय तयाची अंतरकळा । तिचें शोधन करावें. ॥ ५२ ॥ आणिक कल्पे मज मानसीं; । तुम्हीं वाली वधिला किष्किंदेसि, । राज्य दिधलें सुग्रीवासि । तें येणें ऐकलें. ॥ ५३ ॥ हा रावणें[1] अपमानिला, । मग अभिमानचक्रीं पडिला. ॥ तुज कृपानिधि शरण आला । बंधुराज मागावया. ॥ ५४ ॥ ऐसे वाक्पुष्पीं हनुमंतें । पूजिलें रघुराजकर्णातें. । धन्य धन्य, तूं गा,' ऐसें सतोषमानें । प्रतिउत्तर दिधलें. ॥ ५५ ॥ रघुनाथ म्हणे, ' गा हनुमंता। ऐसेंचि वाटे माझिया चित्ता; । राक्षस बोलावूनि आता । अभय, आश्रयो, द्यावा. ॥ ५६ ॥ तंव सुग्रीव म्हणे, ' जी नृपवरा, । जेणें समयीं सांडिलें सहोदरा, । तयाची कीर्ति तुम्ही विचारा । उत्तमु कीं मध्यमु. ' ॥ ५७ ॥

१. अ. उज्वता. २. अ. पेंद, सर्वथा. ३. अ. हिता.

तंव राम कपिरायास म्हणे, । ‘ अति धन्य, गा तुझें बोलणें. । सकळ शास्त्रें शोधिलीं जेणें । तयासि हे स्फूर्ति नाहीं. ॥ ५८ ॥ *परि गा पिते, बंधु आणि पुत्र । मारिले कैंचें सर्वत्र ? । धाडोळिता अवघें जगत्र । म्या देखिले डोळा ॥ ५९ ॥ पिता तरि येकु दशरथु । भ्राता तरि येकु भरतु । पुत्र तरि मी येकु रघुनाथु । वनिता तरि येकी वैदेही. ॥ ६० ॥ सुग्रीवा तुजसारिखा सखा । नाहीं भुवनत्रयीं न देखा । सेवकु तरि एकु देखा । मारुतात्मजु. ॥ ६१ ॥ तंव सुग्रीव म्हणे ‘ जी रघुनाथा; । साराश बोलिलेती समर्था; । परि राक्षस राहवणें वृथा । अपकारें मुचील. ’ ॥ ६२ ॥ रामु कपींद्राप्रति बोले, । ‘ मशकफुंकें मेरु डोलें, । मुंगियातें वज्र उलें । हें कैसेंनि घडेल ’ ॥ ६३ ॥ रजनीचर ते केवढे । मये आम्हा उपजविली गाढे. । कृतांतु राहिला मज्पुढें । तरि खिळेनिरे वाणीं. ॥ ६४ ॥ अथवा राक्षस हो, विभीषण हो । शरण आलियासि अनुग्रहो; । हें वाक्य अन्यथा पितामहो । करूं न शके माझें. ॥ ६५ ॥ मागें कपोता सनाथ्या भिण, । शिबिरायासि गेला शरण. । तेणें आपणास केलें निर्वाण, । परि शरणागतु रक्षिला. ॥ ६६ ॥ भ्रतार वेसनभुत, कुष्ठळु, । पतिव्रता करी साभाळु, । तैसा शरणागत अमंगळु । समर्थे नुपेक्षावा. ॥ ६७ ॥ ऐसा रामाचा अभिप्रावो । जाणोनि, बोले कपिरावो; । म्हणे, ‘ राक्षसाचा सद्भावो । स्पष्टिक दिसत असे. ॥ ६८ ॥ पारिखा परि पुण्यपरायणु, । जवळी असावा विभीषणु. ’ । मग आज्ञा दे सीतारमणु । भेटावयाची. ॥ ६९ ॥ जाला बिभीषणाचा भाग्योदयो । आला रघुनाथभेटीचा समयो । साधविता जाला ताराप्रियो । राक्षसासि. ॥ ७० ॥ प्रीती आदरें निःशंक मानसीं । विनतातनयो भेटे विष्णूसि, । तैसा विभीषण श्रीरामासि । भेटावया आला. ॥ ७१ ॥ सरितापूर मानला प्रवाहीं । तो सिंधूसि मिळे लवलाहीं, । तैसा विभीषण सुखस्नेहीं । रघुनाथासि भेटे. ॥ ७२ ॥ राघवचरणांबुजें बरवीं । तेथें शत्रुभ्राता मस्तक ठेवी. । अयोध्याधीश म्हणे, ‘ चिरंजीवी । होईं, गा बिभीषणा. ॥ ७३ ॥ मग शीघ्र उठविला रघुवीरें, । आलिंगिला स्नेहआदरें. । म्हणे, ‘ समर्थी

१. ब. भुर्ति. * ही ओंवी ब. प्रतींत नाहीं. २. अ. जानकी ३. अ अकार्य. झाचिरें ४. ब. वचन ५ अ. आगविना. ६. अ. निष्कपट. ७. ब मुखें न्यान- देसि पाहीं. ८. ब आनां रुसंधा.

भग्वान् ईश्वरें । प्रेरिला आम्हांसि. ॥ ७४ ॥ तूं सापद सुद्रमति । ऐसें बोले सीतापति । प्रसंगें आलासि आम्हांप्रति । भावार्थेकरूनि. ॥ ७५ ॥ ऐशा माचां अमृतवचनीं । राक्षसें पारणें केलें मनीं; । जैसा चंद्रासि देखोनि गगनीं । चकोरु तृप्त झाला; ॥ ७६ ॥ कृपणें देखिला पूर्वजांचा अर्थु, । कीं पतिव्रतांसि भेटला प्राणनाथु, । कां योगियासि सांपडला पंथु । गुप्त झाडींचा. ॥७७॥ बंधुभयझोंचा व्याधि लागला, । भाग्यें राघववैद्य भेटला, । बिभीषणा कृपारसु दिधला, । आरोग्य जालें तात्काळें. ॥ ७८ ॥ जैसो परिसेंसि झगटे, । हेम होय, पूर्वधातु पालटे; । तैसी बिभीषणहृदयींची फुटे । उद्वेगचिंता. ॥ ७९ ॥ अति निःकपट अंतःकरणीं, । उभा राहिला जोडोनि पाणि. । स्तुति आरंभिली मधुरा वाणी । रघूत्तमा रायाची.॥ ८० ॥ " जय जय, सर्वोत्तमा रामा, । तुझी अपार, अगाध महिमा । वर्णितां परा, पश्यंती, मध्यमा, । वैखरी पारुषली. ॥ ८१ ॥ श्रुतींचीं शतें करिती स्तवन, । परि नेणवे तुझें पूर्ण ज्ञान; । तेथें मी बापुडें अज्ञान । किती वाखाणीन तुम्हां ! ॥ ८२ ॥ वृक्षाचे अग्रीं लागलें फळ । तें नेणे पूर्वील जन्ममूळ. । जनकाजननीचे जन्मकाळ । बाळकातें दृष्ट नाहीं. ॥ ८३ ॥ जेंव उत्पत्ति चराचरींची । कर्ता अधिकारी विरंचि. । तोही तुझिया निजस्वरूपाची । विरचना नेणे ॥ ८४ ॥ विराटस्वरूप तूंचि हें सत्य. । उत्पत्तिस्थितिप्रळयो हें तुझें कृत्य. । तुजवेगळें आहे, हें मिथ्य, । अबाधित वाक्य. ॥ ८५ ॥ चतुर्दशभुवनींचा तूं नायकु, । अनंतब्रह्मांडईश्वरु तूंचि येकु, । स्वयंशक्ति, गुणत्रयीं व्यापकु, । पंचभूतें चाळिसी. ॥ ८६ ॥ मच्छ, कूर्म, वराहो, । नृसिंह, वामन, परशरामहो, । तोचि तूं वैदहीनाहो । मनुष्यवेषधारी. ॥ ८७ ॥ असुरां उन्मत्तांसि निर्दाळण, । साधुजनाचें संरक्षण, । इतुकें करावया, अवतरण । तुवां केलें सूर्यवंशीं ॥ ८८ ॥ तुज शत्रु, मित्रु आणि संसारु, । हा ऐलीकडील विचारु । तूं निर्गुण, निरोपम्य, निर्विकारु, । प्रपंचाविरहितु. ॥ ८९ ॥ आघवी मायामय अवलंबिनी. । लीला, लौकिक ऐशी करणी । सत्य होआवी काव्य ऋषीची वाणी, । श्रवणें जग तरावें. ॥ ९० ॥ तुजवेगळी विषय-स्वार्थें । येऱ्हवीं ओगिली लंकानाथें, । तत्व विचारितां येणें अर्थे । महंत बोध-

१ ही ओवी ब प्रतींत नाहीं. २. ब. संपटे. ३. ब. उद्वेगाची काजळी. ४. अ. धाकला. ५. अ. साधुजनांसि सद्रक्षण. ६. अ निराकार. ७. ब. अवगणी. ८. अ. नेणें.

ती ना. ॥ ९१ ॥ रत्नमणीपासूनि रंगाच्योनि । काढूनि न्यारी करणें युक्ति । मधुरता मिश्रीन अमृतीं, । ते चाळावी कोणेन पां ? ॥ ९२ ॥ रश्मीची वेगळी रश्मिमंडळीं. । ते होईल कशी वेगळी ? । कनकीं कांति सर्वांगीं मिळाली । ते दोहोंनि कशी न्यारी ? ॥ ९३ ॥ प्रकृतीपासुनि छाया । हारपलि नरजाये, रघुराया. । तुझी स्वरूपभोगभजनीमायी । रावणें नेली हें मिथ्या. ॥ ९४ ॥ दर्पणीं नेत्रांचेनि निवाडें । पाहतां दिसे दुसरें रूपडें. । सीतेची छाया तेणेंचि पाडें । मायामय नटला. ॥ ९५ ॥ ते रावणें हरिली दुष्टभावें, । का जें होणार तें सत्य होआवें. । तुझें त्रिभुवनीं उरावें । अवतारचरित्र. ॥ ९६ ॥ म्हणौनि, जी अयोध्यापति, । ललितत्व अलासि व्यक्ती. । मज किंकराची किती स्तुति ? । तव महिमा वर्णवेना. ॥ ९७ ॥ 'नेति नेति' ऐसीं श्रुतिवाक्यें. । शेष लुब्ध जाला स्तवनविवेकें. । तेथें मी अज्ञान मुखें येकें । काये बोलेन आगळें. ? ॥ ९८ ॥ मेघ वर्षती अनंत धारीं, । परिमाणु पडती पृथ्वीवरि । हें सख्या होईल काळवरी । परि गुण तुझे अमित. ॥ ९९ ॥ ऐसें बिभीषण अनुवादतु, । तयासि निवारी मैथिलीकांतु. । म्हणे, 'पुरे. गा सखया. स्तुतिवाद बहुतु । सांडी. बैस आता. ॥ १०० ॥ तुवां, गा, आमुचेनि स्नेहवादें । सर्व सुहृदासि येतल्ली दंदें, । तैसें विष्णुकारणें प्रल्हादें कुळाचार सांडिला. ॥ १ ॥ रघुनाथ मागे सौमित्रासि । तेणें सिंधुजळ भरिलें कळशीं । मग वेदोक्तमंत्रें बिभीषणासि । राज्याभिषेक केला. ॥ २ ॥ राम म्हणे. 'बैसतां आसनीं । बिभीषणा होये लंकापति, । जोंवरि सोमसूर्य भ्रमती । आकाशअंतराळीं ॥ ३ ॥ जोंवरि गंगागोदावरी । वाहत आहे पृथ्वीवरि । माझें नामचरित्र त्रैलोक्यमझारीं । तंववरि राज्य करीं सुखें. ॥ ४ ॥ ऐसा रामें दिधला आशिर्वादु । बंधुराजरु, काळम अभेदु. । बिभीषणासि तेणें आनंदु, । तो न वचे कथिला. ॥ ५ ॥ जो इच्छित निवाला येक दुम्ने, । पुढें क्षीरसिंधु प्राप्त जाला त्यातें. । तयापरी सुखाचें भरितें । बिभीषणाचे हृदयीं दाटे. ॥ ६ ॥ कुरूप कन्या पृथ्वीपरिभ्रमण करी, । तीसि राजपुत्र अकस्मात वरी, । तियचा आनंद न माये अंबरीं, । तैसें जालें बिभीषणा. ॥ ७ ॥ जन्मुनि दरिद्री रंक, । तो सुवर्ण नाग इच्छी येक, ।

---

१ च कैसा २ अ नाड ३ च नाहीं ४ च वेदोक्त मंत्रें

प्रासि सांपडे कूपभरी कनक । तैसा संतुष्ट राक्षसु. ॥ ८ ॥ कपि म्हणती धन्य, गा बिभीषणा, । आतां येथूनि लंकेचा तू राणा । हा सर्व रघुनाथचरणापासूनि प्रसादु. ॥ ९ ॥ इति श्रीयुद्धकांडरामायणे । पुढिले कथेसि सादर होतु श्राहणे । वाल्मीकिकाव्यआश्रयो म्हणे । कृष्णदास मुद्गल. ॥ ११० ॥

## प्रसंग ६ वा.

ॐनमो श्रीरामसच्चिदानंदायनमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ मंत्रियांमाजी देऊनि मानु, । बिभीषणासि पुसे रघुनंदनु, । कैशियापरी दशाननु । राक्षेसांसीं नांदतु ? ॥ १ ॥ रामप्रश्नांचीं प्रत्योत्तरें । बिभीषण देतसे आदरें: । "सीताशुद्धि केली वानरें । तयानें देखिलें दृष्टी. ॥ २ ॥ तो रावण क्रूर, कपटी, । त्रैलोक्यासि गर्वे नाणी दृष्टी; । तयाचे अंगलग्न दश कोटि । लंकेचे राक्षस. ॥ ३ ॥ कुंभकर्ण, राया, अवधारीं । तो षण्मास संपूर्ण निद्रा करी; । तयाची काळेसि सरी; । बळियांमध्यें श्रेष्ठ. ॥ ४ ॥ तया कुंभकर्णाचे कुमर । पितया तुल्य बलाढ्य, क्रूर, । तेहीं समरीं निर्जर । विटंबिले बितंड. ॥ ५ ॥ राजपुत्र, ऐकें जी जयरामा, । इंद्र जितला म्हणोनि इंद्रजित नामा । काळ विटे त्याचिया संग्रामा । तो मेघनादु. ॥ ६ ॥ ऐकिजा असेवे प्रहस्त, । रावणाचा मुख्य पुरोहित, । जेणें पुरविला युद्धीं अंत । मणिभद्रगधर्वाचा. ॥ ७ ॥ महापार्श्व आणि महाबळु, । महोदरु आणि त्रिशिरा विशाळु, । देवांतक, नरांतक अढळु । अकंपन, अलोट हे युद्धीं. ॥ ८ ॥ अग्निहन्, वज्रदंष्ट्री, विरूपाक्ष, । आणिक नामाधिले मुख्य मुख्य । ऐसे शत, सहस्र, लक्ष । येकाहूनि येक वळी. ॥ ९ ॥ येरा सख्या नाहीं कोट्यानुकोटि । कामरूपी, क्रूर, कपटी, । राक्षस वसताती त्रिकुटीं । लंकेमध्यें सुखें. ॥ १० ॥ तया राक्षसाची मायिकवृत्ति । सर्व मज ठाउकी, जी रघुपति. । समयानुसार तुम्हांप्रति । मीं सांगेन, राया." ॥ ११ ॥ हें आइकोनि राम संतोषे; । मग बिभीषणासि मनु पुसे, । कपि समुद्र तरती कैसे, । तें आम्हा सांग, मित्रा. ॥ १२ ॥ ऐकोनि रामाचें वचन । बिभीषणें केलें हास्यवदन. । म्हणे, "वेदु जाला कर्माधीन । हे अपूर्व, जी राया. ॥ १३ ॥ अनर्घ्यरत्नाचा

---

पा० मे० १ अ. वायुकुमर. २. ब. प. सि. ३. अ. असत जरि. ४. अ. तो २०,०१ना ६ अ. अइक ऋति.

परीक्षकु कुशळु । साहूनि चाग काय कुळाळु? । तू जी सर्वज्ञ भूपा
दासातें महत्व देशी." ॥ १४ ॥ ऐसें निववूनि स्वामीतें । विचारु वे
सुग्रीवाचेनि मतें. । म्हणे, "राघवा, क्षमाचित्तें । सागरासि मार्गु मागि
॥ १५ ॥ आपुलिया कार्याकारणें । मव्हतयासि लीन लागे होणें." । मी ध
हा सान, ऐसें उणें । न धरावें मानसीं. ॥ १६ ॥ म्हणवूनि आता, र
नाथा, । हा वरुणाल्य वश कीजे सर्वथा; । तुमची परिसोनु मूळकथ
सागरु मार्ग निर्मिळ. ॥ १७ ॥ पुर्वजामध्यें यासि देवोनि मानु । सा
करा, जी प्रसन्नु." । या बोलासि रघुनंदनु । यथार्थ मानिता झाला. ॥ १८
मग तो सूर्यवंशी रघुराजु, । सुमित्रासुताचा पूर्वजु, । नमस्कारित सि
उजू । दर्भासनीं बैसला. ॥ १९ ॥ कुटवेदीमध्यें वैश्वानरु । ति
तेज:पुज सुरकार्यकरु, । तैसा बैसला सुंदरु । सर्वात्मा श्रीरा
॥ २० ॥ मग वाहिनीनायकें, नीळें, । स्वस्थानीं ( स्थापिलीं ) वानरा
दळें. । इतुकी विवंचना शार्दूळें । रावणदूतें देखिली. ॥ २१ ॥ शार्दू
तेथोनि निर्गमनि । आला जेथें लंकापति, । मग प्रणिपात के
दोन्हीं हस्तीं, । वार्ता सागता जाला. ॥ २२ ॥ "अनधारी येथार्थ, भूपाळा
म्या प्रत्यक्ष देखिलें टोळा, । असख्यात लतामृगमेळा । उत्तरपारीं राहिल
॥ २३ ॥ महाबळवत प्लवगम । अहोरात्र करीं शिळा, द्रुम; । सेना वसली
अनिर्भीम । म्या मर्यादा तुळिली ॥ २४ ॥ दोवेच मनुष्य राजकुमर, । जें
मदनाचे अवतार; । अमित रीसकपींचे भार । तयाचा स्वामी सुग्रीवु. ॥ २५
दुसरा कपिसिंधु जळमसुद्रा । भेटों आला, जी राक्षसेंद्रा. । आता रिपुमत्र
विषयीं निद्रा । लागों नेदी सर्वथा. ॥ २६ ॥ व्याधि, वैरि न जिंकिती वळें,
तंव निर्मूळ करावे शीघ्रकाळें; । विलबीं पाविता, वळें । आगळे क्षणक्षण
होती त्याचीं. ॥ २७ ॥ साम, दान अथवा सधिभेदु, । मव्हता करावा
मंत्र सिद्धु, । जेणें तुटे विग्रहसबधु, । ऐसें विचारीं, नृपति." ॥ २८ ।
इतुकी शार्दूळ सागे वार्ता. । उद्वेग वाटे राक्षसेंद्रचित्ता; । कोण पाठवावा
मागुता । जो बोलेल कपींद्रासि. ॥ २९ ॥ मग शुक बोलावूनि तें अवसरीं।

पाठभेद.—१. ब. सगरान्वजु. २. अ. अग्रजु. ३. ब. फळ न स्वीकारून समुद्र
४. ब. दुःखपाणिमध्यें दार्वावर ५. अ. विवरवेना, (म्युहरचना?). ६. अ. वारें.
७. अ. मनोगति.

लंकेश तयासि आज्ञा करी. । म्हणे, जाऊनि उत्तरपारीं । सुग्रीवासि सांगावें. ॥ ३० ॥ "म्हणें, 'गा तूं आम्हां जैसा भ्राता, । सर्वथा न प्रवर्तावें अनुचिता । परतोनि जाईं मागुता । निजस्थाना किष्किंधेसि. ॥ ३१ ॥ आम्हीं हरिली काकुत्स्थभार्या, । तरि तुमचें काय गेलें, कपिराया ? । आदरें आलासि साह्या । व्यर्थ मदबुद्धीस्तव. ॥ ३२ ॥ निर्बळाचिया झुंजा नवजावें, । कृपणाचा वऱ्हाडी न व्हावें, । मूर्खासि मित्रत्व न जोडावें, । हें द्वारें लघुत्वाचीं. ॥ ३३ ॥ अरे गंधर्वी अथवा सुरवरीं । लक्षिली न वचे लंकापुरी; । तुम्हीं नरवानरीं । कैसेनि घेइजेल ? ॥ ३४ ॥ राजपुत्रांचेनि मित्रपणें । व्यर्थ जाल, रे, मरणें,' " । ऐसी शुकाप्रति रावणें । उपदेशिली वार्ता. ॥ ३५ ॥ मग राजाज्ञा धरूनि मुगुटीं । राक्षस कामरूपी, कपटी, । तात्काळ पूर्वदेह पालटी । आणि होय शुक जैसा. ॥ ३६ ॥ प्रेरिला असतां लंकानाथें, । उड्डाण केलें गगनपंथें, । कपिसेनासमुदावो जेथें । उत्तरपारासि तेथ आला. ॥ ३७ ॥ दृष्टि पाहोनि कपिवाहिनी । अंतरिक्ष राहिला गगनीं; । मग वानरांप्रति मधुरवाणी । बोलता जाला. ॥ ३८ ॥ "ऐका, अवघे वानरहो. । केला लंकानाथें अनुग्रहो. । आत्मकार्येवीण कळहो । सांडा राक्षसेसीं. ॥ ३९ ॥ रामाची भार्या वैदेही । तिसीं तुम्हांसि प्रयोजन नाहीं. । कुबुद्धिसरितेचे प्रवाहीं । का, रे, व्यर्थ वाहवलेती ? ॥ ४० ॥ रामलक्ष्मणांचेनि सगें । व्यर्थ आलेति, रे, मृत्युमार्गें. । आयुष्य असेल तरि जा, रे, वेगें । उत्तरादिशेप्रति. ॥ ४१ ॥ जरि नवजाल तुम्ही लतामृगें, । तरि जाणा पुरलीं आयुष्यमार्गें; । जळतपर्वतास पतंगें, । सघटों आलेती बळें. ॥ ४२ ॥ तुम्ही सकळ मुर्खें वानरें । आइका माझीं उत्तरें, । मी येकला पाणिप्रहारें । खंडण करीन." ॥ ४३ ॥ ऐसें वार्तिक बोलत असे । वानर पाहती तंव पक्षी दिसे. । एक म्हणती 'धरा'. या शब्दासरिसे । उडाले कितीयेक. ॥ ४४ ॥ झेंपाळिला चौघीं जणीं । पक्षी धरोनि पाडिला धरणी, । ताडिते झाले करचरणीं । शुकातें वानर. ॥ ४५ ॥ पावत असतां अति वेथा, । म्हणे, "धांव धांव, गा रघुनाथा, । वार्तिक वधणें सर्वथा । विधि नव्हे, गा." ॥ ४६ ॥

*- पाठभेद.-१. ब. तां, गा, जावें. २. अ. ते आज्ञा राक्षस धरी. ३. अ. शुक जाला पक्षिरूप. ४. अ. न्याहळोनि. ५. अ. गंभीरवाणी. ६ अ. तियेचें प्रयोजन तुम्हां. ७. अ. वार्तिक, वेताळ सर्वथा । धर्मेता वधू नये. ॥

ऐसा करुणा भाखी दीनवक्त्रें; । मग अवलोकिला राजीवनेत्रें. । 'सोडा सोडा.' म्हणवूनि सौमित्रें । आज्ञा दिधली. ॥ ४७ ॥ पुनरपि उडोनि निराळा, रहे; । म्हणे, "गा सुग्रीवा, सावध पाहें. । लंकापतीनें बोलिलें आहे, । तेंचि मी बोलत असें. ॥ ४८ ॥ सुग्रीवा, तू राजनीतिनिपुण, । बुद्धिवंतांमाजी श्रेष्ठ, । परी जाणत जाणत स्थानभ्रष्ट । जालासि वायां. ॥ ४९ । भाग्यश्रियेचा शेवटीं, । पाहें, विपरीत संकल्प उठी, । धांवता वानरेपाठीं । सर्व सुखासि मुकिजे. ॥ ५० ॥ जैसें भोगितां लक्ष्मीचे सोहळे । आठवती भिक्षेचे टोहळे । तैसें तुज जालें ये वेळे । रामासरिसा आलासि. ॥ ५१ ॥ देवाचिये बुद्धी वसतसगें कामु । चेष्टा केलिया जिणें केला भस्मु, । तसा तू अज्ञान प्लवगमु । क्षयो पावसी, कुबुद्धि." ॥ ५२ ॥ ऐसें अमंगळ शुक बोले, । ऐकोनि वानर कोपले; । तव ऋषभ म्हणे, "उगले । प्रत्युत्तर यासि सांगों." ॥ ५३ ॥ ऋषभ म्हणे "रे मूढा शुका, । हीनामध्यें हीना मशका, । तुज जरि वधावें वार्तिका । तरि कीर्ति कवण ? ॥ ५४ ॥ उदकावरील हा तरंगु । क्लेश कैंचा पावतां भंगु ? । तैसा करितां तुझा प्राणभंगु । प्रयास नाहीं. ॥ ५५ ॥ सुग्रीवाचें प्रतिउत्तर परियेसीं, । जाऊनि सांगे रावणापाशीं; । 'तू माझा स्वजाति, सखा नव्हेसी, । शत्रु होसी रामाचा. ॥ ५६ ॥ मज सांगातें आणिलें रघुनाथें । त्याचें भविष्य जाण यथार्थें, । जे लंकेसि धाडोनि पाठवें, । तुझें निर्मूळ करीन. ॥ ५७ ॥ गृध्र जटायूतें वधिलें, । सीताहरण कपटेंशीं केलें, । या गर्वाचें भरितें भरलें । असे तुझ्या हृदयीं. ॥ ५८ ॥ तुझिया गर्वकुमाची गवसणी । विदारावया आला द्रुमपाणि, । करिजे शुष्क फणसांची खंडणी । तैसीं शिरें खंडु तुझीं. ॥ ५९ ॥ बिभीषणाचूनि रजनीचर । अधर्मदोषाचें गिरिवर । ते रणभूमिच्या ठायीं कपींसमोर । खंड विखंड पडती. ॥ ६० ॥ ऐसी ऋषभकपीची वागेश्वरी । रावणचाराचें छळण त्यावरी, । हें ऐकोनि अंगद वारी । आपुलिया स्वजातीसि. ॥ ६१ ॥ "ऋषभा, हीन जे आपणाहूनि । तयासि न बोलावें प्रतिवचनीं; । बोलतां होय हानी । आपुलिया महत्वाची. ॥ ६२ ॥ तू तुलासि -

पाठभेद.–१. अ. उड्डाण. २. अ. भासी. ३. अ. ऐसें बोलिले उत्तरीं । रावणदूताची छळणा करी. ॥

त्सी, पुरुषार्थें । हें वचनें जाण व्यर्थ; । जैसें बृहन्नडासि मन्मथें । स्पर्शरीं हाणिजे. ॥ ६३ ॥ परि येणें कपटियानें एक केलें: । कपिसेनावळ तुळिलें; । ऐसियासि सोडितां नव्हे भलें; । 'धरा धरा मागुता.'" ॥ ६४ ॥ ऐसें जंव वालीसुत बोले, । तव कपिदशक ऊर्ध्व उडालें; । शुक धरोनि मारिते जाले । ताडण दोर्दंडीं. ॥ ६५ ॥ मिळोनियां बहुत कुंजरीं । मांजर ताडिजे शुंडाप्रहारीं, । तैसें येक शुकासि वानरीं । ताडण आरंभिलें. ॥ ६६ ॥ मग परवार्तिकासि ते काळीं । बंधन केलें पाशजाळीं; । वानरीं वेढूनि भूमंडळीं । उत्तरपारीं रक्षिला. ॥ ६७ ॥ काय वर्तलें तयाउपरी । राघवें पूजा समर्पिली सागरीं; । फळें, तोय वर्जूनि निराहारी, । दर्भासनीं निद्रा केली. ॥ ६८ ॥ क्षीराब्धी शेषाचां आस्तरीं । महाविष्णु इच्छे निद्रा करी, । तैसा राम अंबुनिधीचां तीरीं । दर्भासनीं शोभत. ॥ ६९ ॥ नेमेसी असिजे राजीवनेत्रें, । कपिसेना जैशी लेपिंची चित्रें; । ऐशीं क्रमिलीं त्रिरात्रें । जलाब्धीचा तटाकीं. ॥ ७० ॥ अप्रसन्न देखोनि समुद्र । कोपयुक्त जाला नरेंद्र; । प्रलयसमयींचा रुद्र । तैसा भासे सर्वांतें. ॥ ७१ ॥ अग्निकारिला असतां कोपु । सुमित्रासि पुसे रघुनृपु, । " तुम्ही सांगितला तो संकल्पु । सुफळ नव्हेचि पैं. ॥ ७२ ॥ मी नेमेसीं या समुद्राप्रति । फळें, तोय वर्जूनि असें मती, । परि हा अप्रसन्न पापमूर्ति; । ऐसियातें दंड कीजे. ॥ ७३ ॥ कल्पूनि इच्छिला स्वार्थु । तो हीनापासोनि पावे समर्थु, । हा उपाव देखणें व्यर्थु । अपकीर्तिसि कारण. ॥ ७४ ॥ पांगुळ होऊनि ठेला वायो, । नेत्रीं मंद जाला सूर्यो, । ज्वरें तप्त हिमालयो, । हें अपूर्व जी केवढें ! ॥ ७५ ॥ मेघ तृषाक्रांत जाला अंबरीं, । क्लीबदशा पावला कामारि, । प्रळयींचा पावक शीतें थरारी, । तैसें आजि जालें. ॥ ७६ ॥ मी राम, दशरथकुळअर्कु, । सुरांसारखियांचा वरदायकु, । तो मी समुद्राचा जालों याचकु, । हें विपरीत सर्वथा. ॥ ७७ ॥ या सागरासि दिधला मानु । परि वेळु नेणेचि अज्ञानु, । दक्षासि सिक्षा लावी त्रिनयनु, । तैसें करीन आतां. ॥ ७८ ॥ आपुल्या निज अग्निबाणीं । हा जळसिंधु करीन निपाणी; । जैशी शुष्क सर्व धरणी । तळवट असे." ॥ ७९ ॥ तंव लक्ष्मणु म्हणे, "रामा, । तुज सर्व धैर्याची सीमा; । सात्विक गुणविश्रामा, ।

पाठभेद.--१. अ. जी रामा, । योगेश्वरमनविश्रामा । तुज तंव धैर्य, ६ मा, । सात्विक गुणनिधि. ॥

तुज का ऐसी तीव्रता ? ॥ ८० ॥ कडवटपणा ये अमृता, । सोमापासूनि उष्णता, । तरि तुज वैदेहीकांता । शीघ्र कोपु उद्भवे. ॥ ८१ ॥ अगा, पूर्वजा, दयानिधि, । अंगिकारीं क्षमाधैर्यबुद्धि, । या उपरी आपणचि महोदधि । कार्य करील, सत्य." ॥ ८२ ॥ ऐसा सौमित्र बोलोनु राहे. । पुनरपि राम सागराची वास पाहे; । तंव तो मातला दिसत आहे, । उचंबळे भयानक. ॥ ८३ ॥ उचंबळे पृथ्वीवरूनि गिरि । तैशा हेलावती ल्हरी; । उदक उसळतसे अंबरीं । घडघडायमानें घोषें. ॥ ८४ ॥ ऐसा उड्डुल्ला वरुणालयो । दाखविता जाला प्रळयसमयो । अवलोकूनि उदेला कपरायो । कितेका कपिअंगीं. ॥ ८५ ॥ ऐसें आपुलें मद्दळ गार्दे । नंदेश्वर दाखवी रामापुढें; । जेसें चडवातापुढें मेहुडें । पसरलें अवरीं. ॥ ८६ ॥ अद्भुत, असमाव्य दिसे समुद्र, । हें न सोहे रामचद्र. । मग कोपला, जैसा रुद्र । महाप्रळयकाळीं. ॥ ८७ ॥ आता अंबुनिधीचें करील शोषण, । तरि सुजनहो ऐका सावधान; । जेणें तुटे संसारबधन । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ ८८ ॥

---

## प्रसंग ७ वा.

ॐनमः श्रीसच्चिदानंदायनमः । श्रीगुरुकाशिराजायनमः । तव रघुनाथ म्हणे, "गा बंधु, । अधिक मातला, पाहें सिंधु; । आता या दुरात्मयाचा अपराधु । न सोहें लक्ष्मणा. ॥ १ ॥ कृष्णनायसाप्रति अादरें । नित्य न्हाणिजे गोक्षीरें, । तरी काये त्याचेनि शरीरें । श्वेतवर्ण होइजे ? ॥ २ ॥ पचामृतकाढियांत शिळ । भिजों घातली चिरकाळ, । भेदोनि होय रसाळ, । हें न घडे, सौमित्रा. ॥ ३ ॥ दुरात्मयां, पापरूपा । भजतांही परि कैंची कृपा ? । पय.पान करवितां सर्पा । पूर्वगुण न सडी. ॥ ४ ॥ आता जाण, गा भ्रातया, पणु; । निर्मूळ करीन शीघ्र वरुणु." । ऐसें बोलोनि सीतारमणु । उभा राहिला शीघ्र. ॥ ५ ॥ ठाणीं तुळिलें दोन्ही दोर्दंड, । मग करीं घेतलें कोदंड, । अरिअंतक जें प्रचड । चढविलें रीत. ॥ ६ ॥ राम नरवीरचूडामणी । ब्रह्मशस्त्र स्थापिलें निजबाणीं; । धारा पुसूनि लाविलें गुणीं । ब्रह्मदंडासारिखें. ॥ ७ ॥ वोढितां कोदंडाचेनि करारें ।

---

पाठभेद.-१ अ. गर्जे. २. ब. पुढील कथा करा श्रवण. ३. अ. करीं क्षमा. ४. अ. दुराचारिया. ५. अ. सर्वथा गुण.

भयें शीत धरिलें वैश्वानरें, । महाघोष केला अंबरें, । कांपु वर्ते भूमिसी, ॥ ८ ॥ कालिमा व्याप्त जाली दिनकरा, । पर्जन्या ऐसा च्यवती तारा, । धुई दाटली दिगंतरा, १ वळसा वर्ते भूतांसि, ॥ ९ ॥ थरारिती स्थावर पर्वत, । त्रैलोक्य अवघें भयचकित, । विमानें साडूनिया वळगत । उघिती दाही दिशा, ॥ १० ॥ वोलाडूनि मर्यादासीमा । योजन येक सिंधु आला साउमा, । ते समयीं सत्य प्रवगमा । युगान्त गमलें. ॥ ११ ॥ यानंतरें दशरथात्मजु । कठिण वोले समुद्रा उज । म्हणे, "साहें, रे, शर तेज पुञ्ज । तुझें शोषणकर्ता" ॥ १२ ॥ त्या बोलासारिखा भयचकितु । सागरींहूनि सिंधु निघे मूर्तिवंतु, । सरिता प्रत्यक्ष परिवारितु । रामापुढें आला ॥ १३ ॥ निशी प्राप्त जालिया पौर्णिमा । तारासमेत उगवे चंद्रमा, । तैसा नंदीवेष्टित समुद्र श्रीरामा । जवळिके आला ॥ १४ ॥ महायागीं देता पूर्णाहुति । कुडाग्नींहूनि प्रकटे मूर्ति, । तेसा सागर राघवाप्रति । समुद्रांतूनि आला ॥ १५ ॥ क्षीरसागरा समुद्रमथनीं । प्रकट होइजे चतुर्दश रत्नीं । तेसा समुद्र सरिताउदकींहूनि । मूर्तिमंत रामापाशीं ॥ १६ ॥ अनुपम्य रत्नें अलोलिकें । समुद्र लेइला असे अनेकें । सरिता शृंगारमंडित कौतुकें । उभिया सागरपृष्ठभागीं ॥ १७ ॥ सागरनदियांचा अंजलीपुटीं । रत्नें जगदुर्लभें, गोमटीं, । तें रघूत्तमासि रिघता भेटी । पुढ समर्पिलीं ॥ १८ ॥ सागरु म्हणे, "जी जयरामा, । कल्याण गा तुज नरवीरोत्तमा । कोपू साडी, आता कृपाक्षेमा । करीं मजवरि. ॥ १९ ॥ समुद्र मातला तुम्हा दिसे । परि माझा स्वभाव ऐसाचि असे । लहरिया उसळति वळसे । सदा गर्जे भयानकु ॥ २० ॥ तीव्र सदा हें रविमंडळ, । तें कहिंच नुगवे शीतळ । महा वोखटें हळाहळ । तेथें कैंची मधुरता? ॥ २१ ॥ नम्र नव्हती वज्रधारा, । उष्णता नसंडी वैश्वानरा । म्हणवूनि सहजगुण सागरा । न पालटे सर्वथा ॥ २२ ॥ मी सागरु आपुलेनि वळें । स्वभावेंचि लहरिया उसळें । हें वोखटें न म्हणावें स्नहाळें । कृपा करावी मजवरि ॥ २३ ॥ धर्ममया रघुनंदना, । जोंवरि उतरे कपिसेना । मी थिरावेन" या वचना ।

पाठभेद – १ अ रघु म्हणे २ अ ऐसा रामासि भेटला. ३ ब प्रलयमूर्ति.

रघुरावो मानवला. ॥ २४ ॥ अयोध्या नृपकोदंडपाणि । सागराप्रति बो मधुरा वाणी, । "म्यो शर साधिला गुणीं । तो न वचे काढिला. ॥ २५ उदयाचलाहूनि आदित्यु । निघे पश्चिमे आक्रमितु, । तो पुनरपि पूर्वे फ अस्तु, । तरिच शर सरे मागें. ॥ २६ ॥ पर्वतदरींचें सरिताजळ । साग राप्रति धांवे तुंबळ, । तें परतोनि ठाकी जन्ममूळ । तरि बाणु रिघे माता. ॥ २७ ॥ ऐशीं रघुनाथाचीं उत्तरें । कठिण आइकिलीं रत्नाकरें; । मं प्रार्थी रामासि जोडिलेनि करें; । म्हणे, "आइकें राया, ॥ २८ ॥ तुमचिय वडवानळ शरें । कोरडें होइजे माझेनि उदरें, । मग जितुकीं दीन जलचरें नाशातें पावतील. ॥ २९ ॥ तरि, धर्मात्मया रघुनाथा, । माझिया गर्भ जीवां न व्हावी वेथा । आणि तुझा बाणाग्नि न शमे वृथा, । ऐसें करीं, कृपाळुवा. ॥ ३० ॥ माझिये तीरीं उत्तर दिशे । अन्यायकर्मी लोक वसे; । तरि तिनुचे स्थळीं जळ नासे । ऐसें करी येणें बाणें." ॥ ३१ ॥ ऐसें बोले रत्नाकरु, । तंव सुटला ब्रह्मशस्त्र शरु; । वमन करित जातसे वैश्वानरु । उत्तर दिशे उजू. ॥ ३२ ॥ दैदीप्यमान महाकल्लोळु । जैसा अनित्य विद्युल्लतांचा मेळु ॥ तो उत्तरस्थळीं पडूनि, टाळू । फोडी पृथ्वीची. ॥ ३३ ॥ कितियेक जळसिंधु शोषला, । बाण पाताळापर्यंत गेला. । तया शरपंथाचा कूप जाला, । नाव ठाके व्रणतीर्थ. ॥ ३४ ॥ जितकें सिंधुजळ सोखलें । तितुके भूमी मारवाड जालें; । तेथें रामें वरद दिधलें । जे सदाफळ असो. ॥ ३५ ॥ कोपा भिलु जाला रघुनंदनु, । बोले सागरु प्रसन्नवदनु; । " कपिसेना उतरे तो प्रेत्नु । आइकें, जी नृपति. ॥ ३६ ॥ नळु वानरु महाबळवंतु, । जाणा विश्वकर्मयाचा सुतु, । आहे ब्रह्मवरदवंतु; । जळीं पाषाण तारील. ॥ ३७ ॥ नळाचा हस्त जे शिळेसि लागे । ते जळीं काष्ठा ऐसी तरगे. । आतां सेतु बांधवीं, जो न भंगे । कपिसेना उतरतां." ॥ ३८ ॥ ऐसा उपावो सांगे समुद्र । तेणें आनंदला रामचंद्र; । जैसा संतोष मानी देवेंद्र । बृहस्पतीचेनि मंत्रें. ॥ ३९ ॥ रघुनाथु ह्मणे, " नदनदेश्वरा । तूं आमुचा पूर्वजांतुल्य सोइरा; । समयीं आलासि उपकारा । तें शूळपाणि

पाठभेद.–१. व. माझी विज्ञापना, रणरंगधीरें, । म्हणे आइकावी. ॥

जागे. ॥ ४० ॥ चितेचिया योगनयाभीतरीं । आम्ही पडिलों सहपरिवारीं, । तरी तू वरपलासि कृपाधारीं, । साकडें निरसलें. ॥ ४१ ॥ देखोनि रामाचा गौरवराशि । सुखभरतें आलें समुद्रासि. । मग आज्ञा मागोनि रघुनाथासि । निजास्थाना सिंधु गेला. ॥ ४२ ॥ याउपरि वैदेहीकांतें । आदरें पूजिलें नळातें. । "उपैकारियासि भवानीकांतें । अगाध तराया. ॥ ४३ ॥ ब्रह्मशाप वरदवत जालें, । तें ये काळीं आम्हा उपेगा आलें, । जैसें सोगव्यीमाजी भेटलें । तारू अकस्मात. ॥ ४४ ॥ जे काळीं भाग्यश्री प्रकटे ।,तें परिस होती घरींचे गोटे, । झाडमात्र जितुकें भेटे । तें कल्पद्रुम होय. ॥ ४५ ॥ वाडाचे कूपीं स्वातीचें जळें । अनर्घ्य निपजतां मुक्ताफळें, । गोधनें घरींचीं नाठाळें । त्या होतीं कामधेनु ॥ ४६ ॥ कपि मित्र जोडले मजकारणें. । अमराहूनि आगळे कोटिगुणें." । गोड ऐकोनि रामाचें बोलणें । अति आनंदले कपि ॥ ४७ ॥ मागुतें राम म्हणे, "गा नळा, । वहिला उदकीं तारीं शिळा. । सर्वांतें प्राप्त होय सुवेळा । हें करीं शीघ्र काळें." ॥ ४८ ॥ रघुनाथाचा आदरशब्दें । नळ बोले अति आल्हादें । "स्वामी, तुझेनि चरणप्रसादें । पालाणीन समुद्रा. ॥ ४९ ॥ जो देहधारी न धरी पुरुषार्था । तयाचें जन्म गेलें वृथा. । जननियें जठरीं केली वेथा । वात्सल्य करितां. ॥ ५० ॥ जमदग्नीनें तजिलें कोपसत्व, । सहस्रार्जुनें हरिलें जीवित्व, । पुढं फरशुधरा आलें महत्व, । तीर्थे क्षेत्री मारिलें. ॥ ५१ ॥ म्हणोनि, जी रघूत्तमा, । जळो या जात्री परती शांति क्षमा, । तोयेंकरूनि सागरु तुम्हा । भेटावया आला ॥ ५२ ॥ त्या पुरुषार्थें कपोतें उप प्रविदैं । मग ब्रह्मवरद प्राप्त जालें." । हें ऐकोनि सन्तोषलें । अंतःकरण रामाचें. ॥ ५३ ॥ नीळें कपीतें आज्ञा दे त्वरें, । "तुम्हीं वळवत जा हो उत्तरें, । कुमशिळांचे बांधोनि भारे । आणा मनु तरावया" ॥ ५४ ॥ कपि गर्जिन्ले भुभु कारें, । अमित धांविन्ले उत्तरें, । उत्पाटिले पाणि प्रहारें । नानाजातींचे वृक्ष, ॥ ५५ ॥ ताड, माड, साग, तमाल, । मद्र, उंबर, वट, पिंपळ, । खैर, हिंवर, व वेठ विशाळ, । मादार, निवडुग ॥५६॥

१. अ. पुसिले. २. अ. तू उपकारी निर्मिलासि अर्जुन. ३ ब. ३ म १ ज/ ४. ब हृदय. ५ ही ओंवी ब प्रतीत नाहीं

निंब, आम्र, वेल, चंदन, । वळेर, पारीतक, रातांजन, । हेते, पळस पांगारे, कांचन, । चंपक, अरिटें, ॥ ५७ ॥ वेत, वेळू, हिंगण, हिंवडे, फणस, हरित, व्याहाडे, । धुरें, निंवारे महारुखडे, । तीव्र आणि सेंवगे ॥ ५८ ॥ शिंशिशिरि, साल्या, पिंपरी, । निगुडी, निर्गी, गुगुळी, चारी, आवळिया, जांभुळिया, वदरी, । चिंचा, गोंदणिया, ॥ ५९ ॥ रायेरी, खर्जुरी रायेफळी, । दाळिंबी, कर्वदी, पूगिफळी. । पिळका, भोंकरी निशाळी, । आणिक नाना जातीं. ॥ ६० ॥ ऐसे द्रुम वानरादिकीं । उपडूनि वाहिले मस्तकीं, । शीघ्र आणूनि सिंधोदकीं । टाकिते जाले. ॥ ६१ ॥ ऐसे वृक्ष जवा पेर्ग्नेनार्रा । उपट आरंभिले वानरीं, । व्हान म्हणाल तरि त्याचा पाठारीं । ग्रामें, पुरें, पाटणें. ॥ ६२ ॥ आणिकहीं नदी खळाळे, । गर्जतीं हलकल्लोळें, । सरोवरें, तडागें तुंबळें, । समुद्रासमान पैं असती. ॥ ६३ ॥ बहु द्रुम, बहु वल्ली असतीं; । नामें सांगावीं कोणें किती? । असतीं अष्टादशभार वनस्पति । वदली न वचे. ॥ ६४ ॥ आणितीं वानर कोट्यानुकोटि, । भरणें घालिती सागराचा पोटीं; । नळु वरदवंत कपिजेठी । सेतु बांधिता जाला. ॥ ६५ ॥ येक कपि गिरि उत्पाटिती, । येक समुद्रीं आणूनि घालिती, । येक सेतुबंधन करिती । नळाचेनि मंत्र. ॥ ६६ ॥ सर्व झाडें सरळियाउपरि । काय केलें वानरवीरीं[१] । शिळा असती ज्या स्थळांतरीं । तेथूनि आणिलें जाले. ॥ ६७ ॥ कलश ठेविती कलशावरि । तैशा शिळा मस्तकीं घेती हरि, । आणूनि टाकिती सागरीं । दोर्दंडबळेंकरूनिया. ॥ ६८ ॥ पडती शिळांचिया चळथा । तेणें जळ धांवे गगनपंथा. । महाजळचरें पावती वेथा, । पळती पूर्वपश्चिमे. ॥ ६९ ॥ वज्रचि तें कपिकुळ अंग; । करांगुळें मोडिती गिरींचीं शृंगें, । घेऊनि टाकिती वायुवेगें । अंबुनिधीमधें. ॥ ७० ॥ अंबरींहूनि मेघ वर्षे । वानर शिळा टाकिती तैसे. । नळ युक्ती बांधित असे । उदकीं सेतु. ॥ ७१ ॥ वानर वश घेऊनिया करीं । गणित करिता दिधलीं येथवरी, । दक्षिणे नाडविला निस्तारी । अवक्र अपूर्व तो. ॥७२॥ पिता जयाचा विश्वकर्मा । तो सेतु बांधे नळु नामा, । ऐसियासि वानया उपमा । भुवनत्रयीं न देखिजे. ॥ ७३ ॥ प्रथम दिवशीं बळिवंतु । चतु-

१. अ. पर्वताधारीं. २. ब ठेविती मस्तकावरि.

त योजनें बांधिला सेतु, । तंव अस्तमाना गेला आदित्यु । पुढें पुरें
रिती. ॥ ७४ ॥ पुढें दिवसु प्राप्त जाला दुसरा. । कपि उत्तरें धांविन्नले
रा । शृगें, शिळा आणूनि सागरा । सुजिते जाले बळें. ॥ ७५ ॥
स्तकीं, लांगूलीं, भुजादंडीं । घेऊनि वानर आणिती धोंडी, । पर्वतासार-
खेया दंडी । सिंधूमध्यें टाकिती. ॥ ७६ ॥ अरुणोदयापासूनि सेतु ।
ाधिता होय सूर्या अस्तु, । तें वाढविला अद्भुत। द्विदश योजनें. ॥ ७७॥
कृत्तिकेपासूनि चांदिणें पडे, । तें दिवसेंदिवशीं अधिक वाढे, । तैसा सेतु
क्षिणपंथें चढे । नळाचेनि हातें. ॥ ७८ ॥ मुग्धेची तारुण्यदशा । अनेव
उमटती दिवसदिवसा, । सागरावारे सेतु बांधिता तैसा । वृद्धीतें पावत
असे. ॥ ७९ ॥ बाल्याभ्यासापासूनि पंडितु । नित्यानित्य व्युत्पत्ति वाढवितु; ।
तैसा आगळा होतसे सेतु । शिळाशिखरेंकरोनिया. ॥ ८० ॥
तिसरा दिवसु उगवला । जालियापासूनि सेतु बांधिला, । गणित केलें तंव
भरला । येकवीस योजनें. ॥ ८१ ॥ प्रवर्तला चोथा दिवसु । वानरां
अधिकाधिक उल्हासु, । पाडिती शिळांचा पाउसु । अंबुनिधीवरि. ॥ ८२ ॥
नानाजातींचे पाषाण निशाळ, । ताम्र, श्वेत, कृष्णांबर, नीळ, । ऱ्हस्व,
दीर्घ वर्तुळ, । कपि घालिती समुद्रीं. ॥ ८३ सेतु बांधिता दिनमान गेलें ।
वाढविलेयाचें गणित केलें, । ते पूर्वदिवसाहूनि भरलें । अष्टादश आणि
चारि. ॥ ८४ ॥ पुढें पंचमु दिवस पाहिला । वानरीं शिळांचा सटा पा-
डिला, । तैं पुनरपि वाढविता जाला । मुख्य नळ सेतूतें ॥ ८५ ॥ पूर्व-
दिवसापासूनि अधिकु । त्रयोदश आणि दशकु एकु । योजनें बांधिला दो-
एकु । सेतु समुद्रावरि. ॥ ८६ ॥ रघुनाथ चालवीतु घोडे । तव तो सेतु
अधिकाधिक चढे. । बांधता बाध लागले कडे । सुवेळाप्रदेशींचे. ॥ ८७ ॥
पांचवे दिवशीं बांधणी । मागुती भोंविलीं वानरगणीं, । अपूर्व हे नळाची
करणी । इतुकी नाहीं सागरीं. ॥ ८८ ॥ उत्तरपारींहूनि गणना केली ।
त्यांनीं शत योजनें जाली, । रुंदी आटवी जंव पाहिली । ते असे दश यो-
जनें. ॥ ८९ ॥ सेतूस लागे सुवेळातीर । देखोनि आनंदले वानर, ।
जैसी पूर्णाहुति जालिया थोर । ऋत्विज संतुष्टती. ॥ ९० ॥ ब्रह्मगि-

१. अ पडे २ अ. पीत, कृष्ण, नीळ ३. अ. शिरवा. ४. ब. नय आणि दोनि दशकु. ५ अ चरि रथ चालविता घोडे ६. ब आगळ चढे ७ अ. मविली.

रोंहूनि गोदावरी । गौतमें मेळविली सागरीं, । तें आनंद मानिजे ऋषेश्वरीं । बहुमाळ मनीं, ॥ ९१ ॥ तैसें विश्वकर्मयाचेनि नंदनें । सेतु बांधिला शत योजनें, । सुवेळा देखोनि वानरांचीं मनें । संपूर्ण संतोषती ॥ ९२ ॥ देव, गंधर्व बैसोनि विमानीं । सेतुचरित्र पाहती लोचनीं. । तयांते आनंद वाटतसे मनीं । अपूर्व अत्यंत. ॥ ९३ ॥ समुद्र पालाणिला पाषाणीं । ऐसें स्वर्गींही नाहीं देखिलें कोणीं. । धन्य धन्य नळाची करणी ! । अघटित घडलें ॥ ९४ ॥ ऐसें बोलती सुर, किन्नर, । भुभुःकार करिती वानर, । तेणें घोषें ब्रह्मांडभांडोदर । संपूर्ण भरलें ॥ ९५ ॥ दशमुखारि आनंदला, । जैसा क्षीरार्णव उचंबळला, । तैसाचि सौमित्र संतोषला । शेषअवतार जो. ॥ ९६ ॥ सुग्रीवा बिभीषणाचें हृदय । संपूर्ण जालें आनंदमय. । म्हणती निपजलें महाकार्य । समुद्र तरावयाचें. ॥ ९७ ॥ याउपरि नळाप्रति वचनें । राम बोले तें अमृतासमानें. । म्हणे, " धन्य, गा, तू, निदानें । तुजशीं तुळिता हळुवटें ॥ ९८ ॥ तुज परिसेनें दीजे सरी, । तो लोह पालटी इतुकेंचि करी, । परि उदकीं शिळा ते तारी । हें न हेत्याचेनि. ॥ ९९ ॥ शिळा अर्वतिप्रमाणु । पडताचि जळीं बुडे पाषाणु । हा तयाचा सहज गुणु । विश्व देखत आहे ॥ १०० ॥ गिरि आणि गिरितुल्य शिळा । तुझिये हस्तें, गा नळा, । उदकीं तराविया, हें डोळां । अपूर्व देखिलें. " ॥ १ ॥ ऐसें बोले जानकीप्रियो । प्रतिउत्तर दे विश्वकर्मतनयो. । "उत्पत्ति, स्थिति, प्रळयो, । हें करणें केलें आहे? ॥ २ ॥ सूर्यातें तेज कोणें दिधलें? । चंद्रासि शीतळ कोणें केलें? । नभ्रं नक्षत्रांतें कोणें घातलें । वायोचक्रीं? ॥ ३ ॥ जग वाहे हें धैर्य स्थिति, । समुद्र मर्यादा नोलांडिती । पवनासि अद्भुत गति, । हे कोणाचें करणें, देवा? ॥ ४ ॥ ऐसि विश्वाचें कार्य करी । मेघ निर्मोनि गगनोदरीं, । आंतरिक्षीं पृथ्वीवरि । करणें उपजविली? ॥ ५ ॥ करणें केल्या चारि वाणी? । करणें निर्मिल्या चारि खाणी? । चौर्‍यायशीं लक्ष जीवयोनी । प्राण घालिता करणु? ॥ ६ ॥ पक्षिकुळा श्वापदा आंगीं । वर्ण उमटविले विविधा रंगीं, । चक्षींच ऐकिजे भुजंगीं, । ऐसें कोणें पा केलें? ॥ ७ ॥ युगायु-

१ हा शब्द अ प्रतीत नाहीं. २. घ. तव गर्भिले ३ अ नर्दे ४ अ न्तरें. ५ घ. दिवार्य तो पासा. ६. घ. न दाटिती ७ घ केसें सम?

तांचांमितरीं । अवतारलीला कोण करी? । या प्रपंचाचा सूत्रधारी । कोण जाला आहे? ॥ ८ ॥ देव, दानव, राक्षस, असुर । कोण लावी यासीं वैर? । धर्माधर्म बहुत प्रकार । कवणें नेमूनि ठेविले? ॥ ९ ॥ उदकीं पाषाण बुडती, । हें कवणें केलें भुवनपति? । आतां तरले हे मागुती । कोणाची करणी? ॥ ११० ॥ म्हणता नळें तारिल्या शिळा, । हेंही करणाचें करणें, दयाळा? । असो बहुत बोल; मायाकळा, । तुझी तूंचि जाणसी. ॥ ११ ॥ हा रचूनि ब्रह्मांडगोळ, । लीलाविग्रही खेळसी खेळ । तो तूं सर्वज्ञ भूपाळ । दासातें महत्व देसी. ॥ १२ ॥ सर्वअंतर्यामी सर्वात्मा । अखंड चित्स्वरूप तूंचि, रामा. । जैसी घटमठीं वर्तणुक व्योमा । व्यक्ता अलिप्त. ॥ १३ ॥ तूं सदोदित, सकळ, सहज; । तें वेगळें नळपण कैचें मज? । म्यां शिळा तारिल्या, हें चोज । कोठें सरतें होईल? ॥ १४ ॥ निमित्य ठेवूनि एकातें, । कार्य करिसि इच्छामात्रें. । असो बहु बोलणें; भगवंतें । गौरव दिधलें तेंचि गोड." ॥ १५ ॥ ऐसे नळाचे शब्द, । जैसे का सुधारसाचे बुद; । परिसता हृदयारविंद । संतोषलें रघुनाथाचें. ॥ १६ ॥ तेचि प्रसंगीं मागुता । सर्वेश्वर जाला बोलता. । म्हणे, " नळा, बहुत गुणवंता, । असाधारण बुद्धि तुझी. ॥ १७ ॥ सकळ शास्त्रांचें मथन । करूनि ठेलें तुझें मन. । तुज एकी उपमा देता न्यून । युक्ति गुरुकृपेचिया." ॥ १८ ॥ सुग्रीवें वाहिनीनाथातें । आज्ञा दिधली वेगें बहुतें. । सेतुपथें जावयासी त्वरितें । ऋक्षवानरांचीं दळें. ॥ १९ ॥ गगनचुंबित पताकाचिरें । नीळें भ्रमरिशीं वेगवत्तरें. । देखोनि निघाले कपींचे भारे । सेतुचेनि मार्गें ॥ १२० ॥ रघुनाथासि हनुमंतें । स्कंधीं घेतलें प्रेमें बहुतें, । तैसेंचि लक्ष्मणातें वाळीसुतें । हर्षयुक्त वाहिलें. ॥ २१ ॥ रघुकुलतिलक दोन्ही वीरीं । मिरविजे कपिस्कंधावरी; । जैसे सिंहासनी गगनोदरीं । चंद्र, सूर्य शोभती. ॥ २२ ॥ महाभारामध्यें मंडळी । बिभीषण, सुग्रीव राजाजवळी. । पुढें, मागें अनुकूळी । वानरवीर चालले. ॥ २३ ॥ निघाली सेना घनदाट, । देश योजने रुंद वाट, । येसापुटें येक अचाट धीट । पर्वतप्राय चालती. ॥ २४ ॥ दळ चाले चटपटगती, । दोंही प्रदेशाकडील वीर निसरती; । पडत पडता उड्डाणें घेती । व्योमाचिये पोकळीं. ॥ २५ ॥ तुनळ गर्जे

---

१. अ. मिष मिष २. अ. म्याच वाचिली ३ अ. सर्व. ४ अ. द्रव. ५. अ. जाय

सरितापूर, । तेणें गजरें चाले दळभार, । ऐसे तरले सेतुपथें सागर, । सुवेळाप्रदेश पावले. ॥ २६ ॥ उल्लंघित पावलेया पलैपार, । श्रीराम आला परिवेष्टित वीर; । जेसा सूर्य सहस्रकरेंसीं निग्दर। पश्चिमाचलाचें पानें. ॥ २७ ॥ सुवेळाप्रदेशींचें भूमंडळ । तेथें पाहोन रमणीक स्थळ, । रामलक्ष्मणसुग्रीवादिर सकळ । उतरले कपि लागवेगें. ॥ २८ ॥ तारकासुरावरि घाल्णें । मेरुकटरमा सुरेंद्रें केलें उपणें, । तसें कपिचक्रेंसीं सीता रमणें । सुवेळातळीं राहिजे. ॥ २९ ॥ इति श्रीरामायणयुद्धकांडकथा । वाल्मीकिकाव्य नामी भवार्णवनेवा, । चित्त वारें श्रोतीं श्रेसार्था । कृष्णदास मुद्गल म्हणे ॥ १३० ॥

## प्रसंग सातवा.

ॐनमो श्रीसच्चिदानंदाय नम । श्रीगुरुकविराजाय नम । सुवेळाप्रदेशीं राहिलियावरि । रघुनाथें देखिला त्रिकूटगिरि, । त्या पाठारम्मर्दा लंकापुरी । तेजोराशि दिसत असे. ॥ १ ॥ पाहता अपूर्व वाटे श्रीरामा. । म्हणे, " धन्य धन्य तो विश्वकर्मा; । लंकेसि घावया उपमा । भुवनत्रयीं न देखों. ॥ २ ॥ चदन वनस्थळीं गोमटी । ते व्यापिली असे सर्पपोटीं, । तैसी लंका कोट्यानुकोटि । राक्षसीं गुप्त असे. ॥ ३ ॥ लंका देवतांचि जोंच शमे, । नेत्रीं आनंद, मन रमे, । चित्ररथाचें उद्यानवन उपमे । उणें वाटे यथार्थ " ॥ ४ ॥ ऐशी लंका देखिली रघुनंदनें, । जानकीसि भेटों जाउें मनें, । क्षण येक स्नेहवचनें । रामु बोलता जाला. ॥ ५ ॥ आता "लक्ष्मणा, लंका पाहें, । येथें प्राणप्रिया सीता आहे, । मी केव्हा तीसि देऊनि बाहें । आलिंगन देईन[1] ॥ ६ ॥ सौमित्रा सीतेचेनि वियोगें । सदा संतप्त अहर्निशी आंगें, । घटिका जातसे जैसीं युगें । श्रोमसिरीं मन बुडे '॥ ७ ॥ ऐसें बोलोनि रावणारि । कपिकुळें वरासि आज्ञा करी, । " अव्यग्र असावें रोरथोरीं । राहिनी वेष्टनिया. ॥ ८ ॥ सर्वांपुढें अंगदें, नळें, । दृढ राहेंनें आपुलेनि बळें, । जंबें,[2] ऋषभें अंतरमेळें । दक्षिणभाग रक्षावा. ॥ ९ ॥ ऋक्षींसहवर्तमान जांबुवंतें । वामें रक्षावें वाहिनीतें । गवयें, गंधमादनें वहिलें । पृष्ठभाग रक्षावा. ॥ १० ॥ कपिचक्राचे मध्यमठीं । सुग्रीवा तू आम्हांतरळीं, । रघुनाथ ते पाठीं । आरा करी कपोटा ॥ ११ ॥ परिसोनि नेत्रेश्वरानी उत्तरें ।

---

१. अ पर २ अ अंतरमळें ३ अ नरेंदाचा.

नीळासि निरोपिलें किष्किंधेश्वरें, । मग जया कपींचीं दळें अपारें । तें मर्यादा वसिन्नें.[1] ॥ १२ ॥ द्रुम, शिळा, शिखरें सिधें । हें कपिपाणितळीं आयुधें, । येकें येकें फरूनिया उर्धें । नभ दाटिती नादें. ॥ १३ ॥ ऐशी कपिसेना जालिया स्वस्थन । मग राघव बोले धर्मवचन. । "रावणचार ॥रग वचन । नवरानवरि. ॥ १४ ॥ शीघ्र, सुग्रीवा, शुकासि सोडा, । पाशबंध चरणींचे तोडा, । हा क्लेशभूत जाला बापुडा । नवरानवरि हो. ॥ १५ ॥ स्वामींचा कार्याकारणें । भृत्यासि परसेनेमध्यें लागे जाणें, । तया येकांत वद्रुतीं निंदणें । हे धर्मनीति नव्हे ॥ १६ ॥ जो संग्रामातें इच्छितु । तयाचिवरि उचलावा हातु, । वार्तानिसनिक, परदूतु । क्षेमेंचि जानों दीजे." ॥ १७ ॥ परिसोनि रामाची उत्तर । शुक सोडिला वाळी कुमरें, । तो 'जय राम' म्हणोनि सुखें योरें । खेगमगें उडाला ॥ १८ ॥ चोणवयाभात कोंडिजे मृगें । तो अवचट वाचें उदेलेनि भाग्यें, । तैसा शुकु न पाहता मागें । त्वरें जातु लंकेप्रति. ॥ १९ ॥ ब्रह्ममुक्तिसुख जाटे जीवीं । तयासि उपमा काये द्यावी[2] । ते हो जाणती अनुभवी । प्राप्त जालिया ॥ २० ॥ आनंदपूर्ण असे चित्तवृत्ति । शुक लंका प्रवेशे शीघ्रगती. । राजगृहा येऊनि नमिला लंकानृपति। साष्टांगीं प्रीतिपूर्वकु ॥ २१ ॥ मग शुकासि पुसिलें दशवक्त्रें. । "कवणे स्थळीं क्रमिलीं नवरात्रें[3] । काय पाहत होतासि चरित्रें । तया रुतामृगाचीं[4] ॥ २२ ॥ अपूर्व देखिलें तितुकें सांग, । तुझे मुखीं का उदेलें वाटती उद्वेग[5] । उचित दिसे तुझें सर्वांग. । क्लेशवार्ता नेणों आम्ही." ॥ २३ ॥ ऐसा नगरनाथाचा आक्षेपी, । राक्षस बोले कामरुपी. । "अहो स्वामी, यातुतुकें गोपी । चतुरें केलें पाहिजे. ॥ २४ ॥ आयुर्वित्त गृहच्छिद्र गुप्त, । मन्त्र, औषध, मैथुनिक प्राप्त, । दान, मान, अपमान, हें सत्य । अनुवादोंचि नये. ॥ २५ ॥ म्हणोनि, प्रभु, याचिकारण । अपमानअनुभव मीचि जाणें, । तें उघडूनि सांगता लाजिरवाणें । वाटत असे, जी, मजलागीं. ॥ २६ ॥ तुझी आज्ञा अंगिकारूनिया, जी राया, । म्या पाय्टिली पूर्वकाया. । उडोनि गेलों वरुणालया । मानसगतीकरूनिया ॥ २७ ॥ मीं अंतरिक्ष राहोनि अवलोकीं, । तंव कपिसेना उत्तरतटाकीं ।

---

१. अ मर्यादा न वर्णव २ अ नभा दाटू म्हणती ३ अ रागभार्गें. ४ अ अग्रनिद्रा

वारिन्धी असे बराश्य, निर्धा । दश योजनें विस्तीर्ण. ॥ २८ ॥ सुन्य धनुर्भरवर्तमान राम, । कपिनाथ तो सुग्रीव प्रगन. । तया कपींचा ऐसा निवन । कोथिला न वचे करणां. ॥ २९ ॥ मग मी निराळा राहूनि, नृपति, । तुझी वाचिष्ट उत्तरें बोलिल्यों तयांप्रति. । तें योग्य मानलें सर्वां चित्तीं । जैसें पान पित्याचें. ॥ ३० ॥ वानरदवाक येके येकें । उठोनि धरिलें मज वळें. । वज्रासारिखी कपिकरतळें; । मज मर्दनें करिते जाले. ॥ ३१ ॥ हा देशे पानडा झिरानें, । जैसें सुमनराड चटवानें. । ऐसा तो नाव चेरियानें । परि प्रान न व्हावा. ॥ ३२ ॥ इंदुबिंब अर्को हरपलें । तैसें पाशवरीं मज बोटिलें. । मग रामाचेनि प्रतापें वर्तलें । थोर अपूर्व, जी राया. ॥ ३३ ॥ समुद्रांतून समुद्र मूर्तिमंतु । धान्यांनिहित आला अकस्मातु; । उदयाचळीं उगवे आदित्यु । तैसा रामाप्रति भेटला ॥ ३४ ॥ याउपरि, राया गर्वनिधि, । समुद्रें सांगितली रामाप्रति बुद्धि: । शिळी बांधिजे महोदधि । कपिनळाचेनि हस्तें. ॥ ३५ ॥ मग रामें प्रेरिले वानर; । तेहीं आणिले शैल्य, शिळा, वेगवत्तर । धन्य धन्य ! त्या नळाचे कर । लागतां शैल्य, शिळा तरलिया. ॥ ३६ ॥ जाली सेतू समुद्रीं रचना । मूर्तें थान्तून शत योजना । रामु, बिभीषणु, कपिसेना । पैल तीरीं उतरले. ॥ ३७ ॥ सर्व सेना वसविलीयाउपरि । पुढें माझा भाग्योदयो करी. । राम बोलिला धर्मोत्तरीं । 'शुक सोडा, रे कपिहो.' ॥ ३८ ॥ ऐकतां तत्क्षणीं वानर सोडिती. । मग मी येथें आलों, जी नृपति. । तुझिया चरणांची प्राप्ति । आयुष्यास्तव जाली. ॥ ३९ ॥ आतां हेचि बुद्धि, लंकानाथा, । रामाप्रति सीता चाली सर्वथा. । हें न करितां पावेल वेथा । लंका राक्षसांसहित." ॥ ४० ॥ ऐसें शुकाचेनि मतें । कोपा चढिजे दशवक्त्रें ॥ म्हणे, "सूर्य सुगनतां नक्षत्रें । नभीं झळकताति. ॥ ४१ ॥ खगेश्वर न दिसे टोळा । तवचि कोल्ह्याकुळ करिती उन्माद; । वारणाप्रति मदु आगळा । जव केसरी न माने. ॥ ४२ ॥ अनिवार माझी बाणवृष्टि । ते राजपुत्र न देखती दृष्टी. । तंववरि करिताति गोष्टी । महाप्रतापाचिया. ॥ ४३ ॥ परि येक अवित्री दुष्कर केलें । तें मनीं आणितांसि न वचे धरिलें. । येविषयीं स्वमानस्थाही स्वर्शलें ।

---

१. अ. कपचें कवणासि ? २ व गवसिलें. ३. अ. सूर्योदयो होतां नक्षत्रें । नभीं स्फुरती कैसीं ? ४. अ. कद्द.

नाहीं भुवनत्रय. ॥ ४४ ॥ वानरीं आपले प्रतापबुद्धी । शिळीं बांधिला महोदधि; । परि राक्षसातें नाहीं शुद्धि । तयाचिया बळाची. ॥ ४५ ॥ महाअपूर्व रचिली करणी, । तारा घेतला पाषाणीं. । म्यें तरोनि तारिले द्रुमपाणी; । हें अघटित घडलें. ॥ ४६ ॥ सूर्याचा किरणावरि । चळवती पिपीलिकांचिया हारी. । वायुचक्राचां शिरीं । गृहें निर्मिलीं. ॥ ४७ ॥ वानरीं आणि बांधिला सेतु । हे सर्वथा नव्हे सामान्य मातु; । आतां प्रवेशोन परसेनेंतु । बळ तुळिलें पाहिजे." ॥ ४८ ॥ मग पाचारिले शुक, सारण; । बुद्धी आगळे दोघे जण. । वस्त्रें, अलंकार देऊन अंतःकरण । संतोषविलें तयाचें. ॥ ४९ ॥ दशग्रीव म्हणे शुकसारणातें, । "तुम्ही सदा सतुष्ट माझियानि हितें, । तरि तुळा, जा, श्रीरामगारिसुतातें । किती आणिली सेना कपीची." ॥ ५० ॥ ऐसें उपदेशिले लंकेशें । मग ते आज्ञा वदिती सतोषें, । उड्डाण करूनि आकाशें । शुक, सारण निघाले. ॥ ५१ ॥ देखोनि सुवेळागिरि । तेथें पालट केला धूम्रशरीरीं, । जाले वानरवेषधारी; । कपिसेनेंत प्रवेशले. ॥ ५२ ॥ मेघें नंदनोघ सागरीं मिळाले । तैसे पारखे कपिकटकांत आले; । सुग्रीवदूत ऐसे भ्रमों लागले । मेराचि भल्लीकटे. ॥ ५३ ॥ अनित्य वानरवाहिनींचे थोंवे, । मध्यें शुकसारण हिंडती मोनें; । करणाचे करण बोळखावे । बहुतांमध्यें पारिखे? ॥ ५४ ॥ बुद्धी आगळे, महाधूर्त । मानसीं कपिसेनातें तुळितु, । येक येक वानर वळितु, । गणने आणिले तेहीं. ॥ ५५ ॥ नाना स्थानींचे राजवानर । तयाचे अगण्य वेगळाले भार. । नक्षत्रनक्षत्रीं व्याप्त अंबर । ऐशा सेना मिरवटिया. ॥ ५६ ॥ ऋक्षकपींची सर्वही सेना । पाहोनि दोघां आणिली मना. । मग जेथें वालाव्य रघुनंदना, । ते तेथ लक्षितें जाले. ॥ ५७ ॥ मुख्य रघुराजे ते सभे । तेथें शुकसारणासि रिघु न लभे; । मग अंतरेंचि राहोनि उभे । शुभ मन्या करिते जाले. ॥ ५८ ॥ बहु ध्यानस्त थाळाचारी; । परि कुबुद्धि हृदयाभीतरीं; । तैसे कपटवेषधारी । उभे, तुळिती सर्वांतें. ॥ ५९ ॥ ऐशी चतुर्थपाद घटिका भरली, । पुढें बिभीषणाची दृष्टी पडली । यांचा देहगुण जव लक्षिला । तंव ते शुकसारण. ॥ ६० ॥

१. प हे अघटित घडली घडणी । या नरवानरीं. २ अ. बघु ३. च नमस्कार करूनि नृपतीतें. ४. प. दूयनद ५. अ. मोविल्या. ६. च अंतरिक्षाच

परीक्षकु आपुले कुसरी । खरियातूनि खोटें वेगळें करी, । तसें कपटवेषधारी । बिभीषणें निवडिले. ॥ ६१ ॥ -दृष्टी देखलियेचि अवसरीं । उठोनि बिभीषणें धरिले करीं. । म्हणे, " रघुराजया, अवधारीं । हे राक्षेस लंकेचे ॥ ६२ ॥ दोघे हिंडती वानरवेषें । सर्व सेनाबळ तुळिलें कर्में. । येथें पाठविले लंकेशें, । नाम तरि शुक, सारण. " ॥ ६३ ॥ ऐसें ऐकोनि रघुवीरें । जवळी बोलाविलें आदरें. । " तुम्हांसि कपिजनभय निर्धारें । शंका सोडा हृदयींची. " ॥ ६४ ॥ रघुनाथ म्हणे, "या बिभीषणा, । करीं धरावें शुकसारणा । सर्व सेनाबळ दोघा जणा । तुम्हीं दृष्टी करावें". ॥ ६५ ॥ राम परदूतासि म्हणे, "माझा अनुग्रहो । स्वामिकार्य तुम्हां सिद्धी न्याहो, । सर्व या माया, शंका, मोहो, । कपिसेनात हिंडता " ॥ ६६ ॥ ऐशी रामाची उदार वाणी । मंजुळ ऐकिली दोघीं जणां । मग मस्तकु ठेवूनि रामचरणीं । शुकसारण बोलती ॥ ६७ ॥ "अयोध्यापुरपति, रघुराजा, । कृपानिधि, सर्वगुणसहजा, । सदा यशस्वी राहो तुझिया भुजा । त्रिभुवनपूर्णी ॥ ६८ ॥ तुझें सेनाबळ तुळावया येथें । आम्हांस पाठविलें लंकानाथें, । परि दोघा कपटियास तूंचि समर्थ । प्राणें पैं हो रक्षिले ॥ ६९ ॥ नमोनि आम्हां पाळिलें रामें । तरि त्याचिया कार्या कारणें जालें येणें । येथें अंतरिचे तरि मोगणें । लागळ रखरख ॥ ७० ॥ सैन्य सर्व धरूनिया जावें । शरीर स्वामिकार्यी वेंचावें, । मग चिरकाळें भोगावें । चतुर्दश भोगाचें. ॥ ७१ ॥ तू सर्व जाणसी, राया रघूत्तमा, । आता आपुलेनि स्नेहें आज्ञा द्यावी आम्हा, । तुज आणि तुझिया प्लवंगमा । सर्वदा कल्याण हो " ॥ ७२ ॥ ऐसें विनवूनि रघुकुळतिलका । शीघ्रगती प्रवेशले लंका. । येऊनि भेटले नगरनायका । त्या दशग्रीवासि ॥ ७३ ॥ करसंपुटीं माळविला माथा । म्हणती शुकसारण, " लंकानाथा, । प्राप्त होत असता मृत्युवेथा । सिरजली भाग्यगती. ॥ ७४ ॥ महाकपिसिंधूच्या आवर्ती । आम्हीं प्रवेशलों शीघ्रगती । तेथें बिभीषणें आपुले स्वहस्तीं । धुडविलें होतें. ॥ ७५ ॥ स्मरोनिया पूर्वकोपें । आम्हासि धरिलें माक्षेपें, । परि पुण्यश्लोकें नृपें । क्षेम रक्षिलें, जी राया ॥ ७६ ॥ तेणें चाचार पुरुषार्थ मोठा । काळ उपम देता उणा वाटे । तयासि संग्रामामध्यें[1]

[1] ही ओंवी ख प्रतीत नाहीं

संवटे । ऐसा नरि नोहीं, नृपति. ॥ ७७ ॥ येक रामु, दुसरा लक्ष्मणु, । तिसरा सुग्रीव, चौथा बिभीषणु, । लंका जिंकोन तेहीं प्रतिज्ञापणु । सत्य केला असे. ॥ ७८ ॥ तयातें क्षणक्षणा कोप प्रगटे । जैसा प्रळयीं पावकु आदरें पेटे, । लंकानाथा, आम्हा मानसीं वाटे । शीघ्र सीता द्यावी रामासि. ॥ ७९ ॥ वैदेहीकारणें रघुराजु, । अति उत्कंठित दिभुजु, । नोवें पाहे लंके उजू, । करा चुरी युद्धालागी. " ॥ ८० ॥ ऐसें ऐकोनि राक्षसाधिपें । सारणासि बोलिजे कोपें, । " तू, रे, मत्य आपुलेनि रूपें । ताडण पात्रतासि. ॥ ८१ ॥ काय, रे, त्या वलामर्कटीं । तुझीं मुष्टिवातें मदिली पृष्टी? । म्हणोनि तें भय धरिलें पोटीं, । भत्तेंचि बरळसी. ॥ ८२ ॥ भूताचें भय महाअतका । सागता तुज न वंचे शंका? । माझें बळ जाणता, अविवेका । पात्र जालासि कैसा? ॥ ८३ ॥ मी जरि अवलोकीं वक्र । पायुलें व्योमीं रविचक्र । त्रिदशासहित शक्र । शीतज्वरें बाधिजे. " ॥ ८४ ॥ ऐसें बोलों सरलिया लंकानाथा, । पुढें कैशी वर्तेल कथा । ते कृष्णदास मुद्गल म्हणे यथार्था । वाल्मीकिकाव्य वदे ॥ ८५ ॥

## प्रसंग नववा.

ॐनमो श्रीरामसच्चिदानंदाय नम. । श्रीगुरुकाशिराजाय नम । रामायण होंचि कामगोवा, । वाल्मीकिनें केला दोहावा, । शतकोटि सविस्तर ठेवा । कथाक्षीराचा ठेविला ॥ १ ॥ तरि कथाक्षीराचे भोक्ते । होती, जे भाग्यवंत जाणते, । जसें पीयूषपान करिताति ते । अमरावतिये देव ॥ २ ॥ वैश्रवणाचें मूळ मंदीर, । विश्वकर्मादत्त मनोहर, । दशग्रीव वळवीर्यअपार । तेथें वास्तव्य करी ॥ ३ ॥ तें गृह आपुलेनि उचपणें । मेरूतें म्हणे ठेंगणे । रात्रीं पाहता हे तारागणें । चरी जोडलीं दिसती. ॥ ४ ॥ मग लंकानाथ ते अवसरीं, । सारणासहित वेधाला वरि, । तेथूनि पाहतां पृथ्वीवरि । दृष्टी पाके दिगंतीं. ॥ ५ ॥ रावण दुर्गेच्यातळीं पाहे । तव कपिदळ आच्छादिलें आहे, । तें देखणें नयना न साहे, । मग बोले सारणाप्रति. ॥ ६ ॥ 'ऐसा गा आलेया प्रवाना, । अमित दिसे कपिसैना, । मुख्य मुख्य तितुके, नयनां । दावरीं माझिया ॥ ७ ॥ पावकस्फुलिंग पाहतें डोळा । इच्छा नाहीं

१ अ. विख्या. २ अ पडे.

रविमंडळा; । तैसें म्यां रावणें लक्षीं कपिदळा, । हा सकळ मिथ्या जाण. ॥ ८ ॥ रत्नकळा धरोनि जलधरें । काय दृष्टी आणिजेति थिल्लरें? । तरि म्यां लंकेश्वरें । लक्षामुखें न्याहळावीं. ॥ ९ ॥ सहज पाहता दृष्टी देखें, । कवण कवण हें नोळखें । नामाथिले आपुलेनि मुखें । सांग सारणा मजप्रति." ॥ १० ॥ ऐसें रावणु बोलिलियावरि । सारण वोजे जोडले करीं । म्हणे, "नृपति, नाथा, अवधारीं । कुळाचळा तुल्य कपि. ॥ ११ ॥ नगरेश्वरा, सादर पाहें । जो सर्वांपुढें बैसला आहे । यामन्मुख संग्रामीं राहे । ऐसा विरळा वीर. ॥ १२ ॥ परातें दृष्टी नाणी प्रतापें । सेनानायक वानराधिप, । लंका लक्षूनिया महाकोपें । नीळ ऐसें नाम त्याचें. ॥ १३ ॥ दिसे याचिया दक्षिणभागीं । लोहित अति सर्वांगीं, । उतावेळ संग्रामा-लागीं । वळे डोल्लतु असे. ॥ १४ ॥ हा वायूत हाणे पृथ्वीवरि । तें सत-द्वीपा थरारी, । यासि राज्य सुग्रीवाउपरि, । अंगद नाम याचें. ॥ १५ ॥ अष्टदश कोटि । इतुके वानर याचे पृष्टी । लक्ष लावूनिया त्रिकूटीं । युद्धमनयो इच्छितु. ॥ १६ ॥ पैल कौशिकगिरीचा अति-चळी । राया, याचे उड्डाणकाळीं । नभआच्छादित मेघमंडळीं । विघुलि-जे अगवातें. ॥ १७ ॥ शतकोटीसीं परिवारितु । आला असे संग्राम इच्छितु, । वानरामध्यें वीर्यवंतु । कुमुद नाम याचें ॥ १८ ॥ पैल सिंदूर-वदनासारिख दिसे । तो अयोध्याचळीं वर्ततु असे, । युद्धीं शत्रुसमुदायातें दिसे । अंतकातुल्य. ॥ १९ ॥ शरभु ऐसें नाम याचें, नृपति । गरुडा ऐसी याची गति । महावीर कपि यासनिध असती । त्रिदशकोटि. ॥ २० ॥ पहा पा वायुचक्राचा आसनावरि । पर बैसला दिसे हरि । हा जेधवा वुभु-कार करी । तेणें नादें स्वर्ग खचे. ॥ २१ ॥ ऋक्षभुनाम वळें आगळा । लंका जिंतावया उतावेळा, । सहस्रशतार्ध दळा । घेउनि आला असे. ॥ २२ ॥ संग्रामी अलोट वीर्यवंतु, । दिसे जसा ताम्राचा पर्वतु, । साठिसहस्र सरसेसमेतु । पैल विनतुनामा. ॥ २३ ॥ भृकुटी असे महापाटाळी, । भूमी स्खले अगरोदानळीं, । तो क्रोधुनामा अगाधबळी । सहस्रकोटीसीं आला. ॥ २४ ॥ प्रमाथिनामा पाहें, दशानना, । यासरसीं शतें सहस्र दश भीम सेना. । हा भुभु कारें प्रसादी गगना । जसा प्रळय-मेघु. ॥ २५ ॥ राया, पाहें गवयनाम वानर, । शुद्ध जैसा हेमगिरिवर, । याचे

उड्डाणीं उंचे श्रम वारु । सवितार्थी कांपे. ॥ २६ ॥ यासारिखे वानर आले । जैसे कुळाचळ उचलले. । सख्या करितां गणने आले । सप्त सप्त कोटि. ॥ २७ ॥ पैल पाहतसे नगरा उजू । क्रोधमुखी, याचें नाम गजु, । तुळित असे दक्षिणभुजु । शतें सहस्रेशीं आला. ॥ २८ ॥ ऋक्ष वसे नर्मदातीरीं, । जांबुवंताचा वधु, अनधारी. । याची रोम रुळे पृथ्वीवरि । धूम्र नाम जाण, राया. ॥ २९ ॥ चत्वारदशकोटींशीं आला । अंतरें रोमा पृष्ठिभागीं राहिला, । तया दक्षिणेस सनादनु वसिला, । तो कपींचा पितामहो. ॥ ३० ॥ तया ऐसें कवणाचें शरीर ? । चतुर्दश पद्मामध्यें नाहीं थोर, । योजन एक उंच असे शिर । चरणापासून, नृपति." ॥ ३१ ॥ मुख्य मुख्य कपींतें सारण सांगे. । न्याहळितां रावण उद्वेगे । जैसे महाव्रळिये वेसले जागे । तस्कर असतीपें. ॥ ३२ ॥ श्रीमंता सुजनाचीं देखोनि सुखें । दुर्जनाचें हृदय फुटे दुःखें, । रावणा वाटे तयासारिखें । सारणासि मागता. ॥ ३३ ॥ रावण म्हणे, "गा सारणा, । तूं महामूर्ख, नव्हेसि शाहणा, । अमित वर्णिसी कपिगणा । मज देखतां कसा ? ॥ ३४ ॥ तारागणाचें आगळें तेज । सूर्यापुढें सांगतां न मानिसी लाज. । पृथ्वीवरि पडलें रज । तें गिरितुल्य करिसी. ॥ ३५ ॥ अमित्य टोळाचे मेळो । खगेंद्राची सरी केंवीं पावे । आतां कपिकुळ असों दे आघवें, । काकुस्थातें दाखवीं." ॥ ३६ ॥ रायाचा अभिप्राय जाणोनि । सारण विचारी आपुले मनीं, । म्हणे, "आतां न सरे कपिवाहिनी, । पद्मवीरातें दाखवूं." ॥ ३७ ॥ म्हणे, "राया, मुख्य रिपु । पैल तो पाहें अयोध्यानृपु, । सुंदरपणें कंदर्पु । जिंतिला हो येणें. ॥ ३८ ॥ निरुपम्य वक्त्र वेल्हाळ, । राजीव चक्षु, तनु तमाळनीळ, । कर्णीं कुंडलें मुगुटीं झळाळ । फाकत असे ॥ ३९ ॥ आजानुबाहो चापशरमंडित, । कास घातलीसे अंबर पीत, । बळ याचें अगाध अद्भुत । या तुल्य काळ नाहीं. ॥ ४० ॥ ग्रहनक्षत्रामध्यें सोमु । तैसा कपिपुंगवांत रामु, । राया, त्यासीं करितां संग्रामु । जयातें न पावाल. ॥ ४१ ॥ रामासंनिध, जी नृपवरा, । दक्षिणे वैसला असे दुसरा, । तो लक्ष्मणु जाण महाधीरा । संग्रामभूमीचा ठायीं ॥ ४२ ॥ बाण असती ज्याचे हस्तीं, । अंगीं वज्रिशिरवा निवती, । उदयाचळीं शशिसूर्य बुडती । तें सौमित्रा पराजयो. ॥ ४३ ॥ वैदेहीरायाचा वाम भुजु । तेथ पैल पाहें कपिराजु, । यत्न अवलोकूनि लंके उजू, । सुग्रीव

नाम याचें. ॥ ४४ ॥ दाशरथीचिया कार्याकारणें । अष्टदिशेचे कपि आणिले येणें; । अठरा कोटी तारागणें । इतुके हरि, जुत्पति. ॥ ४५ ॥ कुमर वधिला, जाळिली लंका, । पळ तो हनुमंत, नगरनायका, । आवेश जैसा प्रळयीं पावका । ऐसाच युद्धीं याचि. ॥ ४६ ॥ ऋक्षराज महाबळिवंतु । बहुत काळिया, अगाधवीर्यवंतु; । तो पाहें, जी राया, जांबुवंतु । रावपापुढें असे पैं वैसला. ॥ ४७ ॥ राक्षसवंशीं उत्कंठित प्राणु । तो, प्रभु, पाहें गा बिभीषणु" । ऐसें सांगता रावणु । दुखवला जीवीं. ॥ ४८ ॥ न्याहाळिना धार्मिकाची संपत्ति । दूषिया, दुर्जना असंतोष चित्तीं; । कीं परिसोनि पंडिताची व्युत्पत्ति । मूर्खाचें हृदय फोडे. । ४९ ॥ मग रावण कोपा चढिला, । जैसा वातस्पर्शें वणवा वाढला. ॥ खड्ग उचलूनि हाणिता जाला । सारणासि ते काळीं. ॥ ५० ॥ तव सारण म्हणे, " लंकानाथा । निरापराधा आम्हीं मरया; । स्वामिद्रोही नव्हों, नृपनाथा. । कांहू नको आमुतें. ॥ ५१ ॥ स्वामिकार्यीं विमुख भृत्यु । तयावरि उचलावा हातु, " । ऐसें बोलोनि ऐकोनि निवांतु । राक्षसेंद्र राहिला. ॥ ५२ ॥ जैसें भरतें समुद्रा भरे । तें पुनरपि स्वस्थानीं वोसरे, । तैसें रावणा आगीचें निरे । क्रोधाचें मेहुडें. ॥ ५३ ॥ पुनरपि सारण म्हणे, "जी राया, । आम्हा पाठविलें तुझ कार्या, । तरि यथार्थ तुझिया कार्या । दूतत्व सिद्धी नेलें. ॥ ५४ ॥ जें जें देखिलें आपुलें डोळां । तें तुज सांगितलें, जी भूपाळा, । वृत्तांतु बोलों उणा आगळा । तरि लिंपों दीर्घदोषा. ॥ ५५ ॥ अनृत हें परम पातक, । कदा काळीं न बोलती धार्मिक; । असत्याचा पट्सनक । पुर्वज बुडती निर्यीं. ॥ ५६ ॥ सर्वथा सत्य जाण, जी नृपति, । ऐसें विश्वतोमुखीं वदती । आम्हांसि सांगता मनवृत्ति । अति असंतोषवी." ॥ ५७ ॥ ऐशीं बोलोनि धीट वचनें, । सारण राहिला अधोवदनें. । मग महोदरासि दशानन । बोलों आरंभिलें. ॥ ५८ ॥ " विचारीं या मंत्र, महोदरा, । जो बुद्धिवंत देवगुरु दुसरा, । सुवेळेसि पाठवीं कवणिया चतुरा, । जो वृत्तांत घेऊनि ये." ॥ ५९ ॥ महोदर म्हणे, "दशमुखकमळा, । सुवेळेसि पाठवावें शार्दूला, । हा नानामतें तुझी आगळा । परवार्ताचिन्हें जाणे." ॥ ६० ॥ मग शार्दूल बोलाविला आदरें, । तव राजा प्रणिपातिला येरें; । सर्वेचि राये अलंकार, चिरें । देऊनि संतोषविला. ॥ ६१ ॥ नगरनाथ म्हणे, "शार्दूला, । तुम्हीं शीघ्र जावें सुवेळा, । गणना करूनिया कपिकुळा, । कोण-

कोणाचे पुत्र." ॥ ६२ ॥ ऐसें बोले पुरलंकापति, । शार्दूल निघे शीघ्रगती। जशी धावे मनोवृत्ति । तैसा परामध्यें आला. ॥ ६३ ॥ हरि, जुत्पति पाहता, । बिभीषणें लक्षिला अवचिता । वानर म्हणती, "रे, मागुता । रावण-दूत आला." ॥ ६४ ॥ बिभीषणाचे चत्वार पुरोहित, । आणि द्वादश सुग्रीवदूत । धरिते जाले अकस्मात । षोडश शार्दूलातें. ॥ ६५ ॥ येकलिया गजावरि । चपेटे हाणिती सोळा केसरी, । तैसे रामदास पाणि-प्रहरीं । शार्दूलातें ताडिती. ॥ ६६ ॥ रावणचारु रामाजवळी । घेऊनि आले अतुर्बळी. । नरेंद्र पाहे नेत्रकमळीं, । मग म्हणे 'सोडा.' ॥ ६७ ॥ सोडिता तो मनोवेगें । निघाला, न पाहताचि मागें, । मुख कोमाइलें उद्वेगें । ऐसा रायासि भेटला. ॥ ६८ ॥ पुढें प्रभु म्हणे, "श्रमल्यासि ये गा. । दासत्व आलें तुझिया आगा." । क्षण येक शार्दूल राहिला उगा, । मग बोलता जाला. ॥ ६९ ॥ "राया, महाभीम कपिसैन्यसेना, । तेथें प्रवेश नाहीं, जी, पवना, । त्यामाजी रिघता माझिया लोचना । अधचक्र आलें. ॥ ७० ॥ बिभीषणाच्या पुरोहितीं । मज धरिलें हिंडता, नृपति, । धन्य रामाची उदार कीर्ति । मज तात्काळ सोडविलें. ॥ ७१ ॥ पर्वतीं पडलिया अग्नि धडाडी, । त्यामाजी पतंग घाली उडी, । तैसा मी कपिसैन्यचे सांकडीं । पडिलों, कांचनपुरपति ॥ ७२ ॥ राया, मज वाटे मानसीं, । जे जानकी धाडीं का-कुत्स्थासि, । पुढें जोंवरि आहेत रविशशी, । तवंवरि सुखें राज्य करा." ॥७३॥ शार्दूल बोले दीनवदनें, । तव हास्य केलें दशाननें. । म्हणे मिनली असंख्यात गोधनें । परि व्याघ्र जिंतिती । हे मिथ्या. ॥७४॥ जरि मिळालिया असंख्यात मक्षि-का, । गिरि काय लोटेल त्याचिया धडका ? । अशें आच्छादिलें अर्का, । निशा येईल होईल ? ॥ ७५ ॥ बहु वर्णिसी या प्लवंगमा, । मृगाल्यादिकांसि देशी सिंहाची उपमा, । तरि कवण कवणाचें नाम आम्हां । सुख आहेति, शार्दूला." ॥ ७६ ॥ तव शार्दूल म्हणे, "जी नृपति, । अमित कपि, कोण जाणे किती ? । परि काहीं ते तुम्हाप्रति । थोर थोर सांगेन. ॥७७॥ राया, सुग्रीव जाण या वानरेश्वर, । तो जाण, जो तरणीचा कुमर, । सुरामजु वाळी सहोदर, । तयाचा पुत्र अंगदु. ॥ ७८ ॥ मारुतनंदनु तो हनुमंतु, । खड्गांगाचा जांबुवंतु, । सेनापति नीळ हा सुतु । जाण वैश्वानराचा. ॥ ७९ ॥ जेणें सेतु बांधिला विशाळ । तो हस्तनिधीमाजी राया, नळ, । होय विश्वकर्म्याचा

बाळ; । हेमकूट वरणाचा. ॥ ८० ॥ मैंद, द्विविद, महानिश्वसनु । दोघे हे विश्वेदेवाचे सुत; । ज्योतिर्मुख दुसरा श्वेतु । हे आदित्याचे पुत्र. ॥ ८१ ॥ गवय, शरभु, गंधमादनु,। गवाक्ष हे वळे समानु,। नृपति, जाण, नदनु । सा वैरस्वताचे. ॥ ८२ ॥ सुमुख, दुर्मुख वेगदर्शी । काळाचे हे तिघे परियेसीं." । शार्दूल सांगता मानसीं । रावण दिटला. ॥ ८३ ॥ उचवळी रनाची सादृस, । मोळवणी करिती टोळम, । तयेन रगें गर्भयवा मानस । काय सनुष्ट होईल ? ॥ ८४ ॥ राजा असन्तुष्ट जाणोनि । शार्दूल विचारी आपुले मनीं, । आता अधिकाराची मौनी । कांहिंच्यळ व्यर्थ न सांगे. ॥ ८५ ॥ प्रभूचा मनमीं रुचे बरवें । तेचि मूर्खें प्रतिपादावें; । जाणवीं विपरीत बोले स्वभावें, । क्लेश प्राप्त होती. ॥ ८६ ॥ महीस्तोंहूनि चालिणे पडे, । कर्तव्याधीची उष्णता झडे, । तयींच गया हृदयींचा मोडे । विपरीत यनल्पु- ॥ ८७ ॥ ऐसें विचारूनि शार्दूलें । शब्दसाटुले यातें टाळे, । तव राक्षस-राज भूपाळें । अमगळ आरंभिलें. ॥ ८८ ॥ सन शोधानया सीतेचें, । कराँड कृत्रिम शिर रामाचें, । ऐसें जाणा पुढिलें कथेचें । अनुसंधान असे. ॥ ८९ ॥ इति श्रीरामायण ऋषिनिर्मित । युद्धकांडकथामृत । पुढें परिसावे सावचित्त । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ ९० ॥

## प्रसंग दाहवा.

ॐ नमो श्रीरामनन्दिदानदाय नमः । श्रीगुरुपादारविंदाय नमः । विद्युन्-जिह्वा राक्षस नामा । प्रकटव्याराळी मायाकर्मा, । तो बोलाविला शीघ्र सादरा । श्री आदरेंकरूनि. ॥ १ ॥ नृपति म्हणे, " या विद्युज्जिह्वा, । विरिंचिही नेणे तुझिया माया, । माझा मनकाम सिद्धीस जाया, । तें करीं शीघ्रगती. ॥ २ ॥ काकुत्स्थाचें यत्नाचें धाम । मायामय निर्मी निरोपम, । जयावि देखणाचे रोम । उमें गे सर्वांगीं. ॥ ३ ॥ पूर्णचंद्रातुल्य वर्तुळ, । अत्यंत कळेची मळ निर्मळ । त्रिपुंड्र मंडित कपोळ, । सनिर्मे भ्रूना. ॥ ४ ॥ सुरगान कर्णभार. । जटा मस्तकीं मनोहर, । ऐसें करी, या, तू चतुर । आतांचि सद्दृन ॥ ५ ॥ आणिक रामाचें धनुष्य जैसें । तू निर्मी, या, तयाचे ऐसें, । कनकपटिकाजुद न्यासें, । रत्नें वरि जडवीं. ॥ ६ ॥ त्वरितें निर्मी सायक । चापयी थोंप मनोहरा,। हेंही शिघ्र-हस्तें. विद्याधरा, । वेगें आणोनि देई. ॥७॥ अशोकवना जाऊनि प्रभाते ।

मज देखतां दृष्ट करी सीते. । मोहो उपजेऊ सलसरिते । जनकतनयेसि. ॥ ८ ॥ ऐशी रावणाचीं उत्तरें । शिरीं धरिलीं कापट्यें येरें; । म्हणे, "लंकेश्वरा, महा बरें । तुमची इच्छा पुरैल." ॥ ९ ॥ यें कंकण रत्नजडित । विद्युज्जिव्हासि दिधलें उचित. । ऐशी निशा मिलिया प्रभात । सर्वांसि जाली. ॥ १० ॥ मानसीं धरूनि दुष्ट वासना, । गरनाथ आला अशोकवना; । तंव ते अधोवदनें पद्मनयना । बैसली ोता. ॥ ११ ॥ रावण दशवक्र, वीसभुज, । उभा राहिला जानकी उजू, । सा कर्दळीवृक्षासीं गजु । संघटों आला असे. ॥ १२ ॥ कीं भृगुऋषी- श्या आश्रमा । त्याश्रयालागीं पुलोमा । दैत्य आला तालघंट नामा, । तैसा वण पावला. ॥ १३ ॥ बैसली असतां कुरंगिणी । अकस्मात भेटे ापपाणी; । कीं येकट धेनु असे गोठणीं । तेथें शार्दूल पावे; ॥ १४ ॥ शियापरि दशवक्त्र । देखिला सीतेनें पतीचा शत्रु. । पुढें अनुवाद स्वप- त्रु । रावण करिता जाला. ॥ १५ ॥ म्हणे, "परिसें, वो मनुष्यांगने, । कुमारे, पंकजनयने, । धैर्य अवलंबिलें अज्ञानें । परि निर्फळ जालें. १६ ॥ व्रतें दानें जन्मांतरीं । तुज घडलीं असे सुंदरी; । तरिच प्राप्त ंकापुरी । होईल स्वामित्वपणें. ॥ १७ ॥ आतां मातें तुज असे अभयवरद; । ई प्रमदांचें ऐश्वर्यपद, । सर्वां श्रेष्ठ होऊनि नांद । माझिया निजमंदिरीं. ॥ १८ ॥ तापें शोक वाढविशी वृथा । सुवेळेसि तुझिया प्राणनाथा । उत्तरदशा ाली ते कथा । श्रवण करीं सर्व. ॥ १९ ॥ अवो, तुझे देवर आणि ावार । कपींसहित तरले सागर । सुवेळेसि येऊनियां थोर । पुरुषार्थ ला. ॥ २० ॥ नगरप्रदेशींचीं रमणीक स्थळें, । वनें, उपवनें मोडिलीं फळें; । मग निशा जालिया येक मेळें । विश्रांति पावले. ॥ २१ ॥ ऐसें ाणोनि प्रहस्तें । सरिसें घेतलें वाहिनीतें । महानिशाचर अवचितें । ामावरि घातले. ॥ २२ ॥ रामासहित सर्वही निदसुरे; । राक्षस पडियेले कसरें. । युद्ध जालें तुंबळ; धुरे । सांपडविलें प्रहस्तें. ॥ २३ ॥ तुझिया तीचें निरूपम । खड्गें घेतलें मुखपद्म; । कबंध सरले द्विभुज सुरयाम । व्वीवरि पाडिलें. ॥ २४ ॥ अवचट निसटला लक्ष्मण. । पळतां तोडिला भीषण. । वानरसेनेसि दारुण । शस्त्रमार जाला. ॥ २५ ॥ सुग्रीव छेदिला र्वी ठायीं. । अंगद तुटला अवघा घायीं. । जांबुवंताचा गदाघायीं ।

जानुजंघा तुटलिया. ॥ २६ ॥ हनुमंताची टपडिली हनुवटी. । नीळ निवटिला भुजाकंठीं । अनिवार नळाचे पोटीं । शक्ति बैसल्या जाण. ॥ २७ ॥ गंधमादन गतःप्राण जाला. । गवाक्ष मृत्युमार्गी देखिला. । मैंद सत्वमंद जाला । धीर तुटोनियां, बो. ॥ २८ ॥ दधिमुखाचें मुख चूर्ण जालें. । गोमुखें तृण दांतीं धरिलें. । सुमुखाचें जाण पडिलें । कुमुख होऊनियां. ॥ २९ ॥ सुषेण दुःखें आरंबळे. । केसरी मृतप्राये लोळे. । गजाच्या पोटांतील गोळे । पडिले पृथ्वीवरि. ॥ ३० ॥ शरभ शतखंड जाला. । ऋषभ रक्तनदीं बुडाला. । हेमकूट असे टळमळ । मुष्टिघायासरिसा. ॥ ३१ ॥ ऐसे समग्र सुवेळाप्रदेशीं । शाखामृग पडिले, प्रेतें ऐसीं. । आतां, सुमानने, परियेसीं, । न धरीं आशा. ॥ ३२ ॥ तयांचां शोणिताच्या वाहती सरिता । ऐसी तेथिंची वार्ता; । हें मिथ्या म्हणसी तरि आतां । देखशी नयनीं." ॥ ३३ ॥ ऐसें रावण बोलिला अमंगळ; । तंव विद्युज्जिव्हा आला तात्काळ; । तेणें मायिक शिरकमळ । सीतेपुढें टाकिलें. ॥ ३४ ॥ किरीटकुंडलें मंडित वेल्हाळ, । राजीवनयन, मुखीं तांबोळ, । शोणितचर्चित कंठनाळ, । ऐसें जानकियें देखिलें. ॥ ३५ ॥ कर्णी कुंडलें झळकतीं, । सुरंग शोभे दंतावळी, । मस्तकीं जटा, त्रिपुंड्र कपोलीं, । ऐसें जानकियें देखिलें. ॥ ३६ ॥ पाहतां आंधारें दाटलें डोळां; । शैत्य बैसलें पाणिभंग्रिकमळा. । काया वरपडी जाली भूमंडळा, । जैसी रंभा चंडवातें. ॥ ३७ ॥ मूर्छित असतां घटिका येकी, । उपरि सावध जाली जानकी. । चक्षु उन्मळोनियां अवलोकी । तंव श्रीराममुख देखिलें. ॥ ३८ ॥ कृत्रिम निर्माण रचिलें, । तें सीतेस सत्य भासलें; । जैसें कुरंगिणीनें देखिलें । मृगजळ वनांतरीं; ॥ ३९ ॥ कीं भ्रमें रज्जुवरि सर्पबुद्धि जाली; । कीं शुक्तिका रजतेंचि भासली; । नाना बाळकांची चर्में दृष्टी बैसली । आरसया प्रतिबिंब. ॥ ४० ॥ असो अंचळें पुसोनि, करतळें । उचलूनि घेतलें शिरकमळ. । नेत्रीं श्रवों लागलें जळ. । सीता बोलती जाली. ॥ ४१ ॥ म्हणे, "भविष्य शतकोटि विस्तारें । कथिलें वाल्मीकिकऋषीश्वरें, । तें काय जालें देखसरें । मिथ्यामय अवघें! ॥ ४२ ॥ सागर करस्थितधेंबुटा केला, । तो अगस्त्य मृगजळीं बुडाला; । पिपीलिकापंक्ती मेरु खचला । समूळ

भूमीवरि; ॥ ४३ ॥ अंधकूपीं हारपला सूर्यो; । ज्वरें कोळसा जाला हिमालयो; । ब्रह्मांड विदारिता प्रळयवायो । मशकीं मोटे बांधिला;॥ ४४ ॥ विरूपाक्षचक्षुवन्हि पेटला, । तो पतंगा संघटणीं विझाला; । उभयपक्षांविगळा केला । त्याळें कीं खगेश्वर;॥ ४५ ॥ गिरितुल्यगजांचीं दळें । त्यांचीं विदारी कुंभस्थळें, । तो केसरी साधिला बळें । शृगाळीं मिळोनियां; ॥ ४६ ॥ ऐश्वर्य कर्म भोगिती भूतें । तेंहीं हारविलें कृतांतातें; । मक्षिकांचेनि पक्षवातें । भूगोल फुटला कैसा ? ॥ ४७ ॥ विपरीत वार्ता जाली ऐसी, । रघुनाथ, जिंतिला राक्षसीं; । उदयाचळीं मावळला शशी । सर्वां नक्षत्रांसहित. ॥ ४८ ॥ अहो, परियेसीं, प्राणनाथा, । कैसी अनुभविली देहव्यथा ? । प्रयाण केलें, जी, मुक्तिपंथा । सर्वांतें सांडूनियां. ॥ ४९ ॥ धीर तो नाहीं तुज ऐसा, । भजयो वरूनि त्यजिलें धनुष्या; । शत्रुप्रात केलें यशा, । सेतू समुद्र तरोनिया. ॥ ५० ॥ उत्तरदशा साधली, जी, तुज. । निरांजनीं सांडिलें कां, हो, मज ? । अमित्य आली अपकीर्ति, लाज । सूर्यवंशामध्यें. ॥ ५१ ॥ रघुनाथा, तुझिया आलिंगना अवसरीं । हारुही न साहे हृदयावरि, । ते तुम्ही अंतरलेति दूरि । मद्दांतेरें पाहतां. ॥ ५२ ॥ तुजवेगळा नव्हे येक क्षण, । अंतरंगसरिसा प्राण; । तो अयोध्ये गेलिया लक्ष्मण । काय वर्तेल तेथें. ॥ ५३ ॥ कैकेयी संतुष्ट होईल सळें । कौसल्या आहाळेल दुःखानळें । अति पीडा पावतील द्विजकुळें । तुजवीण, रघुराया. ॥ ५४ ॥ वाट पाहेल तुझा भरत; । व्यर्थ गेला त्याचा मनोरथ; । आणि बुडाला माझा चित्तस्वार्थ । विनाशसमुद्रीं. ॥ ५५ ॥ प्राणाविरहित शरीर, । जीवनेंवांचूनि तडागोदर, । तुम्हांवांचूनि हें अयोध्यानगर । श्रिये, शोभे सांडवलें. ॥ ५६ ॥ कौसल्या विलापु करितां बोलेल, । अवधियां देखतां म्हणेल, । रामासरिसी सीता मृत होईल, । हें सत्य." ॥ ५७ ॥ ऐशी जानकी विलापु करी, । मुख टेंकूनियां सुजानुवरि; । इतुकें देखत असे दूरि । पुढें दशग्रीव उभा. ॥ ५८ ॥ मग वैदेही म्हणे रावणातें, । "होणार केलें पूर्वदत्तें; । आतां सरिसें मज रघुनाथातें । वन्हिशेजे पहुडवीं." ॥ ५९ ॥ ऐशी करुणा अनुवादे जानकी, । तंव तटस्थ जाली घटिका येकी; । हें परिमोनि चतुरादिकीं । अति आश्चर्य मानिलें. ॥ ६० ॥ राक्षसीं माया निर्मिली, । ते कां, हो, सत्याचि मासली ! । हे तंव मूळशक्ति अवतरली । परमेश्वरप्रसंगें. ॥ ६१ ॥ हे मूळ-

माया जानकी, । ईपासूनि निघा अनेकी, । जैसे तरंग सिंधोदकीं । अमित्य उमटती. ॥ ६२ ॥ कीं ते पाहता गगनाचा पोटीं, । होत, जात गाधर्वनगरांची सृष्टि, । ऐशा ईपासूनि कोट्यानुकोटि । निपजती विया अनिवार. ॥ ६३ ॥ ऐसे मिथ्या मोह झळकले, । म्हणऊनि हेंचि अपूर्व वाटलें, । कीं आपुलिये बुद्धीनें रचिलें । कवित्वातें कल्पित. ॥ ६४ ॥ असत्य कथा सत्य कैसेनि मानावी? । येणें अर्थे वाटे अवद्य कवि, । मिथ्या करुणेची पदवी । करिता दीर्घ दोष. ॥ ६५ ॥ हें परिसोनि वक्ता श्रोतयातें प्रार्थी, । "तुम्ही पहा हो, वाल्मीकिश्लोकार्थी, । तोचि प्रमेय मन्हाष्टग्रथीं । रामायण कथिलें. ॥ ६६ ॥ वाल्मीकिकाव्या वेगळें । न डिवीं, मिथ्यामय निढाळें, । जैसी चातकी थिल्लरींचीं जळें । स्पर्श न करी मुखें. ॥ ६७ ॥ पतिव्रता भ्रतारसेवेविण । आनअर्थी न घाली अतं-करण; । नाना वायसाचें आचरण । राजहंस नाचरे. ॥ ६८ ॥ साडूनि सोमरसमींची गोडी । चकोर काये पकात देईल बुडी ? । म्हणवूनि कवि-त्वाचा परवडी । वदेना मिथ्या ॥ ६९ ॥ बोलिजलें ग्रथीं मिथ्या प्रमेय । अति सुरस अमृतमय । परि सेवू नये, जैसें पय । अनामिकगृहींचें. ॥ ७० ॥ वारागना सुदर निकी । देखोनि भुलिजे कामुकीं, । परि ते काय शुद्धाचार लोकीं । कुळवती म्हणिजे? ॥ ७१ ॥ म्हणोनि मिथ्या तर्क याकारणें । बोलता लागती महा दूषणें, । जसें शुद्ध टाकसाळेसि नाणें । न सरे वहिर्मुद्रा. ॥ ७२ ॥ असो वक्ता बोलाचे परवडी । श्रोतयाचा सदेह फेडी, । जैसा पाजळला दीपकु दवडी । डोळयाचें तम ॥ ७३ ॥ सीता सत्य न साडी सर्वथा, । असे पूर्ण कळलें लंकानाथा, । मानसीं धरूनिया विषयव्यथा । निजभुवनासि निघाला. ॥ ७४ ॥ अग्निशिखा वणवर्खा । तैशी काळिमा दशमुखाशि आली । सभेसि बैसोनि आज्ञा केली । "सिद्ध व्हावें" म्हणऊनिया. ॥ ७५ ॥ दशानन गेलियावरि । सीता पडली शोकसागरीं । मग तियेचें सातवन करी । सरमा नावें राक्षसी. ॥ ७६ ॥ सरमा म्हणे, "हा काकुत्स्थकातें, । हें मारिक शिर जाण, सीते. । मिथ्या दुःख करिसी पतिव्रते, । सावधान होई का ॥ ७७ ॥-जनकात्मजे, तुझा प्राणपति । सुनेळे वसे कल्याणमूर्ति, । परिवेष्टित कोण जाणे किती । कपि क्षेमें राहिले? ॥ ७८ ॥ पतगाचेनि पादचपेटें । फुटे महामृगींची कवटें, । तरिच रघुपति रिपुसघटें । पराजयो पावेल. ॥ ७९ ॥

शुष्क रोहिसाची पेंढी । वज्राचिया धारा खडी, । तरि तो लक्ष्मण धैर्य सडी । पळोनि जाये अयोध्येसि. ॥ ८० ॥ खद्योताचेनि उड्डाणें । आह ळोनि पडती तारागणें, । तरिच प्रहस्तप्रधानें प्रतापें जिणें । कपिपुंग यातें. ॥ ८१ ॥ येकवीस वेळा अनिनाशें । हरिलीं क्षेत्रियाचीं आयुष्यें, । तो परामविला जेणें धनुष्यें । तें असे रामापासीं. ॥ ८२ ॥ तुज मासे तया ऐसें प्रचड, । परि नव्हे रामा करींचें कोंदड, । कृत्रिम निर्मिलें नरमुंड । असो, नव्हे तयाचें. ॥ ८३ ॥ अवो, येयूनि संग्रामशेवटीं । विभीषणा ऐश्वर्यी स्थापेल त्रिकूटीं, । तशीच आदरें होईल भेटी । तुज राववासि." ॥ ८४ ॥ ऐसें सरमेनें केलें समाधान, । तेणें बोधलें मैथिलीचें मन. । मग करींचें कृत्रिम वदन । भूमंडळीं ठेविलें. ॥ ८५ ॥ सीता म्हणे, " सरमे, अवधारीं । तू माझिया आकातींची सोयिरी, । मी बुडत होतें शोकसागरीं । तेथें नौका भेटलीसि ॥ ८६ ॥ रघुनाथासगें वनवासीं । नसता, उदेली कर्मनिरशी । त्या दक्षणेपार प्रदेशीं । बलात्कारें टाकिली. ॥ ८७ ॥ येथें भाग्यदिवी माझी उगवली, । जें तुझिया सन्नीपणाची प्राप्ति जाली, । आता तुझे उपकारें बांधिलें । माझी पचाळ काया ॥ ८८ ॥ सरमे, मुक्ताचेनि उजियेडें । सुजनरत्न सापडे, । मग त्याच्यासनिध सुरवाडें । निस्तरती महादु खें " ॥ ८९ ॥ जानकी मधुरा उत्तरीं । सरमेलागीं सतुष्ट करी । पुढें स्तब्ध पाहे धरणीवरि । तव अपूर्व वर्तलें ॥ ९० ॥ माया शिर भूमी होतें पडलें । तें अकस्मात अदृष्ट जालें, । जैसें दीपाचें तेज हारपलें । वातस्पर्शामध्यें ॥ ९१ ॥ अभ्रीं धनुष्य प्रकट जालें । तें क्षण येका विलया गेलें, । तैसें मायिक कोंदड हारपलें । वैदेहापासूनिया. ॥ ९२ ॥ पुनरपि सीता बोले वचन, । 'सरमे धन्य धन्य तुझ ज्ञान! । कृत्रिम कोंदड, वदन । ता, बो, पूर्वींच जाणितलें. ॥ ९३ ॥ दृष्टिपुढें कटका देखे । मग चालतया चरणाम रखे, । तरी तू मजलागीं, सखे, । शोकारोगळें वारसी " ॥ ९४ ॥ ऐसा सीतचा मोहो निरसला, । जैसा जागृतीनें स्वप्न गिळिला. । पुढें कथाप्रसंग लागला । रावणसभेकडे ॥ ९५ ॥ इति **श्रीरामायणी** कथा रम्य, । युद्धकांड अनुपम्य, । तेंचि परिसा गुणगम्य, । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ ९६ ॥

— ० —

त्या कपींची. ॥ ३५ ॥ विलक्षण चिन्ह वर्तत दिसे, । अशुद्धधारी मेघ वर्षे; । अश्वचक्षूंहूनि स्रवत असे । रदनजलधारें. ॥ ३६ ॥ उन्मळण होतसे स्तंभां, । जैशा चंडवातें पडती रंभा; । गेली राक्षसमुखींची शोभा, । प्रेतछाया उदेली. ॥ ३७ ॥ अमृततुल्य उष्ण, पक्कान्नें । अकस्मात् उच्छिष्टेती श्वानें । रात्रीं उर्ध्व करूनि वदनें । रुदन करिती. ॥ ३८ ॥ स्वप्नीं वैधव्य देखती नारी । "राक्षसां पराभविलें वानरीं; । महागजगंडस्थळावरि । मार्जार झेंपाविती." ॥ ३९ ॥ क्षणक्षणां होत भूकंपु । निद्रिस्त ओसणाऊनि करिती विलंपु. । उगलियाच कांटाळिती वपू । रोमांकित पुरुषांची. ॥ ४० ॥ नित्य मध्यरात्रींचां भरीं । राज्यलक्ष्मी बैसोनि महाद्वारीं । 'हा हा' शब्दें रुदन करी, । ऐसें सांगती रक्षपाळ. ॥ ४१ ॥ बहुत अशुभ, जी नृपति, । मज सांगतां शंका वाधी; । आतां विचारा दृढबुद्धी । कल्याण राज्यासि." ॥ ४२ ॥ ऐकोन माल्यवताचीं उत्तरें । असंतोष मानिला दशशिरें, । जैसें दीर्घ यन्त्राचेनि प्रहारें । ताडिजे हृदयावरि. ॥ ४३ ॥ रावण म्हणे. "गा माल्यवंता, । अशुभ कायेसि कथा ! । आनीसि बोलवे लागतील, हे वार्ता । कधींच न घडे. ॥ ४४ ॥ अमृताची कुपी असे हृदयीं । त्यासि दर्दुरींचें विष मारील काई ! । माल्यवंता तूं मूर्ख; ठाईं ठाईं । अविवेक बोलिलासि. ॥ ४५ ॥ तूं प्राप्त जालासि वृद्धदशे । परि अद्यापि बाळकबुद्धि वसे । मज पाहतां तुज ऐसें भासे । भूमीभार जालासि. ॥ ४६ ॥ सभेमध्यें जेणें बैसावें, । तेणें मर्यादे वेगळें नसावें । जेणें गौरविजे तें बोलावें । समर्थासन्मुख. ॥ ४७ ॥ अरे स्वामी जेणें बोलें, । 'सर्वस्व देईन' म्हणे 'आपुलें,' । ऐसें बोलिजे; नाहीं तरि उगलें । मृतप्राय असावें. ॥ ४८ ॥ यायातें असत्य तें बोलिजे, । विखारा विळीं हस्त घालिजे । मदोन्मत्त गजासि कवळी घेइजे । हें सत्याचि मरणद्वार. ॥ ४९ ॥ तूं मजपुढें, रे, ये काळीं । अनुचित बोलिलासि, रे, सभामंडळीं । तुज ताडण करितां हृदयकमळीं । शिणेल मंदोदरी. ॥ ५० ॥ दशरथाचीं दोन्ही बाळें, । येक गौर, येक सांवळें; । सरीसी लघुकपिदळें । घेऊनि आले असती. ॥ ५१ ॥ त्यांचें भय सांगतां, । लज्जा न वाटे तुज, माल्यवंता. । अरे, हें मुख न दाखवीं मागुता । आजन्मपर्यंत." ॥ ५२ ॥ ऐसें बोलोनि राजेश्वरें । अवज्ञा केली कठिणोत्तरें. । तैसेंचि माल्यवंतनिशाचरें । अधो-

घन्न निविजे. ॥ ९३ ॥ असो. रावणु महागर्वनिधि । क्रोधें पेटला, जैसा फाल्याधि; । संग्राम करावयाचा बुद्धी । विचारणा केली. ॥ ९४ ॥ लंकादुर्गद्वारें अप्रसिद्धें । तेथें रक्षण ठेविलें नानायुधें. । राक्षस राहिले करीं आयुधें । धरूनियां थोंवे थोंवे. ॥ ९५ ॥ राजद्वारींचीं सभाद्वारें न विशाळ दिसती गगनाकारें. । तेथें . पराचेनि नावें न सचरे । अणुमात्रपरी. ॥ ९६ ॥ रावण म्हणे, " गा प्रहस्ता, । युद्धीं आगळियां बळवतां । पूर्वद्वारीं रक्षीं, नव्हे दुचिता । निमिष एकही. ॥ ९७ ॥ महापार्श्वमहोदरहो, । तुम्हीं दक्षिणदिशे रहा हो. । अहोरात्राचें पळही गोहो । पात्रों नका येहीं. ॥ ९८ ॥ इंद्रजिता, कुमरा, अवधारीं । तुवां बळवता, असावें पश्चिमद्वारीं. । सरिसे घेई, गा, शस्त्रधारी । शतांचीं सहस्रें. ॥ ९९ ॥ उत्तरद्वारींची विस्तीर्ण भूमी । शुकसारणहो राखा तुम्ही. । येर मंत्रियासीं आम्ही । तेथेंचि असों युद्धालागीं. ॥ ६० ॥ लंकामध्यगुल्मपाठार । तेथें विरूपाक्ष राहे सादर. । साठि कोटि बळिये निशाचर । आपणांसन्निध राखावे. " ॥ ६१ ॥ ऐसी प्रभूची आज्ञा जाली, । ते प्रधानीं मस्तकीं धरिली. । मग सेना चालली; । अनुक्रमें राहिले. ॥ ६२ ॥ चतुरंग वाहिनी असख्यात । चहूद्वारीं बैसले बळिवत. । दुंदुमी गिडबिडीं वाजत; । भयानक वाजात्रीं. ॥ ६३ ॥ ऐसे चमूचे महोदधि । नगर रक्षित राहिले बुद्धी । मग कृतार्थ जाला गर्वनिधि । अतःपुरीं प्रवेशला. ॥ ६४ ॥ पुढें बिभीपणाचे पुरोहित । गुप्तरूपें लंकेस होते घूर्त, । ते इतकें देखोनियां त्वरित । सुवेळासि आले. ॥ ६५ ॥ बिभीपणासि आनंदभरितु । उभयवर्गी केला प्रणिपातु. । लंकेसि जो वर्तला वृत्तांतु । तो सर्व सांगितला. ॥ ६६ ॥ शत्रुभ्राता शरणांगतु । अति रामकार्यासि उत्कंठितु. । स्नेह, मानु दे वैदेहीकांतु । मुख्य मंत्रियांमध्यें. ॥ ६७ ॥ तो बिभीपण रामाजवळिकें । द्वय पाणी जोडूनि उभा ठाके. । म्हणे, "नरेश्वरा लंके । कांहीं येक वर्तलें. ॥ ६८ ॥ नगरवासी, हो तरुण, वृद्ध, । संग्रामाकारणें जाले सिद्ध. । चतुरंग सेना लाहोनि बध । पालाणिली भीम. ॥ ६९ ॥ प्रधानामध्यें श्रेष्ठमहिमा । वाहिनीपति प्रहस्तनामा, । तो लंकापूर्वद्वारीं

सम्रामा- । कारणें राहिला. ॥ ७० ॥ महापार्श्व, महोदरु, । सरिसी वाहिनी भयंकरु, । तेणें धरिलें दक्षिणद्वारु । उत्तारिलें युद्धालागीं. ॥ ७१ ॥ रावणाचा आत्मजु इंद्रारि, । रणांगणीं काळेसीं सरी, । तो युद्धालागीं पश्चिमद्वारीं । सेनेसीं राहिला. ॥ ७२ ॥ शुकसारण निशाचर, । जे आले होते कपटाचार, । ते असख्यात सैनेसीं उत्तरद्वार । रुंधूनि राहिले. ॥ ७३ ॥ राक्षस रावणाचे अंगलग, । जे भिडतां देवां शीघ्र भंग, । पालाणिले गज, रथ, तुरग, । तयांवरि आरूढले. ॥ ७४ ॥ तया सर्वांचा स्वामी समर्थु । मूळ शत्रु लंकानाथु । आपुलिये सामर्थ्य लंकामध्य । गुल्मपत्र रुंधूनि राहिला असे. ॥ ७५ ॥ कराळ तोंड, महाकपटी, । रजनीचर साठि कोटि । लंकामध्यगुल्मपृष्टी । विरूपाक्ष राहिला. ॥ ७६ ॥ रावणें पाळितां लंकापुरी । वळें रक्षिली निशाचरीं । ते सकळेंही सुरारी । जिंतिली नाहीं, राया. ॥ ७७ ॥ अनिळ, संपाती माझे पुरोहित । दोघे लंकेमध्यें होते गुप्त; । तेंहीं हे वार्ता आणिली, सत्य । आपुले दृष्टी देखोनि. ॥ ७८ ॥ धनाधिकारी वैश्रवणु । तयासि पूर्वी युद्ध निघे रावणु; । तें परते न होती येक क्षणु । सा शतें सहस्र. ॥ ७९ ॥ त्या एका राक्षसाचें अगलग; । दळ सरिसें चतुरग;। सहस्र रथ आणि मातग । दोन्ही दोन्ही अयुतें. ॥ ८० ॥ ऐसें तयाचें ऐका वैभव । जिंतोनि बदीं घातले देव. । आता सुग्रीवादिक वीरपुगव यासीं । विचार कीजे. ॥ ८१ ॥ परि, रघुनाथा, तुझी क्रोधदृष्टी । भीम जाऊनि पडिली त्रिकूटीं, । तेचि काळीं राजधानीचे पोटीं । अनत भय निघालें." ॥ ८२ ॥ ऐसीं बिभीषणाचीं उत्तरें । ऐकोनि बोलिजे धनुर्धरें; । म्हणे, " तू आम्हा मिळालासि ईश्वरें । पचम भ्राता हो. ॥ ८३ ॥ भरता सौमित्राचियेपरी । तुझी प्रीति पडिभाए मजवरि. । आतां शीघ्रकाळें अधिकारी । राजधानीचा होयें. " ॥ ८४ ॥ बिभीषण प्रतिउत्तर बोले. । " तुझे श्रीचरण नेत्रीं न्याहळिले, । तेचि काळें सफळ जाले । मनोरथ सर्व माझे. ॥ ८५ ॥ लोहधातु परिसेसि लागली । तेधवाच काळिमा झडली; । तैसी माझी अमगळता गेली । तुझिया कृपादृष्टी. " ॥ ८६ ॥ ऐसे शरणागताचे बोल । रामासि वाटती अमृतातुल्य. । आतां असो हें बहुसाळ. । नरेंद्र बोलता जाला. ॥ ८७ ॥

"शत्रु संग्रामा सिद्ध जाले, । ऐसी वार्ता लंकेहूनि घेऊनि आले । तयां पाहिजे योजिले । प्रतिमल्ल चहू द्वारीं. ॥ ८८ ॥ सभा घनवटली वानर-वीरीं; । थोर थोर बैसले विचारी; । महा नाणागे जयासि सरी । निर्शे-राचि साजे. ॥ ८९ ॥ इति श्रीऋषिकाव्य **रामायण** । युद्धकांड संपूर्ण । पुढील कथा करावी श्रवण । **कृष्णदास** मुद्गल म्हणे. ॥ ९० ॥

---

## प्रसंग बारावा.

ॐनमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । मुख्य राम आणि सौमित्रात्मजु, । वानरेश्वर तो किष्किंधराजु, । मंत्रिमुख्य रावणानुजु । बिभीषणनामा. ॥ १ ॥ हनुमंत, जांबुवंतु, अंगदु, । शरभु, जंघ, केशरि, कुमुदु, । पनस, द्विविद, शरभ, मैंदु, । सुमुख, दुर्मुख, ॥ २ ॥ गज, गवाक्ष, गंधमादनु, । गवय आणि सनादनु, । सेना-पति नीळ, पावकनंदनु, । नळ, आणि हेमकूट, ॥ ३ ॥ आणिक वीर दधिमुख नामा । जो सुग्रीवासि होय मामा, । पैल सुषेणुही असे बहु महिमा । श्वशुर वानरेश्वराचा. ॥ ४ ॥ ऐसे ऐसे हरिपुंगव । सभेसि बैसले जैसे देव । सर्वांसि देऊनी गौरव । रघुनाथ बोले. ॥ ५ ॥ म्हणे, "महाव्यसनावर्ती पडिजे । तैंच मित्रपरीक्षा अनुमाविजे; । तरि तुम्ही ये काळीं कपिराजे । मज सहाय जालेति. ॥ ६ ॥ आदरा प्रतिआदर पुरु-षार्थे । मज केला किष्किंधनार्थे । स्वस्थानें साडूनि दक्षिणपथें । अमित कपि आणिले." ॥ ७ ॥ ऐसा प्रकाशे रामाचा शब्दराशी । तृप्ति जाली कपिचकोरासि; । पुनरपि काकुत्स्थ बोले देवेंशीं । यज्ञपाणि जैसा. ॥ ८ ॥ "तुम्ही आपुलाले परिवारीं । बळें वेष्टिजे लंकापुरी । माझे आज्ञे चहूं-द्वारीं । रुधावें, वीरहो. ॥९॥ प्रहस्तासि नीळसैन्यनाथें । पूर्वद्वारें आक्रमावें पुरुषार्थे; । महापार्श्व, महोदर जेथें । अंगद दक्षिणे राहो. ॥ १० ॥ पश्चिमद्वारीं असे इंद्रजितु । त्यासि प्रतिमल्ल असे हनुमंतु; । उत्तरद्वारीं लक्ष्मणासहितु । मी आक्रमीन बळें. ॥ ११ ॥ बिभीषणें आणि सुग्रीवें । लंकामध्यगुल्म साधावें । थोर योरीं लक्षित रहावें । गुप्तगवाक्षद्वारीं. ॥ १२ ॥ ऐसी बळें राजधानी वेष्टिजे; । कपी कपिरूपें युद्ध कीजे. ।

जांबुवतादिक ऋक्षराजे । तिहीं ऋक्षींच असावें. ॥ १३ ॥ मज आणि दुसऱ्या लक्ष्मणा । मनुष्यवेष असे दोघा जणां," । ऐसी रघुराजें विचारणा । मंत्रिया मतें केली. ॥ १४ ॥ अयोध्यापुरपतीचें बोलणें । सर्वांसि मानलें कोटिगुणें. । मग सुग्रीवें कपिकुळभूषणें । नीळातें आज्ञा केली. ॥ १५ ॥ तेणें कुचा मोनडिला नमत्नुवितु, । तो कपिदळें देखिला सकेतु; । जाले तैसे वेंघत पर्वतु । महासुवेळनामा. ॥ १६ ॥ उपमा देता थोडिया तारा । सख्या नाहीं वानरवीरा । रामलक्ष्मणाचे पृष्टीं सरा । ऊर्ध्वपथें चालती; ॥ १७ ॥ सूर्याचे किरण सूर्यासगें । अधोऊर्ध्व जाती गगनमार्गें, । कीं उडुगणभारप्रसगें । निशामणी वेष्टितु. ॥ १८ ॥ उगवल्या दिनकरें निघाले । ते मार्गी चालता थेवे दाटले. । मागील अस्तमानसमई आले । गिरिपाठारावरी. ॥ १९ ॥ तेथूनि लंका देखिली नित्राडें, । अधिक अमरपुरीचेनिपाडें । वृक्ष सदा फळती गुरवाडें; । रम्य वनें उपवनें. ॥ २० ॥ आश्चर्य करिती वानरगण. । केव्हडें पहा हें लंकेचें लावण्य; । ठेव केली हे निर्माण । धन्य धन्य तो विश्वकर्मा! ॥ २१ ॥ रावया रावणाची राज्यलक्ष्मी । त्याचें वैभव कोण पा नेमी[१] । आता प्रतेला अधर्मी । परि मागुता च्यवेल. ॥ २२ ॥ पश्चिमे दिवाकर जालिया अस्तु । पूर्वे चंद्र उगवे अकस्मातु,। तैसा रावणवधातीं श्रीमतु । अतीं बिभीषण होईल. ॥ २३ ॥ भाग्यसरितेचा पूर वोहटे । तेंच स्वधर्मी वासना विटे. । एक म्हणती होणार तें न लोटे । विरिंचिकरूनि. ॥ २४ ॥ ऐसें कपि बोलती येकमेका, । निमिष नलगे पाहता लंका, । तव अस्त जाहला अर्का, । रजनी प्रवर्तली. ॥ २५ ॥ निशीं भ्रष्ट जाली दिनकरकिरणें, । त्या शोकें काळवंडली तारागणें. । पुनरपि देखोनि प्रीतिलक्षणें । टवटवित जाली. ॥ २६ ॥ निशामदाकिनी खोलें, । कीं तें अमर फुलर्लें, । नाना सौकडे उघडलें । व्योमरत्नमादुसेचें. ॥ २७ ॥ तव चद्रबिंब उगवलें वाटोळें । तेणें दिशाचक्र केलें धवळें; । सप्तसमुद्रीं आगळें. । भरतें भरलें ते काळीं. ॥ २८ कीं रघुवीर आज्ञा मुखेळे, । दैत्यराया नभ उजेळे, । ना ते निराळिये पोकळे । वकपती मुक्तें. ॥ २९ ॥ असो. काळरात्री आपुलिया करीं । दिशा गौरविल्या कृष्णाबरी. । ऐसें देखोनि वानरवीरीं ।

१ क. हातरें. २. क पहावया नभें उघडिल डोळे.

पावकु प्रसन्न केला. । ॥ ३० ॥ तैल्यकाष्ठाच्या बांधल्या चुडी, । तेथें लाविला अग्नि धडाडी; । मग तेणें उजियेडें परवडी । वसली वाहिनी. ॥ ३१ ॥ वानर बळवंत कोट्यानुकोटि । सेनेप्रदेशीं फिरे घरटी, । भुभुःकारिती, त्रिकूटीं । प्रतिसादु गाजे. ॥ ३२ ॥ कुमुदिनी मिरविती आनंदें. । विकासीं लागलीं कुमुदें, । मर्यादा साडिली मकरंदें । षट्पदकुळें झेंपावती. ॥ ३३ ॥ नारी डुल्लती यौवनभारें । पुरुष तेथें चेइती आदरें, । तैसीं कुमुदिनीवरि झुंकारें । अलिकुळें येती. ॥ ३४ ॥ चकोरकुळें जालीं तृप्त; । जीवनझरे साडिती सोमकांत, । असो बोलणें बहुत, । चंड वर्णन पुढें असे. ॥ ३५ ॥ ऐसा अवसरु जाला रामचंद्रा, । कितीयेकां कपींतें लागली निद्रा, । नेत्रकमळीं मिनली मुद्रा । जैसी अगोचरी. ॥ ३६ ॥ सुषुप्तिअवस्थिये खोंपे । सर्वांची चित्तवृत्ति हारपे; । मग इंद्रियांची चेष्टा आटोपे । ठायीं ठायीं. ॥ ३७ ॥ पुढें अज्ञानदशेचा अंतीं । ज्ञानवस्तु होय प्राप्ति, । तैसी निशा सरलिया पुढती । दिवसु पाहिला. ॥ ३८ ॥ जंबुद्वीपदेशींची धरणी । तेथें होती तमाची गवसणी, । ते अरुणोदय होतां तत्क्षणीं । निरसोनि गेली. ॥ ३९ ॥ पुढें उदयाचळापासूनि । भास्कर प्रकाशला गगनीं; । तयाचे प्रीतीस्तव कमळिणी । आनंदली जळीं. ॥ ४० ॥ तेणे आनंदाचेनि उसाळें । प्रीती विकसलीं कमळें, । तें देखोनि षट्पदकुळें, । सुगंध सेविती. ॥ ४१ ॥ दिवसाचा आरंभकाळीं । नित्यनेम सारिले सकळीं. । सभा घनवटली रामाजवळी । सुग्रीवादिकांची. ॥ ४२ ॥ सिनोंदें कपिरायें प्रेरिले । वानर वनें पाहों निघाले, । जैसें समुद्राचे युव फुटले । मर्यादा साडूनिया. ॥ ४३ ॥ महाअनिवार वानरसेना । निदारीत वनें उपवना । वृक्षांचीं फळें तोडिताती नाना, । भक्षिती तृप्तीवरि. ॥ ४४ ॥ स्वयें निघोन रघुनंदनें । दीला पाहिली उर्ध्ववदनें, । तव सुवेळापाठारीं दोनी योजनें । शृंग देखिलें. ॥ ४५ ॥ सुग्रीवासि म्हणे रघुवीर, । "या शृंगावरि आरोहण करूं" । "इच्छा तुमची" म्हणे वानरेश्वर । मग वेघते जाले. ॥ ४६ ॥ वानर नाराजिले प्रसिद्ध । राघवासमवेत चालिले सर्व, । जैसे इंद्रा वेष्टित विबुध । तैसे मार्ग लंघिती. ॥ ४७ ॥ शीघ्र शृंग वेघला रघुकुळटिळकु । जैसा उदयाचळीं षोडशकळिंदु, । त्रिभीपणाचा धरूनि हस्तकु । लंका लक्षिता जाला. ॥ ४८ ॥ कपि जव

जव पाहती राजधानी । तव तव आनद वाटे नयनीं । म्हणती, " रमणीक नंदनवनी, । परि लंका आगळी. ॥ ४९ ॥ ते लंकेमध्यें राजगोपुर । षोडश खणें, पहा, विस्तीर्ण थोर । तयावरि बैसला रावण क्रूर । अंगलगा समवेत. ॥ ५० ॥ उभा राहिला वरिले शिखरीं, जैसा मेरु उदैला अवरीं । अळंकार झळझळिती शरीरीं । विद्युल्लतेचेनि पाडें. ॥ ५१ ॥ युद्धीं ऐरावतीचेनि दतें । वक्षस्थळीं उमटलीं क्षतें; । शीतळचंदनआरक्तें । आगीं उटी घेतली. ॥ ५२ ॥ वरि छत्रें दहाही पूर्णचंद्राकारें, । तितुकींच ढळती चामरें; । किन्नर दाशवृत्ती निजकरें । तांबोळविडिया देती. ॥ ५३ ॥ रत्नखचित जांबूनदाची झारी ॥ जळपूर्ण येकाचे करीं । येक तो पिकपात्रधारी, । येक वाहे आसनातें. ॥ ५४ ॥ ऐसा लक्ष्मीअलंकृत संपूर्ण । गोपुरशिखरीं रावणु । देखोनि दाखवी बिभीषणु । नरवानरपुंगवातें. ॥ ५५ ॥ उग्र रावणीचें ऐश्वर्य । नरवानरा वाटे आश्चर्य; । परि लक्षिताचि न धरवे धैर्य । शाखामृगनाथासि. ॥ ५६ ॥ रिपूचें वैभव देखूनि, रिपु । देखोनि वाढे शोकसंतापु; । अहोरात्र मानसीं संकल्पु । परस्परें वधालागीं. ॥ ५७ ॥ म्हणऊनि सुग्रीवा कोपु नावरे, । कोण्हा न पुसता उडाला त्वरें; । उरगारि जेसा व्योम सचरे । पक्षाचे बळें. ॥ ५८ ॥ रावणासन्मुख अकस्मातु । आला, आदळे जैसा पर्वतु. । देखोनि विस्मो वाटे बहुतु । दशग्रीवा मानसीं. ॥ ५९ ॥ वानर हा येकल्याचि येकु । मज दृष्टितळीं ये नि शंकु । होईल मुख्य कपिनायकु । ऐसें लंकेश कल्पी. ॥ ६० ॥ मग सुग्रीव म्हणे, "रे दशमुखा, । तस्करा, द्वेषिया, महामूर्खा, । मी रघुनाथाचा सेवकु, सखा, । सुग्रीव नाव माझें. ॥ ६१ ॥ जनकदुहिता जगत्रमाता । क', रे, आणिली कपटें सीता ? । तुज मी यथोचित शिक्षा आता । तें कौतुक पाहें. " ॥ ६२ ॥ मग लांगूल वाऊनि वरतें । छेदूनि साडिली दहाही छत्रें, । सर्वेचि उडोनि वामहस्तें । मुगुट माथाचें पाडिलें. ॥ ६३ ॥ ऐसें सुग्रीवानें केलें अकस्मात, । तव रावण कोपें चढला बहुत; । पुढें उमयां झाडिली लात । ते लागली सुग्रीवातें. ॥ ६४ ॥ घायासरिसें सवितासुतें । थापा हाणितलें रावणातें, । खवळला

१. क. करर हस्पी आपुलेने करें. २. क. नरां दुरांस. ३. क. वर्वेटारि. ४. क. टीक.

क्रोधें बहुतें; । मल्लयुद्ध आरंभिलें. ॥ ६५ ॥ जैसे महामदोन्मत्त दंती । येरयेरांसि संघटती, । तेथिंची आदळिली क्षितीं । दणंदणां वाजे. ॥ ६६ ॥ दोघे समतुल्य परस्परें । ताडण करिती मुष्टिप्रहारें । उभयतां वज्रशरीरें । भयंकर भिडती. ॥ ६७ ॥ अति बळिये अलोटरायें । निकरें हाणिती उ-सिणे घायें; । रक्तबिंदु दोघांचें हृदय । केलें दोघीं जणीं. ॥ ६८ ॥ कोपु आवेश न धरे । संघटत असतां दोघे धिरे, । मग आदळले एकसरें । आंगें आंगेंसि बळें. ॥ ६९ ॥ हस्त हस्तेंचि वेटाळिले, । चरणांसि चरण गुंडाळिले, । उरावरी उर आदळले, । दोघे पर्वतातुल्य. ॥ ७० ॥ उभयतां पावेश आगळा, । वर्मे कंठीं लाविती कळा; । ठेलित ठेलित भूमंडळा । दोघे नृपति आले. ॥ ७१ ॥ सांडूनि जीवित्वाचि शंका । भूमीसि मर्दिती एकमेकां; । ऐसा मरल्या दोन्ही घटिका । मल्लयुद्ध करितां. ॥ ७२ ॥ मानसीं विचारी लंकानाथु । येथें अवचटें घडेल अनर्थु; । आतां सांडूं हा पुरुषार्थु । क्षेमें रक्षूं आपणातें. ॥ ७३ ॥ मग सूक्ष्म जाला दशग्रीवु । सोडविली सुग्रीवाची वळु । ते काळीं त्यजिलें वैभवु, । शीघ्र गेला निजस्थाना. ॥ ७४ ॥ तैसाचि तेथूनि रवितनयो । उडाला प्राप्त असतां जयो; । जेथें होता स्वामी सीताप्रियो । पुनरपि तेथें आला. ॥ ७५ ॥ न माये नभीं आनंदें, । नमिलीं रामाचीं चरणारविंदें; । तैसेंचि सर्वांसि प्रीतिवादें । आलिंगन दिधलें. ॥ ७६ ॥ कपिनाथासि म्हणे रघुवीर । "आजि बुद्धी सांडवला देवगुरु; । कीं पश्चिमेसि जातो दिवाकरु । आनमार्गे पडला. ॥ ७७ ॥ मुख्य तुं पतिकपिकुळटिळका । विचारितां चतुरांमध्यें निका; । परि तू ये काळीं अविवेका । पात्र जालासि सत्य. ॥ ७८ ॥ प्रतिबिंबीं झेंपावला अविवेकें । तो सिंह बुडाला कूपोदकें; । म्हणऊनि बुद्धीविण कृत्य जितुकें । दुःखातें प्राप्त करी. ॥ ७९ ॥ आमुतें न करितां श्रुत । उडोनि गेलासि अकस्मात; । तेथें घडतें तुज विपरीत । तरि कार्य नासतें पुढें. ॥ ८० ॥ जीवासि देहीं असे अधिकारु, । मग चाले इंद्रियांचा व्यापारु; । तैसा तू क्षेमें कपिभारु । आम्हा लंकेजारे. ॥ ८१ ॥ आपुलिया अदृष्टाचिये गती । प्रयत्नें आणि पायाळाचे संगती, । तरी पुढें होय प्राप्ति । निधान कुंभाची ॥ ८२ ॥ तरि, कपेंद्र, तुझेनि मित्रपणें । इच्छादेवीस पारणें; । पतिव्रतेचे

मीं देखणें । देखेन डोळां. ॥ ८३ ॥ सत्यचें कपींद्रा जाण । अनर्थी न प्रवर्तावें विवेकेंविण, । आता तू पावलासि कल्याण । हें आम्हा उत्तम" ॥ ८४ ॥ ऐशीं रघुनाथाचीं वाग्पुष्पें । मस्तकीं वंदिलीं वानराधिपें; । मग प्रीतिपूर्वक सकल्पें । बोलता जाला कपि. ॥ ८५ ॥ "मंगळमूर्ति, कोदंडपाणी, । सकळसाराश तुझी वाणी; । बुद्धि हे कर्मानुसारिणी । त्यासि म्या काय करावें ? ॥ ८६ ॥ राया, क्रोधाचें भरितें भरे, । तैसी विचाराची सामुग्री सरे; । अकस्मात अनर्थी निगरे । क्रियाकर्म आपुलें. ॥ ८७ ॥ सरितापूर धावत वेगें । तो न वळे शिकविल्या मार्गें, । जैसा क्रोध उदेला सानुरागें । शांतीतें नपवे सर्वथा." ॥ ८८ ॥ ऐसे सुग्रीवाचे चातुर्य बोल । प्रमाण बृहस्पतिवाक्यतुल्य, । रघुनाथ संतोषला बहुसाल, । म्हणे, "भला भला, गा कपींद्रा." ॥ ८९ ॥ पुढें तव तेचि अवसरीं । पुष्पजाती आणिल्या वानरीं. । सुग्रीव पूजिला उपचारीं । जयो पावला म्हणोनि. ॥ ९० ॥ सेनास्वामी होय जयवंतु, । मग प्रसन्नवदन होय परिवार बहुतु, । जैसा प्रकाशिलिया आदित्यु । अरविंदें विकासती. ॥ ९१ ॥ ऊर्ध्व पाहोनि बोले चापपाणी. । म्हणे "अग्निवृष्टि करितो तरणि । पडतसे, ते स्थळीं धरणी । दग्ध होत बहुसाल. ॥ ९२ ॥ तोचि प्रश्न पुसे लक्ष्मणु । भविष्य सांगे सीतारमणु, । "शीघ्रकाळें महादारुणु । विग्रहो होईल." ॥ ९३ ॥ ऐसें सुवेळाशिखरीं राम बोले. । सुग्रीवातें म्हणे, "उत्तरें वहिलें । शत्रु संग्रामा सिद्ध जाले । त्यातें आक्रमोनि राहों." ॥ ९४ ॥ पर्वत पाठारींची जळें । अधोपरि धावती कल्लोळें । त्याहूनि वैभव कपींचें आगळें । उतरती बहुत पथें. ॥ ९५ ॥ सुवेळे आच्छादित वनस्पति, । उतरता विनोदें उत्पाटिती; । ऐसे रघुनाथ सर्व शीघ्रगती । तळवटासि आले. ॥ ९६ ॥ रघुनाथकपींद्राचे आज्ञेस्तव । लंका वेढिती हरिपुंगव. । कोण कोण द्वारीं संग्राम ठेव । दाटूनि राहिले ? ॥ ९७ ॥ मैंद, द्विविद आणि थोर थोर । येकनेकाचे वेगळे कपिभार । त्यासहित नीळ पूर्वद्वार । आक्रमूनि राहिला. ॥ ९८ ॥ गवय, गंधमादनु गजु । हेमकूट, तळपन, ध्वजु, । यासहित अंगद लंकेचा राजू । दक्षणद्वारीं राहिला. ॥ ९९ ॥ पनस, शरभ, कुमुदु, केसरि । हे वीर अंगदंगसहपरिवारी, । यासहवर्तमान पश्चिमद्वारीं । हनुमंत

राहिला. ॥ १०० ॥ सौमित्राबिभीषणांसि रघुवीर । उत्तरद्वारीं राहिला रणधर्मवीर । साठि कोटी कपिदळभार । अंगलग अवळिके. ॥ १ ॥ सुग्रीवा संग्रामा आवेश परम । अंगलग तेतिस कोटी प्लवंगम । लक्षूनि लंकेचें मध्य-गुल्म । राहिला असे. ॥ २ ॥ सुग्रीवास संवगडा जांबुवंत, । संग्रामीं सौरा रणपंडित । आपुलेनि दळें परिवारित । तेथेंचि अवग्र राहिला. ॥ ३ ॥ महावानर एकमुष्टी । सुषेणासरिशा वीस कोटी । यांचा सावधान फिरे घरटी । सर्व दळ वेष्टित ॥ ४ ॥ लंका प्रदेशिंची सर्वभूमी । वेष्टूनि आ-च्छादिली प्लवगमीं, । शत्रु जिंकावया संग्रामीं । इच्छित राहिले ॥ ५ ॥ द्रुम शिळाशिखरें सिंधें । विशाळें निर्मिळीं नानाविधें, । हेंचि वानरा करीं आयुधें । मिरवत असती. ॥ ६ ॥ कोट्यानुकोटि वानरगण । रणमय रगले वीर दारुण, । वीरश्रीया देखाति स्फुरण । सिंधुलहरियां ऐसे. ॥ ७ ॥ रण-रंगाचेनि आनंदें । भुभु:कारती येकनादें । घोष गर्जे तेणें पडिसादे । नभु पूर्ण होतसे ॥ ८ ॥ कपिसेना सिंधु महांगाढा । तयाचा लंकेसि पडिला वेढा । निशाचर पाहति हुडाहुडा । उभे राहूनिया ॥ ९ ॥ येथूनि संग्रा-मार्चे मूळ,। युद्धकांड तें हें बोलिजे केवळ । वाल्मीकिवाणी पीयूष कल्लोळ । सुजनीं सेवावें कर्णीं ॥ ११० ॥ तोचि हा उच्छिष्ट काव्यरसू । कथी मुद्गल कृष्णदासु । तरी श्रोतीं करूनि अवकाशु । सादरता यावी ॥ १११ ॥

## प्रसंग तेरावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजायनमः । युद्ध-समयो प्राप्त जालियावरी । रघुराजसभा निचारकरी. । बहुत भाव ते अव सरीं । आणिते जाले मना. ॥ १ ॥ संग्रामाचा प्राप्त काळु आतां । राजनीति विचारिजे तत्वता. । तव बिभिषणु जाला बोलता । प्रधानत्वपणें. ॥ २ ॥ "अहो जी नृपति गुणनिधि, । नीति तरि ऐसी युद्धाआधीं । साम, दामु, "भेद, दंड ये बुद्धी । कार्यसिद्धि करावी. ॥ ३ ॥ तरि प्रथम, जी रघुनाया, । साम्य करूनि पाहिजे सर्वथा; । रावणें सीता दिधलिया

१. ख. रघुनाथ सभा. २. अ. दंड, भेद. ३. अ. कार्य साध्य करावें. ४. अ. तरी.

वृथा । युद्ध तयासि कां करणें ? ॥ ४ ॥ कष्टेविण वस्तु होये प्राप्त; । तरि दीर्घ प्रयत्नाचें कायसें आर्त ? । दुग्धींच सांपडे नवनीत । तरि दधि कां मथावें ? ॥ ५ ॥ इक्षुदंडाचे कांडोरी रसधारा । उगलीच फुटोनि पडे शर्करा, । तरि पिळणी, पाक पुढारा । नलगे करणें. ॥ ६ ॥ वाटांचेनि तृणें हरेति व्याधि । तरि कां क्लेशें मिळवाव्या औषधि. । गृहींच प्राप्त होय सिद्धि, तरि कां तपासि रिघावें ? ॥ ७ ॥ सहजचि सांपडे निधान, । तरि कां करावें अंजनसाधन ? । ईश्वरकृपेस्तव जालें ब्रह्मज्ञान । तरि किमर्थ शास्त्रअभ्यासु ? ॥ ८ ॥ म्हणउनि रघुपति अप्रयासें । रावणें सामोपचारासरिसें । सीतेसि वोपिल्या, कायसें । युद्ध करणें परस्परें ? ॥ ९ ॥ आतां रघुकुळतिळका, । शीघ्र शिष्ट पाठविजे निका, । जो युक्तीचा सिंधु बोलिका, । रावणा बोधूं जाणें. ॥ १० ॥ ऐसें बोलिला बिभीषणु, । यथार्थ मानी सीतारमणु । म्हणे " बरवें बोलिलासि तूं सुजाणु । परमनीतिन्यायें. ॥ ११ ॥ आता बहुत मतें विचारा । पाठवावे कवणा चतुरा. । जो येकला जाऊनि दशशिरा । समर्पील शब्दरत्नें ? ॥ १२ ॥ सळ पडलिया सांरिखें । निर्वाह करील प्रसन्नमुखें. । कठिण मान जाणोनि मुखें । शरीर रक्षूनि येईल. ॥ १३ ॥ ऋक्ष तैथा कपिराजे । यांमध्यें येकु विचारिजे. । प्रसंग जाणोनि ऐसा बोलिजे । वृद्धाचार बिभीषणा. ॥ १४ ॥ अशक्त, मंदमति, आळशी, । कृपण, कुव्यसनी, मळीनमानसी, । कुरूप, कुलक्षण, बोलतां जिव्हेसि । शब्द न फुटे जयाच्या, ॥ १५ ॥ ढळितां भयातुर होती. । बोंदी सुटोनियां जाय युक्ति, । पडला समयो नोळखती, । शीघ्र कोपी जे सैदा, ॥ १६ ॥ अंगी ग्रहसंचार असे, । शुचि कदाकाळीं नसे, । निरंतर वासना वसे । सप्तवेसनीं जयाची ? ॥ १७ ॥ वडिलांचेनि दुःखें हरुष मानी, । परलाभें मानी तीव्र हानी । सेंवे जनातें दुष्टवचनीं । सर्वदा दुःख देती. ॥ १८ ॥ मान गाळिता विप्रांचा, । ईश्वरभजनीं संकल्पु कैचा, । मंगळारंभीं जयाची वाचा । अशुभचि वदे, ॥ १९ ॥ ऐसे

१. क. तरि कां युद्ध करावें ? २. क. करणें सर्वथा. ३ अ. व ग. जाणे ? ४. क. श्री रघुपति. ५. अ. पुढे करणें. ६ ग. प्रतींत हा शब्द नाही. ७. अ. निघे. ८. क. व ग. अथवा. ९. अ. जयाधि. १०. अ. बाहींव. ११. अ व ग. -पैं. १२. अ व ग. गरज.

जे गा नैऋत्यनाथा, । प्रयोजनीं वर्जावे सर्वथा. । योजावे ते, किंचित कथा । परिसें तयांची ॥ २० ॥ धीट, धैर्याचे पर्वत, । उदार, असाधारण गुणवंत, । सुघड बोलिके अमृत, । जैसें, मधुरा गिरा, ॥ २१ ॥ शास्त्रार्थ करतलामळ, । हृदय जैसें गंगाजळ, । कुळ विहितआचारशील, । पवित्र, पद्महस्ती, ॥ २२ ॥ यशस्वी, जयवंत सदा, । नुलंघिती वेदमर्यादा, । विपरितकाळींही कदा । न करिती निंद्यकर्मे, ॥ २३ ॥ परोपकारीं कष्टविती देहो, । भूतकृपा, गोद्विजांवरि मोहो, । स्वल्पासाठीं कल्हो । कहींच न करिती, ॥ २४ ॥ वृद्धांचें वाढविती महत्व, । विपरीतकाळीं न सांडिती सत्व, । स्वामिकार्यी जयाचें जीवित्व । तृणासमान असे, ॥ २५ ॥ चिन्हें सुचे कार्याकार्याचें मूळ, । वेषसाई धूर्त, कुशल, । आलस्यरहित धीर सबळ, ॥ सिंहाकृत साजिरे; ॥ २६ ॥ ऐशिया हो पुरुषाळागीं । योजावें प्रयोजनप्रसंगीं. । बिभीषणा, तूं अति चतुर जागीं; । तुजप्रति काय सांगणें ? ॥ २७ ॥ भुवननाथ ऐसें बोले, । ऐकोनि अवघे तटस्थ जाले. । धीरत्वक्रांत विचारू लागले । सुग्रीव आणि बिभीषण. ॥ २८ ॥ जरि पाठवावा जांबुवंत, । तरि हा वडिल, वृद्ध बहुत. । याचा वंधु सनादत्त, दीर्घवंत । हाही योग्य न दिसे. ॥ २९ ॥ जरि पाठवावा मैंदा । तरि हा शीघ्रकोपी सदा; । शिष्टाई न करितांचि द्वंद्वा । तेथें प्रवर्तेल. ॥ ३० ॥ सुषेण करूं नये वेगळा, । हा वैद्य समस्तांहूनि आगळा. । कैसें पाठवावें नळा ? । अत्यंत हा उग्रकर्मा. ॥ ३१ ॥ आणि सेतुबंधन येणें केलें, । म्हणऊन कपिचक्र लंकेस आलें; । हें रावणें असे ऐकिलें । शुकाचेनि मुखें. ॥ ३२ ॥ नेळासि देखोनि सन्मुख । काय अमित्रास वोटेल सुख ? । सकळांपरिस याचें दुःख । हृदयीं धरिलें तेणें. ॥ ३३ ॥ नीळ तरि वाहिनीपति । द्विमुख न धरे विक्रमें क्षिती. । कुमुद तरि क्रोधावर्ती । सर्वदा भ्रमत असे. ॥ ३४ ॥ केसरी न साहे परआगळें. । गज मदोन्मत्त डुल्लतु बळें. । फनश न लिपे

१. क. परिसा त्यांचा निर्धार. २. ख. जयासि. ३. अ. व ख. कधींच. ४. ख. चिन्हींच सुचे कार्याचें मूळ. ५. अ. प्रतीत हा शब्द नाहीं. ६. अ. प्रतीत हा शब्द नाहीं. ७. अ. ऐकतां. ८. अ. मग वीर. ९. अ. व ख. हा आम्हां. १०. अ. यासि. ११. अ. व ख. उपवेन्द्र. १२. अ. बहुत धरिलें तेहीं.

खरिविटाळे. । म्हणया शांति नाहीं. ॥ ३५ ॥ द्विविदाची अति चंड वाचा. । गवाक्षासि अति वीर्य, विचार कैंचा ? । गंधमादन सुगंधाचा । न साहेल रावणातें. ॥ ३६ ॥ तळ पन म्ह्णु अति चचळ, । प्रतापें जैसा वडवा नळु. । हेमकूट बहु विशाळु । वितंडरूपी हा. ॥ ३७ ॥ शरभु सदा वज्र गम्दी । ऋषभु न धरे छळवादीं. । दुर्मुख तरि पदोपदीं । परम क्षोभतु ॥ ३८ ॥ आणिकही ऋक्ष, वानर शाहणे । आहेति, इंद्रा ऐसे आगवणे, । परि हें सौम कृत्य करू जाणे । ऐसा पाहिजे योजिला. ॥ ३९ ॥ बिभीषण म्हणे, "जरि म्या जावें, । तरि पूर्वीच शिकविलें बरवें; । तें नाहीं घेतलें दशग्रीवें, । मग शरण आलों, जी. ॥ ४० ॥ मागुता जावें कोण्या मुखें ? । कैसीं पाहों त्या रावणाचीं मुखें ? । बधु होसाता, परम दुःखें । दोघे तुटोनि गेलों. ॥ ४१ ॥ आता विचारावें कपिनाथा. । तरि त्या योग्य कार्य नव्हे मर्वथा, । आणि येणें गोपुरीं केली वेथा । प्रथमाचि रावणासि ॥ ४२ ॥ सुग्रीवें दिधल्या दु खैकोटि । त्या सवती रावणाचे पोटीं,। ह्मणोनि यासि देखोनि दृष्टी । काय संतोष पावेल. ? ॥ ४३ ॥ आता पाठवावा हनुमंत । तरि हा त्यासि असह्य बहुत । वन विध्वंसुनि, अखया सुत । वधिला रावणाचा, ॥ ४४ ॥ आणि तृतीय भाग जाळिली लंका, । संहारिलें बहुता सैन्यका । हा प्रसिद्ध त्यासि ठाऊका, । यावरि क्रोध बहुत असे ॥ ४५ ॥ म्हणऊनि हनुमंतासि या कारणें । शिष्टाईसबंधें न घडे जाणें. । ऐसें सुग्रीवसमवें बिभीषणें । बोलिजेत आहे. ॥ ४६ ॥ रघुनाथाच दक्षिणभागीं । बिभीषण, सुग्रीव उभयवर्गी. । अंसिजे, तेणेंचि अगलगीं । अंगद बैसला असे ॥ ४७ ॥ तव हनुमंतु तेचि काळीं । श्रीरामासन्मुख बद्धांजुळी । वदता जाला वीरमंडळीं, । बृहस्पति जैसा. ॥ ४८ ॥ म्हणे " भार्गवजिता, भुवनेनाथा, । शिष्टाई करणें हा विचार वृथा, । मग्रामेंविण तो सर्वथा । सीता नेदील रावणु ॥ ४९ ॥ तथापि तेणें सामोपचारें । जानकीसि दिधले निर्धारें, । तरि सख्य सहजचि परस्परें, । तेथें विरोधु कैंचा ? ॥ ५० ॥ वैर तुटोनि गेलिया वरि । रावणा राज्य

१ क. साम्यकृ य २ अ जी, तुम्हा ३ अ दु साचश ४ अ प्रतीत हा शब्द नाहीं. ५. अ. असे ६. स. सारिखा, ७ स. रघुनाथा ८ अ. ९ स. शिष्ट पाठवणें हा विचार वृथा. १०. अ. रावण राज्य

अहलक्ष्पनारें. । तुम्हीं सकल्पु केला त्याची पुढारीं । कोण निर्गति निचारा. ॥ ९१ ॥ देव केसेनि पावे निजस्थानें ? । कसेनि क्षेमें राहती त्रिभुवनें ? । विभीषणासि कृपा केली तें वचनें । सिद्धि कैसेनि जाति ? ॥ ९२ ॥ शिष्टाई न घडे रघुकुळतिळका, । तुम्हीं विभीषणासि दिधली लंका, । हा दमकीर्तिघोष ठाउका । त्रैलोक्यासि जाला. ॥ ९३ ॥ शिवें गौतमासि गोदावरी । दिधली ते मिळाली सागरीं, । तो विपरीत योव त्रिरुका शिखरीं । सामावेल कैसा ? ॥ ९४ ॥ तुमचेनि जनकें तुम्हासि । पाठविलें दंडकारण्यासि, । प्राण गेले, परि सत्यासि । साडिलें नाहीं, स्वामी. ॥ ९५ ॥ ऐसा सत्य प्रतिज्ञा श्रीरामा, । त्रैलोकीं विख्यात नामा, । हरहृदय विश्रामा, । तें काय विपरीत होईल ? ॥ ९६ ॥ तुमचिया कृपादान सुजळें । बिभीषणतृष्णावल्लि पाल्हेली बळें, । आता तेणें येतीळ फळें । लंकेचिया राज्या ऐसीं. ॥ ९७ ॥ ऐसें जरि आहे, सर्वेश्वरा, । शिष्टाई न घडे, तुम्ही विचारा. । बिभीषणें सहज, गुणसागरा, । सांगितली राजनीति ॥ ९८ ॥ आता धर्मन्यायाकारणें । राजनीति असेल करणें, । तरि शिष्टि अवश्य पाठवणें, । विचारिता अंगद येवू ॥ ९९ ॥ मेरुसमान याचें धैर्य, । समुद्रा ऐसें आहे वीर्य, । तेजें तरि जेसा सूर्य, । देखत असा तुम्ही ॥ ६० ॥ हा गुणरत्नाचें भाडार । याननदशारूढ शरीर । कुत्यें तुलणा साचार । सरस्वतीसि पावे ॥ ६१ ॥ सुरेशा ऐसा आगवणें । रिपू सघटणीं परती नेणें । शब्दामळें अती शाहाणे । तयामधें अग्रवादी ॥ ६२ ॥ मान मार्ग जाणे त्रिकाळिचे । कार्याकार्य यासी चिन्हें सुचे । ऐसे बहुत गूण या अगदाचे । सागता असाधारण ॥ ६३ ॥ सुदर आळकारें शोभतु । हाचि पाठविजे सर्वथा दूतु । ऐसें बोलिला हनुमंतु । ते सर्वासीं मानवलें ॥ ६४ ॥ समस्ताचे हृदयीं हातें । तेचि बोलिजें हनुमंतें । भला भला म्हणानी सीताकांतें । शब्दे गाजवील ॥ ६५ ॥ पुढें रघुनाथ म्हण गा अंगदा । उत्तीर्ण नव्हिजे तुझिया स्नेहगादा । निसरल्ला पितृदरा । निवेंकें करूनीं ॥ ६६ ॥ वधूनशुमी होता निरोधू । परी आम्हासा नसता वर समधू । निरापरार्धे वाळिचा वधू । म्या अकस्मात केला ॥ ६७ ॥

१ अ राहतीत्र भुवनें २ अ. तरि ३. क शिष्टाई पाठविण ४ द मनामाय ५ अ. वालिलें

ऊनी चरणीं टेंविला माथा । ऐसें देखुनि अंगदाच्या पुरुषार्थी । सर्वे संतोषला ॥ १०० ॥ परिसोनि अंगदाच्या बोला । वीरचक्रासि आन जाला । बिभीषण म्हणे "भला रे भला । वीर्यवंता वाळिपुत्रा" ॥ १ ॥ पु कृपानिधि म्हणे "वाळिसुता । युद्धसमयो प्राय आतां । तरी शिष्टाई कर प्रथमता । बिभीषणमतें ॥ २ ॥ तरी तुवां गा वीरपुंगवा । साम संकट सिद्धी न्यावा । लंकेमध्यें जाउनी दशग्रिवा । आदरें भेटावें ॥ ३ ॥ बो संबोधकें उत्तरें । करुणा गंभीर तीक्षण मधुरें । कार्य साध्य जेणें प्रकारें करी गुणाढ्या ॥ ४ ॥ आपुलिया कार्या कारणें । वैरी बोळगिजे याचक पणें । जैसीं विप्रवेशें इंद्रें तेणें । मयाशी मैत्री केली ॥ ५ ॥ जोंवरी का सिद्धी पावे । तोंवरी रंकाचे राय म्हणावे । कुजन सुजनाहुनी बोलावें पवित्र परउपकारी ॥ ६ ॥ म्हणउनी अंगदा त्या रावणातें । बोधनीं प्रकारें बहुतें । नाटकें तरी संदेहातें, । फेडूनि येईं कां ॥ ७ ॥ बोल माझा भीम पुरुषार्थू । म्हणावें कां मूळ समुळ संव्हारिसि व्यर्थू । गर्वे भ्रमाल तरि येक पदार्थू । मागें सीता अथवा संग्रामू ॥ ८ ॥ ऐसी रघुनाथें आज्ञा दीधली । ते अंगदें मुगुटीं धरिली । जैसी मौळिचे पायीं टेंविली । रुद्रें चंद्रकळा. ॥ ९ ॥ श्रीस्वामीस प्रणिपात केला । सभा न्याहाळुनी मस्तक डोलविला । मग जयजयराम म्हणोनि उठाला । ऊर्ध्व गति अकस्मात् ॥ ११० ॥ इति रामायण वाल्मिकीकृत । युद्धकांडकथामृत । पुढें प्रश्नीं कीं परिसावें सुचित । कृष्णदास मुद्गल म्हणे ॥ १११ ॥

---

## प्रसंग चौदावा.

ॐनमो श्रीरामसच्चिदानंदायनमः । श्रीगुरुकाशिराजायनमः । निवाला आर्त निर्गुर्क वेळ । साचे सर्पारिचां उपमा. । अगनापो सुटला तेणें द्रुमां । [illegible] प्रवर्तला स्तुती कॅ५प- १ ॥ रघुनाथाचा शार गगनीं मचोर । तैसा ऊर्ध्व उत्तरें । लंकामध्यभागीं ॥ २ ॥ थाकादी-

---

१. स्त. बहुत. २. अ. तरि ऐसें. ३. ... ४. क. गुर्नी बरानी ५. अ. व स्त. ५ जैसे बनेरो तेणे. ३. क. अन्दंत. ५. अ. नानिवडे.

डूनि पडे सपक्ष पर्वतु, । कीं वैकुंठाहूनि भूमी ये वैनतासुतु, । जैसा काळचक्र कृतांतु । टाकी अवनीवरि, ॥ ३ ॥ कीं हिमाळयाची टाळू । त्यावरी पडे वज्रकल्लोळू, । नाना अस्ताचळा माथां तेजाळु । सूर्य उतरे जैसा; ॥ ४ ॥ ऐशियेपरी वालीसुतु । रावण सभेच्या अंगणाआंतु । उतरला तो अकस्मातु । समस्तां देखतां ॥ ५ ॥ निशाचरीं व्यापला सभामंडपु, सिंहासनीं उपविष्ट लंकानृपु । अंगदामानसीं निर्भय संकल्पु । सभेमध्यें प्रवेशला ॥ ६ ॥ दिसे पर्वताहूनि आगळा । तरणीसमान तेजागळा. । अळंकार लेइला त्या रत्नकिळा, । तेणें सभा डौरली ॥ ७ ॥ ऐसा अंगद देखिला डोळां । समस्तां उपजला भयें कांटाळा । प्रचंड लोहाच्या आर्गळा । हातीं वसविल्या राक्षसीं. ॥ ८ ॥ पृष्ठीशि थाऊनि मंडपस्तंभा । धैर्याचा मेरु अंगद उभा । अमान्य करूनि सर्व सभा । पुढें रावणु लक्षिला ॥ ९ ॥ सिंह पाहे दृष्टीसि वारणु, । कीं शार्दूलें लक्षिला हरिणु, । नाना कुमोद्भव ऋषीनें संपूर्ण । जळराशि देखिला; ॥ १० ॥ ऐसियापरी तारासुतें । नेत्रीं न्याहाळिलें लंकानाथातें, । आणि रावणेंही अंगदातें । देखिलें कैसें? ॥ ११ ॥ मार्तंडे देखिला राहो ग्रहणीं, । कीं शैलासमीपचि वज्रपाणी, । नाना शरभुपक्षी समधरणीं । सिंहें पुढें देखिला. ॥ १२ ॥ आणिकही कैसा गमला? । जेसा मृत्यूनें मूळ पाठविला; । कीं तो बळात्कारें गृहासि आला । आपुलें सर्वस्वहर्ता ॥ १३ ॥ ऐसा रावणें अंगदु देखिला नयनीं । भय आणि आश्चर्य वाटलें मनीं । जजा तटस्थ सर्पदर्शनीं । तैसा तटस्थ जाला. ॥ १४ ॥ सभानायक निशाचर, । मंत्री, योद्धे, बंधु, कुमर । पाहतुचि ठेले; परि उत्तर । कोणी कोणासि न बोले. ॥ १५ ॥ सकळ सभा तटस्थ जाणोनि । अंगद विचारी अंतःकरणीं; । मग लांगूल चक्राच्या आसनीं । रावणासन्मुख बैसला. ॥ १६ ॥ म्हणे मौन्य धरिलें निशाचरीं. । फळ नव्हे न बोलतां उत्तरीं. । आतां आपणचि ये अवसरीं । उपक्रम करूं. ॥ १७ ॥ पूर्वी समस्तां सुरासुरीं ।

---

१. स. हा शब्द नाहीं. २. अ. तेणें सर्वांसि उपजला कटाळा ३ अ. केली. ४. अ. लक्षिला ५. अ व स. रावणातें. ६. क. दरशनीं. ७. अ. महायोद्धे. स. प्रधान. ८. अ. टकमका पाहतुचि. ९. अ. अंगदें विचारिलें आपुले मनीं. १०. स. वदं बोलावयाचा.

मथन केलें क्षीरसागरीं । यास्तव निवडिलीं बाहेरीं । रत्नें चतुर्दश ॥ १८ ॥ तैसाचि हा शिष्टाईसागरु । मी आणि रावण शब्दमथन करूं. । सीता अथवा युद्ध, एकु प्रकार । साधूनि जावों. ॥ १९ ॥ ऐसी अंगदें विचारूनि बुद्धि । मथन आरंभिलें शब्दोशब्दीं । मग म्हणे, ' परियेसीं, राया गर्वनिधि, । वचनमालिका माझी. ॥ २० ॥ मज पारखियातें देखोनि । मौन पडिलें सर्वांचे वदनीं, । टकमका पाहती लोचनीं । परी येकुही न बोला. ॥ २१ ॥ धर्ममार्ग तरि ऐसा नव्हे. । आलियातें चतुर्विधप्रकारें पुसावें. । तरि मज पाहता तुम्ही आघवे । वाक्शून्य असाल.॥ २२ ॥ कीं लेखकें चित्र केलें निर्माण, । कीं टांकिया अवयविले पाषाण, । शरीरें जैसीं प्राणेंविण, । देखतु असे मी तुम्हा. ॥ २३ ॥ कुटिल सर्वांच्या अंतःकरणीं, । कीं अभिमानें गिळिली वाणी, । कीं भयाची वैसली कणाणी, । वदनीं खिळी पडियेली. ॥ २४ ॥ कीं राजहंस देखोनि टोळा । संतापे वायसाचा मेळा, । कीं मृगेंद्र देखोनि शृगाळा । सावकास न वाटे. ॥ २५ ॥ कीं विप्र आलिया सभेआंतु । अयोग्यासि लागे धुडका बहुतु, । नाना व्याघ्रदर्शनीं भ्रमतु । वळसा वृषभातें, ॥ २६ ॥ ऐसें मज देखतक्षणीं । सकळही भंगलेति अंतःकरणीं, । तुमचे येकाचीही वाणी । म्लानमुख होउनि ठेलें. ॥ २७ ॥ रावणा हो राक्षसराया, । मी कवण, आलों कवण्या कार्या, । हें तूं पुसावया । किमर्थ समर्थ नव्हेसि ? ॥ २८ ॥ मी इच्छित असें तुमचीं वचनें. । तुम्हीं न पुसा दीर्घाभिमानें. । आता मी शिष्ट आलों रघुनंदनें । पाठविलें आहे ॥ २९ ॥ मज म्हणती, ' तू कोण ? कोणाचा ? ' । तरि एक आत्मजु वाळीचा; । दूत होयें सुग्रीवाचा, । अंगदु नाम माझें. ॥ ३० ॥ श्री[11] रघुनाथाची निजांगना । पतिव्रता ते शुभानना । मेली व्हरूनि दुष्ट वासना । तीस लंकेस आणिलें. ॥ ३१ ॥ अविवेकास्तव अकस्मात । तुजास नियकर्म झालें प्राप्त. । ऐशिया दोषांसि प्रायश्चित्त । घेतलें पाहिजे.

---

१. अ तरि आता हाचि स्त तरि शिष्टाइ हाचि सागर. २ अ शब्दानिद्धि. ३. स्त देखोनि नयनीं ४. अ. तव ५ स्त चतुर्थ अ ' विधा ' शब्द नाहीं ६ अ तैसा देखतसें ७ अ तुम्ही ८ अ व स्त. येग्य ९. अ परि स्त. परि तु न पुससी १०. अ मज पाठविलें ११ स्त, ' श्री ' हा शब्द नाहीं अ. श्रीरा-मांचीं. १२. अ व स्त तुम्ही १३ अ. पातका

॥ ३२ ॥ देहीं दोष घडतां जितुके, । शुद्धि होणारासारिखी ठके, । जनकात्मजा आणिली लंके । हें अमगळ काज. ॥ ३३ ॥ हरी परद्रव्य, परवनिता, । परगृहा अग्नि लावी अवचिता, । विश्वासघातकी वधी निद्रिस्था । तो आततायी बोलिजे. ॥ ३४ ॥ ऐशियाचा भारु दोन घटिका । साहों न शके हे भूमिका । निवृत्ति नाहीं ऐशिया पातका, । देहांत प्रायश्चित्त बोलिजे. ॥ ३५ ॥ तरि तुझा मनींच, गा लंकेशा, । धरिली कामबुद्धी सीतेची आशा; । परी स्पर्शला नाहींसि दोषा । साक्षात्कार करूनिया ॥ ३६ ॥ बहुत दिवस जनकनंदिनी । असे तुझिया अशोकवनीं । मीं मागों आलों तिये लागोनि । सामोपचारें करूनिया. ॥ ३७ ॥ श्रीरामासी सीतेचेनि वियोगें । घटिका जाते जैसी युगें, । सिंधु तरोनि लंका वेढिली वेगें । युद्धालागीं सिद्ध जाले. ॥ ३८ ॥ अंतर पडेल राजनीतीसि । म्हणोनि पाठविलें शिष्टाईसि । तू जरि नाइकसी । तरी युद्धासि प्रवर्तती जाण. ॥ ३९ ॥ तरि सर्व प्रकारें लंकानाथा । शिष्टाई करणें सर्वथा, । संग्रामामध्यें उभय दळ वृथा । किमर्थ आटावें[2] ॥ ४० ॥ आता शीघ्र, राया, परियेसीं । मैथिलि वेई सरिसी, । प्रीतिपूर्वक रघुनाथासि । देई उदारपणें ॥ ४१ ॥ जैसें थोर मार्गें मैथिलेश्वरें । श्रीराम पूजिला षोडश उपचारें, । जानकीसि स्नेहआदरें । सुमुहूर्तें समर्पिली. ॥ ४२ ॥ ऐसेंचि धरूनि संकल्पु । गौरवीं श्रीराम, अयोध्यानृपु, । तेणें भुवनत्रयीं कीर्तिदीपु । प्रकाशेल तुझा ॥४३॥ जन्मीं आलियासारिखें । कीर्ति उरवावी विश्वतोमुखें । वर्तमान असता नानासुखें । पुढिलासि द्यावीं. ॥ ४४ ॥ पाहें गा तरुवर । सर्वस्वें अति उदार, । विश्वाकारणें निरंतर । उपकार करिती. ॥ ४५ ॥ शाखा, पल्लव, त्वचा, मुळें, । पत्रें, पुष्पें, रसु, फळें, । मनइच्छा देती, याही वेगळें । आणिक करिती. ॥ ४६ ॥ तीव्र सूर्यचि किरण । अस्तमानवरि साहती आपण. । छाया पाहूनि श्रमनिवारण । करिती तापळियातें. ॥ ४७ ॥ वात, पर्जन्य, उष्ण, शीत, गाढें । चाहि साहती, तैप येवढें । सदा सव धरूनिया पुढें । लोक उपकारा करणें ॥ ४८ ॥ कुठाराच्या तीक्ष्ण धारीं ।

---

१ हो ओंवी अ व स प्रतींत नाहीं २. अ या ३. क उतरूनि. ४ क. ऐसाचि मनों ५ क पुरुषें जन्मा ६. अ तपतीत्र

करिती चंदनाचीं काहोरीं. । दुःख न धरी, झिजे शिळेवरी. । परि निवर्वी श्रीमतातें. ॥ ४९ ॥ श्वापदें मृगतें परहस्तें । त्यजिती आपुलिया देहातें.[१] कस्तूरिका दे सदैवातें । भोगावयालागीं. ॥ ५० ॥ हाटक घडे सोनारें करें । पिटिजतां वैश्वानरें, ॥ लावण्य न सडी; आदरें । मिरवें भोक्त्याचे देहीं. ॥ ५१ ॥ पहाहो सूर्य येणें । लोकोपकाराकारणें । मेरु सर्वदा वेष्टित भ्रमणें, । विश्रांति नाहीं कदा. ॥ ५२ ॥ वनस्पती निजफळभूतें । तृप्त करी लोकपाळातें । सिणे पारि दुःखातें । कहींच न मनी ॥५३॥ आपुलें शरीर कष्टउनि । धन्य ते उपकार करिती जनीं । राया, परोपकारा तुल्य त्रिभुवनीं । पुण्य आणिक दिसत नाहीं. ॥ ५४ ॥ परपीडेपरीस पातक । शास्त्रें शोधिता न दिसे आणिक; । म्हणौनि धन्य ते धार्मिक । देह उपकारीं वेचिती. ॥५५॥ देहो नाशिवन्त, शरीर । असार साडूनि घेईजे सार । पडलिया देहाचे त्रिविध प्रकार । प्रारब्धासारिखे ॥ ५५ ॥ देह अशुभ कर्म आचरे । पडे तोंवरि मरणें मरे. । पुनरपि भोगावया उरे । अविनाश जीव हा. ॥ ५६ ॥ लोहाचिया अगसगतीं । घनकार्ते पिटी जैसा खातीं, । तैसी जीवासि भोगप्राप्ति । देहाचेनि संगें ॥ ५७ ॥ परमार्थबुद्धि आपुलें हित । पुरुषें विचारावें निभ्रांत । येरवीं अज्ञानास्तव बहुत । दुःख भोगिजेत आहे. ॥ ५८ ॥ मिथ्या हें प्रपंच मायाजाळ । विवेकें तोडावें सकळ । मीं कर्ता, करविता समूळ । उपडूनि साडावें. ॥ ५९ ॥ भजनें, वैराग्य ज्ञानें । साधावीं संसारच्छेदक साधनें. । काम, क्रोध, मद, मत्सर, येसनें । देशधडी करावीं. ॥ ६० ॥ राया, माझिये उपदेशें । दुःख धरिजेत असेल तुझेनि मानसें; । तरि मीं सांगत नाहीं ऐसें । राज्य सोडूनि जावें. ॥ ६१ ॥ व्यापारी अभक्तयांचे । राज्य भोगिलें विदेहन्यायें, । तैसें राज्यीं वर्तता, संसार-नयें । बांधू न शकती कदा ॥ ६२ ॥ काम निजाङ्गनेसीं पूर्ण किजे, । क्रोध दुष्टावरि टाकिजे; । मत्सर संसारासीं चालविजे । मद सोडिजे सकल्पावरि ॥ ६३ ॥ नलिनीपत्र जैसें जळीं, । तैसें न लिंपावें कर्ममेळीं.

१. अ पहा पा श्वापदें. २. अ. पिटत पिटत. ३. अ. ऐसा हो. ४ क. सांडीचि न मानिती ५. अ हा शब्द नाहीं. ६. अ. हा शब्द नाहीं. ७. अ. धन्य धन्य ते सर्वदा धार्मिक ८. अ. दोसी भोगावया केलें. ९. अ. सर्वथें. १०. क. भजन तेंचि वैराग्य ज्ञान ११. अ. बंधन नाहीं कदा.

विश्व हें ब्रह्मचि होळीं । देखोनि स्वरूपीं रमावें. ॥ ६४ ॥ मग स्वर्गसुखाच्या पाउठण्या होती, । त्रिविध मुक्ति मार्गी पडती, । निर्गुण सायोज्यतामुक्ति– । माजी मिळणीं होवे. ॥ ६५ ॥ समुद्रीं पर्जन्याचा थेंबुटा । पडलिया नेत्रडे कवणिया वाटा ? । तैसें सायोज्यीं जालिया एकवटा । महाप्रळयीं निवडेना. ॥ ६६ ॥ ब्रह्मा ब्रह्मांडासहित व्यातें । पाविल, बुडती भूतीं भूतें, । परि भंग नाहीं सायोज्यमुक्तीतें, । ऐसा महावाक्यार्थु असे. ॥ ६७ ॥ जितुकीं पदें सायुज्याअरतीं । तीं नाश पावती पुण्याचे अंतीं. । पुनरपि भोगप्राप्ति । चौऱ्यांयशीं लक्ष योनी; ॥ ६८ ॥ म्हणऊनि सर्वस्वें, लंकानाथा, । दुःखदायक कर्मे करणें वृथा; । आतां दृष्टी घालूनि परमार्थी । देईं सीता श्रीरामासि. ॥ ६९ ॥ परवस्तूसि होईं उदासु, । उरवीं त्रिभुवनीं कीर्ति घोपु; । जेणें विबुधांसहित महेशु । संतोषु पावेल. ॥ ७० ॥ रामास रामाची अंतुरी । देऊनि, ब्रह्मांड आनंदें भरीं; । तरि तुज भोगेल लंकापुरी । ध्रुवमंडळा ऐसी. ॥ ७१ ॥ बळीनें त्रिपाद मेदिनी । अर्पिली वामनालागूनि; । यास्तव तो पाताळभुवनीं । चिरंजीव नांदतु. ॥ ७२ ॥ आपुलें सर्वस्व अर्पिती राजे । त्यांची कीर्ति विश्वतोमुखीं गर्जे, । म्हणोनि ज्याचें त्यासि देइजे । तरि गृहींचें काय वेचे ? ॥ ७३ ॥ आतां बोलणें काय बहुवस । सर्वथा घेईं निर्दोष यश; । जेणें अपकीर्तीचे पाश । तुटोनि जाती. ॥ ७४ ॥ पुढें भऊतेन प्रकारें । यश जोडावें बळात्कारें. । यश तें कैसें, नृपवरें । नावेक परिसावें. ॥ ७५ ॥ यशाची शुभ्रतेची कळा । ऐकिली नाहीं, भूपाळा, । हें ब्रह्मांड जयाची कळा । धवळलें आहे. ॥ ७६ ॥ यशाचा शुभ्र वर्ण अधिक, । हें देखोनि शुभ्रांगाचे कितेक । काय करिते झाले, तें कौतुक । परियेसीं, नैऋत्यनाथा. ॥ ७७ ॥ निर्मळ शुद्धता यशासि जैसी । ऐसीचि हो म्हणोनि तृष्णा मानसीं; । याकारणें कोणें पां कैसीं । साधनें आरंभिलीं. ॥ ७८ ॥ पोटींची कन्या क्षीरसागरें । विष्णूसि समर्पिली आदरें; । हंस सत्यलोका जाऊनि शरीरें । ब्रह्मयाचें वाहन जाहला. ॥ ७९ ॥ चंद्र दुःखें कळाहीन जाला, । रुद्रासि देह देऊनि ठेला; । शेषें भूमिभार माथां घेतला.[1] पाताळीं तप करितु. ॥ ८० ॥ सप्त तुरंग अभिमाना चढले, । उग्र कर्मांसि प्रवर्तले, [2] रविरथीं निघोनि करिते जाले । प्रदक्षणा मेरूची. ॥ ८१ ॥ उडुगणें

१. अ. तरि. २. ब. समुद्रीं पड. ३. अ. विमलता, शुभ्रता.

गगनोदरीं । वसलीं वायुचक्रांचे शिरीं; । तप करितां चेवति पृथ्वीवरि । कितियेक पडती देखा. ॥ ८२ ॥ धवळगिरीस बहु वेथा, । शरण निघाला त्या कैलासनाथा; । शिवपुरी उचलूनि माथां । वाहिली तेणें. ॥ ८३ ॥ असो ऐसिये बहुता परी । कष्ट करिती अद्यापिवरि; । परि यशाच्या शुभ्रतेची सरी । कोणी पावतीचना. ॥ ८४ ॥ शिव बोलिजे अति धवळा[१] परि कंठीं जालासे निळा. । यशाची अखंड अधिक कळा । शुभ्र संपूर्ण, राया. ॥ ८५ ॥ विरिंचिअंडाबाहिरील जळ । त्याहूनि तें यश निर्मळ; । यशासि एकी उपमा घडे केवळ । रघुनाथाचें नाम ऐसें. ॥ ८६ ॥ ऐसें तें यश, निशाचरनाथा, । अंगिकारीं; सीता देई सर्वथा; । विपरीतबुद्धीचे नदीशीं वृथा । जळक्रीडा करूं नको." ॥ ८७ ॥ ऐशी अंगदाची वागेश्वरी; । रावण बोधविला विवेक उत्तरीं; । परी तो तिळतुल्य ह्दयाभीतरीं । चोखाळु नव्हेचि. ॥ ८८ ॥ परमार्थी धार्मिकाचें मत्त । तेथें रमेना दुष्टाचें चित्त. । नित्यें नित्य उपचारी उन्मत, । विवरेना कदा.[२] ॥ ८९ ॥ असता पालथिया घटा । तेथें नें थावे पळ येक येंबुटा;[३] । दुग्धाचे अथणीं घातला गोटा । तो नये पाकातें; ॥ ९० ॥ निंबवृक्षासि बांधलें आळें, । तें पंचामृतें भरिलें चिरकाळें; । त्यासि येतील अमृतफळें । हें न घडे कदा; ॥ ९१ ॥ कुंजर कुसुमवाटिके आंतु । बांधला असे मदोन्मत्तु, । त्यासि सुगंध वायो समर्पितु । परि न बैसे त्याचिये घ्राणीं; ॥९२॥ इक्षुदंडाचे काडोरीं । पिळिजेती पाषाणाचे उदरीं, । परि रसु न थांबे भीतरीं । वाहतुचि गेला. ॥ ९३ ॥ ऐशी अंगदाची शब्दशिष्टाई । बोलिला असाधारण ते समयीं; । परि रावण नेघेचि हृदयीं, । गोचिडा क्षीर जैसा. ॥ ९४ ॥ ऐसें अंगदाचें बोलणें । सुधारसासि आणिलें उणें; । परि अव्हेरु केला रावणें । तृणतुल्य मानिलें. ॥ ९५ ॥ ऐसें अंगद बोलिलियावरि । रावण प्रत्युत्तराचा उपक्रम करी. । ते कथार्णवाची कौतुकलहरी । मर्यादा लंघील. ॥ ९६ ॥ इति श्रीरामायण वाल्मीकिकृत्य । युद्धकांडकथामृत । श्रोते परिसावें सावचित्त । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥९७॥

---

१. क. कुमतिनदीचे प्रवाहीं वृथा. २. अ. नित्यानित्यविचारी उन्मत्त । परी विवरेना कदा. ३. ख. न थरे पडला येंबुटा.

## प्रसंग पंधरावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकृष्णराजाय नमः । मग रावण म्हणे, "रे वानरा, । महामूर्खा, अरण्यचरा । मज दशग्रीवेंसीं पाळेखारा, । शिष्टाई करूं आलेसि. ॥ १ ॥ अरे सिंहाचे सभेसि कैसा । शृगाळीं मिळोनि धाडिला ससा ? । उद्धक हिंडे दिवसा । तये परी तूं आलासि. ॥ २ ॥ मुकें उपन्यास करी वेदांचे, । बधिर श्रवणीं संगीत सुचे, । ससही ताल पांगुळ नाचे, । हें अपूर्वांमध्यें पडे; ॥ ३ ॥ गर्भांध दावी व्योमींच्या तारा, । क्लीबु भैथुनीं महा धीरा, । तैसें घडलें, रे वानरा; । अधिक तूं बोलसी. ॥ ४ ॥ येके ठायीं असतीं अंधकारु, अर्कु; । प्रीतीनें भेटती पर्जन्य, पावकु; । मैत्री चालविती मृत्यु आणि लोकु; । हे अघटित वार्ता. ॥ ५ ॥ हेंही घडों शके येखादियें समयीं, । परी मज न घडे रामेसीं शिष्टाई; । विचार न करितां आपुले ठायीं, । तुजला येथें पाठविलें. ॥ ६ ॥ तप्त लोहो जळबिंदूतें गिळी, । तें सीतळ जालिया पुनरपि उगळी, । तरी त्या दाशरथीस मैथिली । दें साम अंगिकारूनि. ॥ ७ ॥ पतंगाचेनि स्तुतिवचनें । सीतळ होइजे हुताशनें, । तरिच तुझिया सामप्रयत्नें । वैदेही दें रामासि. ॥ ८ ॥ मार्गे येक लतामृग आलें । तेणें सीतेसि प्रयत्नें पाहिलें, । परम अन्याय करूनि गेलें । कृष्ण वक्त्र आपुलें. ॥ ९ ॥ तैसाचि तूं मूढांमाजी श्रेष्ठ । लंकेमध्यें आलासि शिष्ट. । मूर्ख तो दाशरथी, क्रिया भ्रष्ट, । तेणें तुज येथें पाठविलें. ॥ १० ॥ मृगजळें तुंबळ येती पूर, । कीं वज्रधाराग्रीं गळती पाझर, । पाणीतळीं पाल्हावती कबरीभार, । तैं सीता प्राप्त काकुत्स्थासि. ॥ ११ ॥ महा जघन्य परिसिली मातु । दोवे पितृअरि त्यांचा जालासि भृत्यु. । धिक् ! धिक् ! तुझा देह मृत्यु । कां, रे, पावेचिना ? ॥ १२ ॥ तुझा जनकु निरापराधी । रामें वधिला कपटबुद्धी; । कुरंगातें जैसा पारधी । अकस्मात छेदी बाणें. ॥ १३ ॥ व्यर्थ वाळी गेलियावरि । सुग्रीव जाला राज्याधिकारी. । तुझी माता तारा सुंदरी । तेही हरिली बळें. ॥ १४ ॥ तुझें सर्वस्व

---

१. अ. वसती.

गगनोदरीं । बैसलीं वायुचक्राचे शिरीं; । तप करिता चेवात पृथ्व्यामार । कितियेक पडती देखा. ॥ ८२ ॥ धवलगिरीस बहु वेथा, । शरण निघाला त्या कैलासनाथा; । शिरपुरी उचलूनि माथा । वाहिलें तेणें. ॥ ८३ " असो ऐसिये बहुता परी । कष्ट करिती अद्यापिवरी; । परि यशाच्या शुभ्र तेची सरी । कोर्णी पावतीचना. ॥ ८४ ॥ शिव बोलिजे अति धवळा परि कंठीं जाळाते निळा. । यशाची अखड अधिक कळा । शुभ्र संपूर्ण, राय ॥ ८५ ॥ विरिंचिअंडाबाहिरील जळ । त्याहूनि तें यश निर्मळ, यशासि एकी उपमा घडे केवळ । रघुनाथाचें नाम ऐसें. ॥ ८६ । ऐसें तें यश. निशाचरनाथा, । अभिकारीं, सीता देईं सर्वथा, । विपरीत बुद्धीचे नदीशीं वृथा । जळक्रीडा करूं नको." ॥ ८७ ॥ ऐशी अंगदाची वागेश्वरी, । रावण बोधविला विवेक उत्तरीं; । परी तो तिळतुल्य हृदया भीतरीं । चोखाळु नव्हेचि. ॥ ८८ ॥ परमार्थी धार्मिकाचें मत्त । तें रमेना दुष्टाचें चित्त. । नित्यें नित्य उपचारी उन्मत, । विवरेना कदा ॥ ८९ ॥ असता पालथिया घटा । तेथें नें थावे पळ येक येंबुटा; दुग्धाचे अवर्णीं घातला गोटा । तो नये पाकातें, ॥ ९० ॥ निंबवृक्षासि वाधलें आळें, । तें पचामृतें भरिलें चिरकाळें; । त्यासि येतील अमृत फळें । हें न घडे कदा, ॥ ९१ ॥ कुजर कुसुमवाटिके आतु । बाधले असे मदोन्मत्तु, । त्यासि सुगध वायो समर्पितु । परि न बैसे त्याचिये घ्राणीं ॥९२॥ इक्षुदंडाचे काडोरीं । पिळिजेती पाषाणाचे उदरीं, । परि रसु न थाये भीतरीं । वाहतुचि गेला. ॥ ९३ ॥ ऐशी अंगदाची शब्दशिष्टाई बोलिला असाधारण ते समयीं; । परि रावण नेघेचि हृदयीं, । गोंचिड क्षीर जैसा. ॥ ९४ ॥ ऐसें अंगदाचें बोलणें । सुधारसासि आणिलें उणें, परि अव्हेरु केला रावणें । तृणतुल्य मानिलें. ॥ ९५ ॥ ऐसें अंगद बोलिलियावरि । रावण प्रत्युत्तराचा उपक्रम करी. । ते कथाणिवाची कौतुकहरी । मर्यादा उधीळ. ॥ ९६ ॥ इति श्रीरामायण वाल्मीकिकृत्य । युद्धकांडकथामृत । श्रोते परिसावें सावचित्त । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥९७॥

१ क. कुमतिनदीचे प्रवाहीं वृथा २ अ. नित्यानित्यविचारीं उन्मत्त । परी विवरे कदा. ३ ख. न थरे पडला येंबुटा.

# प्रसंग पंधरावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । भगवण म्हणे, "रे वानरा, । महामूर्खा, अरण्यचरा । मज दशग्रीवेंसीं पालेखारा, । शिष्टाई करूं आलेसि. ॥ १ ॥ अरे सिंहाचे सभेसि कैसा । शृगाळीं मिळोनि धाडिला ससा ? । उलूक हिंडे दिवसा । तये परी तू आलासि. ॥ २ ॥ मुकें उपन्यास करी वेदाचे, । बधिर श्रवणीं संगीत ऐके, । ससाही ताल पांगुळ नाचे, । हें अपूर्वामध्यें पडे, ॥ ३ ॥ गर्भांधदेखे व्योमींच्या तारा, । क्लीबु मैथुनीं महा धीरा, । तैसें घडलें, रे वानरा, । अधिक तू बोलसी. ॥ ४ ॥ येके ठायीं असतां अवकाश, अर्कु, । शीतेनें भेटती पर्जन्य, पावकु, । मैत्री चालविती मृत्यु आणि लोकु, । हे अघटित वार्ता. ॥ ५ ॥ हेंही घडों शके येखादिये समयीं, । परी मज न घडे रामेंसीं शिष्टाई, । विचार न करितां आपुले ठायीं, । तुजला येथें पाठविलें. ॥ ६ ॥ तप्त लोहों जळबिंदूतें गिळी, । तें सीतळ जालिया पुनरपि उगळी, । तरी त्या दाशरथीस मैथिली । दे साम अंगिकारूनि. ॥ ७ ॥ पतंगाचेनि स्तुतिरचनें । सीतळ होइजे हुताशनें, । तरिच तुझिया सामप्रयत्नें । वैदेही दें रामासि. ॥ ८ ॥ मागें येक लतामृग आलें । तेणें सीतेसि प्रयत्नें पाहिलें, । परम अन्याय करूनि गेलें । कृष्ण वक्त्र आपुलें. ॥ ९ ॥ तैसाचि तू मूढामाजी श्रेष्ट । लंकेमध्यें आलासि शिष्ट. । मूर्ख तो दाशरथी, क्रिया भ्रष्ट, । तेणें तुज येथें पाठविलें ॥ १० ॥ मृगजळें तुंबळ येती पूर, । कीं वज्रधारांसीं गळती पाझर, । पाणीतळीं पाल्हावती कवरीभार, । तैं सीता प्राप्त काकुत्स्थासि. ॥ ११ ॥ महा जघन्य परिसिली मातु । दोघे पितृअरि त्याचा जालासि भृत्यु. । धिक् ! धिक् ! तुझा देह मृत्यु । का, रे, पात्रेंविना ? ॥ १२ ॥ तुझा जनकु निरापराधी । रामें वधिला कपटबुद्धी, । कुरंगातें जैसा पारधी । अकस्मात छेदी बाणें. ॥ १३ ॥ व्यर्थ वाळी गेलियावरि । सुग्रीव जाला राज्याधिकारी. । तुझी माता तारा सुंदरी । तेही हरिली बळें. ॥ १४ ॥ तुझें सर्वस्व

१ अ. वसती.

मानसीं । क्रोध उचंबळला. ॥ ४६ ॥ अंगद म्हणे, "रे दशानना, । दीर्घद्वेषिया, महामलीना, । अमंगळ बोलसी, रे दुर्जना, । भय न धरिसी पापाचें. ॥ ४७ ॥ तुज मृत्यु आला, रे, जवळिके । म्हणवूनि राघवपत्नी आणिली लंके; । जैसे देहांतसमयीं पिपीलिके । पक्ष फुटती वळें. ॥ ४८ ॥ ग्रामश्वापद रिघे शून्यमंदिरीं । तें अपवित्र पवित्रातें स्पर्श करी; । तैसा तूं कपटवेषधारी । पंचवटिके गेलासि. ॥ ४९ ॥ रामलक्ष्मण गुंफे नव्हते; । तुवां भिक्षा मागितली कृपासरिते; । अरे चांडाळा, क्रिया करूनि सीते । चोरूनि आणिलें लंके. ॥ ५० ॥ तूं, रे, दशकंठांचा वस्तु; । शंकरवरदें जालासि मस्त. । कपटें आणिली रामसिंहाची वस्तु । ते तुज कैसेनि भोगेल? ॥ ५१ ॥ अनर्घ्य रत्नमाळा गोमटी । ते कैसी साजे खराचे कंठीं? । कस्तूरीटिळा शूकराचे ललाटीं । रेखिजेल कैसा? विचारी पां. ॥ ५२ ॥ रत्नखचित पर्यंकावरी । शेज रचिली सुमनाचे धरवारीं; । तेथें निद्रेलागीं अधिकारी । म्हैसा कैसेनि होईल? ॥ ५३ ॥ इंदुकळांगींचें अमृत । तें किरवळासि कैंचें होय प्राप्त? । उष्ट्र कंटकझाडें भक्षित । त्यासि आहार रमाफळें? ॥५४॥ म्हणऊनि, रे राक्षसा, देहधारिया, । तुज आणि रम्य जनकतनया, । उदयाचळीं अस्त पावेल सूर्या । परी हें घडों न शके. ॥ ५५ ॥ नखें मुदिजेति कळिया, कमळें । तैसीं तोडितों तुझीं कंठनाळें, । परि हें अपवित्र, अमंगळें । मी मातळें या चंडिसा. ॥ ५६ ॥ पुढीं, हो राक्षसा, रावणा, । शिरपद्मीं पूजिला कैलासराणा. । त्या शिवनिर्माल्याचा भारु, दुर्जना, । अद्यापि वाहतोसि. ॥ ५७ ॥ समरांगणाच्या शरपथीं । शरप्रवाह हेचि भागीरथी. । तुझें शरीर धारातीर्थीं । रघुराज स्नान करील. ॥ ५८ ॥ ब्रह्मदंडासारिखे प्रचंड । प्रसवेल अयोध्यापतीचें कोदंड; । तेणें राई तुल्य खंड खंड । करवें त्रिपुरतीळ तुझी. ॥ ५९ ॥ भार्गवें जैसे येकवीस वेळ । केलें निःक्षत्री भूमंडळ; । तैसें तुझें राक्षसकुळ । रामबाणें आटेल." ॥ ६० ॥ ऐसे अंगदाचे शब्दबाण । स्फुरतां रावणाचें विदारण; । जैसीं

---

१. प्र. इदुमयल्लीं असे. २. ह व ख या प्रतींत पुढील ओंवी अधिक आहे — आधीच तुझा अपवित्र देहो । वरि घाटला परपत्नीचा विरहो । हे आतळेनि मातळें मी मिन्निमाही । तुज देहांत प्रायश्चित्त पावया. ॥

वज्रघातें होती चूर्ण । शृंगें महापर्वताचीं. ॥ ६१ ॥ रावण म्हणे, " रे स्ताकीटका,। मर्यादे वेगळे बोलसी मशका. । राहो ग्रासी ग्रहणीं शशांका । तैसें गिळीन तुज. ॥ ६२ ॥ कीं अळिका खंडिजे वज्रधारें; । कीं पिपीलिका मर्दिजे कुंजरें; । तैसें म्यां लंकेचिया नृपवरें । तुजलागीं वधावें ! ॥ ६३ ॥ अरे, तूं अरण्यचर मर्कट; । आत्महत्यारी धीट, वाढट, । परी मज रावणेसीं निकट । पिशाचप्राय बरळसी. ॥ ६४ ॥ अरे, निर्जरावरि माझा पराक्रमु । तेथें मनुष्य बापुडें कायसें रामु ? । मजसीं स्वर्मीही करितां संग्रामु । जयो न पावाल तुम्ही. ॥ ६५ ॥ निर्फळ, रे, तुमची कटकी, । कैंचा राम ? कैंची जानकी ? । आतां सकळही तुम्हीं यमलोकीं । वास्तव्य कराल सत्य. ॥ ६६ ॥ माझा इंद्रजित आपुल्या बाणीं । तुमचीं कबंधें नाचवील रणीं. । भुतें भुकेलीं त्यांसि धणी । देईल तुमच्या शोणिताची. ॥ ६७ ॥ भ्राता कुंभकर्ण निदसुरा; । उठलिया प्रळयाग्नि दुसरा. । मनुष्य, कपि त्याचिया आहारा । निर्माण जालेति. " ॥ ६८ ॥ ऐसें बोले शक्रारिजनकु. । अंगद कोपें खवळला अधिकें अधिकु; । जैसा पर्वतीं पेटला पावकु । वातस्पर्शें वाढतसे. ॥ ६९ ॥ मग अंगद म्हणे, "रे तोंडाळ मूढा, । पाणिप्रहारें फोडीन तुझिया दशनदाढा. । अधमाहूनि अधम तुज येवढा । दृष्टी देखिला नाहीं. ॥ ७० ॥ निंदा बोलसी जेणें तोंडें । त्याचीं करीन सहस्र खंडें; । परी त्या अयोध्याधीशें प्रचंडें । मज आज्ञा दिधली नाहीं. ॥ ७१ ॥ कठिण माझे दोर्दंडप्रहार । चपेटे फोडूं शकें मेरु, मांदार. । तेथें त्रिकूट आणि तूं दशशिर । मशकप्राय भासे दृष्टी. ॥ ७२ ॥ हे लंकाचि पालथी घालितों, रावणा, । परी कोप येईल पद्माक्षिरमणा; । जें राज्यदान दिधलें बिभीषणा । उत्तरपारीं सिंधूचे. ॥ ७३ ॥ चतुर्विध कार्याकारणें । लंके रघुनाथास जालें येणें. । तें तूं दशद्विगुण श्रवणें । परिस महाराक्षसा. ॥ ७४ ॥ तुज मारावें सहपरिवारीं, । बिभीषणासि द्यावी लंकापुरी, । देव स्थापावे अधिकारीं, । जानकी अयोध्ये न्यावी. ॥ ७५ ॥ दशरथकुळभानु याचि बुद्धी । त्रिकूटासि आला, रे पापधी; । तुज अद्यापि नाहीं शुद्धी । राम मनुष्य म्हणतोसि? ॥ ७६ ॥ अरे, सिंह काय तो वनचर? । सहस्रफणि तो काय विषधर? । विनतातनयो खगेश्वर । तो

काय येरां पक्षिया ऐसा ? ॥ ७७ ॥ कल्पतरु काय म्हणावा तरु ? । पर्वता समान काय तो मेरु ? । कपिलमहामुनेश्वर । तो काय येर ब्राह्मणा ऐसा ? ॥ ७८ ॥ परिस तो काय पाषाण गोटा ? । उपेंद्र काय म्हणावा धाकुटा ? । नंदी निजवाहन नीळकंठा । तो काय वृषभासमान ? ॥ ७९ ॥ अरे, देवाधिदेव पुरुषोत्तमु । तोचि लीलावतारी श्रीरामु. । त्यासि तू मनुष्य म्हणसी अधमु, । वेळोवेळां. ॥ ८० ॥ आपुला पुरुषार्थ बोलसी, । पिनाक चोढितां उलथलासी, । बहुत विटंबना जाली; मानसी । तें कां आठवीसना ? ॥ ८१ ॥ माझा पिता जाण वाळी । तेणें येक दशशिर कक्षेस्थळीं । धरूनि केलिया आंघोळी । सप्तसमुद्रामध्यें. ॥ ८२ ॥ अपूर्व वाटलें म्हणवूनि गृहासि आणिला. । माझिये पाळणीं उफराटा बांधिला. । मरण पावेल म्हणवूनि सोडिला । माझिये मातेनें. ॥ ८३ ॥ पुढें कार्तिकवीर्याची बंदिशाळा । तेथें एक दशशिर बैसलेला । पायीं पडली होती शृंखळा. । चिरकाळवरि. ॥ ८४ ॥ पुढें पळून पसरूनि दोन-रूपें । सोडविलें त्याचेनि बापें. । मग तो कितेक काळें प्रतापें । श्वेतद्वीपांतरा गेला. ॥ ८५ ॥ तेथें पयोनदीच्या तीरीं । आल्या राजदासी नारी. । तिहीं जलकुंभ वाहिले शिरीं । दशमुख अपूर्व देखिले. ॥ ८६ ॥ अपूर्व वाटलें तयासि; । धांवोनि धरिलें कंठप्रदेशीं; । मग झोळीत निघाल्या दोनी । राजद्वारा परियेसीं. ॥ ८७ ॥ अरे स्त्रियांहीं खेळविता परस्परें । मुटका झाली मार्गें थोरें. । तोचि तू रावणु थोरें । मुख दाखवितां लाजेसिना." ॥ ८८ ॥ ऐसे शब्दबाण ताराजनयाचे । भेदता रावणाचें हृदय खोंचे. । मग म्हणे, "काय रे फेधनाचे । पाहता. अगत्य निशाचरहो ? ॥ ८९ ॥ इंद्राच्या वज्राचे धायघटे । लागता मज भ्रम न वाटे. । परी या कपिशब्दें

१. रा कपिप्रदेशीं २ म्ह प्रतींत पुढील चार ओंव्या अधिक आहेत:—
मग कोणे येके वेळ । रावण शुद्धा गेला पाताळीं. । तो धरूनि नेला राउळीं । बळियाचे तान्हाळ ॥ १ ॥ बळाची रानी विंध्यावळी । तिनें त्यासि आणिलें राउळीं । तेथें राक्षसेंद्र पाद प्रक्षाळी । राणियेचे रावण. ॥ २ ॥ ऐसें तयाचें नित्य करणें, । उदक पाजिलें ऐसें. । तयाचें भ्रमिमान कायरे जिणें । अरसीनिं तिहीं लोकीं. ॥ ३ ॥ आतां क्रमताच्या संधानीं । बाळें ऐसा विसुरली रानी । हे मासी अंगदाची मानी, । धीः धाटे फटेल सुख. ॥ ४ ॥

फुटे । हृदय माझें. ॥ ९० ॥ मज महाबळिया लंकानाथा । कृतांतही करूं न शके व्यथा. । परी या हीन वानरें सर्वथा । क्लेशी केलें बहुवस. ॥ ९१ ॥ धरा, धरा, मारा, बांधा याची ग्रीवा । छेदा कर्णद्वय आणि जिव्हा; । लांगूळ तोडूनि हिंडवा । लंकेचिया चौबारां." ॥ ९२ ॥ ऐसें नगरनाथ बोले, । तंव अंगदावारि चौथे धांविन्नले; । जैसे मदोन्मत्त संघट्टले । महा-वटवृक्षावरि. ॥ ९३ ॥ अति भीम कराळ तोंडें । पर्वततुल्य प्रचंडें; । कठोर अंगदाचीं दोर्दंडें । आंकळिले जाले वळें. ॥ ९४ ॥ भुजा बळकाविल्या निशाचरीं. । मग तारातनयो विचार करी. । म्हणे आपुला पराक्रम ये अवसरीं । दृष्ट करूं रावणातें. ॥ ९५ ॥ लांगूळचक्रीं बैसला होता । तैसाचि ऊर्ध्व उडाला अवचिता । पूर्वी पक्ष होते पर्वतां । तेचिपरी ते काळीं. ॥ ९६ ॥ चारी सर्प कवळूनियां चरणीं । गरुड व्योमांत क्षेपावे सांडूनि धरणी; । तैसा उडाला तत्क्षणीं । तंव मंडप शिरीं बैसला. ॥ ९७ ॥ वळें लंघित निघाला व्योमपंथा । तंव मंडपातळीं असे माथा; । झोंके उचालिलिया चळथा । जडित स्तंभींचिया. ॥ ९८ ॥ पूर्वी अमरेशें, वज्रधरें । विदारिलीं हिमालयाचीं शिखरें; । तेणेंचि पाडें अंगदवीरें । सभा-मंडप विदारिला. ॥ ९९ ॥ जैसा सुटला झंजा मारुतु । महां तरुवरातें उन्मळितु; । तैसा सभामंडप विदारितु । अंगदवीर निघाला. ॥ १०० ॥ उपेंद्राचें पादपद्म । भेदीत गेलें होतें व्योम; । तयापरी महाभीम । त्वरें अंगदु जातसे. ॥ १ ॥ अंतराळीं भोंवंडिलें लांगूल, । भुभुःकारें गर्जे मेघातुल्य, । सुर्जी होते राक्षस महा सबळ । ते निर्जीव जाले. ॥ २ ॥ स्वर्ग भोगितां वेंचे सुकृत, । मग ते पावती अधोपंथ; । तैसे राक्षस अकस्मात् । भूमीवरी पाडिले. ॥ ३ ॥ देखोनि आश्चर्य करी लंकानृप. । म्हणे, केवढा कपीचा बळप्रतापु ! । महा धैर्याचा; सभामंडपु । भगोनि गेला आम्हां देखतां. ॥ ४ ॥ ऐसें वर्तलें ते अवसरीं. । रावण पडिला चिंतासागरीं. । काळजी धरिली निशाचरीं. । म्हणती "विघ्न उदेलें." ॥ ५ ॥ ऐसी करनियां ख्याती । अंगद

१. अ. मग क्रेशातें पावविलें. २. अ ब स. धरा, रे, बांधा. ३ अ ब स. सांडूनि. ४. अ. भुज बळें बळाविले निशाचरीं. ५. स. व्योम आक्रमूनि सांडी धरणी. ६. अ ब स. ऊर्ध्वपंथा. ७. अ ब स. महा मत्त. ८. अ ब स. अधःपात.

निघाला चंडवातगती, । कपींसहित रघुपति । ते स्थानीं उतरला. ॥ ६ ॥ सर्पारि येऊनि परमानंदें । नमस्कारिलीं विष्णूचीं चरणारविंदें; । तयापरि रामाचीं पाउलें अंगदें । मायां स्पर्शिलीं. ॥ ७ ॥ नमिलें सौमित्रसुग्रीवांसि । अनुक्रमें सुखी केलें येरांसि. । बृहस्पति जैसा देवेंद्रासि । तैसा वृत्तांत सांगता होये. ॥ ८ ॥ अंगद म्हणे, "रघुकुळटिळका, । तुझिये आज्ञे प्रवेशलों लंका. । शीघ्र भेटलों त्या नगरनायका । सभामंडपस्थानीं. ॥ ९ ॥ तुमचे उच्छिष्टउत्तरीं कृपानिधि, । म्यां रावण शिकविला नाना बुद्धीं; । परी तो गर्वाचा महोदधि । न मानीच शिष्टाई. ॥ ११० ॥ पाषाणासि फुटतील लता, । वज्रासि येवों शके नम्रता, । परी त्या रावणा नुपजे कृपा चित्ता । जानकी द्यावया. ॥ ११ ॥ शंकरा कंठींचें हळाहळ । होऊं शके अमृता ऐसें शीतळ; । परी रावणाचें चित्त चोखाळ । नव्हे जानकी द्यावयासि." ॥ १२ ॥ ऐसीं ऐकोनि अंगदाचीं वचनें । कोधें उचंबळिजे रघुनंदनें; । जैसा त्रिपुरांतक त्रिनयनें । आवेश धरिला बळें. ॥ १३ ॥ युगांतीं प्रळयकाळीं । क्रोधें पावकु भूतसृष्टी जाळी; । तैसी श्रीरामाची इच्छा आगळी । राक्षस वधावयाची. ॥ १४ ॥ मग राम म्हणे, "किष्किंधनाथा, । हा त्रिकूटाचळ घाली पाळथा; । प्रेरीं वानरांच्या चळथा । लंकालागीं करावया." ॥ १५ ॥ सुग्रीवें आज्ञा दिधली नीळा । तेणें कुंचा मोवडिला सर्व दळा । सुसुःकारें वाहिनीचा मेळा । घोषें आकाश कोंदलें. ॥ १६ ॥ कपिवीर लंकेवरि चालिले; । जैसे प्रळयकाळीं मेघ उदेले; । कीं ते सप्तसागर लोटले । मर्यादा सांडूनियां. ॥ १७ ॥ आतां येथूनि युद्ध होईल थोर. । भिडती राक्षस आणि वानर; । जैसे दैत्य आणि निर्जर । तारकासुराचे युद्धीं. ॥ १८ ॥ इति श्रीयुद्धकाण्डकथारसु । वाल्मीकिकाव्य सुरसु । विनवी मुद्गल कृष्णदासु । म्हणे सावचित्त परिसावें. ॥ ११९ ॥

---

१. ख. मोवाळ. २. ख. मनें.

## प्रसंग सोळावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः ॥ श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ पुढें युद्धावया राजधानीतें । धांवे कपिसेनासिंधुभरतें; । तंव मंदिरावरि मंदोदरीकांतें । आरोहण केलें. ॥ १ ॥ तेथूनि रावणें अवलोकिलें । तंव लंकाप्रदेश पिंगट जाले, । जैसें पर्वता अघोपार वेढिलें । अग्निशिखांकरोनि. ॥ २ ॥ ऐसें देखिलियाउपरी । लंकेश मंत्रियां आज्ञा करी. । म्हणे, "लंकाळगी मांडिली वानरीं । त्यांसि युद्धा जा हो तुम्ही." ॥ ३ ॥ परिसोनि राजउत्तर । सेनेसीं निघाले निशाचर. । कटक सिद्ध जालें भयंकर । चतुरंग पैं. ॥ ४ ॥ राक्षस पदाति निघाले उदंड; । पर्वतातुल्य स्थूल, प्रचंड; । विकट तयांचे दोर्दंड । लंबायमान ताल जैसे. ॥ ५ ॥ मेघवर्ण, क्रूर, कपटी; । अति विक्राळ, भीम मुखवटीं; । आवाळियांबाहेरि दाढा तिखटी । शंखवर्णा निघालिया. ॥ ६ ॥ विशाळ नेत्रांचिया चक्रवाटी- । भीतरीं बुबुळें जैशा आगिटी; । वीरांचिया पाहतां भ्रुकुटी. । अभ्रचापा सारिख्या. ॥ ७ ॥ माथां अग्निशिखा ऐशा जटा । पृष्ठभागीं रुळती पिंगटा; । सेंदूर उधळला ल्लाटा । संध्यारागा सारिखा. ॥ ८ ॥ कांसा घातलिया विचित्रा चिरीं; । अभेद कवचें लेइले शरीरीं, । श्रीदें वांधिलीं मुजीं; शिरीं । चामरें आणि अंकुश. ॥ ९ ॥ वांकीचे झणत्कार चरणीं; । चालतां दणाणिली धरणी; । दाखविती बळाची आंगवणी । शस्त्रें हातीं तुळिताती. ॥ १० ॥ खड्गें, मुद्गल, लोहार्गळा, । फरश, तोमर, गदा विशाळा, । त्रिशूळ, कोईतें, कटारा सरळा, । भाळकाठिया बहुत; ॥ ११ ॥ भातें भरिले पूर्ण शरीं; । ढुवाडें बांधलीं पृष्ठीवरि; । पुढें धनुष्यें धरिलीं करीं; । करीं सुरिया खोंविलिया. ॥ १२ ॥ सडका, पाश, भिंडिमाळा, । वडगे, डांगा, चक्रें, शिळा, । इतुकीं आयुधें पदातिदळा; । अप्रसिद्धें नेणों किती. ॥ १३ ॥ पर्यंचे घाय लागतिये फाळीं । निवारावया खेटकें जवळीं; । मुकुटापासूनि स्पर्शती तळीं । वर्तुळें पूर्णेंदुतुल्यें. ॥ १४ ॥ ऐसे निघाले पायाचे भार; । सैन्यें वेगळे निशाचर । मदिरापानी, रूपमद, क्रूर, । वीरश्रिया उफाळती. ॥ १५ ॥ मग तुरंगाचे भार निघाले, । जैसे लावण्यद्वीपांतरींचे आले; । कीं चित्रकारें

१. फ. धुनें २. फ. दद.

चित्रीं लिहिले । त्यांहूनि साजिरे. ॥ १६ ॥ कितेक शुभ्र, आरक्त निळे, । चकोरचांदिणे, सोनसळे, । हांसळे, सुचित्र, सांवळे, । सुलक्षणिव संपूर्ण. ॥ १७ ॥ ऐसे पांखरिले असंख्यात. । मुखीं मोहळीं रत्नखचित. कटीं सरिया सुशोभित. । नेपुरें चरणीं गर्जती. ॥ १८ ॥ भूमी रुळतं सतही चामरें; । नृत्य करिती उफाळे थोरें; । पृथ्वी स्पर्शतीना पुढिल्यानि खुरें । बहुती भोगिती म्हणोनि. ॥ १९ ॥ हिंसनादाचेनि संकेतें । खळितं रविरथींच्या वारुतें. । मुखीं लाळ सांडिली, तेणें भरितें । भरे भूमी पंकाचें. ॥ २० ॥ कवचें, टोप लेइले बळवत; । वरि आरूढले राक्षस राउत. । करीं नग्न शस्त्रें लखलखित, । मेघीं विद्युल्लता जैसी. ॥ २१ ॥ ऐसे अश्वभार असंख्यात । राजपंथें निघाले उदाळित. । तयांमागें चालिले मदोन्मत्त । ऐरावता सारिखे ॥ २२ ॥ शाद्यवीन भद्रजाती, स्थूळ, । थोरिव जैसे कुळाचळ, । मुखमोहरें महाविशाळ, । सोंडा काळदंड जैसा. ॥ २३ ॥ दंत दोहीं भागींचे महा थोर, । वज्रा ऐसे अति कठोर, । हाणोनि करूं शकती चूर । पर्वतशिखरांचे. ॥ २४ ॥ कनककड्खला रत्नजडिता, । झुली घातल्या सतरंगिता । जांबूनदाच्या लखलखिता । अति शोभायमान. ॥ २५ ॥ गुढारें वाणलीं तयांवरि । अढळ, अभेद, अति कुसरी । पताका उभारल्या अंबरीं । चित्रविचित्र महा थोर ॥ २६ ॥ कर्णी बांधलीं श्वेत चामरें । भूमी रुळतीं महा थोरें. । ग्रीवाचेनि घंटागजरें । चेइरें करिती वीरश्रियेतें. ॥ २७ ॥ दोहीं भागीं बांधल्या घंटा, । अश्वेवदना, महावाजटा; । त्या परसेनेसि नादें धिटा । 'सावध' म्हणती. ॥ २८ ॥ महावंत काळरूपी, दृढ, । त्या गजस्कंधांवरि जाले आरूढ. । करीं अंकुश धरिले गाढ । गरुडचचुवा सारिखे. ॥ २९ ॥ ऐसी चालिली कुंजराची थाटी, । तुरंग उदाळले तेणें दाटीं; । रथ निघाले घडघडाटीं; । ध्वनिपक्षीं दिशा दंधिली. ॥ ३० ॥ जांबूनदाचे रत्नखचित, । विद्युल्लता ऐसे लखलखित । पुढें ध्वजस्तंभ नमचुंबित । भिन्न भिन्न रूपाचे. ॥ ३१ ॥ तयांवरि शस्त्रसामग्री केली. । बाणाचीं भरणें भरिलीं ॥ सत

१. थ. पृष्ठोदरीं आवळिलिया वळवता, । मुखी, पाखरिया सतरंगिता । जांबूनदलखचित.

सप्त सीतांचीं चापें ठेविलीं । शिवकोदंडा तुल्य. ॥ ३२ ॥ आरूढले राक्षस धनुर्धर, । जै बाणीं दाटूं शकती अंबर. । तयां रक्षावया बुद्धीचे थोर । धुरे सारथी बैसले. ॥ ३३ ॥ येके रथीं चवार तुरंगम । द्वीपोद्वीचे अति उत्तम; । ते आगळे बळास्तव व्योम । झडपूं म्हणती खुरीं. ॥ ३४ ॥ ऐसे चालिले वातवेगें रथ; । तेणें पूर्ण व्यापले राजपंथ. । पुढें प्रहस्त प्रधान, मुख्य सेनानाथ; । मर्यादा भार चालती. ॥ ३५ ॥ जयो इच्छिती लंकानाथा । निघाल्या चमूंच्या चळथा; । गणित नाहीं गजघोडियां रथां, । इतुके युद्धा चालिले. ॥ ३६ ॥ पुढें येकनाद केला रणतुरीं, । वाजती इंदुमंडळा ऐशा रणभेरी; । तयांच्या घायें अंबरीं । महाघोष कोंदाटला. ॥ ३७ ॥ गिडबिडी लागलिया थोरा; । दुंदुमी वाजती भयंकरा; । काहळा, कांसोळिया गंभीरा, । जेंगटें, शृंगें गर्जती. ॥ ३८ ॥ विद्युल्लता तळपतां ध्वनि, । तैसे शंखनाद करिती वदनीं; । तो नाद भरला गगनीं । येकें येळे अमित्य. ॥ ३९ ॥ कुंजर किंकाटें निघाले. । वारू दीर्घ घोषीं हिंसिन्नले. । रथ चक्रीं घडघडिले. । सिंहनाद केला पायांचीं. ॥४०॥ ऐसा नाना ध्वनींचा येकवळा । जाला मर्यादे वेगळा; । तेणें पडिसादें मेदिनी अचळा । कंपु जाला पडिभारें. ॥ ४१ ॥ नाद भेदीत गेला आकाशा. । संपूर्ण जाल्या अष्टही दिशा. । ते समयीं भवित्रला वळसा । सर्व जीवमात्रासि. ॥ ४२ ॥ भार चालतां लोपली भूमी. । पदरज भरलें व्योमीं । तयास्तव तो हिमरश्मि । काळवंडूनि ठेला. ॥ ४३ ॥ आलिया युगांतींचा समयो । वेगें सुटे महा झंजवायो, । मर्यादा सांडी वरुणालयो, । तैसें दळ चालिलें. ॥ ४४ ॥ महा भीम राक्षसांची चमू. । ज्यांचा विपुल वीरें पराक्रमु । ते कपिसेनेसीं इच्छित संग्रामु । चहूं द्वारीं राहिले. ॥ ४५ ॥ तंव प्रदेशीं पारिखे प्लवंगम । सिद्ध करिती शिळा, शिखरें, द्रुम; । "जय यशस्वी दाशरथि राम" । म्हणोनि गर्जिन्नले ॥ ४६ ॥ विंशति कोटींसीं वैद्यराजु । सुषेण धांविन्नला दुर्गा उजू, । जैसा सहस्र मरीचि उष्णतेजु । पश्चिम दिशा झेंपावे. ॥ ४७ ॥ लंकादुर्गाबाहिर तळवटी । वेष्टित परिघ खोटी महा मोठी; । त्यातें वानरीं देखोनि दृष्टीं । 'शिळावृष्टीं पूर्ण करिते जाले. ॥ ४७ ॥ अ ॥ जेहीं आपुलेनि वैभवें मीरीं । शिळांचा सेतु' बांधिला सागरी, । तयांसि चक्रद्वारें । बुजितां काय अशाक्य ! ॥ ४८ ॥ जे अगाध अंबु तोडिती बाहीं, । ते काय श्रमती लघु-

नदीप्रवाहीं. । म्हणऊनि निमित्तांत यांरीं तिहीं । पूर्ण करूं आरंभिलें. ॥ ८९ ॥ वानरगण कोट्यानुकोटि । करिती द्रुमशिलावृष्टि; । तेणें भरतें भरलें पोटीं । दुर्गाबाहेरि परिघाचे. ॥ ९० ॥ लंकावेष्टित परिघ जितुका । तो संपूर्ण केला, जैसी भूमिका. । पुढें जयो इच्छिती रघुकुळटिळका । दुर्गा लागीं करिती. ॥ ९१ ॥ लंका चहूं पारीं वानरदळें । वळें उठावलीं येक वेळे; । जैसीं नक्षत्रांतें मेघपडळें । छेपित वाढलीं व्योमीं. ॥ ९२ ॥ प्रचंड शिळा घेऊनियां करीं । कपिगण टाकिती दुर्गावरि. । आदळें भंगती सहस्र हारीं । चारिया रत्नजडिता. ॥ ९३ ॥ पर्वत, शृंगें सिखा पडे. । घायें कोसळती अटाळी बुडे. । विशाळ तुटती कडे । महा दुर्गापासोनियां. ॥ ९४ ॥ रत्नखचित तोरणें । तें चरियापासाव जालीं चूर्ण. । लंका शोभत होती जेणें । त्या पताका केल्या विदारण. ॥ ९५ ॥ लंका चहूं पारीं मग्न जाली; । सुंदरपणाची शोभा खचली; । जैसी वृद्धवनिता विटंबिली । इंद्रियाच्यां पाठिंव्याविण. ॥ ९६ ॥ पाठारप्रदेशींच्या पर्वतीं । होतिया विचित्र वनस्पति. । त्या कोळसे होऊनियां पडती । अग्निशिखांकरूनि. ॥ ९७ ॥ राजधानीरचनेचें विदारण । ऐसें करिती कोपें कपिगण; । हें न साहतांच रक्षण । वरि होते जे राक्षस. ॥ ९८ ॥ ठाईं, ठाईं, हुडोहुडां, दुर्गीं, । महा बळिवंत होते अंगलागीं । ते मार करिते जाले कपिवर्गी । नाना शस्त्रेंकरूनियां. ॥ ९९ ॥ चक्रें, भिंडिमाळा, शर, । मेघासारिखे वरुषती निशाचर. । तेणेंकरूनि तळवटीं वानर । सेनासिंधु डहूळला. ॥ ६० ॥ अनिवार सणसण, येत वृष्टि. । शस्त्रें पडती शस्त्रांच्या पाठीं. । ऊर्ध्व मार देखोनि दृष्टी । कपि क्रोधें तुंबळले. ॥ ६१ ॥ वीरश्री बाणली वानरां आंगीं । तेणें वैभवें वाढले रणरंगीं. । मग चहूंकडोनि येंचले दुर्गी । शतांचीं सहस्रें. ॥ ६२ ॥ वारणमंडळ शैलपाठारीं । त्यासि आक्रमिती तळींचे केसरी; । तैसे कपि रक्षपाळांवरि । संघटले काळरूपी. ॥ ६३ ॥ मल्लयुद्ध मांडलें निकरें, । मुष्टिप्रहरें मारिती परस्परें, । केशधरणी जाली निकरें, । ग्रीवा पिळिती वळें. ॥ ६४ ॥ कपि ठेलिती निशाचर; । वारी हाणिती शिळांचे प्रहर; । राक्षसांचे चरण धरूनियां वानर । नेटूनि पाडिती भूमी. ॥ ६५ ॥ ऐसे ते येरयेरांचे आरें । भिडतां पडले भूमीवरि. । तें राक्षसदळ होतें चहूं द्वारीं । तें निघालें

१. अ. इंद्रियांविनि पाठव्यें विण.

पुढारें. ॥ ६६ ॥ जाळ्या कल्पांतसमयो । मर्यादा सांडी वरुणालयो; । कीं अभ्रासि ने उचलूनि वायो, । धांवोनि नक्षत्रें लोपितु. ॥ ६७ ॥ सरिता-पुरांचे खळाळ । अंबुधीमाजी मिळती तुंबळ, । तैसें कपिसागरीं दळ । राक्षसांचें मिळालें. ॥ ६८ ॥ रणभूमीचे ठायीं बळवंत । सिंहनादें गर्जती अद्भुत. । आपुलिया स्वामीस जयो इच्छित । महायुद्धा प्रवर्तले. ॥ ६९ ॥ खड्ग, मुद्गल, गदा, तोमर, । परिघ, पट्टीश, शूल, शर, । येहीं शस्त्रीं निशाचर । वानरांतें ताडिती. ॥ ७० ॥ वानरांचा विकट मारु । नभचुंबित उन्मुळिती महातरु; । तेणें आयुधीं करिती संहारु । आपुलिया अमित्रांतें. ॥ ७१ ॥ अवघडें आयुधें विशाळा । पादप, पाषाण, शृंगें, शिळा, । अनिवार, घोर, तुंबळा । टाकिति परवीरांवरि. ॥ ७२ ॥ वानरांचा विकट मारु, । तेणें भंगती राक्षसवीरु; । प्रहारासरिसें वाहे रुधिरु । मडभडां भूमीसि. ॥ ७३ ॥ वानरांचीं नखें तिखटें; । उचलूनी हाणिती चपेटे, । फोडिती राक्षसांचीं पोटें । आंत्रमाळा काढिती. ॥ ७४ ॥ येक डसोनि तोडिती कर्ण, नासिकें. । जटा धरूनि आंसुडिती तवकें. । येक शिळा-प्रहारें फोडिती मस्तकें । मृत्तिकेचिया घटा ऐसीं. ॥ ७५ ॥ 'हा, हा' "हो, हो" शब्द करिती वक्त्रें; । राक्षस टाकिती तीक्ष्ण शस्त्रें; । तेणें घायें कपींचीं गात्रें । चूर्ण होती तिळप्राय. ॥ ७६ ॥ सोडूनियां आपुल्या प्राणांची आस । देहधनविषयीं जाहले उदास; । रणरंगीं मिरवे धैर्याची कांस । पुरुषार्थपर्णे. ॥ ७७ ॥ वाणलें वीरश्रियेचें वैभव गंभीर, । ऊर्ध्व बाहो हाणिती येरां येर. । काळतुल्य प्रतिभासती क्रूर । रणांगणाचां ठायीं. ॥ ७८ ॥ पर्वत कुंकुमें डंवरले; । कीं पळस तांबडे फुल्ले; । तैसे उभय दळींचे मिरवले । रक्तांगीं वीरजेठी. ॥ ७९ ॥ थटथटां वाजती प्रहार. । खचखचां तुटती पादकर. । टसटसां होती चूर । अस्थि आंगिचिया. ॥ ८० ॥ थबथबां वाहे रुधिर । जैसे पर्वतपाठारींचे पाझर; । खंडविखंड येर-येरांसमोर । पडले नामाथिले. ॥ ८१ ॥ पुढिल पडलियांचा अवसरीं । उठावा करिजे मागिलेनि वीरीं; । नाना ते सेनासागरीं । लहरियांमागें लहरी लोटती. ॥ ८२ ॥ पर्वतपृष्ठीवरि पर्जन्य पडे, । तैसीं शस्त्रें वरुषती वळियाडे. । रणभूमीस दाटले सडे । करचरणादि शिरांचे. ॥ ८३ ॥ अवघे वीर सन्मुख संग्रामीं । सायकघाय हाणिती वर्मी- । मेद, मांस उस-

ळती व्योमीं । वीरांचिया देहापासाव; ॥ ८४ ॥ हांकिती परस्परें रणधीरे; । घायेसि हाणिती येकसरें; । पुढें प्रेतें जाल्या मोहरे । मागूनि धांवती. ॥ ८५ ॥ घायासारिसें देह होती चेंदा । हें देखोनियां वीर द्वंद्वा. । शिरें तुटलीं ते खदखदां । हांसोनि पडती. ॥ ८६ ॥ हांसती कां पां तुटलीं शिरें, । तेथें साहित्य सुचलें आदरें; । तरि श्रोते जनीं सादरें । श्रवण करावें. ॥ ८७ ॥ श्रोतियांचे आदरकृपाजीवनें । कवितरु पाल्हेजती अतिमानें. । तेथें विकसती सुमनें । साहित्यशब्दांचीं. ॥ ८८ ॥ साहित्यसुमनांचेनि परिमळें । लुब्धलीं पंडितांचीं चित्तभ्रमरकुळें; । अमृतपानाहूनि आगळें । सुख सेव्य येथींचें. ॥ ८९ ॥ श्रोता न भेटे जरि चतुर । तरि वायां जाय कवीचा वाग्व्यापार; । जैसा सुंदरेचा शृंगार । क्लीबापाशीं व्यर्थ जाला. ॥ ९० ॥ असो वाल्मीकिकाव्याचा आधार; । बोलिजे महाराष्ट्रपद्यविस्तार । ते कृष्णदास मुद्गल म्हणे पुढारें । परियेसा, जी, कथा. ॥ ९१ ॥

---

## प्रसंग सतरावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । वीरांचीं शिरें तुटोनि हांसती । तीं लक्षणें सांगावीं कवणे विपत्ती ? । परि कांहीं येक रसवृत्ती । सारिखें बोलणें लागे. ॥ १ ॥ शिरकमळें हांसती याच कारणें । स्वामिकाजीं प्रयाण केलें प्राणें. । तेथूनि खुंटलें येणें, जाणें. । मोक्ष भोगिजे स्वइच्छा. ॥ २ ॥ जालें देहांतप्रायश्चित्त । धारातीर्थी जालें सुस्नात । संसारनिवृत्तीसि दिधलें दत्त । तिळांजुळि संकल्प. ॥ ३ ॥ नाना धर्म बोलिजेति वाचा; । कीं तेजोराशि मायां उग्ररूपाचा । त्याहीहूनि उंच पुण्यश्रीकुंचा । स्वामिकाजीं पडलिया. ॥ ४ ॥ मुखें हांसती आणिकाहीलागीं. । धन्य देह खंडले रणरंगीं. । निर्दोष कीर्ति उरली जगीं । पुरुषार्थपणें. ॥ ५ ॥ नाना हांसती याचेनि संकेतें । छळणा करिती भयभीतांतें । तुम्ही जाल, रे, यमपुरी स्नानातें; । आम्हां मोक्ष प्राप्त. ॥ ६ ॥ हांसतां उघडे दंतहारी, । याचि वांकुल्या दाविती अंबरीं; । म्हणती, “ पाय

---

१. अ. तपाचा. २. फ पुरुषस्नानातें.

देऊनि नक्षत्रांचे शिरीं । जाऊं आतां वैकुंठा." ॥ ७ ॥ असो. ऐसीं कोट्यानुकोटि शिरें । तुटोनि पडलीं; जैसीं फणसें. । तंव अकस्मात आवेशें । कबंध उठिले पां. ॥ ८ ॥ लक्षावधि पडती वीरगण; । तंव एक कबंध उठे शिरेविण; । तेथें कोट्यानुकोटि पडले रण । कबंध उठिले अमित. ॥ ९ ॥ ऐसीं रक्तांकित रुंडें, । भयानक तें महाप्रचंडें, । उभारूनि धांवती दोर्दंडें । दोहीं दळांमध्यें. ॥ १० ॥ कबंध धांवतांचि आदरें । पाहती आपुलालीं पडलीं शिरें. । म्हणती, "येकसाट वाढलों, येकोदरें; । आजि मंगळिक जाली." ॥ ११ ॥ कबंधें म्हणती आपुलिया शिरांतें । "मज सांडूनि गेलेंसि केउतें ?। तुज पाहतसें उभारलेनि हस्तें । सांपड, रे, सांगातियां." ॥ १२ ॥ वीररसीं करुणरसभजनीं । येथें श्रोते बुझती अंतःकरणीं; । वरि कवीची नवल वदे वाणी । मिश्रित नवरसीं. ॥ १३ ॥ म्हणोनि जयासि प्रीति जेणें भावें । त्याणें तें इच्छा निवडूनि घ्यावें. । असो. मावारें अघवें । अति युद्ध होतसे. ॥ १४ ॥ नाना तो संग्रामवणवा पेटला. । क्रोधवातें अधिक वाढला. । वीरपादपांतें आरंभला । संहारसमयो. ॥ १५ ॥ राक्षस आणि दुसरे वानर । आदरें भिडती घोरांदर; । जैसे त्रिदश आणि असुर । जाळंधराच्या युद्धीं. ॥ १६ ॥ गर्जना करिती भयानक. । 'घेघे' शब्दें छळिती येकांसि येक. । दोन्हीं दळींचे वीरनायक । उठावले रणधैर्यें. ॥ १७ ॥ ऐसा संग्राम सेमारीं माजला । जैसा अगाध प्रळयीं सिंधु डहुळला; । कीं महावातें आरंभला । आट तरुवरांसि. ॥ १८ ॥ ऐसें युद्ध होतां पदाति राक्षस । वानरीं रणा आणिले बहुवस; । जैसे जयो पावले त्रिदश । दैत्यांच्या संग्रामीं. ॥ १९ ॥ शैलशिखरें, शिळा आणि द्रुम । येहीं आयुधीं आगळे प्लवंगम. । राक्षस पदातिभार भीम । भिडतां भग्न जाले. ॥ २० ॥ जिमूतें निवारी अंबरीं । झंझा मारुत सुटलियावरि; । तैसें पदातिदळ कपिवीरीं । संहारिलें विक्रमें. ॥ २१ ॥ पदाति राक्षस लक्षानुलक्ष । पडले, जैसे उन्मळले वृक्ष. । यांचिये पाठीं असंख्य । अश्वारूढ उठावले. ॥ २२ ॥ रावत आरूढलिया तुरंगमां । घोडायी चित्रलिखित उपमा, । तरि ते निर्जीव; हे व्योमा । स्पर्शों म्हणत. ॥ २३ ॥ वळें चपळतेनें देती थरणें, । टपाळती पुढिलेनि चरणें; । टांप हाणोनि तारांगणें । भूमी पाडूं म्हणती. ॥ २४ ॥ आरूढलियांचेनि मनोमार्गीं । निघती पवनापरिस वेगें. । परचमूवरि घातिली आंगें । स्वामीसहवर्तमान.

॥ २५ ॥ जे वस्तु भाविजे अंत:करणें । तेथेंचि वैसे दृष्टीचें ठाणें, । तैसें स्वामींचे मतें धावणें । करिती तुरंगम. ॥ २६ ॥ मृग चौताळती मेदिनीं । परि अखंड भय त्याचे मनीं, । पाडसा जनासीं स्थानीं । साशंक वैसता. ॥ २७ ॥ ऐसेही ते उदाळिती रणरंगीं. । लोहोपंजर झळाळिती आंगीं । शस्त्रसामग्री दोहीं भागीं । समयासारिखी असे. ॥ २८ ॥ पृष्ठीवरील राउतपणें । त्या तेजिया दमितो टाचे खुणे. । असिलता तुळिती अगणणें । वानरांसि सवटळे. ॥ २९ ॥ खड्गवर्ष्टीचेनि मिश्रपणें । रामदासातें आणिती उणें, । आपुलिया विक्रमाचें धावणें. । वाढविती वैभवें. ॥ ३० ॥ ऐसे अश्वारूढ पेटले माग, । वर्ष्टी भिडवी सैरावैरा, । थोडिया पर्जन्याचिया धारा । इतुक्यीं शस्त्रें हाणिती. ॥ ३१ ॥ सर्व कपि रणरंगधीर, । ना ते सुराचे अवतार; । स्वामिकाजीं उत्कंठित वीर । प्राणदान घेती देती. ॥ ३२ ॥ पुढें राक्षसांरें प्लवंगम । मुखघोषें पूर्ण केलें व्योम. । नभचुंबित उन्माळिलीं द्रुम । अश्वारूढांतें हाणिती ॥ ३३ ॥ रणरंगीं घायाची दक्षिणा-रीं । उदार फेडिती परस्परीं, । झुंजता उचलिति पदें पुढारी । अनिळा हूनि आगळीं. ॥ ३४ ॥ प्रळयाग्नि तुल्य कपि कोपें । आयुधें मांडित बाहो, गाढे प्रतापें, । घोडियासहित राउत पादपें । हाणोनि चूर्ण करिती ॥ ३५ ॥ घेऊनि विशाळ शिळाशृंगें । लक्षावधि टाकिती वेगें, । रथतुरंगमाचीं आंगें । भग्नदशा पावती वायें. ॥ ३६ ॥ शिळाचा घावो नेटें आदळे । सरिसें मेदमांस ऊर्ध्व उसळे. । बीभत्सता ये वीराचे कळे । जीव प्रयाण करिती. ॥ ३७ ॥ येक धावती उभारूनि नखें, । चपेटें फोडिती अश्वाचीं मुखें; । वक्रें विदारिडियाचेनि दुःखें । साग भूमी घालिती घोडे. ॥ ३८ ॥ विकट मारा पेटले शूलपाणि. । धावूनि तुरंगम धरिती चरणीं. । भवंडोनि हाणती धरणीं । आंगीचेनि विक्रमें. ॥ ३९ ॥ वारू निमिषांत आदळू पुरे, । नखें सर्वांग त्याचें विदारे, । शोणिताचे सुटले पाझरे । उफाळिती भूपृष्ठीं ॥ ४० ॥ पुढील अश्वारूढ पावले व्यथा, । सर्वांचि मागील उचलल्या चळथा, । राउत दावीत पुरुषार्था । हरिदळावरि घातिले. ॥ ४१ ॥ लक्षाचीं शतें येक वेळे ।

---

१. उदित सूर्याची अवचरणें । जैसें मनोमार्गें राहटणें, । कीं वेडल्यावरि धर्नणें । होत इंद्रियांचि जैसें. ॥१॥ या प्रतींत ही ओंवी ३७ व ३८ यांचे दरम्यान अधिक आहे.

राउत उदाळिती वीरश्रियेचेनि बळें; । जयांचें चित्त भयाचेनि विटाळें । कदा स्पर्शलें नाहीं. ॥ ४२ ॥ कृपानंद ते कापथ्यकर्मी, । आगळे सुरांचे संग्रामीं; । नाना शस्त्रें झेलित व्योमीं । लतामृगांसि ताडिती. ॥ ४३ ॥ येक शतसहस्र हाणिती शूळें; । पोळिती वानरांचीं वक्षस्थळें. । घावें पृष्ठीहूनि जाळें । मांसमाळा निघती. ॥ ४४ ॥ येक भुजत्राणें भोवंडिती गदा. । प्रहार हाणिती स्मरोनि द्वंद्वा. । मस्तकाचा करिती चेंदा । ऐसें अनिवार आरंभिलें. ॥ ४५ ॥ राक्षसराउतांचा आगळा विक्रमु, । कपि क्षीण जाले करितां संग्रामु. । तंव मागील उठावले वीरधर्मु । दाखवित कपि. ॥ ४६ ॥ गजमदातुल्य ते क्षणीं । गर्जिन्नले पादपपाणि. । पुढें अश्वारूढांतें समरंगणीं संहार करिते जाले. ॥ ४७ ॥ तरुवरांकित शैलशृंगें । घेऊनि धांवती वातवेगें. । हाणोनि चूर्ण करिती अंगें । शतें सहस्रां राउतांचीं. ॥ ४८ ॥ तुरंगोत्तमारूढां शिरीं । शिळावृष्टि केली त्या कपिवीरीं; । तेणें मेदमांसाचा पृथ्वीवरि । पंकु जाला परिवळु. ॥ ४९ ॥ शोणितांचे खळाळ वाहती; । प्रेतांच्या सडियानें व्योपली क्षिति; ॥ वाजी वीर पडले किती, । ते संख्या केली नवचे. ॥ ५० ॥ तुरंगाचे भार कोट्यानुकोटि । भग्न होऊनि परम [1]संकटीं. । रणपडित कपि वीरजेठी । पुनरपि युद्ध मांडलें. ॥ ५१ ॥ "जय यशस्वी अयोध्याधीश!" । म्हणऊनि उठिले कपिमुखीं घोष; । तेणें येकनादास्तव आकाश । संपूर्ण जालें ते काळीं. ॥ ५२ ॥ रघुवीराच्या कार्याकारणें । उदित सर्वांचीं अंतःकरणें; । जैसें मनोमार्गाच्या राहटणें । इंद्रियांसि होत असे. ॥ ५३ ॥ दितिपुत्र शत्रूचेनि हितें । सदा जागृत त्रिदशांचीं शतें; । तैसीं लतामृगें आदरें बहुतें । रामकाजीं उत्कंठित. ॥ ५४ ॥ असति ते वेषधारी वानर, । परी पीयूषआहारियांचे अवतार; । संहारावया रजनीचर, । असंख्यात आले लंके. ॥ ५५ ॥ रुद्रासि आवेश महाप्रळयीं, । तैसा कोप महाकपींच्या हृदयीं. । निर्भय ते रणभूमीच्या ठायीं । उभे शैल्यद्रुमपाणि. ॥ ५६ ॥ तुरंगोत्तमारूढ, महा-
[2] बळवंत । अमित्र भंगिले असंख्यात; । ऐसें देखोनियां अद्भुत । राक्षसकटक

[1]. एका हाणोनियां मुद्गलें । मस्तकांची करोनि कवळें । ऐसें अश्वारूढीं आरंभिलें । महा घोर युद्ध. ॥ अ प्रतींत ही ओंवी ४८ व ४९ यांचे दरम्यान अधिक आहे.

क्षोभकें. ॥ ५७ ॥ प्राप्त पराजयो रिपुसंघटणीं । तत्र तत्र आवेश अतः-
करणीं, । मग सकल्प सय घालिती निर्वाणीं । अभिमानास्तव. ॥ ५८ ॥
द्यूतीं युद्धीं पडिलिया हारि, । क्षमातारू बुडे अभिमानसागरीं, । क्रोधानळ
पेटे अति उदरीं, । जैसा वातसर्गे वोणवा. ॥ ५९ ॥ करिती कपिसेनेसीं
सग्रामु । मगली निशाचराची चमू. । आले तेही वीरश्रीक्रमु । समरां-
गणाच्या ठाई. ॥ ६० ॥ पदातिदळ कोट्यानुकोटि भीम । पडिलें राक्षसांचें
दळ प्रथम, । त्यांउपरि राउत, तुरंगोत्तम, । सस्ये वेगळे रणासि आले.
॥ ६१ ॥ अश्वारूढांच्या पार्श्वभागीं । मार बाणले होते नागीं, । ते लोट-
ले विशाळ रणरंगीं । वानरगणावरि. ॥ ६२ ॥ पादपांकित डिसाळ
शैल, । तैसे पताकामंडित ते स्थूळ, । ऐरावतीसम तुल्यबळ । येकयेकां-
ग ते. ॥ ६३ ॥ पर्वताचीं शृंगें वर्तुळें । तयापरी कुंजराचीं कुंभस्थळें. ।
ऊर्ध्व शुंडा करूनिया बळें । किंकाटण करिती. ॥ ६४ ॥ कर्ण पडला-
रूनि सकेतें । पालविती परवीरा समागतें. । उठथू मांडिती उभारलेनि
दंतें । परसेनेच्या चळथा. ॥ ६५ ॥ मदु माजला अंगीं अतिभरें । पोहू-
नि साडिती गडस्थळा द्वारें. । घंटा घोषिती तेणें गजरें । दिशा संपूर्ण
जालिया. ॥ ६६ ॥ महा मदोन्मत्त गजवाहिनी. । भारें लवों पाहे मेदिनी. ।
कराळ, क्रूर, मदिरापानी । त्या वारणा स्कंधीं आरूढले. ॥ ६७ ॥ येक
येक गजपृष्ठीवरि । पंच पंच वैसले शूळधारी. । ते उपमा दीजे जैसे गिरी ।
पंचपंचशृंगाचे. ॥ ६८ ॥ ऐशा कुंजराच्या कोटि ते समयीं । धांविन्ल्या
रणभूमीच्या ठाई । गंभीर वाद्यांची लागली घाई, । दुंदुभि, गिडविडिया,
भेरी ॥ ६९ ॥ आणि विक्रमें भीम कोल्हाळ । उठिला दळामध्यें तुंबळ, ।
तेणें वीरश्रियेचा माडला खेळ । धडें, मुंडें नाचों पाहती. ॥ ७० ॥ अचो-
ट गजभारांच्या सघटणीं । विक्रमें सघटले पादपपाणि. । सिंहघोष करूनियां
समरंगणीं । वैराचि धाविन्नले. ॥ ७१ ॥ पुढें वानरसेनेनीं । कुंजर लोटिले
निशाचरीं । नक्षत्रातें आच्छादित अंबरीं । जीमूत जैसे दाढले. ॥ ७२ ॥
कुंजराळ समार्गीं, मदोन्मत्त । हाणिती कपीस वज्रा ऐसे दंत. । पृष्ठीवरील महास्त्र ।
शस्त्रवृष्टि करिती. ॥ ७३ ॥ गदा, मुद्गल, पट्टीश फरश, । चक्रें, शूळ, परिघ
बहुवस, । 'घे घे' शब्दांचे करूनि घोष । तये शस्त्रें हाणिती. ॥ ७४ ॥

घाय लागताचि वानरवीर । साडिती येवुटे रुधिर; । ते उपमा दीजे गभीर । किंशुक वनीं फुलले. ॥ ७५ ॥ गजाचें गाढें देखोनि सघटण । क्रोधें खवळले हरिगण. । मग करिते जाले विदारण । वारणमडळासि. ॥ ७६ ॥ येक कपि शिळाचेनि प्रहारें । करिती कुजराचीं मुडें चुरें. । येक हाणिती प्रचड तरुवरें, । माज मध्ये मोडिती. ॥ ७७ ॥ येक हाणिती दोर्दडचपेट । तेणें कुभस्थळांचे होती कुट. । येक मुष्टिघातें विवट । करिती कोथळाचे. ॥ ७८ ॥ येक सोंडा धरूनि पिळिती कठ. । तोडिती जैसे द्रुमफळांचे देंठ. । दत मोडिती कडकडाट । शुष्क काष्ठा ऐसे. ॥ ७९ ॥ येक लागूलें धरूनि बळें । मोनडूनि टाकिती ऊर्ध्व रसाळें. । आकाशीं पर्ते उडती अनिळें, । तथापरी भ्रमती गज. ॥ ८० ॥ आपुलेनि बळें वानरवीरीं । पर्वताचीं आयुधें झेलिलीं करीं, । तेंही गज टाकिले अवरीं । हें अपूर्वचि नव्हे. ॥ ८१ ॥ महा तुबळ हें सिंधुजळ । जेंहीं केलें जैसें भूमडळ, । तयांचें किती सागावें वळ । अमर्याद, आगळें ! ॥ ८२ ॥ ऐसे रामदास महावीर । हाणिती कुजरांनरि कुजर, । ते उपमा गिरीवरि गिरिवर । जैसे पडती अकस्मात. ॥ ८३ ॥ गज गजासि लागता क्षणीं । दोन्ही भगोनि पडती धरणी, । ऐसें विकट युद्ध वानरगणीं । गजासीं माडिलें पैं ॥ ८४ ॥ सिंहतुल्य शाखामृगराज । तेंहीं सहारिले अयुताचे सहस्र गज. । 'जय यशस्वी दशरथात्मज' । म्हणोनि गर्जिन्नले. ॥ ८५ ॥ गज सत्वे वेगळे पडले, । यां पचगुणें महारत रणा आले, । जे पूर्वी सग्रामीं जयो पावले । पराभविलें त्रिदशासि. ॥ ८६ ॥ वज्रघाताऽस्तव विदारले शैल । तैसे गज भग्न पडिले विशाळ, । तयाच्या मेदमासें तुबळ । पृथ्वीवरि ढीग जाले. ॥ ८७ ॥ परसेना केली नि:कुजर; । मग मुमु कोरें गर्जिन्नले वानर. । त्या घोर घोषें दिशा, अबर । सपूर्ण जालें ते काळीं. ॥ ८८ ॥ भूतानीं साडिलीं स्थानें. । खेचरीं पळविलीं विमानें. । वनचरें विहगमाचीं मनें । भयभीत, उविती दिशा. ॥ ८९ ॥ महा भयानक रणमडळ, । धावती अशुद्धाचे खळाळ, । अमित भरलें असे राक्षसदळ । तें शोधें उचवळलें ॥ ९० ॥ न टिपती भयाचेनि पिटाळें, । परवीरातें न देखती वळें, । साव जयाचें आगळें । निर्जरावरि होतें, ॥ ९१ ॥ ऐसे भूर ते

राक्षस, । कापट्यकुंभ, सर्वदोष, । तिहीं सिंहनाद करूनि आकाश । कोंदिलें ते समई. ॥ ९२ ॥ गज पडिले. पार्श्वनेटीं । होत्या रथांच्या कोटि; । त्यांसि युद्धाची उत्कंठा मोठी; । पुढारले वेगेंसीं. ॥ ९३ ॥ प्रेतांच्या अस्थि करीत कूट । रथ धांविन्नले घडघडाट. । पुढें रण दाटलें असे घनदाट, । पद शिरेना, प्रेतांस्तव. ॥ ९४ ॥ मेदमांसाचेनि तुंबळें पंकें । संपूर्ण बुडती रथांचीं चाकें. । तुरंगम उफाळती तवकें । स्फुराणत नासापुटें. ॥ ९५ ॥ सारथी आरूढ बैसले धुरे. । घोडियां साट देती सोडूनि वाग्दोरे, । स्वामीचेनि मतें त्वरें । वागविती रथासि. ॥ ९६ ॥ धुर मुख्य रथारूढ निशाचर. । भातां भरिले बहुसाळ शर. । अस्त्रें, शस्त्रें, माया, अपार । रथावरि रचियेलीं. ॥ ९७ ॥ रथ कनकाचे रत्नखचित, । ध्वज नाना मुखाचे उंच बहुत, । पताका, अंबरें सुशोभित । चहूं कोनीं स्तंभां शिरीं. ॥ ९८ ॥ ऐसिया सेनामुखीं रथांच्या कोडी. । धनुर्ध्वें वाहूनि राक्षस चालती प्रौढी. । म्हणती, "मर्कट हो, देशधडी । मरणालागीं आलेति- ॥ ९९ ॥ मूर्ख, रे वनचर, परम तुम्ही. । अभाग्यहो कां त्यजिली जन्मभूमि? । जाहेति रामाचे समागमी । मृत्यूचीं फळें पावावया. ॥ १०० ॥ सिंहमंडळी वसे त्रिकूटाचळीं, । तयावरि कटकें केलीं शृगाळीं; । जयो पावाल, जै मृगजळीं । मेरु, मांदार बुडती. ॥ १ ॥ प्रथम दाविलें बरवें बळ. । पडिलें पाडिलें देवारिदळ. । तया डसिणें तात्काळ । घ्या, रे, कोटिच्या कोटि." ॥ २ ॥ ऐसें बोलती रथींचे राक्षस । ऐकोनि कपि कर्कश, । मग टाकिते जाले वाग्पाश । रजनीचरावरि. ॥ ३ ॥ " अरे, तुम्ही रजनीचर सकळ । सर्व-दोषदुर्ग, दुरात्मे, खळ, । कापट्यकुंभ, अति, अति अमंगळ, । अधर्मी, अन्यायी. ॥ ४ ॥ रेणुका अविनाशाची जननी, । ते कृत्या निर्माण कार्त-वीर्यालागूनि. । तिचेनि प्रसंगें निःक्षेत्री मेदिनी । येकवीस वेळा जाली. ॥ ५ ॥ तैसेंचि राक्षसहो, जाणा. । जानकी कृत्या क्षया रावणा. । त्याचेनि संगें सर्व मरणा । प्राप्त जालेति कपिहस्तें. ॥ ६ ॥ राक्षसमेदमांसें पृथ्वी तुंबळेल घोर हे अघनी; । म्हणोनि भविष्य नाम ठेविलें पूर्वीं । 'मेदिनी' ऐसें. ॥ ७ ॥ क्षेत्रियांचेनि शोणितें । पृथ्वीतें भरिलें रामें रेणुकासुतें. । मा तेणें भ्रीत्यर्थ पितरातें । तेथें तर्पण केलें. ॥ ८ ॥ तैसें तुमचेनि आत

रुधिरें । वेळा लाविजैल सागरें. । मग त्या भरतयामध्यें आदरें । रुद्रगण निधि करिती. ॥ ९ ॥ आता सावधान असा रणभूमीसि । पडल्यालें भेटवू तुम्हासि. " । ऐसी अमित्रवाचाश्रवणीं राक्षसासि । क्रोधमर्यादा साडिती. ॥ ११० ॥ क्रोधें कोदंडें वाहूनि येकसरें । वर्षती वाणवृष्टि त्वरें, । जैसा प्रळयमेघ उतरे । पृथ्वी पूर्ण करावया. ॥ ११ ॥ सधान सुटे अनिवार घोर, । बाणजाळें आच्छादिलें अंबर. । रणचत्वरीं गिरितुल्य वानर । भाळि झेलिती सर्वांगीं. ॥ १२ ॥ बहु बाण लागलियाचा घाई । कपिगण खोंचती ठाईं ठाईं. । रुधिराचे प्रवाह ते समईं । वाहों लागले भूमंडळीं. ॥ १३ ॥ देखोनि राक्षसाचें शरजाळ । क्रोधें उचवळलें कपिदळ, । जैसें भरतें आल्या सिंधुजळ । स्वस्थान साडोनि लोटे. ॥१४॥ खड्गें जया वीराचीं शेळ । तयाचें किती वानावें बळ? । स्वर्गभोक्त्याचे अवतार केवळ । कार्याकारण वेषधारी. ॥ १५ ॥ परवीराची अधिक वाणवृष्टि, । मग कपिक्रोधें वुडों पाहे सृष्टि, । सत्वें वेगळे सोडूनि वृष्टि । शिखरें शिळांची करिती. ॥ १६ ॥ अश्वकर्ण सप्तपर्ण तरु । तेणें प्रहारें करिती रथियासि मारु । येकातें शृंगें हाणोनि चूरु । करिती पूर वाहिनीचा ॥ १७ ॥ येक वानर घेऊनि शिळा । गिरितुल्य झेलिती विशाळा, । येक गाढूनि दोर्दंडवळा । हाणिती रथारूढातें. ॥ १८ ॥ परदारसत्या शिळाशृंगें । लताभृग टाकिती वेगें, । तेणें घायें भगती अभंगें । रथाथाटे अपार. ॥ १९ ॥ पादपाक्रित पडता पर्वतें । पिष्ट होती रथाचीं शतें । रथिया, सारथिया, अश्वातें । समागमें मृत्यु. ॥ १२० ॥ ऐशा रथाचिया कोटि । चूर जालिया रणांगणाचा पोटीं। चतुर्थगुणें शैलशिलासघटीं । तुरंगम विखुरले. ॥ २१ ॥ रथसरत्या सारथी पडले, । तुंबळ अशुद्धें पूर पसरले, । मांर्जा महा टोंग उचलले । पडलिया प्रेतांचे. ॥ २२ ॥ अपार रामरावणकटक । युद्ध करितां पडलें कितियेक, । परि त्या दोहीं दळीं तृष्णा अधिक । त्रासातें पावले नाहीं. ॥ २३ ॥ युद्ध मांडलें ऐसें अति घोर । भयचकित देव, दैत्य, किन्नर, । पुढें कथा श्रोतीं ते सविस्तार । सुरस पढितां प्रियो. ॥ २४ ॥ । इति श्रीयुद्धकांडरामायण । वाल्मीकिरत्य जगतारण, । तें, सुजनहो, श्रवण कीजे सावधान । कृष्णदास मुद्गल म्हणे ॥ १२० ॥

---

## प्रसंग अठरावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरु काशिराजाय नमः ।
जैसें पाहतां जळ सागरीं । लोटत लहरियांमागें लहरी, । तैसें आतां वीर रसाउपरि । वीररसुचि पुनरपि. ॥ १ ॥ नांव याचें 'युद्धकांड;' । येथें युद्धाचें असे उदंड. । वीर पर्वता समान प्रचंड । पडले संख्यारहित. ॥ २ ॥ संग्रामाच्या रणभूमीसि । धडमुंडांच्या पडल्या राशी. । अधिक तृष्णा दोहीं दळांसि । युद्धाची होत असे. ॥ ३ ॥ कामिकासि कामु वाढे रूपभोगें, । वोणविया विस्तारु वायुसंगें, । शशांकासि शुक्लपक्षयोगें । कळावृद्धि होतसे. ॥ ४ ॥ तप वाढे सुचित्त नेमें, । दया वाढे साधुसमागमें, । प्रताप वाढे आगळ्या विक्रमें, । दानें पुण्य वाढे. ॥ ५ ॥ प्रीति वाढे अति आदरें, । यश वाढे परोपकारें; । तैसी संग्रामतृष्णा वाढे वैरें । परस्परें अमित्रांसि; ॥ ६ ॥ म्हणऊनि कपि आणि निशाचर । द्वंद्वयुद्ध करिती अति घोर. । कोणासि कोण, तें श्रोतीं अति सादर, । सविस्तर परिसावें. ॥ ७ ॥ इंद्रजितासीं तो वाळीसुतु, । जंबुमाळी यासि हनुमतु, । निकुंभाप्रति वीर्यवंतु । नीळ सेनापति, ॥ ८ ॥ विरूपाक्षें लक्ष्मण पाचारिला. । वज्रमुष्टि मैंदावरि धांविन्नला. । प्रतपनु नळेसीं भिडों आला । क्षिप्र नामा सुग्रीवेसीं, ॥ ९ ॥ विद्युन्माळी आणि सुषेण, । वज्रमुष्टि मैंदेसीं दारुण. । रघुनाथु लक्षोन चौथे जण । धांविन्नले अतिरथी. ॥ १० ॥ अग्निकेतु, रश्मिकेतु, मित्रघ्नु, । चौथा कुंभकर्णाचा नंदनु । मागें धाऊनि वेगें परतु । रथारूढ झेंपावले. ॥ ११ ॥ आणिक नामाथिले राक्षस । भिडती सांडूनि जीविताची आस; । जैसे दस्य आणि त्रिदश । अनादिवैरेंकरूनि. ॥ १२ ॥ मेघनाद कोपला शक्रारि, । परिघ लोहाचा घेतला करीं, । बळें टाकिला अंगदावरि । वज्रासारिखा. ॥ १३ ॥ अंगदें देखिला परिघ येतु । चुकविला लाघवें वेगें वहुतु; । मग दोर्दंडें मवंडूनियां पर्वतु । हाणी मेघनादासि. ॥ १४ ॥ पर्वत पडतांचि इंद्रजितें । शतचूर्ण केला गदाघातें. । सवेंचि वेगें वाळीसुतें । शिखरें दोनी घेतलीं. ॥ १५ ॥ तें बळें टाकिलीं इंद्रजितावरि, । आडळली जव मेघनाद निशाचरी । तैयास्तव शिदाळी

१. अ. तेही विदारिली भूमीवरि.

पृथ्वीवरि अश्व, सारथि, रथु. ॥ १६ ॥ रथ सुंगटु । रत्नखचित. । आणिके रथीं बैसला इंद्रजित. । मग परस्परें अद्भुत । संग्राम करिते जाले. ॥ १७ ॥ तंव निकुंभ राक्षस निघाला उजू. । पाठीं जैसा गजा वरि गजु. । मेघमंडळीं जैसी विजु । ऐसा धांविनला. ॥ १८ ॥ गर्जन केलें महा भयानक, । तेणें चकित उभय कटक. । शक्ति निकुंभाची अलोलिक । नीळासि ताडिलें खर्ह्में. ॥ १९ ॥ घावो साहोनि कोपला नीळु. । पाषाण करीं घेतला विशाळु, । तें हाणोनि फोडिली टाळू । निकुंभाची महा कठिण. ॥ २० ॥ तेथोनि भडभडां वाहे रुधिर, । जैसी शैलशृंगींची जलधार. । वज्रातुल्य तें निकुंभाचें शरीर; । पुनरपि धावे वेगीं. ॥ २१ ॥ रथारूढ असोनि आंगवणे, । टक्षूनि नीळातें चक्रें हाणे. । येरू साधकु लघुलाघव जाणे, । उड्डाण केलें वक्र. ॥ २२ ॥ सवेंचि शिळाघायें पावकसुतें । मारिलें निकुंभाचिया सारथियातें; । मग निकुंभ गदा तुळित ऊर्ध्वहस्तें । चरणचाली धाविनला. ॥ २३ ॥ तयां दोघां परस्परें । युद्ध मांडिलें महा निकुरें. । तंव जंबुमाळियानें घोरें गजरें । हनुमंत पाचारिला. ॥ २४ ॥ म्हणे "बोलविलासि, रे कृष्णानना; । लंका दग्ध केली, रे महामळीना; । अक्षयासि क्षय केला, बळहीना; । तो तूं आजि सांपडलासि. ॥ २५ ॥ तो[1] उसिणवट घेईं, रे, ये काळीं." । ऐसीं उत्तरें बोलोनि आगळीं, । मग महा मुद्गलें वक्षस्थळीं । हनुमंतासि ताडिलें. ॥ २६ ॥ मग हनुमंत म्हणे, "निंदेचें फळ । भोगीं, रे कुटिळा, तात्काळ." । मग मुष्टिघातें वक्षस्थळ । चूर्ण केलें क्रोधें. ॥ २७ ॥ येवथाचि पायासरिसा जंबुमाळी । शोणितें चर्चित पडला भूमंडळीं; । तंव सुषेणावरि ते काळीं । विद्युन्माळी धांवला. ॥ २८ ॥ नाना सेनेचा सागरीं । विद्युन्माळी याचा रथु ते लहरी; । सुषेण तेचि मर्यादा तेथवरि । लोटला वेगें. ॥ २९ ॥ धनुष्य वाहोनि महा थोर, । तूणिगर्भीं काढिले सात शर. । चारि चुकले, तिघीं भेदिलें शरीर । सुषेणकपिवीराचें. ॥ ३० ॥ आगीं रुतलिया तीक्ष्ण भाली; । तेणें सुषेणा मूर्छना आली । क्षण येक भूमि स्वीकारिली; । पुनरपि सावध

1. अ. ते उखिणवारी मेहेन ये काळीं.

जाला. ॥ ३१ ॥ विद्युन्माळी गभीर गर्जतु। आला राघवावरि अकस्मातु; । परि तो मातला जैसा हस्तु¹। सिंहापुढें कैसा राहे? ॥ ३२ ॥ तंव सुषेणे चाळिला घेऊनि गिरी. । टाकिला विद्युन्माळियावरि. । तो रथासहित भीतरी । विदारोनि आच्छादिला. ॥ ३३ ॥ तव महारथी क्षिप्रनामा । धावे सुग्रीवा उजू साउमा. । म्हणे, "साहें, रे प्लवगमा, । मुद्गलप्रहार माझा." ॥ ३४ ॥ ऐसें बोलोनि क्षिप्रें मुमटें । मुद्गळ सुग्रीवावरि टाकिला नेटें. । लागता धरिला वामपाणिपुटें । वानरवाहिनीश्वरें. ॥ ३५ ॥ क्षिप्रा हृदयीं क्रोधानळु. । धाविन्नला शोणित निराळु.। गर्जे गभीर अति विशाळु, । सुग्रीवा सघटला. ॥ ३६ ॥ तव शीघ्र तिये समयीं वानराधिपें, । अमित्रनिशूळ साहोनि, कोपें । हाणोनियां सप्तपर्णपादपें । शिर भंगिलें क्षिप्राचें. ॥ ३७ ॥ तेणें घाय आली गिरगिरी, । क्षिप्र पडिला धरणीवरि; । जैसा सुषुप्तीनें व्यापिला शरीरीं । निचेष्टित प्राणी राहे. ॥ ३८ ॥ येरीकडे निर्वाणनिकरें । भिडिजे वज्रमुष्टीसीं मैंदें वीरें. । घाये देत घेत परस्परें । न लोटती येरयेरा. ॥ ३९ ॥ मैंदे वानरवीरें ते काळीं । गिरिशृंगें मोवडून करतळीं । अविघ्नतृष्णा आगळी । वज्रमुष्टीस हाणे. ॥ ४० ॥ शिखर ये तो राक्षसें देखिलें. । परिघघातें मध्येंचि फोडिलें; । जैसें निर्जरनाथें विदारिलें । हिमाळयाचें शृंग. ॥ ४१ ॥ मंत्रेचि मैंदें आगळिया वीरें । रिपुवरि टाकिलें शृंग दुसरें; । तया घायास्तव जाली गात्रें चुरें । वज्रमुष्टींचीं रणरंगीं. ॥ ४२ ॥ तयाचिपरी भुजता द्विविदें । वज्रसर्पी ताडिला विशाळ आयुधें. । घाये राक्षसाचें मुख वाहे अशुद्धें, । पडला पृथ्वीवरि. ॥ ४३ ॥ तव प्रतपनु राक्षस प्रतापी; । तेणें विंधिला बाणीं नळु कपि. । घोर घोष करूनि पुनरपि । संधान करी त्वरें. ॥ ४४ ॥ शरवृष्टि नळें साहिल्यावरि । क्रोधें उचलिला विशाळ गिरि. । बळें टाकिला प्रतपनावरि । द्रुमांकित विशाळु. ॥ ४५ ॥ त्या पडतया पर्वता तळीं । प्रतपनु चूर जाला भूमंडळी. । तव परस्परें वरपती बाणजाळीं । सौमित्र आणि विरूपाक्ष. ॥ ४६ ॥ कार्तवीर्य आणि परशुरामु । उभयतां आवेश

१. अ. रथाश्वसारथियासीं भीतरी । आच्छादिला. २. अ. विदारिलें.

निकृमु, । तैसा होतसे सग्रामु । सौमित्रा आणि विरूपाक्षासि. ॥ ४७ ॥ बाणीं निरावकाश गगन. । तोडी येक येकाचें सधान. । थोर युद्ध दोघाचें समान. । लघुलाघव दाखविती. ॥ ४८ ॥ तव लक्ष्मणें रामानुजें । आगळ केलें वीरराजें. । शर पूजिला पावकबीजें । टाकिला विरूपाक्षा उजू. ॥ ४९ ॥ सर्पचाली विद्युल्लता जैसी । जात, बाणाची गति तैसी. । पावक प्रज्वलित आकाशीं । तो विरूपाक्षें देखिला. ॥ ५० ॥ शीघ्र बहुबाणी सधान केलें, । अग्निबाणातें कितियेक खडिलें; । परि तेज न धरवताचि आलें, । रथाचा कोळसा केला. ॥ ५१ ॥ सारथ्या, अश्वा सहित जाला, । विरूपाक्ष आहळोनि पडला, । हें देखोनि हाहाकार जाला । राक्षसवाहिनीमध्यें. ॥ ५२ ॥ विरूपाक्ष आणिला रणा, । जयो प्राप्त लक्ष्मणा. । येरांकडे चौं बाणीं चोंघा जणा । रघुनाथें निधिलें. ॥ ५३ ॥ ऐसें नरवानर, निशाचर । युद्ध करिती घोरादर । सत्ता न टळली महावीर, । वैर वाढलें उभयतां. ॥ ५४ ॥ ऐसा सग्राम जाला तुबळ, । वाहती रुधिराचे खळाळ, । उभेयाचें बुडे वक्षस्थळ । इतुकी खोली जाली. ॥ ५५ ॥ कितियेक कोटी रणा आले. । मग शिरेंविण कबध उठिले. । अमित सैरा धाविन्नले । दोहीं दळामध्यें. ॥ ५६ ॥ सेंदुरें डवरले स्तभपोटाळे, । तैसे धावती कबध सरळे. । तैयाचें आग तयास आदळे । वज्रघाता सारिखें. ॥ ५७ ॥ सग्रामीं बळियातें नाहीं त्रासु, । तारुण्यदशा पावला वीररसु, । तव अस्तमाना गेला दिवसु, । रजनी प्रवर्तली. ॥ ५८ ॥ काळरात्री आली महाकाळी, । परी वोहोट नाहीं दळीं । युद्धाची तृष्णा आगळी । कपि आणि राक्षसासि. ॥ ५९ ॥ सूर्य गेलिया सृष्टीबाहेरि । नक्षत्रें दिसती अबरीं, । राक्षस अमित्र निघाले बाहेरि, । जैंवि वैरी वायसाचे. ॥ ६० ॥ रात्रीस देखोनि रजनीचर । सर्वही आनदले हृदयीं थोर. । मग सिंहनाद करूनि अबर । सपूर्ण करिते जाले. ॥ ६१ ॥ उदकार्थियें देखिली सरिता, । कीं मूर्खासि भेटली ब्रह्मदुहिता, । कीं दरिद्रघरीं विष्णुकाता । आली अकस्मात. ॥ ६२ ॥ बाळकासि जननी साडूनि गेली । वाट पाहता पुनरपि भेटली, । कृपेनें कामधेनु वोळली । बुभुक्षिताच्या धामीं, ॥ ६३ ॥ ऐसियापरी आनदती ।

---

१. क. तयाच्या आगासि आदळे.

निशाचरांसि जाली निशाप्राप्ति. । अंधकारामध्यें युद्ध करिती । वानरांसी अति निकर्में. ॥ ६४ ॥ मेघासारिखे वीर गर्जती, । परि कोणासि न देखती, । भलते भलत्यातें हाणिती । ऐसें अद्भुत आरंभलें. ॥ ६५ ॥ शस्त्रे तळपती जेशा विजा. । थडथडा घाय हाणिती वैजा. । तुटोनि डसळती शिरें, भुजा, । सडे दाटती रणांगणीं. ॥ ६६ ॥ टोळे वाटारूनि पाहती वानर । तंव काळें दिसे भूमि, अंबर. । सणसणा आदळती शर । वक्षस्थळावरि. ॥ ६७ ॥ वैराचि न देखती वानरगण । टाकिती शिळा, शृंगें, द्रुम, पाषाण. । तेणें अकस्मात होती चूर्ण । सवेचि निशाचर. ॥ ६८ ॥ दुष्कर आरंभलें ते समयीं, । महावीर लुटती घायीं । हाणीत असती कवणे ठायीं । तें न कळे दोहीं दळा. ॥ ६९ ॥ हाका देती महा भयंकर । 'घे घे' शब्दें छळिती येरा येर. । घायासि आदळती वाळिये वीर, । न देखताचि हाणिती. ॥ ७० ॥ [1]वगति राहिली अंधकारें, । मग पायींच धावती राक्षस वैरें । ते समयीं अतिलताचेनि आकारें । परदळीं प्रवेशती. ॥ ७१ ॥ राक्षसदळ आणि कपिदळ । अंधकारें येकवटलें तुंबळ. । आपला पराना कोण केवळ । ऐसी वोळखी राहिली. ॥ ७२ ॥ धावता येकामि येक झगटती । 'कोण रे तूं?' ऐसें पुसती । 'रामदूत' म्हणे, तारे ताडिती । राक्षस अकस्मात. ॥ ७३ ॥ 'कोण रे, कोण?' पुसती वानर. । 'लंकेचे' म्हणती निशाचर. । मग रामदास हाणिती प्रहर । द्रुमशिळादोर्दंडीं. ॥ ७४ ॥ ऐसा सहार माडला दोहीं दळीं. । न सरे निशा महा घोर काळी. । अंधकारीं झुजता अतुर्बळी । रणा आणिले बहुत. ॥ ७५ ॥ भीम, दुष्कर रात्रीचा समयो । जाणोनि मृगांकें केला उदयो. । तो कपिकटकासि अति प्रियो. । डोळ्या देव आले. ॥ ७६ ॥ जीव असता घायेंवट पडले । ते सोमकांतस्पर्शें सावध झाले. । जागृत दशेतें पावले । व्यापार इंद्रियांचे. ॥ ७७ ॥ चंद्राचीं रश्मे पडलीं शीतळें, । वरि ढाळु दिधला मळयानिळें, । ऐंद्रियातत्व निकळ वीराचीं बळें । ठायींच्या ठायीं राहिलीं. ॥ ७८ ॥ अगावरि पडले चंद्रकर । तेणें सावध जाले जर्जर. । या प्रश्नाचें उत्तर । परिसावें, जी, तुम्हीं ॥ ७९ ॥ चंद्रीं अमृतकळा असती । त्या रश्मिनिळद्वारें स्रवती, । म्हणऊनी ते रस्न लागताचि जिवती । धातु

[1] अ. रथगती.

सर्व आगाचिया. ॥ ८० ॥ चद्रमा आठ लोकपाळां । उचित दे अमृतकळा; । मग तो तया वेगळा । लाजा लपे सूर्याआड. ॥ ८१ ॥ मग कृष्णपक्षा अतीं । पुनरपि शुक्लीं कळा प्राप्त होती. । त्या चढता वाढता पूर्ण जाणती । पूर्णिमे षोडशा ॥ ८२ ॥ षोडशकळीं पूर्ण दिसे चद्रमा । म्हणोनि तिथीसि नाम पूर्णिमा. । चतुर्दशा त्याहूनि महिमा । थोर ते पूर्णिमेचा. ॥ ८३ ॥ पूर्ण इदु करी जैं उदयो । तैं आगळा वोमडे वरुणाल्यो. । काय कारण तरि हा तनयो । चद्रमा सागरासि होये. ॥ ८४ ॥ सुरासुरीं मथिला समुद्र । तेथें रत्नीं निवाला चद्र. । हलाहलप्राशनें तप्त रुद्र, । तेणें मौळीं धरिला. ॥ ८५ ॥ ऐसा तो उपकारी निशाकरु । उगवला अमृतकळीं मनोहरु, । वानरवाहिनीस तेथें थोरु । अति आल्हादु जाला. ॥ ८६ ॥ द्विलक्ष योजनें कळावरें । असिजे आकाशीं अतरें. । परी तयाच्या मरीच्यमृतें । चकोरें तृप्त झालीं खालुतीं. ॥ ८७ ॥ जितुकिया सोमकाति शिळा । त्या पाझरू लागलिया सीतळा. । कुमोदिनी उच्छाव आगळा, । फुल्लारें विकासती. ॥ ८८ ॥ स्वामीस देखोनिया वनस्पति । रविरस्मींची व्यथा विसरती, । जैसी भताराची जाणोनि प्रीति । नारी दिनकष्ट साडिती. ॥ ८९ ॥ चीराचेनि प्रतापें महीमडळ । तपोनि कृष्ण जालें होतें सकळ; । तेंचि चाद्रणें पडलिया शीतळ । श्वेतदशा पावलें. ॥ ९० ॥ दिवसा पारधियाचेनि उद्वेगें । भयचकित श्रमलीं कुरगें, । रात्रीं मृगांक उगवलियाचेनि प्रसगें । सुखस्थानीं वैसलीं. ॥ ९१ ॥ चक्रवाकें येकवाटें दोघें जणें । तयावरि पडिलें चद्राचें चादिणें । काति पालटलिया विलक्षणें । दिसती परस्परें ॥ ९२ ॥ दिवसाची देहदशा पालटली, । जवळी असता भूलि ठेली, । वोळखतीना, विघडली । येरयेरांपासूनिया ॥ ९३ ॥ तरि काय कल्पित ऐसेंचि वाटे. । शशाकु कृष्णपक्षीं कळीं तुटे, । तरि काय घडलें नेणों वोखटें[१] । श्राप त्या चक्रवाकातें. ॥ ९४ ॥ आणिक येक कल्पनें वाणी । चद्रप्रकाशें सर्व सुखी प्राणी, । परि येक प्रकटला विरहिणी । अति मनें आहाळती. ॥ ९५ ॥ तरि काय त्याचिया श्रापास्तव । क्षीण चद्राचें वैभव[२] । कीं लक्ष्मीमुख देखोनि ठेव । साडिली वर्तुळपणाची[२]॥ ९६ ॥ ऐसा चद्र आकाशीं मिरवला, ।

१. अ. दिवसदिवशीं २ अ. मृगाकोदयाचेनि.

तेव राम सौमित्रा बोलिला, । " मध्यरात्रीं मार्तंडें उदयो केला; । तीव्र किरणीं पोळित." ॥ ९७ ॥ म्हणे, "उदयो केला जरि अर्कें । तरि विकासशून्यें कां पुंडरीकें ? । अद्यापि तरि चक्रवाकें । वोमात असती दुचडी. ॥ ९८ ॥ आकाश भरलें सूर्याचे किरणीं । परि तेज सांडिलें नाहीं तारागणीं; । सोमकांत झरे झरवणीं; । ऐसें अपूर्व देखत असें." ॥ ९९ ॥ ऐसें विपरीत रामाचें बोलणें । आइकोनि कल्पिलें लक्ष्मणें, । अवनिसुतेचेनि स्मरणें । विरह व्यथा वाधली. ॥ १०० ॥ जितुक्रियांसि वाधी कंदर्पु । त्यांसि उदेजे विरहतापु. । शीतळ उपभोग दीपु । अधिक अधिक होतसे. ॥ १ । मग लक्ष्मण म्हणे, " गा रघुपति, । सूर्यउदयो तंव निशीचे अंतीं. । रात्रिं उगवे गभस्ति, । कैसेनि हें घडेल ? ॥ २ ॥ हा निशाकर मृगनाहनु; । नव्हे गा. सर्वथा भानु." । हें ऐकोनि क्षोभला रघुनंदनु । वचन बोले चंद्रा प्रति. ॥ ३ ॥ म्हणे, " अरे दुष्टा, तुझें चद्रमंडळ । अर्ध्यायशीं सहस्र योजनें वर्तुळ; । मज पाहतां विषकुंभ केवळ, । अमृतमय हें मिथ्या. ॥ ४ । तुझिया रश्मानळरेखा । आंगीं लागती, जैशा अग्नीच्या शिखा. । शरिं संडितों कळालक्षणशाखा । परि कांहीं येक कारण असे. ॥ ५ । चद्रा, तू पूर्णिमेच्या रात्रीं । कांहीं येक तुकसी प्रियापत्रीं; । हें कल्याण, नाहीं तरि नक्षत्रीं । शोभतासि कैसा ? ॥ ६ ॥ आणिकही येकें प्रकारें । तुज न खंडिजे मासियेनि शरें, । जे संतोषें शैलसुतावरें । तुज मस्तकीं धरियेलें. ॥ ७ ॥ आणि निसरे गुणें, शशी, । दैवे काळीं तू क्षेम पावलासि. । विचारितां, गा, उपनामासि । मीच पात्र जालों असें. ॥ ८ ॥ आणीकही एक गुण; । जें त्या शरीर केलें देवांसि अर्पण, । प्रतिदिनीं वांटोन । दिधली एकेक कळा." ॥ ९ ॥ ऐसें दशमुखअरिनें बोलिलें, । क्रोधदृष्टीं चंद्रासि छळिलें. । तें काळीं हूनि खंडन जालें । कृष्णवर्ण चिन्हा कीं. ॥ ११० ॥ असो आतां एळवगिन; । बीटु मानितील श्रोतेजन; । म्हणती, ' धीररसाआन आन । बोलसी आदर. ' ॥ ११ ॥ कवि विनवी श्रोतयांतें । महा विचक्षण तुम-चीं चित्तें । म्हणउनि वर्ण्यात जमे मातें । वागेश्वरी विनोद. ॥ १२ ॥

---

१. अ. उदेजे. २. अ. विरहदु. ३. अ. प्रम.

इति श्रीयुद्धकांडकाव्य वाल्मीकि, । जें चरित्र परिकर त्रैलोक्यीं; । तोंचि प्रमेय चतुरादिकीं । महाराष्ट्रभाषा ऐकिजे. ॥ १३ ॥ सुवर्णपात्रीं क्षीर दुहिलें । तें काय रुची दुणावलें ? । तेंचि मृण्मय पात्रीं घटीं घातलें माधुर्य पालटेल काई ? ॥ १४ ॥ विनवी मुद्गल कृष्णदासु.। म्हणे, "सेवा रघुनाथकथारसु; । तोय त्यजूनिया राजहंसु । दुग्ध सेविती जैसें ॥ १५ ॥ अपार गुंफिली अक्षरमाळा, । पदार्थी नवरससाहित्यमाळा, । ऐसियाचा आन्हिकु वेगळा, । भेटे भाग्या लागला. ॥ १६ ॥ जे स्थळीं जे जाति भजे, । तेथ तेथ गुणवंतीं विवरिजे; । अर्थगंभीरताचि घेइजे । कर्णभूषण आनंदीं. ॥ १७ ॥ असो; आता सगर्भ बोलणें. । बोलता वाटे लाजिरवाणें. । चतुरासि चमत्कार दाखवणें । हें तर उचित नव्हे. ॥ १८ ॥ आतां दत्तचित्तें निश्चळ । ऐका राहिल कथेचें मूळ. । रात्रीच्या काळीं रामरावणदळ । युद्ध करिती आवेशें." ॥ १९ ॥ इति श्रीयुद्धकांडरामायण- । कथा, वीररसु गहन. । श्रोतयासि विनवी 'सावधान'। कृष्णदास मुद्गलु. ॥ १२० ॥

---

## प्रसंग एकोणिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । नमो श्रीगुरुकाशिराजाय नमः । चंद्रउदयाचेनि उजियेडें । वीर वीरासि देखती निवाडें. । वानरीं उपडूनिया झुवाडें । मारिती राक्षसातें. ॥ १ ॥ इंद्रजित आपुलेनि बाणीं । करी कपि पादपाची खंडणी. । हें घोर देखोनिया रणांगणीं । तारातनयो कोपला. ॥ २ ॥ महा भयंकर गाजिन्नला, । सिंह सिंहावरि धाविन्नला, । पाणिचपेटे हाणोनि मोडिला । अश्वरथ इंद्रजिताचा. ॥ ३ ॥ परंतु निदारें वज्रघातें, । तैसा रथ चूर्ण जाला अंगदहस्तें. । मग आणिके रथीं इंद्रजितें । आरोहण शीघ्र केलें. ॥ ४ ॥ अंगद वीर जयो पावला, । देवीं पुष्पवर्षाव केला, । वानरसिंधु गाजिन्नला, । तेणें दिशा दुमदुमिल्या. ॥ ५ ॥ 'भला, गा, भला वीर.' येणें बोलें, । रघुवीरें अंगदासि गौरविलें. । तंव तेणें मेघनादें स्मरिलें । कापट्यविद्येलागीं. ॥ ६ ॥ मग राक्षसदळांतूनि उडाला. । अप्रत्यक्ष अंतराळीं राहिला. । तेथूनि वेगें करिता जाला, । सर्पशरवृष्टि. ॥ ७ ।

शाखामृगवाहिनी अपार । त्यां येकातेंही न हाणे शर. । रामलक्ष्मण महावीर । तयातें हाणे लक्षूनि. ॥ ८ ॥ रघुनाथ ऊर्ध्व पाहत असे । तो घोर सर्पवृष्टि वर्षे; । परी संधानकर्ता न दिसे । लक्षितां दाही दिशां ॥ ९ ॥ रणतुणा वाजे गंभीर गुण, । झुंजांटे येती सर्पबाण, । हाणितें कवणे ठायींहून कवण, । तें न दिसे कवणासि. ॥ १० ॥ आंगेंसीं आदळतें जे शर, । तेचि डसों लागती निखार. । रामसौमित्र रणरंगधीर । निवांत उभे असतां. ॥ ११ ॥ पर्वतीं पडती पर्जन्यधारा, । ऐसींच सत्या त्य सर्पशरा. । सर्पमय भासे सैरांसैरा । रामलक्ष्मणाचे दृष्टी. ॥ १२ ॥ ऐसें आरंभलें महा दुष्कर, । भयचकित यमातुल्य वानर. । सर्वांचि बुद्धीचें वैभव थोर, । परि ते काळीं नचलेचि. ॥ १३ ॥ त्वचेवरि रोमाच उदेले, । तैसे प दोघांसि सर्पपाशीं लागले, । मग राम येक वचन बोले । कपींद्रा प्रमुखाप्रति. ॥ १४ ॥ "कैसा विपरीत काळाचा व्यापार । हरिणाक्षमौळींचा जो खगुरु, । तयासि जडल्या नवज्वरु । सर्व दोषांसहित. ॥ १५ ॥ वेगेंसि विधुटेचें उनर्णे । देखतक्षणीं विंधों शके जो बाणें, । तया वीरराजें लक्ष्मणें । सर्पपाशीं सत्त्व साडिलें. ॥ १६ ॥ पहा पा आपलीचि पृष्टी । अगोचर असे आपुलिये दृष्टी, । तैसा कोण करितो सर्पवृष्टि । तो न लक्षे नेत्रीं आम्हा. ॥ १७ ॥ नेणों सर्पांसि व्यालें आकाश. । अगणित पडले लागती पाश, । कीं कपटमायावंत राक्षस । तिहीं त्रिया निर्मिली. ॥ १८ ॥ तरि तुम्ही लतामृगेंद्र ये काळीं । असा सावधान आम्हाजवळि. । गिरिगार- वृष्टि वरी, ती करणें म्यळीं, । तें पहा, हो, शीघ्र. ॥ १९ ॥ ऐसें बोलिल्या रघुनाथें । कपिदशक उडाले गगनपंथें, । जो येक येक धाड शके पाडूं । या ब्रह्मांडगोळातें. ॥ २० ॥ कुमुद, द्विविद, जांबुवंत, । सुषेण, नळ, नीळ, हनुमंत, । मैंद, दुर्मुख, वाळीसुत, । इतुके आकाशीं भ्रमतीं. ॥ २१ ॥ आपुले शक्तीसारिखे अवघे । हिंडती गरुडाचिये परी. । शत योजनें आकाश वोरी । शोधिलें क्षणार्धे. ॥ २२ ॥ पाहतां न दिसे धनुर्धर, । मग आले जेथें रघुवीर. । म्हणती, " सर्व-

१. अ. उभे थोर घोर वानर. २. अ. झुंजारी. ३. अ धार. ४. अ हरमौळींचा निशाकर. ५. अ विस्तारष्टिकतीं.

दोषी निशाचर। पाहता न पडेचि ठायीं." ॥ २३ ॥ ऐसें रामासि बोलती प्लवगम, । तव आकाशीं घोष केला भीम. । मेघातुल्य गर्जे म्हणोनि नाम । मेघनाद त्याचें. ॥ २४ ॥ रामलक्ष्मण नागपाशीं बाधले, । मग आकाशीं अप्रत्यक्ष बोले. । म्हणे, " सग्राम का न करा उगले, । राजपुत्रहो, तुम्ही ? ॥ २५ ॥ समुद्राचें केलें भूमडळ, । तें काये जालें तुमचें आजि बळ ? । अपार आणिलें वानरदळ । तें काय निर्जीव जालें ? ॥ २६ ॥ खरदूषणादिक थोर थोर । पूर्वीं वधिले निशाचर, । तयाचा सूड मागती सर्पेश्वर, । तुमचे आगीं डसोनि. ॥ २७ ॥ तुमचा ऐकोनि पुरुषार्थु । चिंतातुर होता लंकानाथु, । आजि तो जाला सुखी समर्थु । अमरराजशत्रु." ॥ २८ ॥ ऐसें बोलोनि मागुतालें । सधान करी तो वर्में आपुलें, । तव कपिसमुद्रामध्यें उदेलें । भयाचें हलाहल. ॥ २९ ॥ म्हणती, " जयाचेनि बळें आम्हीं । पदागुष्ठें आकाश पाडू भूमी, । तो रामुचि मुख्य प्रथम सग्रामीं । सर्पपाशीं बाधला. ॥ ३० ॥ आत्मा वरपडा होय अरिष्टा, । तें राहे इद्रियांचिया चेष्टा; । तैसी स्वामीस न भासे सग्रामप्रविष्टा, । तेणें कपिसत्व हीण पडलें. ॥ ३१ ॥ ऐसें बोलती लतामृग. । म्हणती, " अकळ कर्माचा भोग ! । मुख्य महावीर उभयवर्ग । नागपाशीं बधन पावले. ॥ ३२ ॥ दुष्कर माडलें कपिसेनेतें, । तव काये केलें इंद्रजितें । दश दश बाणीं नळनीळातें । अकस्मात भेदिलें. ॥ ३३ ॥ मैंद, द्विविद, कुमुद, सुषेण, । यानारि टाकिले त्रीणि त्रेणि बाण. । द्विदशक मोकालिले कठिण । वानरेश्वरावारि. ॥ ३४ ॥ शतार्धबाणीं वाळीसुतु । भेदिला, तैसाचि हनुमतु. । नव बाणीं ऋक्ष जांबुवतु । भग्नबळ केला. ॥ ३५ ॥ सुमुख, दुर्मुख, दधिमुख, गजु, । गवाक्ष, गवयो, तळपन, ध्वजु, । जंघ, केसरी, प्रभजु, । हे भेदिले दों दो बाणीं. ॥ ३६ ॥ आणिक सरवें वेगळे वानर, । पर्वत जयाचीं खड्गें, ऐसे वीर, । तितकियावारि टाकिले शर । येकलेनि इंद्रजितें. ॥ ३७ ॥ पुष्पाकित पळस उन्मुळले, । तैसे वीर रणीं मह्यु पडिले. । तयाचिया देहापासव सुटले । शरें शोणिताचे. ॥ ३८ ॥

---

१ क. आत्मरूप पडिलिया होय अरिष्ट. २ अ. हीनसत्व कपि जाले ३ अ तीनि तीनि.

रामलक्ष्मणांतें नागजाळ, । बहु बाणीं भेदिलें कपिदळ, । मग गर्जना करूनिया तुंबळ । प्रकटला मेघनादु. ॥ ३९ ॥ पराभविल्या त्रिदशा. । आनंद न भरे आकाशा, । तैसा आनंद वोसंडत राक्षसां । वानरसेन पडिलिया. ॥ ४० ॥ मग इंद्रजित ते अवसरीं । मग्न राक्षसांचें शोधन करी. । घायाळें घाउनि रथांवरि । लंकेमध्यें पाठविलीं. ॥ ४१ ॥ बाण-निर्मिं टोपरिला तृणी, । धनुष्यासि घातली गवसणी, । ऐसें करूनिया रावणी । निघे हरखेंनि दळेंसीं. ॥ ४२ ॥ परतल्या चातुरंग वाहिनी, । लागल्या गंभीर वाद्यांचिया ध्वनि. । पुढें प्रताप वर्णिजे वंदीजनीं । वज्रपाणिजि ताचा. ॥ ४३ ॥ सिंहनादें गर्जती निशाचर भार, । प्रवेशले निज नगर. । प्राप्त जालिया महाद्वार । दळ ठोकलें बाहेरि. ॥ ४४ ॥ मंत्रियासहवर्तमान श्रेष्ठ । लंकानाथ सिंहासनीं उपविष्ठ, । येता सन्मुख सुत ज्येष्ठ । अग-ण्यीं वेष्टितु. ॥ ४५ ॥ शीघ्र येऊनि तो रावणी । मस्तक ठेविला पितयाचे चरणीं. । विंशति भुजीं उचलिला तत्क्षणीं, । आलिंगिला दशमौळें ॥ ४६ ॥ शत्रूसीं संग्रामीं जयो पावला । म्हणोनि वैदिक मंत्रीं कल्याणविला, । बहुत ते काळीं त्यागु दिधला । याचकवृंदिकरांसि. ॥ ४७ ॥ इंद्रजित म्हणे, " पितृराया, । देहा वाचू शकेल ठाया, । भृगोदकें मेरु जाये विलया, । तैं मज पराजयो. ॥ ४८ ॥ तुझे शत्रु जे रामलक्ष्मण, । नागपाशीं बांधले दोघेजण. । असमर्याद वृक्षमृगगण । ते शरजाळें खिळिले. ॥ ४९ ॥ त्याच्या शोणिताच्या सरिता । जालिया सागरीं मिश्रिता । आता तुम्हीं सांडावी शत्रूची चिंता, । शेष जैंगता सांडी जैसी. ॥ ५० ॥ ऐसें आत्म-जुशब्दाचेनि श्रवणें । आनंदें ब्रह्मांड भरिलें तेणें रावणें. । आपुलिये आंगींचीं भूषणें । लेवविलीं ज्येष्ठ पुत्रासि. ॥ ५१ ॥ दशानन म्हणे, " पुत्रोत्तमा, । प्राप्त जालासि युद्धीं श्रमा. । आता जाऊनिया, गुणग्रामा, । नाना भोग अनुभवीं " ॥ ५२ ॥ ऐसी राजाज्ञा जाउियानरि । इंद्रजित प्रवेशला निज मंदिरीं. । आनंदमय लंकापुरी. । पताका तोरणें उभविलीं. ॥ ५३ ॥ दिवसा अंतीं जालिया रजनी । निरखी सौंदर्य बाणें गगनीं, । तैसी सुशोभित राजधानी । दिसे शत्रूसि जिंतिल्या. ॥ ५४ ॥

१. अ. निजगृहा जावें.

राजा चितारहित तेणें आनंदें. । दश दिशा संपूर्ण वाघनादें. । जैशीं विकासलीं अरविंदें, । तैशी ग्रामस्थां सुखी कळा. ॥ १५ ॥ इतकें कथन जालियावरी । लंकेश मंत्रियांतें विचारी. । " शत्रु साभावले रणचत्वरीं, । सीतेचें सत्व शोधूं, " म्हणे. ॥ १६ ॥ इति श्रीयुद्धकांडरामायण । वाल्मीकिवाक्यनिरोपण; । महाराष्ट्रपद्यांतरीं करा हो श्रवण। कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ १७ ॥

## प्रसंग विसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः ॥ श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ त्रिजटानाम निशाचरी । रक्षण जेथें रामाची अंतुरी, । ते गुणसमुद्रींची लहरी । रावणें बोलाविली. ॥ १ ॥ तीस रावण म्हणे, "वो त्रिजटे, । प्रगल्भांमधें महा श्रेष्टे, । रामापासाव सीतेचें चित्त विटे । ऐसें करी शीघ्रकाळें. ॥ २ ॥ विदेहरायाची नंदिनी । तीस बैसवीं पुष्पकविमानीं. । महा घोर रणमेदिनी । दाखवीं तिचिया नेत्रीं. ॥ ३ ॥ राजपुत्र रामलक्ष्मण । नागपाशीं पडले दोघेजण. । संज्ञेरहित लतामृग जाण । विदेहदशा पावले. " ॥ ४ ॥ ऐसें उपदेशिलें दशग्रीवें. । त्रिजटा उत्तर दे, म्हणे, 'बरवें.' । रायाचेनि मतें लागे वर्तावें, । ऐसें कल्पूनि निघाली. ॥ ५ ॥ मग आली जानकीजवळी. । तीस पुसे रामकांता मैथिली. । म्हणे, " काय वृत्तांतु सभामंडळीं । वर्तला, तो सांग आम्हां. " ॥ ६ ॥ त्रिजटा म्हणे, " वो राघवप्रिये, । शंकारहित असें, वो माये. । राजाज्ञेस्तव, सत्वागळिये, । रणभूमीस पाहों चाल. ॥ ७ ॥ तुज अनहित चिंतीं, वो सुदरी, । तरि वज्र पडो माझे शरीरीं । । चिंता, क्लेश हृदयीं न धरीं, । बैस पुष्पकविमानीं." ॥ ८ ॥ मग त्रिजटेस म्हणे जानकी, । " तुजतुल्य पतिव्रता नाहीं त्रैलोक्यीं. । त्रिवेणी गंगा तूझिये मस्तकीं । जटारूपें राहिल्या. ॥ ९ ॥ म्हणौनि त्रिजटा साचार. । त्रिवेणीयुक्त तुझें शरीर. । तुझेनि दरुशणें महाघोर । पाप तत्काळ जाये. ॥ १० ॥ मज रघुनाथाचेनि वियोगें ।

---

१. क. राजा चितारहित आनंद तेणें. । दशदिशा संपूर्ण तेणें गुणें. । जैसीं विकासलीं कुमुदवनें, । तैसी ग्रामस्थाचे सुखी कळा. २. अ. पदोत्तरीं. ३. अ. तियेचा डोळा. ४. क. वर्तो लागावें. ५. अ. चिंतन जरि.

निमिष जातें, जैसीं युगें; । परि कठिण काळ तुझेंनि संगें । किती येक क्रमिला; ॥ ११ ॥ सुधारस जरि कडुवटे, । क्षीरनिधि तो तुंबळ विटे, । तरिच तुझी कृपादृष्टि पालटे । मजवरूनि, सखिये ". ॥ १२ ॥ ऐसीं ते जानकीचीं उत्तरें, । चंद्रकळा सांडूनि मधुरें. । मग त्रिजटेनें धरूनि कृपाकरें । उठविलें जानकीसि. ॥ १३ ॥ मग अंचलें झाडूनि पाउलें सीतेसि विमानीं बैसविलें. । तेचि क्षणीं पुष्पक उचाविलें । पृथ्वीपासाव आकाशीं. ॥ १४ ॥ अतिगुणगंभीर पुष्पकीं । दोघीच बैसल्या त्रिजटा, जानकी. । पद्माक्षी रणमंडळ अवलोकी, । तव देखिलें भयंकर. ॥ १५ ॥ पादप पृथ्वीवरि उन्मूळले, । तैसे कोटींच्या कोटि वीर पडिले. । सर्वांगीं भग्नदशा पावले । कपि आणि निशाचर. ॥ १६ ॥ असंख्यात शिरपद्मा-चिया ढाखोळिया । भूलिंगाप्ति वीरीं वाहिलिया. । काय कारण, तरी पावावया । सर्व सुखाचे अधिकार. ॥ १७ ॥ वनस्पतींचें जालें खंडण, । तैसे तुटोनि पडले करचरण. । महार्ण घोर पडिलें रण. । बीभत्स निस्ता-रळा. ॥ १८ ॥ ऐसा संग्राम जाला अद्भुत. । वीर पडले सत्येरहित. । तेथें कबंधाचें करिता गणित, । पडिले किती सागानें[१] ॥ १९ ॥ येकाचीं फुटलीं घायें कपाळें, । येकाचीं माजाडें, वक्षस्थळें, । येकाचीं तुटोनि पडलीं सिसाळें, । मोडोनि निदारिलीं. ॥ २० ॥ येक विदारले जानू, गुडघे, घोटीं, । येक हीन जाले मुडपीं, मणगटीं, । घाय लागोनि येकाचे पोटीं । मासमाळा निघालिया. ॥ २१ ॥ कितियेक चौरंग आले, । कितियेकाचे कोथळ फुटले, । कितियेक चिरूनि उघडले । येकयेकाचेनि हस्तें. ॥ २२ ॥ ऐसे कपि आणि निशाचर । प्रेतें होऊनि पडले अपार. । कितियेक घाईं जाले जर्जर, । परि प्राण असती. ॥ २३ ॥ जिवत जर्जर आहाळती दु:खें, । नेत्र फिरविती पसरिती मुखें, । येक प्राण गेलिया नि:शेखें । निश्चळ पडिले. ॥ २४ ॥ येक करचरण खोडिती, । येक दंतें भूमीस डसती, । येक हुंकारवोषें हुंवती, । येक वमिती अशुद्धें, ॥ २५ ॥ येकाचीं शिरें तुटोनि पडलीं, । तीं येकाच्या धडीं निगुती जडलीं, । ऐसी विलक्षण दशा प्राप्त जाली । वानरराक्षसातें. ॥ २६ ॥

---

१. अ. येकाचीं निवटलीं कडजाळें. २ अ. सुरहिता.

रजनीचराचीं पडलीं रुंडें, । तेथें लागलीं लतामृगाचीं मुंडें, । अश्वमुखें गजमुखें, उदडें । पडलीं प्रेतें रणागणीं. ॥ २७ ॥ ऐसें भयानक मांडलें भूमंडळ. । तेथें वाहती शोणिताचे खळाळ, । तेणें नदी जाल्या तुंबळ, । समुद्रासि मिळाल्या. ॥ २८ ॥ या सरिताचीं उभयें तीरें । दिसती अद्भुतें, त्यकरें, । खळाळें गर्जती रुधिरें, । तुबळ वाहती पूर. ॥ २९ ॥ तया सरिताची खोटी । कुंजर बुडती इतुकी जाली । तेथें प्रेतें फुगोनि वाहों लागलीं । राक्षसवानराचीं. ॥ ३० ॥ असती अंगीं लोहाचे पंजर, । तैसेच भेदता पडिले वीर, । तेचि त्या नदीचा पोटीं साचार । मत्स्यरूप भाविले ॥ ३१ ॥ कुंजराचीं जेथें रुंडें, मुंडें, । तेंचि तें नाडे सावजें रचडें, । खेटकें तरती उदडे । तेंचि पृष्ठी कूर्माच्या ॥ ३२ ॥ वीराचे बाहु तुटले सरळे, । तेचि पचफणी सर्प निरोळे, । माजी पडले पिंचाचे गुडाळे, । तेचि शेवाळ बहुवस. ॥ ३३ ॥ कबरीभाराचे ल्वे, तृण, । वाळुगा दंताचें निखुरण, । कर्दमा उपमा दीजे कवण? । तरि मेदमास वरटी. ॥ ३४ ॥ रथसैंाट जाले असती चूर्ण, । वृक्ष, धनुष्य, भातडिया, वाण । तेचि तरग, वाहे वोसाण । नदीचेनि प्रवाहें ॥ ३५ ॥ ऐसिया सरिताचें कोण पा जळ? । तरि अशुद्ध वाहे तुंबळ. । लोटें गर्जती खळाळ, । सागरीं संगम जाले. ॥ ३६ ॥ प्रेतें वाहती रणनदीचा पोटीं, । फुगलीं दिसती जेशा शैल्यपृष्ठीं. । ऐसें जालिया वरिलें तटीं । शोणित गाठों लागलें. ॥ ३७ ॥ अशुद्ध वाधा लागलें जळु । मग प्रवाह आवरे हळूहळू. । जात होता वोसाणा कल्लोळु । तो मदत्व पावला. ॥ ३८ ॥ त्या महापूराचा वोहँटीं । बैसली भयानक वरटी । प्रेतें खिरडत होतीं काठीं । स्थिरोनि वेटें जालीं. ॥ ३९ ॥ ऐसें तें रणागण भयानक. । नाम त्याचें महावीरांतक. । तेथे मीनले महाभक्षक । असंख्यात ते काळीं. ॥ ४० ॥ रानश्वानें क्रव्यादें, । जबुंक, शशक, भालुका, गिधें, । आणिक नाना अप्रसिद्धें । पावलीं रणामध्यें. ॥ ४१ ॥ नाना जातींचीं श्वापदें । कराळ निकाळ, चतुष्पदें. । विदारिलें मास भक्षिती आल्हादें, । शानेशें क्षुधाक्रांतें. ॥ ४२ ॥ वीराचे भुज धरूनि चचुवे । उडती रणगिधाचे

१ अ माणलें. २ अ. विरळे ३. अ. साटे. ४. ख पोटीं ५ अ जळुक

मेळाये. । प्रेतांवरि बैसोनि डोळ्यांचे थोंबे । विदारिती त्वचा. ॥ ४३ ॥ तीक्ष्ण वायसांचीं चंचुपुटें, । तोडिती बैसोनि प्रेतांचीं पोटें, । उलथूनि विदारिती वीरमांस सदटें; । गोमायु, शृगाळ भक्षिती. ॥ ४४ ॥ तंव अकस्मात तेचि काळीं । पातली आठ कोटी भूतावळी; । तेणें वाणली रणमंडळी । बीभत्सरूपेंकरूनियां. ॥ ४५ ॥ नुसदेया सिसांचे वेताळ; । कराळ मुंडांचे कंकाळ; । बाळग्रह भीम कुश्चळ; । ग्रहाग्रह वेगळे; ॥ ४६ ॥ स्मशानस्तंभ, अनेक प्रेतांग, । वंठे, कराळ काकटे, झोटिंग, । भैरव, भयानक ग्रहरोग; । वितंड बीभत्सरूपी, ॥ ४७ ॥ खांबा, जाखिणी, जळनिवासिनी, । चौखिया, मौळियाँ, मानविणी । खेचरा, किणकिणिता, योगिनी, । जिव्हा ळ्याळित पातल्या. ॥ ४८ ॥ ऐसीं नामांकित प्रसिद्धें भूतें । रणामध्यें आलीं धांवतें; । तें सागतां बीभत्सें बहुतें; । भक्ष् लागली ते काळीं. ॥ ४९ ॥ तोडिती वीरांगांचे गोळे, । तेथूनि थबथबां रक्त गळे. । मुखीं घालूनियां गिळिती सगळे, । दंत न लाविती कोठें. ॥ ५० ॥ कंठीं रोंवूनिया तीक्ष्ण दशन । करिती स्रवतरुधिरपान. । जितुकें मेदमांसाचें स्थान । तितुकें तोडूनियां घेती. ॥ ५१ ॥ इक्षुदंडाची पाकनिष्पत्ति । कडू मानिती ते काळीं भूतीं. । आपुली इच्छा भक्षिती, । कंठमर्यादा होवसे. ॥ ५२ ॥ उदरें फोडूनि काहाडिती माळा. । घेती शोधूनि काळिजाच्या कवळा. । कर्णनासिकागंडस्थळा । झोंबती आविशें. ॥ ५३ ॥ शेनाळ्या तुल्य निर्ळी पित्तें । मुखीं घालिती थबथबितें. । अस्थींचें पीठ करिती दांतें; । चघळिती केसें ? ॥ ५४ ॥ ऐसें वीरमांस परवडी । भक्षिती भूतगण आवडी. । नाना रुचीची गोडी । मानिती जालीं कैसीं ? ॥ ५५ ॥ उदंड रणीं देखोनियां खाजें । आनंदें भूतें नाचती मोजें. । म्हणती, "कृपा केली रघुराजें । बहुत काळाउपरि. ॥ ५६ ॥ पूर्वी भार्गवें रणपंडितें । घातुणेर केला आमुतें; । तयाचिपरी जानकीकांतें । इच्छाभोजन दीधलें. ॥ ५७ ॥ म्हणऊनि रघुनाथाचेनि प्रसादें । आजि बहुत भक्षा, रे, मांसमेदें. " । ऐसें बोलती आनंदें । भूतगण परस्परें. ॥ ५८ ॥ येक म्हणती, " ये अवसरीं । जो मांस भक्षीना पोटभरि, । तो वंचला जाण जन्मवरि । महा अभाग्यवंतु."

१. अ. सांडिगे. २. अ. थड्. ३. अ. मेळिया. ४. अ. नवीनी.

॥ ५९ ॥ तंव येक म्हणती, " बहुसाळ । रण पडलें सागरतुल्य. । तुम्ही समग्र भक्षाल,। हें न घडे सर्वथा." ॥ ६० ॥ येक बोलती येकांकडे. । म्हणती, "त्रासलों, रे,तुमचिया वडवडे। कवळ घालितां मुखीं अंतर पडे,। मौनमुद्रेसी सेवा. ॥ ६१ ॥ सर्वांतें होईल संपूर्ण धणी; । मग सुखें क्रीडा करूं रणांगणीं. " । ऐसें बोलूनियां भूतगणीं । आवेशें भक्ष्य भक्षिजे. ॥ ६२ ॥ महा अश्व, गज, वीर पडिले, । तितुके भूतीं निर्मांस केले. । मग अस्थींचें फोडूं आरंभिलें। पूर्ण प्रचंड कांडोरें. ॥ ६३ ॥ ऐसी भक्षितां भूतें धालीं; । उदक म्हणऊनियां अशुद्धें प्यालीं; । मग आनंदशद्धें गर्जलीं, । " जयजय रघुराज, " म्हणौनि. ॥ ६४ ॥ असंख्यात रण पडिलें. । भूतांसि भक्षितां अल्पचि वेंचलें. । वरकड तैसेंचि संचलें । सिंधुतुल्य भयानक. ॥ ६५ ॥ निराळीं पुष्पकविमानीं । बैसली असे जनकनंदिनी. । रणमंडळ पाहतां थोर मनीं । भयचकित जाली. ॥ ६६ ॥ म्हणे, " त्रिजटे, हें कैसें अद्भुत ! । कपिराक्षस पडिले असंख्यात. । मेद, मांस, अत्यंत शोणित । पृथ्वीवरि तुंबळलें. ॥ ६७ ॥ दिसे अति बीभत्स भूमिका. । भग्नदशा पावली वानरकटका. । कवणी स्थिति रघुनायका । तें दाखवीं, त्रिजटे. " ॥ ६८ ॥ मग त्रिजटा ते अवसरीं, । सीतेसि धरूनियां करीं, । म्हणे, " शंका सांडीं, वो सुंदरी, । धैर्य अवलंबीं. ॥ ६९ ॥ रामलक्ष्मण ते रणरगीं । दोघे परिवेष्टित भुजगीं." । त्रिजटा म्हणे " जानकीलागीं, । " अवलोकीं महावीर." ॥७०॥ सादर वैदेही सीता न्याहळी, । तव दाशरथी देखिले सर्पजाळीं, । जैसे निधान कुंभ त्यावरि वेंटाळी । विखारांची असती, ॥ ७१ ॥ कीं चंदनतरूचे सर्वांगीं । वेढे घातले महानागीं, । तैसे दिसती रणरगीं । रामलक्ष्मणादिक. ॥ ७२ ॥ हळाहळधरें आणि रघूत्तमें । परस्परें स्मरिजे प्रेमें; । म्हणऊनि काये तेणें संभ्रमें । शिवभूषणें जडलीं ? ॥ ७३ ॥ कीं लक्ष्मण शेषाचा अवतार, । आणि शेष सर्पांचा ईश्वर, । म्हणऊनि भेटी आला नागभार । सौमित्रालागीं ? ॥ ७४ ॥ ऐसें देखोनि अकस्मात । सीता उलंडली येथाभूत. । मग त्रिजटेनें केलें सावचित्त. । म्हणे, " भय धरूं नको, माये. ॥ ७५ ॥ तूं विदेहरायाची नंदिनी । परी अत्यंत मोह

---

१. अ. वीर मूर्च्छा पावले कोक.

धरिसी मनीं. । शिखा निघाली अग्नीपासूनि । ते शीतळ होये. हे अपूर्व. ॥ ७६ ॥ वज्रा आगींची वज्रधार, । ते केसेनि होये सुकुमार? । विषद्रुमाचें फळ मधुर । कैसें जालें ये काळीं? ॥ ७७ ॥ सीते, तुझें वैभव ऐकिलें; । जेणें चापें रावणमहत्व भंगलें, । तें, वो, तुवा खेळणें केलें । घोडियाचेनि पाडें. ॥ ७८ ॥ येवढें तुझें शक्तिधैर्यबळ, । तें आजि कोठें ठेविलें सकळ? । [1]धीरोदात्तप्रिया तू केवळ । मोहसिंधूची लहरी. ॥ ७९ ॥ सीते, तुज धैर्याची फळप्राप्ति, । ऐसी विश्वतोमुखी वदती. " । हें वचन ऐकोनि गुणवती । बोलती झाली पुढें. ॥ ८० ॥ म्हणे, " ऐक, मित्रे त्रिजटे. । मज मानसीं अति व्यथा वाटे. । तूं बोलसी बोल गोमटे । मृगजळासारिखे ॥ ८१ ॥ माझे देर, भ्रतार दोघे जण, । कुळसूर्यदशारथ, सुलक्षण, । करूनि रणभूमीचें आथरण । निद्राभूत झाले कैसे? ॥ ८२ ॥ कमळिणीतंतुनें गज बांधिले, । कीं सिंह तृणफाशीं पडले, । अग्नि, सूर्यो दोघे आतुडले । [2]खद्योतदळामध्यें. ॥ ८३ ॥ त्यातें हे दशा प्राप्त जाली, । माझी सामुद्रिक खोळ खचली; । भाग्यश्रीसरिता वोहटली । एक सरिसी आजि; ॥ ८४ ॥ मनोरथाचा मेरु खचला; । उत्साहाचा द्रुम उन्मळला; । सर्व सुखाचा ग्राम बुडाला । शोकसागरामध्यें. ॥ ८५ ॥ आता वैधव्य मज ठाकूनि आलें; । कल्याणैंवि हें मावळलें. " ॥ तव त्रिजटा म्हणे, " काये, वो, जालें? । अमंगळ बोलों नको. ॥ ८६ ॥ रामसौमित्राचीं मुखें पाहें. । इंद्रियाचें पाटव्य अधिक आहे. । यासि भय कैचें? उगी राहें, । नको शिणू हृदयामध्यें. ॥ ८७ ॥ अज्ञानतुरगोदकाचा पूर । तेथें बुडे ज्ञानलक्षण तारू, । तरि तुझे देर आणि भ्रतारु । विपरीत दशा पावती. ॥ ८८ ॥ रावणासि पराभव देखसी दृष्टीं; । परि हें मिथ्या, जैसी स्वप्नसृष्टि, । तू धैर्य साठवीं हृदयसंपुटीं, । मोह तोडीं विवेकखड्गें. ॥ ८९ ॥ आणिक येक चमत्कार, राजसे. । हें ये पुष्पकीं अनचट वैसे, । त्याचें पुढें महा विघ्न नाशे, । हें अनुभवीं जाणसी. " ॥ ९० ॥ जानकी म्हणे त्रिजटेतें, । " पूर्वी हें पुष्पक कवणा प्राप्त होतें? [3] । पुनरपि त्रिजटा सांगे उचितें, । " ऐक, शुभाननें. ॥ ९१ ॥ हिरण्याक्ष जो शंकराचा भाडारी, । तो वैसे

१. अ. धीरोत्तम. २. अ. दाघे वीर बुडाले । खद्योदजळामध्यें. ३. अ. कल्पनातिव.

या विमानवरि. । रावणा प्राप्त जाले त्याउपरि । चंद्रचूडभजनास्तव. ॥ ९२ ॥ त्रिलोचनाचे वरदबळें । रावणा वाणलें वैभव आगळें; । परि त्या कर्माचें फळ वेगळें । राणीव कळसा आली. ॥ ९३ ॥ भस्मासुरें कापट्यें, दुर्मती, । प्रसन्न केला भोळा चक्रवर्ती. । मग पार्वतीअभिलाषा अंतीं । शंकरामागें लागला. ॥ ९४ ॥ पुढें तया भस्मासुरातें । माया निर्माण केली भगवंतें. । तो भस्म केला त्याचेनि हस्तें, । ऐसें आइकें, सीते. ॥ ९५ ॥ तयाचपरी, जानकिये, जाण. । होईल रावणाचें संहारण, । कपिकटकेसीं रामलक्ष्मण । जयो पावती हें सत्य.॥ ९६ ॥ आतां, सीते, मोहो मानसीचा सांडीं. । विपरीत चिंता सर्वथा खंडीं. । काकुत्स्थासि हारि, तरि अग्निकुंडीं । मी कांष्टें मक्षीन, माये. ॥ ९७ ॥ पायांची गति जाली निकी, । परि ते कैसे वावरतील मस्तकीं ? । रावणाचें बळ गाढें त्रैलोक्यीं; । रामातें जिंकी, हें मिथ्या. ॥ ९८ ॥ राम, नरवीरचूडामणि, । उठोनि राक्षस वधील वाणीं. । तुज भेटेल क्षेमें, हे वाणी । माझी वेदातुल्य. ॥ ९९ ॥ चिंता दवडूनि दिगांतरीं । चाल आतां येथोनि सुंदरी. " । आभारूनि येरी । बोलती जाली सीता. ॥ १०० ॥ म्हणे, " प्राप्त जालें विपवल्लीननस्थळ, । माजी क्षुधा पीडिल्या जोडे अमृतफळ; । तैसें जालें, त्रिजटे, केवळ । तुझेनि स्नेहवादें. ॥ १ ॥ बुडतां शोकाच्या महापूरीं । तूं मित्रनौका प्राप्त या अवसरीं. " । परिसोनि त्रिजटा म्हणे, " सुंदरी, । स्तुति सांडीं माझी. ॥ २ ॥ म्यां तुजकारणें काय केला उपकारु ? । काय दाखविला सुखाचा सागरु ? । कीं तुज क्षेमें भेटविला रघुवीरु, । कीं म्यां सिसें वोवाळिलीसि ? ॥ ३ ॥ कामधेनूचा मनोरथ वोजा । काय पूर्ण करूं शके अजा ? । कीं लक्ष्मीलागीं रंकाची भाजा । सुप्रसन्न होईल ? ॥ ४ ॥ का हिंसकाची कामारी । जान्हवीलागीं पवित्र करी ? । कीं पुलकांकित कल्पतरूची । काये फुलौरा वाढेल ? ॥ ५ ॥ म्हणोनि मी आणि जानकिये । उपकार करीन, हें न घडे, माये. । आतां तुझे महिमेनें, सये, । उठती रामलक्ष्मण." ॥६॥ ऐसें आपुलेनि अमृतबोलें । जानकीचें हृदय निववीलें. । तव पुष्पक अकस्मात गेलें । अशोकवाटिकेमध्यें. ॥ ७ ॥ मग त्रिजटा ते काळीं । वार्ता सांगे रावणाजवळीं. । पुनरपि आली जेथें मैथिळी. । रक्षणसुखें राहिली. ॥ ८ ॥ इति श्रीयुद्ध-

कांडरामायण । वाल्मीकिकृत निरोपण; । तें, सुजनहो, करावें श्रवण, ।
कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ १०९ ॥

## प्रसंग एकविसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । धन्य, तियें रम्य राघवचरित्रें, । विस्तारलीं वाल्मीकिवक्त्रें । तया कथारसालागीं कर्णपात्रें । सुजनीं वोडवावीं. ॥ १ ॥ भवसिंधु तरावयालागीं । येकुचि उपावो कलियुगीं. । हरिकथाकीर्तन, जगीं । दुसरें नाहीं सर्वथा. ॥ २ ॥ परमेश्वरभजन करावें, । ऐसें बहुतेकांसि कैंचें ठावें ? । पूर्वदत्तास्तव कृपा कीजिल देवें । तरिचि सत्वगुण जोडे. ॥ ३ ॥ असो, इतुकी जाली पूर्वकथा. । चित्त दीजे अग्रश्लोकार्था. । रामकटकासि करूनि व्यथा । इंद्रजितु गेला असे. ॥ ४ ॥ रामलक्ष्मण पन्नगपंजरीं । असतां, किष्किंधेश्वरु शोकु करी. । तयासि विवेकाचा उत्तरीं । संबोधिलें बिभीषणें. ॥ ५ ॥ पुनरपि बिभीषणु म्हणे, । "बैसलेति काय केविलवाणे ? । वीरहो, धरा आगवणे, । सांडूं नका धैर्य. ॥ ६ ॥ महाबळिये तुम्ही वीर. । पायें पाडूं सकां अंबर. । येकवटतां सप्त सागर । आंवराळ सुजावळे. ॥ ७ ॥ तुमचे उभारले चपेट । देखोनि उलों पाहे भूपीट, । पर्वत होऊनि येकवट । पाताळीं जावों म्हणती. ॥ ८ ॥ तुमचें बळ जाणितलें रघुनाथें, । म्हणौनि साह्य आणितिलें येथें; । आतां तुम्ही स्वपुरुषार्थें । हित करा स्वामीचें. ॥ ९ ॥ राक्षसमाया बहुत, । अरिष्ट करिती अकस्मातः । आकाशींहूनि टाकिती पर्वत । रामलक्ष्मणांवरि." ॥ १० ॥ ऐसें बिभीषणाचेनि बोलें । कपिआंगीं बळ उचंबळलें. । मग बिभीषणासि दिधलें । उत्तर वानरनाथें. ॥ ११ ॥ "जनळीं प्रदीप्त वैश्वानरु । तरि काय करील अंधकारु ? । तुंबळेला आहे तरती सागरु । स्तमाधारें. ॥ १२ ॥ रघूत्तमाच्या कार्याकारणें । येथें प्लवंगमां जालें येणें; । परि, गा, तुझेनि मित्रपणें । दुष्कर वाटत नाहीं. ॥ १३ ॥ बिभीषणा, तूं मित्रचूडामणि. । समयो सिद्धी न्यावा, गदापाणि. । कोण वीर पडले, कोठें, रणीं । तें शोधन केलें पाहिजे." ॥ १४ ॥ तंव बिभीषण म्हणे, " किष्किंधापति, । देखेंचि वाटे माझा चिती; । परि रामा, सौमित्रा हे गति, । सांडोनि कैसें

जावें "१ ॥ १५ ॥ कपींद्र पुडती दे प्रत्युत्तर. । " मी बैसलासें येथें सादर: तंव तुम्हीं शोधूनि रणचत्वार । शीघ्र यावें." ॥ १६ ॥ तेचि क्षणीं वानरवीरें लांगूलें वाइलीं अंबरीं । येलेंकरूनि रामसौमित्रांवरि । मंडपजाळें केलीं. ॥१७ चौघां प्रधानांचेनि संगें । बिभीषणु निघाला वातवेगें. । मारुतातें सांडी मागें । रण शोधितु चाले. ॥ १८ ॥ नाना पडलें रण तो सागरु, बिभीषणु तोचि तारूं, । जीवंतां वीरांचें केणें भरूं । जातसे सैरावैर ॥ १९ ॥ उन्मळले दीर्घ तरुवर, । तैसे पडले महावीर. । सर्वांगीं चाचें रुधिर, । घायीं जर्जर जाले. ॥ २० ॥ पडलियांचां देहीं दशा ठाकली, जैसीं शोणितसागरीं स्नानें केलीं. । एकांचीं शरीरें घायीं उलली, । जैस गिरिशृंगीं दरी. ॥ २१ ॥ बहुत पडले भोगित व्यथे, । एक एकांत उताणे पालथे; । एक भूमीसि टेंकीत माथे । भेटें मारूनि डुंबती. ॥ २२ एक खैरडिती करचरण, । एकांचे निःशेष गेले प्राण, । एक सर्वांग असती चूर्ण, । मेदमास पसरलें. ॥ २३ ॥ ऐसें देखोनि रणसागरीं बिभीषणु काय करी? । सांभाळाची भरोवरी । सर्वांसि दाखविता जाल ॥ २४ ॥ एकांचे उजू करी पाय, हस्त; । एकां सारिसें बैसवी मूर्छागत; एक दुःखें असती डुबंत, । त्यांतें आश्वासितु. ॥ २५ ॥ सोएँतें सजवी भंगले यांतें. । सावध होती त्यांसि घे सांगातें. । एक जाले निःशेष प्रेतें । ते सांडूनि पुढें शोधितु. ॥ २६ ॥ पडले देखोनि नांवाणिगे । औषधि आणी म्हणौनि सांगे । एकातें म्हणे, " धैर्य धरा, उगे. । भयातें स्पर्शो नका. ॥ २७ ॥ वानर म्हणती, " गा, बिभीषणा, । कोण स्थिति रामल क्ष्मणां?" । तयांतें सांगे दोघा जणां । कल्याण जालें. ॥ २८ " अरे वानरहो, आइका. । सत्यवचनें ठेऊनि सांडा शंका. । जर सर्वथा रघुकुळटिळका । सेनेसहवर्तमान." ॥ २९ ॥ ऐसे बिभीषणाचे आतवादें । वानरां मानसीं माजलीं दोंदें. । जितुकेयांचीं वळें होतीं मदें, ते उळसती तिये काळीं. ॥ ३० ॥ पुढें बिभीषणु रणपंडितु । सर्वां हित करीत भ्रमतु; । वीरशोधन करितां जांबवंतु । देखिला व्यथाभूत ॥ ३१ ॥ अमरशत्रु तो रावणी; । तेणें जांबुवंत खिळिला बहुबाणीं.

---

१. अ. यत्नालागीं. २. अ. योजिला. ३. क. खोळिती ४. क. येणें सच करित

ते व्यथा अनुभवितु धरणी । पडलासे महावीर. ॥ ३२ ॥ पर्वता अंगीं तरुवर, । तैसे ऋक्षनाथाचां देहीं शर. । ऐसी दशा देखोनि थोर विभीषणु बोलता जाला. ॥ ३३ ॥ "अगा, ये जांबुवंता, ऋक्षराजा, भूमंडळीं वीराग्रजा, । सिंधुमथनीं तुझिया भुजा । क्लेश पावलिया नाहीं ॥ ३४ ॥ ऐसें तुझें पुरुषार्थपण । आम्हांसि जाळें परानें श्रवण. । ते आजि कोठें ठेऊनि, बाण । साहिले इंद्रजिताचे ?" ॥ ३५ । ऐसें विभीषण बोलोनि राहे, । तंव जांबुवंतु सावध पाहे. । म्हणे, "बैस गा मित्रा, स्नेहे । समर्थी दाखविला." ॥ ३६ ॥ मग विभीषणु म्हणे "ऋक्षनाथा, । धैर्य धरावें, सांडूनि व्यथा. । पडलिया महावीरांच्या च व्यथा, । त्यासि उपावो विचारीं. ॥ ३७ ॥ तूं बहुद्रष्टा, बहुकाळी, । बहुत तूं बहुतबळी, । बहु कपि पडले भूमंडळीं । बहुत प्रयत्नें रक्षीं.' ॥ ३८ ॥ जांबुवंतु म्हणे, "गा विभीषणा, । धर्मात्मया, रघुनाथपरायणा, तुझिये बुद्धीचा बोलणा । निश्चितार्थु बृहस्पतीचा. ॥ ३९ ॥ पौलस्तीसुतु रावणानुजु; । परि तुज बंधुत्वें मानी रघुराजु; । कपिवाहिनीचा दक्षिण भुजु । निर्माण जालासि. ॥ ४० ॥ आइकें; राक्षसकुळदीपका, । वैद्यि प्रकारु नाहीं ठाउका; । परि वैद्यु वानरांमध्यें निका । येकु सुषेणनामा ॥ ४१ ॥ तो जाणे सर्व औषधि. । उपचार करैल नाना बुद्धी. । परि हनुमंतु क्षेमें तरि सिद्धी । सुषेणमतें जाईल." ॥ ४२ ॥ विभीषण म्हणे "गा, ऋक्षराजा, । कल्याण असे मारुतात्मजा. । तम गिळूं शके रवितेजा, परि न क्षिणे बळ त्याचें." ॥ ४३ ॥ ऐसें बोलोनि विभीषणु । शीघ्र चालिला जेथें सुषेणु. । म्हणे. "वैद्यचूडामणि, प्राणु । रक्षीं कपिवाहिनीचा. ॥ ४४ । इंद्रजिताचेनि युद्धें वीर । जाले असती सर्वांगीं जर्जर; । आतां कल्यार पावती वानर, । ऐसें सांग शीघ्र." ॥ ४५ ॥ ऐसें विभीषणु बोलिलेयावरि सुषेणु उत्तर दे. म्हणे, "अवधारीं, । औषधि असती त्या दूरि । बहुसंख्य योजनें. ॥ ४६ ॥ उत्तरे क्षीरसिंधूचां तीरीं । द्रोणाचळ, चंद्राचळ महागिरी. । वल्ली असती त्यांचां पाठारीं । अमृतमय रसाळा. ॥ ४७ ॥ वी असती संग्रामीं आंगरणें, । परि त्या वल्लींची परीक्षा कोण्ही नेणे. । कट

१. क. बुद्धीचि बोलणा । यथार्थ बृहस्पति.

कांमध्यें कपित्रय जाणे: । कुमुदु, मैंदु, द्विविदु." ॥ ४८ ॥ बिभीषणु म्हणे, "वैद्यचूडामणि, । कपित्रय व्यथाभूतलें बाणीं." । सुषेणु सांगे, "गा गदापाणि, । एकु हनुमंतु जाईल. ॥ ४९ ॥ त्या अमृतवल्ली जरि प्राप्त होती, । तरि प्रेतें जालेयाचे प्राण येती. । जीवत धायवट उठती । हें अपूर्व नव्हे." ॥ ५० ॥ ऐसें सांगितलें सुषेणें. । तें सत्यत्वें घेतलें बिभीषणें. । म्हणे, "गा, तुझेनि ज्ञानें वाटे उणें । तुळिता विरिंचिअड हें. ॥ ५१ ॥ पहा, हो, रामाचेनि सन्निधानें । आलीं द्वीपोद्वीपींचीं रत्नें. । यथार्थ कपि आपुलेनि प्रयत्नें । नभ नखीं सांठविती. ॥ ५२ ॥ सावध करूनि त्या सुषेणातें, । बिभीषणें घेतलें सांगातें. । मग जेथें असिजे वैदेहीकांतें । तेथें येता जाला. ॥ ५३ ॥ कृपणें गृहीं निक्षेपिलें धन, । प्राप्त जालें निदेशगमन, । परि त्याचें ठेवियेपाशीं मन । उत्कंठित येतसे. ॥ ५४ ॥ बिभीषणु ऐसियापरी । रामापाशीं ये तिये अवसरीं. । महा वेगु देखौनि वानरीं । भय धरिलें हृदयीं. ॥ ५५ ॥ अति चंड, काळस्वरूपी, । हा इंद्रजितु आला पुनरपि; । मग तयाचेनि धाकें महाकपि । लवू पाहती भूमंडळ. ॥ ५६ ॥ सुटलेया झंजामारुत, । आटु मंरतसे द्रुमासि वहुत. । समुद्रलहरिया उचंबळत । तैसेंचि सेनेमध्यें. ॥ ५७ ॥ देखौनि सुग्रीवु अंगदातें पुसे. । "सेनासिंधु डहुळला दिसे." । अंगदु उत्तरीं म्हणे, "कैसें । जाणता नेणां, स्वामी ? ॥ ५८ ॥ मुख्य नरेंद्रातें ऐसी दशा, । म्हणौनि वाहिनीसि भ्रमे वळसा, । सर्वेंद्रियामध्यें नेत्रीं जैसा । कर्मव्यापि उदैला." ॥ ५९ ॥ ऐसें अंगद बोलों सरे, । तव बिभीषणु आला त्वरें. । कपिमंडळचक्षीं सुटले झरे, । म्लान मुखें सर्वांचीं. ॥ ६० ॥ महाबळिये येकवटले. । परस्परें सवोखील बैसले; । तव सुग्रीव सुषेणाप्रति बोले, । "आइकें, वैद्योत्तमा. ॥ ६१ ॥ जयाचेनि वक्र नेत्रें । निचेष्टित होती कृतांतगात्रें, । ते इये काळीं दिसती कृपापात्रें । रामलक्ष्मणादिक. ॥ ६२ ॥ जयाचिये आंघ्रीचीं फुलारें । सेवूनि शोभती विधातयाचीं शिरें, । तो अवनीसुतावर सर्पशरें । हे दशा पावला. ॥ ६३ ॥ बाळपणीं ज्याचिये वीरलक्ष्मीनें । देखौनि सत्व सांडिलें रेणुकासुतें, । तो हा रघूत्तमु इंद्रजितें । सर्पपाशीं बांधिला. ॥ ६४ ॥ अमो

आश्चर्य हें. सुषेणा, । तू वळनतु आणि वैद्य शाहणा. । आता येथोनि रामलक्ष्मणा । किष्किंधेसि नेई. ॥ ६५ ॥ उभयवर्गाची वरिया रीती । करावी उपचारसेनाप्रति, । तव मी रावणनेमाची कीर्ति । उद्धारूनि येईन. ॥ ६६ ॥ रावणु वधीन सहपरिवारीं, । बिभीषणु करीन लंकाधिकारी, । जानकीतें वाहूनि स्कंधावरि । भेटवीन रामासि. " ॥ ६७ ॥ ऐसें बोलिलें शाखामृगराजें, । तव उत्तर दीधलें मारुतात्मजें. । म्हणे, " वज्रधारा त्या अनुजें । कैसेनि खडण पावती ? ॥ ६८ ॥ नव्हाड दग्ध करिता वैश्वानरु । तो शमेल जडलेया दर्भपजरु, । तरिचि अपजय घेऊनियां रघुवीरु । अयोध्येसि जाईल. ॥ ६९ ॥ एके वदनीजाचेनि मारें । त्वती दशाननाचीं शिरें, । तें वरीनधार्वाण वैदेहीवरें । सत्र साडूनि जाइजैल. ॥ ७० ॥ आता, समग्र वीरहो, तुम्ही । वैसा पैयेसीं अतर्यामीं. " । तव अशरीरिणी बोलिली व्योमीं । " कल्याण काकुत्स्थासि. " ॥ ७१ ॥ ऐसें आकाशदेवता बोले, । आइकोनि अवघे आनदले, । तव रामें नेत्र उघडिले, । अवलोकिलें कपींतें. ॥ ७२ ॥ निचेष्टित निद्रा केली सौमित्रें, । दृष्टि उघडिली राजीवनेत्रें, । तें देखोनि कपिवक्त्रें । सुप्रसन्नें जालीं. ॥ ७३ ॥ जाळेया अमावास्येची निशी । कळारहित काळवडे शशी, । तें महादु:खें शोकु चकोरासि । प्राप्त होय जैसा. ॥ ७४ ॥ यावरि बीजेसि देखोनि चंद्ररेखा । सर्व चकोर पात्र होती सुखा. । ऐसी कळा चढली रामाचेया मुखा, । अति सतुष्ट शाखामृग. ॥ ७५ ॥ रघुनाथु सभवतें न्याहाळी, । तव बसले देखे वेष्टित वीर वळी, । जैसे मानससरोवराचा पाळीं । राजहस वैसले. ॥ ७६ ॥ पुढें रघुनाथु म्हणे, " गा, कपिनाथा, । आम्हानिमित्त पावलेति व्यथा. । तुम्हा उत्तीर्ण होइजे त्या अर्था । मी देखत नाहीं. ॥ ७७ ॥ मज साह्य जालासि बहुत बळें, । परी त्या कर्माचें कर्तव्य वेगळें । । आता सहवर्तमानकपिदळें । तुम्हीं किष्किंधेसि जाइजे. ॥ ७८ ॥ आम्हांसि दशा ऐसी प्राप्त. । अनिवार पाशीं जालों गुप्त. । देखोनि होतसा सतत, । दु:ख दुणावत असे. ॥ ७९ ॥ थोर पुरुषार्थु केला अंगदें । आणि गवयगवाक्षमदें, । सुषेणें, नळें, नीळें, कुमुदें, । बहुताचा सांगों किती ? ॥ ८० ॥ आता स्वइच्छेकरूनि ।

लंघा, जा, उत्तरमेदिनी. । आम्ही उभयवर्ग आहों इये स्थानीं, । पुढें होणार तें होईल. " ॥ ८१ ॥ ऐसी आइकौनि रामवचनें । दुखवलीं सर्वांचीं मनें. । मग सांडिते जाले नयनें । तोयाचे थेंबुटे. ॥ ८२ ॥ श्रीरामाचीं उदास उत्तरें । आइकौनि बोलिजे वानरेश्वरें. । म्हणे, " आत्मयारहित शरीरें । काय सुखें राहतील ? ॥ ८३ ॥ जीवन सांडूनि जळचर । सेविती शुष्कशैलपाठार, । तरि तुम्हांपासौनि जाती वानर । उत्तरदिशे उज. ॥ ८४ ॥ मेरूहूनि उंच महाथोरा । पुण्यराशी घडलिया वानरां, । मग तूं योगीश्वरांचेया ईश्वरा । स्वामित्वें जोडलासि. ॥ ८५ ॥ स्वामीसि विपरीत वेळा घडली, । तेथें जो सेवकु करी रणखळी, । त्याची रौरवीं बुडे कुळवल्ली । जंववरी हे शशिरवि. ॥ ८६ ॥ तुम्हांसि सांडूनि प्लवंगम जाती, । ऐसें नेघडे, जी, कल्पांतीं. । आतां आमुचिये भाग्यगती । शीघ्र तुम्हीं उठावें. " ॥ ८७ ॥ ऐसे सुग्रीवाचेनि बोलें । नरेंद्राचें मन आनंदलें. । मग लक्ष्मणाकडे पाहिलें । तंव अचेतनु देखिला. ॥ ८८ ॥ " म्हणे, पहा, हो, कर्माचें करणें । । कोण दशा धरिली लक्ष्मणें ! । समागमें होतों तिघें जणें । तिघें विघडलों निमार्गी. " ॥ ८९ ॥ करुणागर्भ रामाचें बोलणें, । आहाळती सर्वांचीं अंतःकरणें. । ऐसें असतां बिभीषणें । अनुवाद केला. ॥ ९० ॥ " इच्छा सृष्टी, इच्छा संहारु, । तो हा ऐसा आजि रघुवीरु; । तरि माझे मनोरथाचा मेरु । काय खचों पाहतो ? " ॥ ९१ ॥ बिभीषणा करुणावचनीं । म्लानदशा दिसे वदनीं. । तयातें सुग्रीवु म्हणे, " गा, मनीं । धैर्य धरीं, सखया. " ॥ ९२ ॥ ऐसे सर्व शोकाचां अगाधीं । पडले, ज्यांची गुरुतुल्य बुद्धि. । ऐसें देखौनि कृपानिधि । गुप्त वायु आला. ॥ ९३ ॥ हळूचि बोले रामकर्णी. । म्हणे, " हें काय, गा नरचूडामणि ! । परब्रह्मरूप सांडूनि । करणी अज्ञानाची ! ॥ ९४ ॥ तूं आत्मारामु, गुनस्थेश्वरु; । धरिला कार्याकारण अवतारु; । ज्ञानपक्षीं मूळ विचारु । आपुला आपण करीं. ॥ ९५ ॥ तुम्हीं ऐसी धरिली हे दशा, । कपिसेने आंतु भ्रमे वळसा. । पुढें कार्य थोर असे, रणकर्कशा, । उठीं उठीं, भगवंता. " ॥ ९६ ॥ मग हनुमंतपितृनें काय केलें ? । गरुडास्त्र रामासि उपदेशिलें. । तें राव-

---

१. अ. रणखाली.

णारि जपे, तें जाणवलें । त्या सर्पशत्रूलागीं. ॥ ९७ ॥ म्हणे, "साह्येया स्वामीचेनि अवतारें, । कां पां मज स्मरिलें आदरें. ? । तरि जावों," म्हणौनि वळें थोरें । उड्डाण केलें आकाशीं. ॥ ९८ ॥ तया गरुडाचिये येतगती । पक्षवातें शैलशृंगें फुटती; । महावृक्ष उन्मळौनि भ्रमती । आकाशापकाशीं. ॥ ९९ ॥ हिमाद्रिमस्तकीं होता बैसला, । तो लंकेवरि निमिषांतु आला. । तात्काळ सर्पा पळु सुटला । पक्षघातगर्भरुनि. ॥ १०० ॥ श्रीरामलक्ष्मणांचां देहीं । रोमसंख्या लागले होते अहि; । ते तिये काळीं म्हणती, "मही, । ठावो देईं आम्हासि." ॥ १ ॥ मग विखार काद्रवेय पळाले; । एकु सिंधुजळीं रिघाले, । ते विरुळे होऊनि राहिले । अद्यापिवरि. ॥ २ ॥ देखौनि पृथ्वीचीं वोटमेगें । सर्प तयांमाजी रिघती वेगें. । म्हणती, "गरुडापासौनि वांचों भाग्यें । तरि नयों मागुते येथें." ॥ ३ ॥ ऐसे तुटौनि गेले नागपाश, । उठिले रामलक्ष्मण निर्दोष. । तें खगेश्वर वेऊनि यश । निजस्थानाप्रति गेला. ॥ ४ ॥ निद्रा केलेया दुष्ट स्वप्न दिसे, । तें जागृति जालिया नासे; । रामलक्ष्मणांचे तैसे । पाश प्रत्यक्ष जाले. ॥ ५ ॥ ऐसें अकस्मात जालें अपूर्व, । देखौनि आनंदले कपि सर्व. । भुभुःकार केला तेणें गर्व । भगले असुरशत्रूचे. ॥ ६ ॥ कल्याणवंतु जाला मुख्य स्वामी, । तेणें सेनेचा हर्ष न माये व्योमीं. । सर्व शाखामृग रणभूमीं । उभे, इच्छिती युद्धासि. ॥ ७ ॥ आतां मागुता संग्रामु महाथोर । करितील कपि आणि निशाचर; । पुनरपि माजैल रणचत्वार । मेदमांसें, शोणितें. ॥ ८ ॥ आतां श्रोतीयांचें मडळ । असावें सावधान, अचळ. । रघुनाथकथा क्षीराब्धि केवळ । प्राप्त जालेया सेविजे. ॥ ९ ॥ कथापीयूष करा श्रवण, । हें पुनः पुनः म्हणता आदरभण; । भ्रमरासि सांगेल कवण ? । जे 'कुसुमातें भोगीं' म्हणौनि. ॥ ११० ॥ दूरस्थें सरितांचीं जळें । त्यासि काय समुद्रें पाठविलीं मूळें ? । म्हणौनि पद्मिनांची चित्तें बळें । वोधाची लागती काय ? ॥ ११ ॥ चंदनशाळांचा पदरी । आलीं पुष्पें अति साजिरीं; । त्यांची प्राप्ति जाली, तरि चतुरीं । कां न भोगिजे ? ॥ १२ ॥ रसें तुंबळले इक्षुदंड गोड, । त्यांचे कांडवर्सा आले फळांचे घड; । ऐसीं अपूर्वता देखौनि मक्षावयाची चाट । कोण पां न धरी ? ॥ १३ ॥ मकरंदु मुक्तफळांचं

आंगीं । हा शब्दाचें अश्रुत त्रिजगीं; । ऐसेयाची प्राप्ति झालीसी; नें भोगी- । ऐसा कोण पां असे ? ॥ १४ ॥ रम्य रघुनाथचरित्र, । त्रैलोक्यतारक, परमपवित्र; । तें साहित्यशब्दीं कथिलें विचित्र, । तरि कोण पां नावडे ? ॥ १५ ॥ कवित्वसागराचां पोटीं । साहित्यरत्नाक्षरें गोमटीं; । त्यांतें चिरलें नदृष्टी । निवडूनि काढित्ती. ॥ १६ ॥ साहित्यअक्षरांचीं अंबुजें । तुरंगिनि नवरस नाचती भोजें; । तें कौतुक पहावया बीजें । चतुरीं कां पां नं रावें ? ॥ १७ ॥ इति श्रीयुद्धकांडकथामृत, । लोकोद्धारण वाल्मीकिकृत, । परिसावें करूनि सुचित्त, । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ ११८ ॥

---

## प्रसंग पांचविसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । निर्भ्र जालेया अवकाश व्योमीं । तेजःपुंज दिसे सहस्ररश्मि; । तैसा रघुराजु रणभूमी । उभा शोभतु. ॥ १ ॥ सिद्ध चाप करूनि मुष्टी, । अरिमथितें लक्षी क्रोधदृष्टी. । तिये काळीं रामाचेनि प्रतापें सृष्टी । उलढीं आगली तेजें. ॥ २ ॥ भरताग्रजा समीप दक्षिणे । ठाण मांडिलें भीम लक्ष्मणें. । तूणि पृष्ठीसीं पूर्ण बाणें, । करीं कोदंड धरिलें. ॥ ३ ॥ नरेंद्रा वामभागीं कपिराजु; । तेथेंचि असे तारात्मजु. । मैंद, सुषेणु, गवय, गजु, । हे इशान्य दिशे उभे. ॥ ४ ॥ नळु आणि वाहिनीपति । ऋक्षराजु, बिभीषणु, मारुती, । हे वीरवंत उभे असती । आग्नेय दिशे रायापाशीं- ॥ ५ ॥ लतामृग कोट्यानुकोटी । उदित उभे लक्षूनि त्रिकूटी. । क्रोधानळु कढे सर्वांचां पोटीं, । युद्ध इच्छिती पुनरपि. ॥६॥ ऐसें सर्व शाखामृगदळ । गगनाहूनि अति तुंबळ. । सिंहनाद केला तेणें दिग्मंडळ । संपूर्ण जालें ॥७॥ हरिसैन्यमध्यें आगळा, आवेशु. । रिपुभयाचा नाहीं स्वलेशु. । सर्वी मुखीं- हूनि निघाला घोषु, । तेणें लंका गजबजली. ॥ ८ ॥ नगरवासियांचां कर्णविवरीं । घुमारा भरला, थेमलीं टाळीं. । महावीरांचिया रोमावळि । उभारल्या पुलकातुल्य. ॥ ९ ॥ ऐसें वर्तलेया तिये अवसरीं । रक्षपाळ होते चहू द्वारीं, । तिहीं एक भीमरात्रपर्गे । पौलस्त्यां तेथें आले. ॥ १० ॥ उभे राहूनि मदद्वारीं । नृपति नमिला जोडलां करीं. । म्हणती, "यथार्थ,

राया, नरधारी. । वरी व्यथारहित जाणे. ॥ ११ ॥ तुटले दाशरथि या अतिनाळ, । हर्षे गर्जत कपिदळ, । आकाशीं झेलित पादप, शैळ दुर्गेनीं मारले." ॥ १२ ॥ ऐसीं आइकोनि दूतवचनें । मस्तक तुकिलें दशाननें. । पुत्रें जाळिलीं अरिलक्षणेंनें । तयें पार्ल्हजळीं केलेनि पा ॥ १३ ॥ मग रावणु प्रहस्तेसीं बोले. । "कोळमेयासि कोप सुटले, ते क्षणमात्रें नमचुनि जाळे, । ऐसे आटरिले इये काळीं. ॥ १४ । शचीपतींचेनि अमित्रें । वाणीं भेदिलीं हरिनरांचीं गात्रें. । सत्त्वरहितें, प्रेत दशापात्रें । होऊनि पडलीं. ॥ १५ ॥ फाळें गिळूनि उंगळिलें । तैसे पर दळ्यांगेस उठिले." । ऐसे आइकोनि दळपति बोले, । मंत्रिगणु जो श्रेष्ठ ॥ १६ ॥ "राया, बोल्ती. एक त्रिभुवनीं, । ब्रह्मांडीं बळिये सुधापानी. तुम्हीं त्यांचीं वैभवें हरूनि । दीनदशा दीधली. ॥ १७ ॥ ऐसा प्रताप तुमचा त्याचे रम्य । वागता आहाळती राजे सर्व भाम. । पहा पा वराह, शेष, कूर्म । भेणें तळीं बसले. ॥ १८ ॥ ऐसी तुमची पुरुषार्थकीर्ति । धरटी फरी दिग्मंडळा भरती, । तो नृ त्रिपुरविपुरपति । वरसवी वाकुरुथाचा. ॥ १९ ॥ राया मज आता कल्पनें हृदयीं, । रामें विचारूनि आपुल्या ठायीं । केली लंकेवरि कटकाई, । सागर शिळीं बांधोनि ॥ २० ॥ वानरीं प्रथमचि संग्रामीं । घोर मांनिली रणभूमी. । भंगोनि भंगिले पराक्रमी । सहये वेगळे पहा पा. ॥ २१ ॥ नागपाशीं बांधिलें इंद्रजितें । म्हणोनि जवळ्य न धरावें त्यातें. । भय सांडूनिया परतें । नैर्ऋत्यावरि चालिले. ॥ २२ ॥ आता ऐसें कीजे, भूपोत्तमा, । तयाप्रति पाठविजे संग्रामा । माझेनि मतें एकु धूम्राक्षनामा । वरी नष्टूनि येईल." ॥ २३ ॥ ऐसें प्रहस्ताचें बोलणें । रायासि मानलें शतगुणें. । धूम्राक्षकरें वैरी वधणें । हा निश्चयो केला. ॥ २४ ॥ मग त्रिदशेश्वरारि तिये काळीं । बोले धूम्राक्षासि सभामंडळीं । म्हणे, "तुझेनि प्रतापें तुझा मौळी । जयपूर्ण असे. ॥ २५ ॥ तरि आजि तुवा सहपरिवारीं । शीघ्र जावें लंकेबाहेरि । युद्ध करूनि रणचत्वारीं । नरवानर संहारावे." ॥ २६ ॥ ऐसें त्रिभुवनायारींनें बोलिलें, । अळकारचीरीं गौर-

---

१. घ पर्थे. २. घ उगळिल । तैसें परदळ पुनरपि. ३. अ साइूनि सद्टी परतें.

ले, । तव धूम्राक्षा आगी भरलें । भरितें सत्वश्रियेचें. ॥ २७ ॥ स्वामी गौरव देत मुखें, । अमृतपान नव्हे त्या सारिखें. । तुळिता तेणें सुखें । मेरु, मांदार उणे जाती. ॥ २८ ॥ महाराक्षसीं बाणली सभा, । सातोंनि धूम्राक्षु राहिला उभा. । युद्धावेशें डोले प्रतिभा. । राजेंद्र नमस्कारिला. ॥ २९ ॥ धूम्राक्षाचें अगळग दळ । अमित पाचारिलें तात्काळ. । राजमार्गी दाटलें तुंबळ. । गर्जत भयानक. ॥ ३० ॥ पदाति, रथ, तुरगोत्तम, । गज गुढारिले गिरितुल्य भीम, । चतुरंग चालता, हें व्योम । रजीं संपूर्ण जालें. ॥ ३१ ॥ रथु जांबूनदाचा रत्नखचित, । ध्वजांकुशपताकीं मंडित, । त्यांसि अश्व जुतिले श्वेत, । चत्वार, मारुतवेगी. ॥ ३२ ॥ त्या रथावरि सामग्री केली, । शस्त्रांचीं भरणें भरिलीं. । धूम्राक्षें अंगत्राणें घातलीं, । आरूढला तिये रथीं. ॥ ३३ ॥ वाहिनीनिष्टित महाशूर । चालिला रथीत दक्षिणद्वार । रणतुरें वाजती, तेणें अंबर । संपूर्ण जालें. ॥ ३४ ॥ धूम्राक्षु आला लंकेबाहिरि । अट्टहासु केला निशाचरीं, । तव अकस्मात् तिये अवसरीं । अपशकुन जाला. ॥ ३५ ॥ खडिला भुज चर्चित अशुद्धें । धूम्राक्षरथीं टाकिला गीधें. । अमंगळ शब्द क्रव्यादें । सेनेसन्मुख केला. ॥ ३६ ॥ ऐसे पा अपशकुनसंगमीं । धूम्राक्षु भंगला अंतर्यामीं, । तव शीघ्र साधूनि रणभूमीं । भार तुंबळ थोकले. ॥ ३७ ॥ शस्त्रमंडित ते सर्व चमू । उचवळे करावया संग्रामु. । दाखविती अमित्रातें विक्रमु । वाचें आणि मुखवोपें. ॥ ३८ ॥ याउपरि कपिदळाकडे । दीर्घ गर्जिन्नले वळिवाडे, । तेणेंकरूनि स्वर्गीचे हुडे । भूमीसि भेटों म्हणती. ॥ ३९ ॥ देखोनि राक्षसदळाचा यावा, । कपिपुंगवीं केला उठावा, । जैसा वळें उसळे हेलावा । ऊर्ध्व अवुनिधीचा. ॥ ४० ॥ वीरश्रियेचें वैभव गाढें, । वीर लोटले वीरापुढें. । पुरुषार्थें तृणापवडें । परदळातें मानिती. ॥ ४१ ॥ सहस्रकराची प्रभा पडे, । वीरीं भय टाकिलें त्याही पैलीकडे. । जय इच्छित महारिंगाडे । परस्परें पुढें जाले. ॥ ४२ ॥ संग्रामु देखोनि परम सुखीं । लोटले दोहीं दळांचा सुखीं । जीवितें मानूनि तृणासारिखीं । एक एकातें हाणिती. ॥ ४३ ॥ नळ, गदा, मुद्गल, तोमर, । पट्टीश, दट्टुडी,

१. प त्यासि रथीं जुतिले चत्वार श्वेत । जे वायुवेगें चामखी.

फरश, चौधार, । कटारे, फोड्ते, भिंडिमाळा, शर, । इयें शस्त्रें राक्षसाचीं ॥ ४४ ॥ शैलशृंगें, शिळा, तरुवर, । येहीं आयुधीं भिडती वानर. निकट घायागरिसें निशाचर । चूर्ण होऊनि पडती. ॥ ४५ ॥ प्रहार हाणी निया निकरें । भंगिती एकमेकांचीं शरीरें. । तुटती अस्थिमांसें, रुधिरें भडभडा वाहती. ॥ ४६ ॥ मीनले संग्रामाचा आवर्ती । हाकिती, उसिना घायीं हाणिती. । शिरकरचरणीं दाटली क्षिती । दोहीं दळामध्यें. ॥ ४७ ॥ करचरण तुटली शिसाळें. । आवाळीं पसरूनि धांवती वळें, । क्रोधाग्नें सगळें [1]ब्रह्माड गिळूं मानिती. ॥ ४८ ॥ ऐसें युद्ध माडलें महाघोर. । भिडती पर्वतातुल्य वीर. । ऊताता वाघरी रणचत्वार । मेदमांसें तुवळलें. ॥ ४९ ॥ गिरिशिळापर्वतीं पादपपाणि । करितां धूम्राक्षदळाची भंगणी. । तिये अवसरीं चतुरंगिणी । खळवळली वहुत. ॥ ५० ॥ रथ आणि घोडे वारिरि । शिळाचा सडा पाडिला वानरीं. । नैर्ऋत्यदळीं तिये अवसरीं । संहारकाळु आरंभला. ॥ ५१ ॥ ऐसें धूम्राक्षें दृष्टी देखिलें. । क्रोधें ब्रह्माड जाळीन मानिलें. । मग सारथिया म्हणे वहिलें । "रथातें चालवें." ॥ ५२ ॥ स्वामीचेनि मतें सारथी । साटासरिसे अश्वांतें प्रार्थी. । तव ते धाविन्नले रणपथीं । पवनासि साडूनि मार्गे. ॥ ५३ ॥ उदाळती ऊर्ध्वगतीनें घोडे, । सरिसा रथु चाके चक्रीं उडे । पडले रणागणीं प्रेताचे सडे । तयातें पिष्ट करिती. ॥ ५४ ॥ ऐसा महारथी धूम्राक्षनामा । प्रवर्तला घोर संग्रामा. । शरवृष्टि केली तेणें व्योमा । जवनिका जाली. ॥ ५५ ॥ धूम्राक्षु मेघलक्षण, । जळधाराम्यानीं पडती बाण, । पर्वतासम वानरगण । झेलिती सर्वांगीं. ॥५६॥ ऐसा वर्षत शरधारीं । मेघतुल्य गर्जना करी । वीरश्री वेभवें अवरीं । [1]माये आवेशें. ॥ ५७ ॥ अनिवार बाणाची गति. । अमित वोटओढी सरती. । तृणिगर्भी कोण जाणे किती? । ते सरसरा येतसे. ॥ ५८ ॥ टत बाणाची गुंगाट ध्वनी । निरवकाश जालें गगनीं । तयामाजी कपिसे नी । खोंचली वहुसाळ. ॥ ५९ ॥ एकले धूम्राक्षवीरें । सहस्रावधि कपि दिले शरें. । ऐसें देखौनि वायुकुमरें । शिखर वोटीं नाचविलें. ॥ ६० ॥ गिरिशृंग तिये अवसरीं । धावोनि टाकिलें धूम्राक्षावरी. । तें आगासि आदळता

१ व. ब्रह्मांड.

सातीं शरीं । राक्षसवीरें फोडिलें. ॥ ६१ ॥ सर्वांचि हनुमतासि ते क्षणीं । धूम्राक्षें भेदिलें द्वादश बाणीं. । मुख पसरूनि गंभीरा वाणी । गर्जन आगळें केलें. ॥ ६२ ॥ हनुमतु म्हणे, "भला गा वीरा[1] ॥ आता साभाळीं, निशाचरा. । मग पर्वतु उचलिला दुसरा, । मंदराचलु जैसा. ॥ ६३ ॥ गर्जन करूनि भयानक । प्रथम छाळिलें राक्षसकटक, । मग त्या धूम्राक्षाचें मस्तक । पर्वतें आच्छादिलें. ॥ ६४ ॥ पर्वतपृथ्वीचा सपुटीं । हारपली धूम्राक्षससारसृष्टि । ऐसे देखोनि दिधली पृष्ठी । राक्षसवाहिनीनें. ॥ ६५ ॥ सरिताप्रवाह मिळे सागरीं, । तेसे पळत प्रवेशले लंकापुरी, । सभामडपीं सुरेश्वरारि । तेथें वृत्तातु सागती. ॥ ६६ ॥ " नृपति, धूम्राक्ष ऐसा वीरु । जो अमरपुरवासियास झुजार, । तयाचा हनुमतें केला सहारु । महापर्वतप्रहारें " ॥ ६७ ॥ ऐसें आइकताचि लंकापुरपति । रुद्रातुल्य जाला दु खानीं. । म्हणे, " व्याघ्रासि क्षयप्राप्ति । गोवनसघट्टनें जाली." ॥ ६८ ॥ मग वज्रदंष्ट्रासि तिये अवसरीं । गौरविलें पुरुषार्थउत्तरीं. । म्हणे, " तू आजि निर्वाण ( ? ) करीं । अवनीचें मडळ " ॥ ६९ ॥ ऐसें नैर्ऋत्याधीश बोलों सरे, । तव वज्रदंष्ट्रासि कोपु सचरे. । राजा नमस्कारूनि त्वरें । निघाला सग्रामासि. ॥ ७० ॥ मुख्य वज्रदंष्ट्री महावीर; । सरिसे चालिले चतुरग भार; । अश्व, रथ, पदाति, कुजर, । राजमार्गे निघाले ॥ ७१ ॥ लागली गंभीर वाद्यध्वनि । तेणें निरवकाश जालें गगनीं, । सेनाकल्लोळ चालता मेदिनी । कपायमान भासे. ॥ ७२ ॥ लंकेचा पश्चिम दारवठा, । कळसतोरणेंमडित, महा मोठा, । दोहीं भागीं सपूर्ण, त्या वाटा । वज्रदंष्ट्री निघाला. ॥ ७३ ॥ गजरें चाले भयानक चमू । शस्त्रमडित अति विक्रमु । म्हणती, " आजि प्राप्त जाल्या सग्रामु । प्रतापा पारणें होईल." ॥ ७४ ॥ तव दळ चालता अकस्मात । अद्भुत उठिला चडवात; । ध्वजु उन्मळोनि भ्रमत । आकाशा पोटीं. ॥ ७५ ॥ रजीं दळ पावले अधदशा, । समयीं वाटे प्रळयो ऐसा, । सर्वांसि मुहूर्तमात्र पडला । वर्तला लंकाप्रदेशीं. ॥ ७६ ॥ ऐसें वातारिष्ट शमलें, । सर्वांच्या चक्षुसि देव आले । म्हणती, " आकाश पडतां धरिलें । आमचेनि भाग्यसुरें." ॥ ७७ ॥

[1] घ. रणशुरांची ध्वनी.

पुढें दळ रणभूमीसि आलें त्वरें. । मृत्युपात्र ते जाले पुढारे. । देखौनि पर- वीर रणधीरें । महानादें गर्जिन्नले. ॥ ७८ ॥ वन्ही लागला पर्वती, । तेथें वळें झेंपावती; । तेसे राक्षस कपिदळावरि पडती; । मिळाले संग्रामारि ॥ ७९ ॥ दोहीं दळींचें हाणिती परस्परें. । ठायिं ठायिं भगति वज्र शरीरें. । पर्वत पाझरती, ऐसीं रुधिरें । स्रवती भूमंडळीं. ॥ ८० ॥ वीरगण करिती कोल्हाळु, । तेणें गेचरा सुटला पळु. । माडला वीरश्रीचा खेळु, अतळु महासुभटासि. ॥ ८१ ॥ ऐसे उभय दळींचे वीर । संग्राम शूर रणगंभीर, । प्रहारसवें पडती अपार. । जैसे तरु उन्मूळती. ॥ ८२ ॥ अश्व, रथ, गज एके वेळे । मारु करित उठावले बळें; । जैसा तोयाब्धीचीं जळें । वेळेतें वोयाडिजे. ॥ ८३ ॥ अधिक तृष्णा वानरदळा. । अपार टाकिती गिरिशृंगशिळा. । थेंबटे थोडे मेघजळा । इतुकी वृष्टि करिती. ॥ ८४ ॥ पडती शिळांचिया चळथा । तेणें राक्षससेना पावत व्यथा.[१] हें देखौनि स्वपुरुषार्थी । वज्रदंष्ट्री दारुणी. ॥ ८५ ॥ म्हणे धुरेचिया सार- थियातें, । "वेगें मावारें साडीं मारतातें. । साट देऊनि अश्वोत्तमातें । रथु नें सेनामुखीं. ॥ ८६ ॥ पाहें पा इये काळीं संग्रामीं । निर्वाण करीन रणं- भूमी, । जैसी सविता उदेलेया व्योमीं । नक्षत्रें काळवंडती." ॥ ८७ ॥ वं- ज्रदंष्ट्रीचें वचन गाढें । सारथियें रथु प्रेरिला पुढें- । लवीत धावे पडले- याचीं धडें, । गिरिशृंगासि वायु जैसा. ॥ ८८ ॥ वज्रदंष्ट्री परदळासमोर । संधान करिता झाला घोर, । तीक्ष्ण, सरळ, रुक्मपुंख शर । लक्षावधि सो- डीत्तसे. ॥ ८९ ॥ अति वेगोत्तर संधानगति, । धुंधाटें बाण बाणामार्गें येती, । वानराचा आंगीं भेदोनि पडती, । परतेंचि पैलीकडे. ॥ ९० ॥ वज्रदंष्ट्री गर्जे भीम, । शरजाळें आच्छादिलें व्योम. । तिये समयीं कितीएक प्लवंगम । पृथ्वीवरि पाडिले. ॥ ९१ ॥ देखौनि वज्रदंष्ट्रीचा शरमारु । क्रोधें उचंबळला वाळीकुमरु, । पर्वत उचलिला, जैसा मेरु । धांविन्नला वातवेगें. ॥ ९२ ॥ ऊर्ध्व बाहो करूनि, पाणितळावरि । चक्रतुल्य केला गिरि । म्हणे, "राक्षसा, शीघ्र सावरीं" । मग टाकिला बळें. ॥ ९३ ॥ मस्तकीं

---

१. 'ब' प्रतींत ही ओंवी नाहीं.

वेसाने गिरिचक्र, । तव वज्रदंष्ट्री उठावा वक्र; । गदा घेऊनि धांविन्नला, शक्र । जैसा वज्रातें नरूनि. ॥ ९४ ॥ आकाशीं भवडूनि गदा, । 'घे रे' म्हणोनि हाणी अंगदा. । याउपरि घोर द्वंद्वा । तारातनयो प्रवर्ते. ॥ ९५ ॥ दोर्दंड उचलूनि अति कठोर । फोडू आरंभिलें वज्रदंष्ट्रीचें शीर; तव तेणें साधकें एक अष्टधार । आड धरिलें. ॥ ९६ ॥ संगेंचि त्या खड्गाचेनि घातें । वक्षीं ताडिलें अंगदातें, । तव तेंचि शस्त्र घेऊनि, वालिसुतें । अपूर्व अद्भुत केलें. ॥ ९७ ॥ खड्गें हाणोनि कंठनाळीं । शीर पाडिलें भूमंडळीं, । जैसी गिरिशृंगाची डिखोळी । इंद्र वज्रें तोडी. ॥ ९८ ॥ मुख्य वज्रदंष्ट्री ऐसेयापरी । खडूनि पाडिला पृथ्वीवरि, । जयो अंगदु पावला; वानरीं । सिंहनादु केला ॥ ९९ ॥ वज्रदंष्ट्रींसि देखोनि ऐसी दशा, । राक्षसदळीं भरिन्नला वळसा. । पृष्ठी वाहूनि पश्चिम दिशा । उरले लंका प्रवेशती. ॥ १०० ॥ युद्ध करिता जाले भग्न, । रुधिरचर्चित, म्लानवदन; सभामंडपा येऊनि नमन । नैर्ऋत्यनाथासि केलें. ॥ १ ॥ 'राया, आजि संग्रामु थोर जाला, । कपिभारु किती एकु मारिला, । या उपरि रणा आणिला । वज्रदंष्ट्री अंगदें." ॥ २ ॥ ऐसें आइकोनि लंकापुरपति । पडला चिंतेचा आवर्ती । मग बोलोनि अकंपनाप्रति । युद्धा पाठविलें. ॥ ३ ॥ तोही वधिला वायुकुमरें. । मग शोकु वरिला लंकेश्वरें. । तिये काळीं बोलोनि प्रतापउत्तरें । प्रहस्तें सावरिलें ॥ ४ ॥ आता प्रधान प्रहस्तनामा । जाईल चतुरंगिणीसीं संग्रामा, । तो वीररसु परियेसा म्हणोनि तुम्हा । प्रार्थितु असें. ॥ ५ ॥ कृष्णदासु मुद्गलु विनवी, । श्रोतिकीं सादरता यावी, । सुचित्त कथा परिसावी । रामायणा वाल्मीकवाणी ॥ ६ ॥ इति श्रीयुद्धकांडकथामृत, । लोकोद्धारण वाल्मीकिकृत, । तें परिसावें करूनि सुचित्त । कृष्णदास मुद्गलु म्हणे. ॥ १०७ ॥

---

१. 'घ' प्रतींत ही ओवी नाही. २ घ. प्रवेशा. ३. घ. रामायण म्हणोनि. ४. घ. ५ श्री श्रीरामायण । युद्धकांड दोरवटन, । श्रोतीं परिसावें सावधान, । कृष्णदास मुद्गल म्हणे.

## प्रसंग तेविसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकादिराजाय नमः । धूम्राक्ष, वज्रदंष्ट्री, अकंपनु । पडेल्यां दुःख धरी दशाननु; । तयाप्रति प्रहर प्रधानु । बोलता जाला तिये काळीं. ॥ १ ॥ "अहो राजचक्रचूडामणि, अकंपनु, धूम्राक्ष पडले रणीं; । तया गतशोकाची सांडणी । सर्वथा करावी. ॥ २ ॥ युद्ध करितां आटलें दळ, । विचारितां अति निर्बळ; त्याचेनि कोटीगुणें तुंबळ । सिद्ध असे लंकेमध्यें. ॥ ३ ॥ सभामंडळीक महावीर, । अतिरथी, अद्भुत धनुर्धर, । जे सुरयुद्धीं शक्रासि साचार । सिंहरूर संग्रामीं. ॥ ४ ॥ मार्तंडरथींचे जैसे वाजी, । तैसे अमित सिद्ध लंकेमध्यें तेजी; । तयांवरि आरूढती तयांचां गुर्जी । वीरश्री खेळे. ॥ ५ ॥ सहस्रमगु बैसे जयावरि । त्या परिस वळिये, जैसे गिरि, । तूंझिये गजशाळेभीतरीं । कुंजर कितीएक वांधले. ॥ ६ ॥ रथ साडपंधरेयाचे रत्नखचित, । अपूर्व, अभंग, असंख्यात; । जेणें विद्रारे महापर्वत । ऐसेयू शस्त्रांची सामग्री. ॥ ७ ॥ महारुद्राचां तृतीय नयनीं । सांटवला ब्रह्मांड जाळिता अग्नि, । तैसी तुमची चतुरंग व्राहिनी । सिद्ध असे लंकेमध्यें." ॥ ८ ॥ ऐसें प्रहस्त बोलतां । इंद्रारिजनकाची हरली चिंता. । ह्मणे "प्रधानोत्तमा, तुज असतां, । आह्मासि व्यसन कैचें ? ॥ ९ ॥ परिसु जयांचां दक्षिण करीं । आणि कल्पद्रुमु वाटिकेभीतरीं, । विचारिता त्यांचिये मंदिरीं । दारिद्र्दुःख कैचें ? ॥ १० ॥ सुधारसाचा ऱ्हद अंतरीं । आणि स्वामित्व क्षीरसागरीं, । ऐसे या सभाग्यांचा जठरीं । क्षुधाक्लेश कैचें ? ॥ ११ ॥ सूर्यसहवर्तमान ज्याची सभा । आणि आज्ञाधारकु अग्नि उभा, । सहज दैदीप्यमान प्रतिभा, । त्यासी तमबाधा कैंची ? ॥ १२ ॥ ह्मणोनि, गा वाहिनीनाथा, । तुझियेसन्निधीं कैंची उद्वेगव्यथा ? । आतां शीघ्र आपुलेया पुरुषार्थां । दृष्ट करीं अमित्रातें." ॥ १३ ॥ ऐसें रावणु बोलो सरे, । तंव प्रधानासि आनेगु न धरे । मग राजा नमस्कारूनि त्वरे । युद्धालगीं

निघाला. ॥ १४ ॥ रथारूढ जाला अतिवेगें. । भार तुंबळ पुढें मागें. । मेदिनी रज व्यापी; त्या तव खगें । आपणातें आच्छादिलें. ॥ १५ ॥ महारणवाद्याचा एके वेळें । नादु लागला अति विशाळें; । तया ध्वनीनें पडले टाळें । दिग्गजा कानीं. ॥ १६ ॥ राजधानीचें पूर्वदिशाद्वार । फळसमंडित, महाथोर, । पदाति, अश्व, रथ, कुंजर । तेणें मार्गें निघाले. । १७ ॥ सर्व वीर समर्थु । प्रहस्तु मुख्य सेनानाथु. । रण पावता तयाचा रथु । चाऱ्ही वारु पडले. ॥ १७ ॥ ऐसा अपशकुन जाला अकस्मातुः । अतःकरणीं भेदला प्रहस्तु. । पुढें वाहिनीपरिवेष्टितु । वातवेगें चालिला. ॥ १९ ॥ भार घेऊनि रणांगणीं ठोकले, । सुभट सिंहनादें गर्जिन्नले, । रघुनाथु बिभीषणेंसीं 'बोले, । "हा कोणु युद्धा आला" ? ॥ २० ॥ बिभीषणु ह्मणे, "नरवीरोत्तमा, । हा मुख्य मंत्री, प्रहस्तनामा, । राक्षससेनेचा स्वामी. संग्रामा । अति विक्रमें आला. ॥ २१ ॥ यासि प्रतियोद्धा असे नीळु, । जैसा शार्दूळेसीं शार्दूळु, । दोघांचा विक्रम विशाळु, । दोघेही वाहिनीपति." ॥ २२ ॥ ऐसा बिभीषणु रावनापाशीं । बोलता तुटे बृहस्पतीशीं, । तंव पूर्वद्वाराचा प्रदेशीं । कपि राक्षस संघटले. ॥ २३ ॥ उभयदळवीरांतें मृत्युकाळु, । वीराश्रियेचा मांडला खेळु. । भ्रमतु वाटला क्रोधानळु, । अग्नि जैसा पर्वतीं. ॥ २४ ॥ हाहा शब्दीं हाकिती परस्परें, । आयुधें उचलूनि हाणिती निकरें, । एक एकाचीं मागिती शिरें । वज्रघायास्तव. ॥ २५ ॥ पर्वतीं विद्युल्लता पडती, । तैसे वीरांवरी घाय विझती. । सत्त्वागळे मागें न टळती । राक्षस आणि वानर ॥ २६ ॥ अश्वारूढ, गजारूढ, महारथी । लोटले व्हरियातुल्य रणार्थी. । शस्त्रास्त्रांची घातली वृष्टी । वानरवाहिनीवरि. ॥ २७ ॥ अति योद्धे कपिकेसरी । शिळा टाकिती पर्वतावरि, । मेघ मिळोनि अंबरीं । जैसी वृष्टि करिती. ॥ २८ ॥ पादपपाषाणांचे प्रहार । लागतां विदारति निशाचर; । रथ चूर्ण होती; वारु, कुंजर । रणचत्वरीं पडती, ॥ २९ ॥ ऐसा संग्रामु मांडला अद्भुत, । पडले बहुसाल कपि, नैऋत्य, । तुंबळ वाहों लागलें शोणित, । समुद्रीं संगम जाले. ॥ ३० ॥ भग्नले देखोनि राक्षसदळ । प्रहस्तें मोकलिलें शरजाळ; । तेणें आच्छादिलें अंतराळ । वारेयातें वाट

नाहीं. ॥ ३१ ॥ जांणें दोहचिया भालीं निवटा, । आदुडियाच्या अति पसरटा, । काठिया तळपता, चोखटा, । रत्नपुष्पा, विचित्रा. ॥ ३२ । सुटत रागचेनि धुधुवाटें । धागरतीं वोर्पे गिरिकूटें । महाभूतांचीं पोटें । भयाचेनि पडिभरें. ॥ ३३ ॥ प्रहस्तु नतुनाडा अति निका, । नीळ कदिकटका । हें देखोनि नीळा, दळनायका, । अद्भुत जाला. ॥ ३४ ॥ अग्निपासौनि जयाची उत्पत्ति । तयाचा प्रतापु किती ! । महाद्रु क्षेमें प्रळयाग्नी, । जानुल्य क्रोधें जाला ॥ ३५ ॥ पर्वत उचलूनि निशाळु, । गर्जतु वानिता नीळु । देदीप्यमान कटोळु । वैश्वानराचा. ॥ ३६ ॥ उभा राहोनि प्रहस्तरथापुढें । वचन बोलता जाला अति गाढें. । ह्मणे, 'महादुर्जनें, दुष्टराजें, मुटें, । रे, कुबुद्धि केली ? ॥ ३७ ॥ जानकी, दूरदृष्टा विचारिता, । पद्मोद्भवाचा पिता त्याची काता । ते जगत्रयजननी लंके आणिता नेणाचि, रे चांडाळ हो ॥ ३८ ॥ अरे, बिभीषणें तुमचें हित । सांगितलें सुवचनें बहुत, । तें तुम्हा सन्मुखें अहित । निंदा केल्या आमुची. ॥ ३९ ॥ अति अधर्मा तूं पापरूपा, । आजि प्राप्त जालासि माझेया कोपा, । आता हाणौनि दोर्दंड्ड् पापा । चूर्ण करीन तुझें " ॥ ४० ॥ हें आइकौनि प्रहस्तासि तुबळ क्रोधु । ह्मणे, 'मर्कटा धूम्राक्षाचा केला वधु, । मशक तुल्य तुझा देहो, निंदु । कोपिसी काइसेनी पां. ? ॥ ४१ ॥ मीं प्रहस्त आपुलेनि शरें । मेरु मंदर उदरें, । त्याहूनि काय, रे, तुझेनि शरीरें । दढत्व धरिलें असे' ॥ ४२ ॥ मस्तकीं वाहूनि दक्षिण भुजु । अतियुद्धा आलासि मज उजू, । तरि तूं बापुडा गतायु गजु । मज सिंहानें नापटलासि " ॥ ४३ ॥ ऐसें प्रहस्तु बोले आगळें, । तव गर्जन केलें गंभीर नीळें. । गिरि उचलिला होता भुजबळें । तो शत्रूवरि टाकिला. ॥ ४४ ॥ गिरि भ्रमत जव उतरे, । तव प्रहस्तें सधान केलें त्वरें, । फोडूनि पाडिला, विखुरे । पडता पृथ्वीवरि ॥ ४५ ॥ ऐसें देखोनि अग्निकुमरें । गिरिशृंग घेतलें दुसरें । ऊर्ध्व बाहो करूनि, क्रोधें थोरें । पर्वतावरि टाकिलें ॥ ४६ ॥ रथावरि आल्हाळि शिखर । तव प्रहस्तें सोडिले तिखाति शर, । वज्रा ऐसे धुधुवाट थोर । शृंग फोडिलें तेंहीं ॥ ४७ ॥ प्रहस्तें मारिले तियेचीं क्षणीं । नीळु मेल्हिला

ाहुती बाणीं; । तिये व्यथेस्तव पडों पाहे धरणी; । परि शक्ती सांवरिला; । ४८ ॥ जैसा पुष्पधन्व्याचा शरीं । साधुमनें परदार स्वीकारी, । तिये समयीं एकु आंवरी । विवेकु मित्रराजु. ॥ ४९ ॥ प्रहस्ताचे अनिवार बाण । भेदले नीळाचां आंगीं तीक्ष्ण; । परि त्या वानरवीराचें ठाण । गिरिप्राय; न भंगे. ॥ ५० ॥ वरि पडति पर्जन्यधारा । परि भयबाधा हस्तीची कुजरा, । तैसा संधान साहतुचि पुढारा । वन्हितनयो धांविन्नला. ॥ ५१ ॥ वेगीं क्रमूनि धारापंथु । कारचपेटें हाणे रिपूचा रथु, । तंव शीघ्र परसेनानाथु । भूतळीं उतरला. ॥ ५२ ॥ देखे रथु जाला चूर्ण; । मग क्रोधें उचंबळला पूर्ण. । विशाळ गदा, लोह जोर्ण, । ते नीळावरि टाकिली ॥ ५३ ॥ कपोल किंचित भंगले घातें । तिये ठायीं भूमि भरली शोणितें; । याउपरि वैश्वानरसुतें । अद्भुत विक्रमु केला. ॥ ५४ ॥ वोघ्र करूनि अति गंभीर । वृक्ष उन्मुळिला महाथोर, । सहस्रशाखांचा, विस्तार । योजनें दोनी. ॥ ५५ ॥ तो झाडिला आकाशीं दोर्दंडदोरें, । मग मानसीं भाविलें कपिवीरें । "मी रामदासु, तरि येणें प्रहारें । प्रहस्ताचें शिर भंगो." ॥ ५६ ॥ इये भावनेंकरूनि प्लवंगमें । वैरी हाणिला अतिक्रमें. । "साटे, रे" ह्मणौनि मस्तक द्रुमें । प्रहस्ताचें चूर्ण केलें. ॥ ५७ ॥ द्रुमलक्षण वज्र आदळलें, । तेणें प्रहस्तशिरशृंग पिष्ट जालें, । कबंध भंगोनि भूमीं पडलें, । प्राणें केलें प्रयाण. ॥ ५८ ॥ सेनापतीनें सेनापति वधिला, । जैसा सिंहें सिंह विदारिला; । तिये समयीं आनंदु जाला । वानरवाहिनीतें. ॥ ५९ ॥ पादपप्रहारु कार्गी न पुरे, । तंव पक्वफळ्यातुल्य विदारे; । कां अश्म लागतां निखुरे । मृत्तिकापट्ट जैसा. ॥ ६० ॥ कौतुक पाहत होते नयनीं । देव बैसौनि विमानीं, । तेहीं प्रहस्तु वधिला म्हणौनि । नीळु पूजिला आदरें ॥ ६१ ॥ प्रहस्तासमागमें दळ । युद्धा आलें होतें शुंबळ, । तें कपिव्याघ्रीं सकळ । प्रथमचि मारिलें; ॥ ६२ ॥ अल्प, धावरट उरलें । तें पळत लंका प्रवेशलें, । मंडपांगणीं उभें ठेलें, । वार्ता सांगति रायापुढें. ॥ ६३ ॥ "अहो राजेंद्रा, लंकानाथा, । निरुपम प्रहस्ताचेया पुरुषार्था. । आजि समरीं वैरियांसि व्यथा । प्रळयातुल्य केली. ॥ ६४ ॥ सूर्य आपुलेनि तपपणें । निस्तेजें केलीं तारांगणें, । ह्मणौनि शुक्राचें उसिणें । घे राहोचें

मुख; ॥ ६५ ॥ तैसें राया तेणें प्रहस्तें । शंखारीं फोटिलें कर्पीतें; । तया वैराचें अग्निमुतें । डसिणें घेतलें. ॥ ६६ ॥ वनस्थळीनीं वणवा लागला । तो अवकाळवृष्टीनें विझविला, । तैसा प्रहस्तु नीळें निर्जितु केला । समरंगणाचां ठायीं." ॥ ६७ ॥ ऐसें आइकतां क्षणीं रावणें । राज्यानें बुडविलें अंतःकरणें, । क्रोधानळु पेटला, तेणें । उचबळों पाहेरु. ॥ ६८ ॥ प्रहस्तमरणाचा काळ क्रूर । तोचि अमावास्ये रात्रिचा भर; । पीडा पावला रावणचित्तचकोरु । मुखशशांकातें न देखे. ॥ ६९ ॥ कोपवह्निकुंड होतें रावणाचां हृदयीं । तें पेटलें अद्भुत तिये समयीं; । आरक्तीं दाटलीं धुरांचीं धुई, । तोचि हा धुरटा दिसे. ॥ ७० ॥ प्रहस्ताचेनि प्रधानपणें । सुरागनांसीं शोकसिंधीं उपेणें. । वद्रुतां भूपाळांचीं अंतःकरणें । भयाचा विळीं रिघालीं, ॥ ७१ ॥ ऐसा प्रहस्तु वानरीं वधिला, । मग राजा दुजेया महोदरासि बोलिला. म्हणे, । "काय पा विपरीत वर्तला । आजिचा काळु हा. ॥ ७२ ॥ अवकाराचा मुजाचीं मिठी । पडली सूर्याचा कंठीं, । का वडवानलु धरूनि वीरगुटी । पतगें समुद्रीं बुडविला, ॥ ७३ ॥ उपडूनि मेरूचा मुसळा । जो करतळीं इंद्र शकें डोला, । तो प्रहस्तु आजि प्राणा वेगळा । वानरीं केला कैसा ? ॥ ७४ ॥ तरि आता प्रहस्ताचा प्राणेंसीं । तुळीन मेरू ऐसिया राशीं. । शरीं खडूनि वानराचा सिसीं । बुजीन सागरातें ॥ ७५ ॥ आजि समरीं मारीन शत्रूतें, । जैसें क्षत्रिया मारिलें रेणुकासुतें; । मग तयाचेनि जळशोणितें । तर्पण प्रहस्तालागीं. ॥ ७६ आता तुह्मीं सर्व शीघ्र काळें । पाठाणावीं अगल्में दळें । आजि मीं आपुलेनि शरजाळें ब्रह्मांड। संपूर्ण करीन." ॥ ७७ ॥ ऐसी आज्ञा आवेश देखौनि प्रधानीं । पाळाणिते जाले बाहिर्नि. । ऐसा वृत्तांतु देखिला नयनीं । मंदोदरीचा हेरीं. ॥ ७८ ॥ आतां रावण युद्धा जातिये अवसरीं । नीति सांगावया येईल मंदोदरी, । ते पुढील कथा महाचतुरीं । सुचित्तें श्रवण करावीं. ॥ ७९ ॥ इति श्रीयुद्धकांडकथापीयूष, । नाना तें रामायणसरोवर मानस, । ज्ञाते रमोतु का राजहस । कृष्णदासु मुद्गल ह्मणे. ॥ ८० ॥

---

## प्रसंग चोविसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकृपादिराजाय नमः। मुख्य-
जांगनेचे दूत । राजसभेसि होते धूर्त, । ते राजविवंचना आइकौनि
त्वरित । राजभुवना निघाले. ॥ १ ॥ विहंगम जैसे झेंपावले, । कां कार्मु-
कापासाव शर सुटले, । नाना ते मनाचां आसनीं बैसले । स्वामिणी कार्या
कारणें. ॥ २ ॥ अर्ध निमिष ही भरे । तंव महाद्वार पावले त्वरें. । विचित्रें
देखूनि सामोरे । चित्रशाळेप्रति आले. ॥ ३ ॥ तिये शाळेची अद्भुत
रचना, । दोंदें निघालीं पाहतियां लोचनां, । लावण्य आइकौनि शचि
भुवना । उद्वसता आली. ॥ ४ ॥ ते शाळा वनितालतांचें वनांतर ।
कीं प्रमदापद्मिनींचें तडागोदर, । कीं नायकानक्षत्रांचें अंबर । अवकाशपणें.
॥ ५ ॥ कीं ते कीर्ति विश्वकर्मेयाची, । कीं ते कृपाफळसिद्धि शिवाची, ।
कीं तपश्री दशाननाची । निरुपमा भुवनत्रयीं. ॥ ६ ॥ तेथें कामविलें
चंदनहेम, । रत्नीं विराजित अति उत्तम, । बोलायें विबुधांचें विश्राम ।
तरि तें राक्षसीं भोगिलें. ॥ ७ ॥ ऐसिये चित्रशाळेभीतरीं । प्रथम प्रहरांचां
अवसरीं । पर्यंकाचां अरुवारीं । मंदोदरी बैसली असे. ॥ ८ ॥ उपमा दीजे
तियेच्या स्वरूपासि, । तरि सुरांगनां ऐसिया दासी; । चातुर्यं तुलिनां
इयेसीं । रति जाली काम-प्रिया. ॥ ९ ॥ तारेचें पतिव्रतपण निकें, ।
परि विपरीत घडलें तें जगासि ठाउकें; । मी तीस्तव तियेपासूनि मृगांकें ।
बुधातें जन्मविलें. ॥ १० ॥ बोलती अहल्येचें पतिवृतपण, । परि लागले
शक्राचे कामबाण; । अपराधें जाली पाषाण, । मग रामपायें उद्धरिली.
॥ ११ ॥ पतिव्रता सांगावया आणिका, । तरि त्या स्पर्शल्या दोषें एकैका; ।
हें उवइूनि बोलतां लोकां । निंदाविषयीं लागैल. ॥ १२ ॥ म्हणौनि
सर्वश्रेष्ट ते मंदोदरी, । साम्यता बोलावी जैसी गौरी; । मनातें स्मरण कीजे
तरि । महापातकें नाशती. ॥ १३ ॥ मंदोदरी आपणेनि सुंदरपणें । शोभवी
सर्वांगींचीं भूषणें. । प्राणाचे निश्वासें पारणें । सुगंधातें करवी. ॥ १४ ॥
आंगींचेनि गौरवर्णें । चंद्रिकेसि आणितां हे उणें; । हास्य करितां दंत-
किरणें । माणिकातें रगु देती. ॥ १५ ॥ मर्यादा न साडी मंदिरा, हीं ।

तेसें यौवन सुटलें अनि; । उपभोगा व्यावरितासि जालि सिद्धि. । भेटला तारुण्यसिंधु. ॥ १६ ॥ मंदोदरी तारुण्यसागर, । तेथें वसला स्त्रीचा प्राणेश्वर. । धन्य टायीं पंडित ईश्वर. । म्हणोनि तेथें सुराड्या. ॥ १७ ॥ मंदोदरी सत्य पतिव्रता । अनगें प्रसन्न केली सेविता, । मग म्हणे " तू सागर होसी, रुक्मिणी माता । कृष्णाग्रतार जाहेया. " ॥ १८ ॥ लावण्यें विकासलें फुटारपत्र । तैसें मंदोदरीचें वेल्हाळ वक्त्र । रावणाचे वीसही नेत्र । भ्रमर भ्रमती तेथ. ॥ १९ ॥ एव्हडें चातुर्य मंदोदरीसि, । रंभेचें नृत्यवैभव दूपी, । शंका वाटे सरस्वतीची मानसीं, । बोलता निक्षेपु पडे. ॥ २० ॥ ऐसी ते प्रमदाची ईश्वरी, । दुन्तें देखिली तिये अवसरीं. । प्रणिपातु केला जोडल करीं । संपूर्ण मानेसीं. ॥ २१ ॥ मंदोदरी पाहे दूतातें. । वार्ता पुसे भ्रूलतासंकेतें, । या उपरी ते वाग्देवतें । ददनितें जाले. ॥ २२ ॥ वार्तिक ह्मणती, " जी स्वामिणी, । आनि युद्धीं महस्तु पडला रणीं । हें आइकोनि रायाचा अंत करणीं । आवेशु अद्भुत आला. ॥ २३ ॥ रायाचा कोपाग्नि दिसे ऐसा, । नेणों ब्रह्माट गोलाज होईल कोळसा, । पुढें त्या नरवानराचा काईसा । ठरला पैक्रू बोलाना ? ॥ २४ ॥ आता सहवर्तमान सेनेसी । लंकनाथु जातो युद्धासि, " । ऐसें आइकौनि मंदोदरीचा मानसीं । चिंतेचा वायु लागला. ॥ २५ ॥ अमृतें पूर्ण पात्र भरिलें । तेथें विषाचें विरजण पडलें, । तैसें मंदोदरी हृदयीं संक्रमलें । चिंतेचें विन्हाड. ॥ २६ ॥ मंदोदरीचा आनंदविळीं । प्रवेशली चिंतासर्पिणी काळी, । मग मात्यवतु राक्षसु तेव्हेळीं । शीघ्र बोलाविला. ॥ २७ ॥ त्या वृद्धासीं केला विचार. । सरिसा अतिकाया कुमर, । युद्धा जाताहे प्राणेस्वर । तया भेटीं निघाली. ॥ २८ ॥ सोवर्ण सनिंत्राण सौमधाप हेंत्रि स्नानगर्भ व्युत्पन्न मंत्री. । पुढें बंदिजन स्तवित स्तोत्रीं । अश्वारूढ निघाले. ॥ २९ ॥ शिबिका रत्नखचित सिद्ध केली, । तेथें मंदोदरी आरूढली. । तियेचि काळीं वाद्यें वाजिन्लीं । नानाध्वनीचीं तुरुलें. ॥ ३० ॥ सरिसीं वेष्टिलें दासींचीं शतें । जाणविती नाना उपभोगातें. । ढळती व्यजनें चामरें श्वेतें, । वरि छत्रें चंद्राकारें ॥ ३१ ॥ दोहीं मार्गीं चालती दोवीजर्णा, । गिडिया देती दर्पिणी, । एकि पिकपात्रधारिणी, । एकि कन्हेरिणी ॥ ३२ ॥

रत्नखचित कांचनझारी । जळपूर्ण एकीचां करीं. । केतकीदळाचें पात्र कीचां शिरीं। कुसुमीं भरिलें असे. ॥ ३३ ॥ एकीजवळी परिमळाची पेटी, की घेतली चंदनाची वाटी, । एकि ते आसनोनेहटीं । शृंगार सांवरी. ॥ ३४ ॥ एकि, जैसा तेजाचा रवि, । मुखापुढें दर्पण दावी. । एकि लघु-चँर स्पर्शवी । स्वेदमुद्दर देखोनि. ॥ ३५ ॥ जाणविती नाना उपभोगासि । त्री मंदोदरीचिया दासी; । त्यांचेया एकैका अवयवासीं । रंभा उर्वशी न पुरे. ॥ ३६ ॥ प्रथमयौवना त्या सकळा । सुशोभित चालती सुढाळा; । याचा गोरवर्ण देखौनि चंद्रकळा । लोपती लज्जा धरूनि. ॥ ३७ ॥ त्या नव्हेति राक्षसी नारी, । विद्याधरां गंधर्वांच्या कुमरी; । गायन करित मधुरस्वरीं । चालती दोहीं मार्गी. ॥ ३८ ॥ झर्झर वेत्रपाणिदशक । पुढें दाविती गर्जनेचें कौतुक. । याउपरी राजमार्गींचे लोक । निवारिती उभय-मार्गी. ॥ ३९ ॥ ऐसी अमरराजशत्रुप्रिया । प्राणपतीतें जातिसे भेटावया. । आगींची प्रभा फांके, तेणें चर्या । गोपुराच्या उजळती. ॥ ४० ॥ विराजित उभयतटतीर्थी । रत्नाकराप्रति जातिसे भागीरथी, । तैसी सेनावेष्टित सुपंथीं । जात देवी मंदोदरी. ॥ ४१ ॥ असो, शीघ्रकाळें राजागना । आली महामं-डपस्थाना. । अतरीं थोकली सर्व सेना, । आपण पुढें चालली. ॥ ४२ ॥ गर्भार सुंदरेच्या करकमळा । आपुलेनि करांबुजें धरिलें लीळा; । भाटारगृहीं उजळे दीपकळा । तैसी सभेमध्यें आली. ॥ ४३ ॥ सभामंडळिक बैसले होते । ते अधोवदनें जाले परते. । मग नृपति ह्मणे, "काते, । अपूर्व येथें बिजे केलें." ॥ ४४ ॥ देवीनें देखौनि प्राणेश्वरू । करकमळद्वयीं केला नमस्कारु. । रायें धरिला करें करु, । मचकावरि बैस-विली. ॥ ४५ ॥ कैलासीं सभे त्रिपुरारि । अर्धांगीं बैसवी आलेया गौरी, । दशाननें तियेचिपरि । प्रियेतें बैसविलें. ॥ ४६ ॥ मेघीं अचंचळ विद्यु-ल्लता, । तैसी प्रियोत्तमपाणि पतिव्रता. । तांबुल, पुष्पांजळी देऊनि वार्ता । अंतरीची पुसे रावणु ॥ ४७ ॥ प्राणेश्वराचेनि आदरें । पतिव्रता बोले सारांश उत्तरें. । म्हणे, "जी, विवेकाचेनि बळें चतुरें । पुढें आत्महित देखावें. ॥ ४८ ॥ राया, पुरुषाचा हाचि पुरुषधर्मु । चालों दीजे सदाचारनेमु । पुढें परत्रासि मिळे कामु । तोचि अनुसरिजे ॥ ४९ ॥ तिळतुल्यसुखानि

पालटे । पुण्य वेंचे पर्वतापरिस मोठें, । ऐसें आचरावेंना धर्मनिष्ठें । धर्मशुद्धि करूनि. ॥ ५० ॥ राया, मुख्य धर्म परोपकार, । एणेंसीं तुळितां उणा मेरु; । आणि परपीडेचेया पापाचा विस्तारु । भुवनत्रयीं न मोथे. ॥ ५१ ॥ आणिक परियेसीं, लंकराजा. । ज्याचां गृहीं दुभे कामधेनु वोजा. । तो पुरुषु अभिलाषी अजा; । हें महाअपूर्व, जी. ॥ ५२ ॥ वाटिकेसि कल्पतरूची भाग्यवर्ळे, । मग्यीं दे कल्पिलीं फळें, । तेणें आदरें अर्काभि वाधिलें आळें; । हें महा अपूर्व, जी. ॥ ५३ ॥ जयाचां घरीं लक्ष्मी प्रत्यक्ष निधि । आज्ञाधारका सर्व सिद्धि, । त्या नरासि उठली भिक्षेची बुद्धि; । हें महा अपूर्व, जी. ॥ ५४ ॥ सदा पीयूषवाहिनीचें तीर, । त्यांत अमृत नाइति इच्छिती सुर, । ऐसें त्यजूनि आवडे थिल्लर; । हें महा अपूर्व, जी. ॥ ५५ ॥ रंभा न तुळे अगुष्टेसीं, । जे संपूर्णसौंदर्याची राशी, । ऐसी ज्या पुरुषाची दासी, । तो परदार इच्छी; । हें अपूर्व, जी. ॥ ५६ ॥ ह्मणौनि, जी पति, प्राणनाथा । तुह्मी सर्वार्थीं सपूर्ण, समर्था; । परि जानकी आणाति वृथा । विरोधु रावेमेंसीं करिता ॥ ५७ ॥ पाहता विषवल्लीचा पालवी । कैंची अमृतफळाची ठेवी? । तैसें सीता राखिलेया सुखपदवी नाहीं सर्वथा स्वामी. ॥ ५८ ॥ जेणें अर्थे निर्मूळ होआवें, । त्या अर्थासीचि का प्रवर्तावें? । ह्मणौनि विवेकियावें ओळखावें । आत्महितार्चे द्वार ॥५९॥ प्रत्यक्ष, वहुधा, चोज पाहीं उदकीं पाषाण तारिले जेहीं । ऐसे ते नरवानरदेही । कैसे पा म्हणावे? ॥ ६० ॥ जे स्वयेंचि बुडती । आणि दुसरे यासिही बुडविती । ते तरौनि, तारिलेति । द्रुमपाणि, देखा. ॥ ६१ ॥ आहारा अमृत निर्माण ज्यांसि । तें वळभग केले राक्षसीं; । त्या महावीरासि रणभूमीसि । पर्णभक्षक मारिती. ॥ ६२ ॥ ऐसा विपरीत काळु आला, । तो दूरदृष्टी पाहिजे विचारिला. । अरिष्टाचा उमाळा आरंभला, । त्यासि कारण जानकी. ॥ ६३ ॥ आता विवेकातें मत्रीं ह्मणावें, । बुद्धीचें स्मरण करावें, । नीतीसि जवळि असों द्यावें । कार्याकारण, राया. ॥ ६४ ॥ कीर्तीचें वाढवावें महत्त्व, । सतोषें सग्रहिजे सत्व, । जैसें हृदयातील जीवित्व । तेसेंचि जग मानावें. ॥ ६५ ॥ आइकिलें, राया, आइकाहो. । विवेकशून्य महत्तबाहो । सदा सुख असना देहो । सुबुद्धि साडिली तेणें. ॥ ६६ ॥

जमदग्नीचा आश्रमीं देखिली । ते कामधेनु बळें हरिली; । पुढें कार्तवीर्या कुळनळी । खंडिली परशुरामें. ॥ ६७ ॥ तयाचिपरि, प्राणनाथा, । हा दाशरथी राम सर्वथा; । यासीं विग्रहो करितां, समर्था, । तुह्मां कल्याण कैचें ? ॥ ६८ ॥ धूम्राक्ष, प्रहस्त युद्धा गेले । ते काय जय घेऊनि आले ? । अकंपनु, वज्रदंष्ट्री दशा पावले, । ते विचारा मानसीं. ॥ ६९ ॥ प्रहस्तु पडला संग्रामीं, । राक्षसमेतें माजली रणभूमी; । हें आईकौनि आतां तुह्मीं । युद्धासि जावों पातां. ॥ ७० ॥ मज पाहतां नव्हे बरवें, । विचारा बुद्धिचेनि वैभवें. । आतां रामेसीं सख्य करावें । जानकीसि देऊनि. ॥ ७१ ॥ शीघ्र सोडा, जी, विदेहतनया, । सांगातें द्यावें अतिकाया, । एक उत्तम धनुष्य देऊनियां । रघुनाथालागीं पाठविजे. ॥ ७२ ॥ तेथें बिभीषणु असे धर्मात्मा । तो बोधवील नरवियापरी रामा. । तुह्मीं सर्वाथय नवचावें संग्रामा, । हे उक्त विज्ञापना माझी." ॥ ७३ ॥ ऐसीं मंदोदरीचीं उत्तरें । आइकौनि, हास्य केलें दशशिरें. । "प्रिये, बोलिलीस सारांश उत्तरें । परि इयें कैसीं घडती ? ॥ ७४ ॥ घन रंगित वैश्वानरें । पतंगासीं सख्य कीजे आदरें, । तरीचि, कांते, तुझेनि विचारें । मज राघवेंसीं मैत्री. ॥ ७५ ॥ मज रावणाचेनि दर्पमहिमानें । स्वर्गींचे देव झाले दीनें; । तो मी मानवियांचेनि सन्निधानें । श्लाघ्यता कैसी भोगवूं ? ॥ ७६ ॥ म्यां सीता आणिली हेरें थोरें; । पुनरपि रामामि देवों सामोपचारें । हें सुश्रवण कीरति तरि शिरें । माझीं मज बोझें वाटती ॥ ७७ ॥ गजाचिये मस्तकीचा मणि । सिंह चपेटप्रहारें आणी । तो जरि भयें दे, तरि धरणी । सिंह वरतातुल्य. ॥ ७० ॥ कांते, आपुलेनि पुरुषार्थें । करूं नये तें केलें समर्थें । तें शकोनि सांडिजे, तरि व्यर्थें । वैभव जिजे ॥ ७८ ॥ माझेया खड्गाचिये मुष्टितळीं । इंद्राचा मुकुट भरला धुळीं; । तो रावणु मी, ये काळीं । सीता सोडूं अक्रोधें कैसी ? ॥ ८० ॥ आठवत क्षणीं माझे हस्त । खटखटती ऐरावतीचे दंत; । वैश्रवणु होये भयचकित । माझें स्मरण जालेया; ॥ ८१ ॥ ऐसेन म्यां रायें रावणें । मनुष्यांप्रति लीन होणें, । सीता सोडूनि पाठवणें । हें लघुत्व दीर्घ, कांते. ८२ ॥ आणि आइक, मंदोदरी. । महाद्रुद्र मांडिलें वानरीं, । कितिएक भंगिली पुरी, ।

दळ मारिलें बहुत. ॥ ८३ ॥ ऐसेया रामेसीं इये समयीं । कैसी करूं मी शिष्टाई ? । निग्रहो साहावा, हें हृदयीं । न येने माझां. ॥ ८४ ॥ यथार्थ भाइक आता, सुदरि, । न सोडीं रावणाची अनुरी । आणि रामुही मजसीं सख्य करी, । हें न घडे विचारिता. ॥ ८५ ॥ जेणें शतयोजनें सागरु शिळीं । बांधिला, जैसी महीतळीं, । प्रतापें संग्रामीं समदळीं । महाराक्षस मारिले. ॥ ८६ ॥ आता, वल्लभे, सत्य जाण, । तो सीता नेवे युद्धेंविण, । निरपराधें वाळीसीं केलें निर्वाण, । ऐसा कापथ्यकर्मा. ॥ ८७ ॥ जनस्थानीं तेणें वधिले थोर । चतुर्दश सहस्र निशाचर; । मी त्याचेनि सूडें वधिन वानर । आजिचे संग्रामीं. ॥ ८८ ॥ वल्लभे, आता ऐसें करावें: । तुह्मीं शीघ्र निजभुवना जावें. । आनंदभरित मनीं असावें, । माझी चिंता न करावी. ॥ ८९ ॥ वारें पडत्ता तिळतुल्य कुसुमें । पृथ्वी लपविजे पाताळाकूमें, । तरिचि मज रावणातें, रामें । संग्रामीं साधिजे ॥ ९० ॥ कांते, कर्पूराचेनि तुषारें । भस्मिजे महावैश्वानरें, । तरिचि, रावणाचेनि शरें । रामे सामर्थ्य भाटें. ॥ ९१ ॥ प्रिये, पिपीलिकेचेनि बळें । कुंजरातें गिळिजे सगळें, । तरिचि रामाचें क्षेनिन्व आगळें— मजसीं युद्ध करिता". ॥ ९२ ॥ बोलता रावणाच्या हृदयाभीतरीं । लोटती क्रोधाच्या लहरी. । मग म्हणे, "तुह्मीं सुंदरि, । शीघ्र गतव्य होआवें." ॥ ९३ ॥ परिसोनि रायाचें वचनें, । मंदोदरी असंतुष्ट मनें निघाली म्लानवदनें । निजभुवनाप्रति. ॥ ९४ ॥ मंदोदरीनें हृदयीं मानिलें ह्मणे "आम्हा आजि कल्पांत माडिलें. । कोण कर्माचें वैभव वोहिलें, रायासि युद्धा नेतसे ! " ॥ ९५ ॥ म्हणे, "गा, होणारा बळवत्ता". मग निघाली धरूनि चिंता. । शीघ्र रावणाची कांता । निजगृह पावली. ॥ ९६ ॥ मंदोदरीच्या मुखकमळा । निघोनि गेलिया, हे कळा. । आनंदु झाला वेगळा । स्वप्न जसा जागृतीपासौनि ॥ ९७ सुरस्तु पाहता विटती डोळे, । जिव्हा अमृतासि नातळे, । आहळों वासना पळे । उपभोगापासौनि. ॥ ९८ ॥ ऐसी रावणकांता मंदोदरी सापडली शोकाचां जोहरी. । कथा कैसी होईल पुढारीं, । तीसि चिंतावें. ॥ ९९ ॥ भविष्य वाल्मीकाचें निरें. । जें वदिजे कैलासनायकें.

धरू भवसिंधु, श्लोके । तरिजे निश्चात, हो. ॥ १०० ॥ जयावरि भगवताची । तयासि रामकथेची रुचि, । अभक्तासि नावडे परीक्षा त्र, । जैसें रोगिया मिष्टान्न. ॥ १०१ ॥ इति श्रीयुद्धकांड रामायणी ा, । जे श्रवणे मेळवी परमार्था, । गटी दु ख, दारिद्य व्यथा । कृष्ण-सुद्रुत म्हणे. ॥ १०२ ॥

---

## प्रसंग पंचविसावा.

ॐ नमो श्रीरामसचिदानंदाय नम । श्रीगुरुकाशिराजाय नम । युद्धीं सु पडलेयावरि । रावणाचा क्रोधाग्नि न माये अवरीं । तेसमयीं दिशाा वाहिर । सूर्यो जाणें भाजी ॥ १ ॥ रावणु बोले महोदराप्रति, । सर्व दळ पाळाण शीघ्रगति. । उत्तम रथ, तुरगम, दंती । चालवा प्रकारगें. ॥ २ ॥ पूर्वी देवासीं वहुत वेळ । युद्ध जालें महातुंबळ, । येकाळींपारि तें दळ । क्षेशानिलें नव्हतें. ॥ ३ ॥ शस्त्रें घ्या रे पार चोखटें, । विजूतुल्य, नूतनें, तिखटें, । जयाच्या धारावरि पुटें । शिखिशिखांचीं खेळती. ॥ ४ ॥ सूर्यु नक्षत्राचें प्राशन करी, । तैसे मी ाजि परदळ संहारीं; । शोणिताचे संगम सागरीं । मेळवीन आतां. ॥ ५ ॥ नरल्नाचा तेज,पुञ्ज । मजलागीं रथु करा सज्जु, । ज्यावरि वसौनि ामजु । भंगिला कश्यपाचा. ॥ ६ ॥ ऐसें रावणु बोलतक्षणीं । तव द्ध हों लागली चतुरंगिणी, । तें किंचित आइका श्रवणीं । समयासारिखे. ७ ॥ पायांचे प्रचंड वळियाडे । जैसे काजळाचेढुडे, । मुखीं शुभ्रदांत, दधरे । त्रिकाळरूपी. ॥ ८ ॥ अग्निकुंडा ऐसे नेत्र विशाळ, । मुख ब्वामान, जिन्हा कल्लोळ, । पर्वतासमान कोथळ । आजानुबाहु बळिये, । ९ ॥ मुखीं, मस्तकीं लोहाचिया जाळी, । घातलेया दृष्टि फांके वेगळी । मार्गी आगवाणे घातलीं काळीं । जिये वज्रासि अभेद्यें ॥ १० ॥ कटीं सरिवानली व्याघ्राम्बरें. । मुकुटीं वाधिलीं चामरें, । कासा घातलिया चिरें । चित्रविचित्र-विविधे ॥ ११ ॥ वक्र सुरिया खोंविलिया कटीं । शस्त्रे धरिलीं

वळूनि मुष्टी. । खेटकें विशाळें नेहटीं । वामांगाकडे दृढें. ॥ १२ ॥ वीरश्रियेचीं सहज वाद्यें । चरणीं गर्जेती बांकी, वीरिदें; । आवेशें उचालिती पदें, । धरणी दणाणित असे. ॥ १३ ॥ विद्युल्लता तळपती मेघांबरीं, । त्याहूनि तेजाळीं खड्गें करीं; । असीलता, शस्त्रवल्ली, कटारी, । ळहुडी आणि दिद्घडी; ॥ १४ ॥ मुद्गल, तोमर, फरशु, शूळ, । यत्र, गदा, गळ्याळें, मुशळ, । दशघ्न्या शतघ्न्या विशाळ, । आणिक चक्रें, चेंडू कीं. ॥ १५ ॥ कटारे, कोहते, भिंडि माळा, । पाश, पांगडी, शंकळा, । धनुष्यबाण पदाति दळा । शस्त्रसामग्री जाली. ॥ १६ ॥ ऐसे पायाचे राक्षस चतुर्बळी । खड्गें झेलिती उटली अंतराळीं, । सिंव्हनाद देती आवेशें, तिये काळीं. । वीरश्रिया चेतविले ॥ १७ ॥ ऐसे पायांचे असंख्यात चालिले, । तंव तुरंगोत्तम पांखरिले, । त कवणासि जाती वर्णिले, । चित्रींचीं भांडारें? ॥ १८ ॥ रावणें आपुलेनि प्रयत्नें । सप्तद्वीपींचीं आणिलीं अश्वरत्नें; । किति एक काळ होतीं यत्नें, । तीं ये समयीं काढिलीं. ॥ १९ ॥ जंबुद्वीपींचे जांबळे, सोने सळे; । श्वेतद्वीपींचे चांदिणे हांसळे; । क्रौंचद्वीपींचे निळे, । चितोडे, चित्रांग. ॥ २० ॥ शाकद्वीपींचे नारगे सोज्वळ; । कुशद्वीपींचे चकोर, चपळ; । शाल्मली द्वीपींचे बदर, वहळ; । पुष्करींचे श्यामकर्ण; ॥ २१ ॥ आणिक नाना द्वीपींचे नागर, । अंग, वंग, कलिंग, काश्मीर, । सौराष्ट्र, गौड, चौड, गुर्जर । बोडकौ, कर्णाटक. ॥ २२ ॥ ऐसे तुरंगम सुलक्षण, । सर्वांगीं कुशळ संपूर्ण, । देश रायें जिंतिले दारुण । हरिले सवळ सुजाति ते. ॥ २३ ॥ सूर्याचिये रथींचे घोडे । ह्मणती अद्भुत बळीयाडे; । अर्ध निमिष जव पडे, । तंव इतुकें क्रमिती ॥ २४ ॥ दोनी सहस्र दोनी शते दोनी योजनें । सदाकाळ चालती गगनें । अतुर्बळीये त्याहूनि अतिपानें । राया रावणाचे वाजी. ॥ २५ ॥ चित्रींचीं भांडारें उघडिलीं. । कीं शृंगारसागरें मर्यादा मांडिली । तैशीं अश्वशाळेंहूनी थाटें निघालीं । अश्वोत्तमांचीं महलें ॥ २६ ॥ आति कुसरी पाल्हाणिले, । सावंग रत्नखचित घातले, । चामरांकित चौताळिले, । हिंसत राजपंथें. ॥ २७ ॥ ऐसे तुरंगम मनोवेगी । दोह-पजा झळाळिती अंगीं । शस्त्रसामग्री दोहीमार्गीं । फेंमी घातली असे. ॥ २८ ॥

वारि आरूढले राउत; । अगवाणें खेइले वळवत, । त्यांचे दोर्दंड खड्गीं मंडित, । आगेंशु आकाशीं न माये. ॥ २९ ॥ ऐसें अश्वांतें उद्दालित । चालिले तुंबळ असंख्यात; । तव महादंती मदोन्मत्त । चालिले वेगें. ॥ ३० ॥ ऐरावती समान सकळ । चौ चौं दंतांचे महास्थूळ; । नाना ते गजरूपें शैल । रावणातें सेविती ॥ ३१ ॥ पर्वत कुंजराचेनि रूपें । रावणापाशीं असती दर्पे. । कोण कारण ? तरि साक्षेपें । श्रोतीं परिसावें. ॥ ३२ ॥ पूर्वी इंद्रें वज्रधरें । छेदिलीं पर्वतपक्षशिखरें, । मग मिळोनि गिरि दुःखें थोरें । रावणासि शरण गेले. ॥ ३३ ॥ मग रावणें गिरिवरातें । निर्भय दिधलें स्नेहें बहुतें. । पुढें पर्वताचेनि कैवारें इंद्रातें । विटंबिलें युद्धीं. ॥ ३४ ॥ हरिले स्वर्गींचे अधिकार, । बंदीं घातले सुरवर, । सूडु घेतला तेणें थोर । गिरि आभारले ॥ ३५ ॥ म्हणौनि ते गज साचोकारें । पर्वतां समान शरीरें, । मंडित वज्रमयें गुढरें । हेमें आभरणिले. ॥ ३६ ॥ घातल्या दिव्य, विचित्रा झुली, । जयासि रत्नखचितें लगटें जडलीं । चहूंकडे मुक्ताफळें खिळिलीं । जियें नक्षत्रामगानें ॥ ३७ ॥ घटाघागरेवेळाचे घोळ । बांधिले चहूंकडे तुंबळ । रुळती चामराचे पाहाळ, । पताका पृष्ठीवरि. ॥ ३८ ॥ महामुखीं, कुंभस्थलीं । घातलीं लोहाचीं मोहाळीं. । स्कंधीं बैसले महावत बळी । शूळ, शक्ति घेऊनिया. ॥ ३९ ॥ ऐसे गजभार गुढरिले, । किंकाटत असंख्यात चालिले; । तेणें भारें पोटीं पाय घातले । सहस्रमुखें. ॥ ४० ॥ त्यामागें रथ सज्ज जाले, । जे वाऱ्यापरिस वहिले, । तेथें तुरंगम जुतिले । कितीएक सोळसोळा. ॥ ४१ ॥ चालिलेया रथा कैंचें गणित ? । सुवर्णरत्नी विराजित । पताका चहू पारीं डाळकत, । ध्वज नानारूपाचे. ॥ ४२ ॥ तेथें आरूढले धनुर्धर, । अतिविक्रमाचे निशाचर. । कोदंडें करीं, तूणीगर्भ शर, । मरणें घातलीं शस्त्रांचीं. ॥ ४३ ॥ सारथि बैसले कुशळ धुरे, । दृढ घोडेयांचे वाग्दोरे, । ते राजपथीं रथ त्वरें । चालिले अमित. । ऐसें चातुरंग कटक । सन्नद्ध जालें भयानक; । जैसा उगवलिया सहस्रार्क । ऐसा रथु सज्ज जाला. ॥ ४५ ॥ विचित्र विश्वकर्मे याची करणी. । रत्नें जडिलीं खणोखणीं, । तें तेज प्रकाशलेया तरणी । लोपोनि जातसे. ॥ ४६ ॥ शरभमंडितु महाकेतु, । अनर्घ्य

रत्नीं विराजितु, । तो उभारिला रथीं सडितु । त्रिभुवा भयदाता. ॥ ४७ ॥
चित्रावरा, अलौकिका । चहू कोनीं मिरवती उंच पताका, । त्या नभ-
रंगणीं अभिराटिका । पालविती नवज्ञनीं. ॥ ४८ ॥ हलेत्रींचा प्रत्य-
हुताशनु । शिवार्चनीं रावणासि जाला प्रसन्नु. । तेणें आपुला मुखींहूनु ।
काय हा रथु दिधला ? ॥ ४९ ॥ तेन पुनु तो वज्राचा, । प्रतापमनिरु
दशाननाचा, । दर्पु हरिला वैश्रवणाचा । त्यावरि बैसोनि रावणें. ॥ ५० ॥
सौंदर्य त्याचें अतिपाडें, । वर्णन बोलिजे तितुकें थोडें, । बिंब तुळे रत्ना-
चेनि उजियेडें । चातुर्य चक्रीं ॥ ५१ ॥ तया रथावरि शतेंकें । दळें ठेविलीं
कार्मुकें, । भार्गवा दिधलें होतें त्र्यंबकें । तयाचितुल्यें. ॥ ५२ ॥ वज्र, वेडुर्य,
पद्म, गोमेद, । एहीं खचित धनुष्यांगीं बध, । संतें, सतूर्णे, दटनाद, । नव्रासि
अभेदें ॥ ५३ ॥ तयासि विचित्रा गयमणी । आणिक जुवाड टोपरिले तूणी, । ते
संपूर्ण भरित बाणीं । रुक्मपुखा सरळें. ॥ ५४ ॥ शक्ति परप्राणहरणा । रथीं
ठेविलिया अतिदारुणा, । गदा, मुद्गल, तीक्ष्णा । खड्गट्टी तेजाळिया.
॥ ५५ ॥ नाना शस्त्रें तेजाळीं । रावणकरें मुटलीं युद्धकाळीं, । तयाचिया
राचेलिया काळी । महा धगधगिता. ॥ ५६ ॥ ऐसा भज केला रथोत्तमु, ।
जयावरि खेळे रावणाचा विक्रमु, । तयावरि बैसौनि केला संग्रामु । बहुत
वेळ्ा देवांसि ॥ ५७ ॥ ऐसिया रथासि जुतिले घोडे । अष्टदश, बळिवाडे, ।
त्याचिये अगकांतीनें पडे । चांदिणें पृथ्वीवरि. ॥ ५८ ॥ त्या अश्वांचे
सौंदर्याविस्तारें । जैसीं उचटिलीं चित्रींची माडारें, । सुलक्षणिक, नवूर्ण
अलंकारें । मिरवति चहू कोनीं. ॥ ५९ ॥ नेपुरें, चामरें, कळा-
भरणें, । मोहाळीं झळकती, अगाणें, । उभारलेनि पुच्छें, कर्णीं ।
नभ घेऊं म्हणती ॥ ६० ॥ पदें न धरती पृथ्वीवरि. । हिंसवा दिग्मंडळ
ययारी । त्याचा चळणीं पुढिला खुरीं । पृथ्वीसि नातळती. ॥ ६१ ॥
ऐसा अश्वोत्तमीं यानिग रथु, । तयावर आरूढला लंकानाथु । सपत्नांचा
सिंधु, समर्थु, । राक्षसेश्वर तो. ॥ ६२ ॥ पूर्णचंद्राकार दहाही छत्रें. ।
चहू दळाचीं विचित्रें, । तितुकींचि सूर्यपत्रें । मुकुटावरि मिरवती. ॥ ६३ ॥
कोटिसंख्या निशाचरगण । राक्षस, देवावरण, । वेढित चालिले जैसे
सूर्यकिरण । सूर्यासिसरिसें. ॥ ६४ ॥ आपुलेया निजाममनावरि । आरू-

लढे, जेसे बळवत गिरि. । अगळग सैन्य शेजारीं । निघाले खटाटोपें. ॥ ६५ ॥ राजबंधु, राजकुमर, । सुहृदजन, नमाचतुर, । मत्री कपटविद्यासागर । समभारें चालती. ॥ ६६ ॥ किरीटकुंडलें, बाहुभूषणें, । कंठमाळा, करीं कंकणें, । मुद्रिका आंगोळियांचें लेणें । नवरत्नें रग देतीं. ॥ ६७ ॥ चरणीं वांकी बिरिदाथितपणें, । वेतळी दिव्याबरें, अगत्राणें, । जयांवरि सुरशस्त्रें जाली चूर्णें । पूर्वी सग्राममसमयीं. ॥ ६८ ॥ माथां छत्रें जाळियांचीं, । जेसीं बिंबें शृगारव्योमींचीं; । शस्त्रें झळाळिती मुष्टीचीं । विजचेनि पाडें. ॥ ६९ ॥ नीळांवराचीं मत्स्यरूपें । चउदंडांवरि सकोपें. । वातगर्भें पूर्ण पडपें । चालविलीं रायापुढें. ॥ ७० ॥ सिंहशार्दूलांचीं कीर्तितोंडें । मुष्टीमध्यें धरिलीं प्रचंडें; । राजभारांपुढें उदडें । मिरवती वहुतां हस्तीं. ॥ ७१ ॥ गजारूढ बताळे, भाट । प्रतापु रायाचा वर्णिती चाजट; । तेणें घोषें गगनाचें पोट । सपूर्ण भरत आहे. ॥ ७२ ॥ वेत्रपाणि राजभारांपुढें । धांवती, गर्जन करिती गाढें, । प्रळय मेघनादाएवढें । क्षणोक्षणीं भयानक. ॥ ७३ ॥ सेना चालिली चतुरंगिणी, । भारें लवों लागली धरणी; । वारेंनि हालतां अगाधपाणी, । वरि नौका खेळे जैशी. ॥ ७४ ॥ राजभारु वहु बळवतु । तेणेंकरूनि सहस्रफणि अनतु । हृदयीं जाला चिंताक्रांतु । कां पां जड भूगोलु आजि ? ॥ ७५ ॥ ऐसा असमाव्य दळभारू । चालिला, जेसा फुटला सागरू. । धूसर उदैलें तेणें दिनकरू । गगनीं आच्छादला. ॥ ७६ ॥ धुंडें दाटलिया दाही दिशा, । माडला खेचरांसि अति वळसा, । वाद्यें वाजतां, त्याचे निर्घोषा । दिग्गज साहों शकतीना. ॥ ७७ ॥ पूर्णशशांकवदना भेरी । धडकती, तेणें भूगोलु थरारी; । दुदुभीनिशाणांचां गजरीं । त्रैलोक्य बधिर जालें. ॥ ७८ ॥ शंख, शृंगें, पणव, काहळा, । यांचा घोषु उठिला आगळा; । रणमोहरींचा एकवळा । अतिवादें जाला. ॥ ७९ ॥ ऐसे रणवाद्याचे लक्षावधि जोड । राजभारापुढें वाजती सुघड; । तेणें संपूर्ण भरले वाड । व्योमाचें उदर. ॥ ८० ॥ अश्वोत्तमांचे उदैले हिंस, । उठिले कुंजराचे किंकाट कर्कश; । तेणेंकरूनि आकाश । कोंदलें तिये समयीं. ॥ ८१ ॥ आनंदें, निजर्में पदाति रूळ. । सिंहनादें गर्जतसे तुंबळ; । तेणें घोषें खगांचें कुळ ।

च्यजळें अवनीवरी. ॥ ८२ ॥ रथांचेनि घडघडाटें । ढळलीं विशाळ शैलकूटें, । भूतगणांचीं पुटउीं पोटें, । प्राण घेऊनि पळतीं, ॥ ८३ ॥ ऐसा सर्वमार्गीं मर्मर्तु । मिरवत चालला लंकानाथु, । हृदयीं जयाशेचा स्वार्थु दीर्घ धरिला असे, ॥८४॥ जशी जिंकावया देवेशा । वृत्रासुरें धरिली जयाशा, का वसतसमें महेशा । जिंकों इच्छितु कामु गेला. ॥ ८५ ॥ आपुलेनि वैभवें दशग्रीवें । क्षुद्रें मानिली भुवनें सर्वें । ब्रह्मादिकांसि दीर्घगर्वें । दृष्टिनाणी हुसरदें ॥ ८६ ॥ भूतगणचक्रांत भूतेश्वर, । का व्याळांत वासुकि विखार, । नाना पर्वतमंडळांत मेरु । विराजमान, ॥ ८७ ॥ नातरि निजगणांतु मृत्यु, । का रश्मिचक्रीं आदित्यु । ना तो ज्वाळांवेष्टितु वडवटितु । प्रळयपावकु, ॥८८॥ ऐसा मिरवतु समर्मोरें । जसी सीमा सांडिली सागरें, । रावणु वैभवें अति गजरें । तैसा रणभूमीसि आला ॥ ८९ ॥ पुढें पाहे नेत्रीं अरिदळ, । तव असमाव्य देखिलें तुंबळ, । जेवीं समुद्राचें जळ । अपार, अटक्मन. ॥ ९० ॥ रावणु आश्चर्य करूनि राहे, । तव, येरीकडे रघुनाथ पाहे, । आउ असमव्य दिसत आहे । कटक नैर्ऋत्यांचें ॥ ९१ ॥ खगेश्वराचे पक्ष दोन्ही । तैसी दिसे राक्षसवाहिनी । नेत्रीं निहाळूनि मनीं । अत्यंत आश्चर्य करी ॥ ९२ ॥ मग त्रिभुवनाचा पूर्वजु, । रणरंगधीरु रघुराजु । पाहोनि बिभीषणा राजू । बोलता जाला ॥ ९३ ॥ वृत्रासुरयुद्धीं अमरराणा । बृहस्पतीशीं बोले क्षणक्षणा, । तैसा रामु पुसे बिभीषणा । अमित्रांचें बमव ॥ ९४ ॥ 'पर्वतातुल्य एकेकु निशाचर, । ऐसा दोनि कोटि दळभारु, । त्यांतु मुख्य सेनाईश्वरु । कोण सांगा आला ? ॥ ९५ ॥ उत्तरवसतकाळीं तरणि । मध्यान्हीं तीव्र तपे किरणीं, । कवित्या दृष्टी कडसणी । नेत्रीं पाहवना बिंब, ॥ ९६ ॥ तैसें आति हक्ष वेना डोळां, । ऐतुकें तेज तुंबळ का परदळा ?" । तव बिभीषणु बोले, "भूपाळा, । आइका, सांगेन तुम्हा ।॥९७॥ जेणें अमरनिजा सेली कपटें, । दरिद्रदवासि दिधलें माटें, । नयाचिये गंदणी धाकटें । महाड अवघें, ॥९८॥ *विचारिता समर्थीते मही । येथें आ तु ऐसा दुजा नाहीं । पाताळींचें महा* मही । विटविलें बळें ॥ ९९ ॥ हा रथु सहस्रामाजा थोर । पाहता दिसे जैसा मेरु, । मधूनि आरण्य ना सागरु । दाप हा दाटिला नेणों !

पूर्वी कुबेरें अतिप्रयत्नें, । संचिलीं होतीं अमोल्यें रत्नें, । लंकाराजगृहीं ठेविला यत्नें, । तिये रावणा प्राप्त जाली. ॥ १ ॥ या रत्नांचीं सुतेज किरणें, । देखौनि लाजती तारांगणें; । हृदयीं धरूनि महाउणें । दिवसा मुख लपविती. ॥ २ ॥ ऐसा महारथु पहा, हो, । ध्वजु उभारला, जैसा काळाचा बाहो; । यातें देखतां युद्धीं मोहो । पावले देवगण. ॥ ३ ॥ चहूं कोनीं उंच पताका, । दिसतां अचचळा जैशा उल्का; । रथींचे घोडे, रघुकुळटिळका, । श्यामकर्णें, श्वेतांग. ॥ ४ ॥ रथा परिवेष्टित सुचित्रें, । नभचुंबित दहाही छत्रें; । तितुकींचि ढळती सूर्यपत्रें, । झळाळितें असती. ॥ ५ ॥ ऐसिये रथीं बैसला मेघवर्णु, । चित्रविचित्रां भूषणीं संपूर्णु; । हा, रघूत्तमा, जाण मुख्य रावणु, । विंशतिबाहो, दशमुखु. ॥ ६ ॥ सांडित : क्रोधाचिया उल्का । तुमशीं युद्धा आला, रघुकुळटिळका. । आजि यावयाचें कारण आइका, । सांगैन तुम्हां. ॥ ७ ॥ आपुला नीळु सेनास्वामी, । येणें कालिंचा संग्रामीं । महस्तु पाडिला, जी, रणभूमी । मुख्य प्रधानु रावणाचा. ॥ ८ ॥ पडलेया प्रहस्ताचें दुःख नांवरे, । म्हणौनि युद्धा आला त्वरें; । यासरिसे राक्षस रणधीरे । दशकोटि, पहा, आले. ॥ ९ ॥ रावणा दक्षिणमार्गे तळपतु । दिसे रथु; रुक्माचा रत्नखचितु; । ध्वजीं कुंजरु असे मंडितु, । ऐरावती सादृश्य. ॥ १० ॥ तुरंगोत्तम तुरंग श्वेत । रथीं जुंतिले द्वादश बळवंत; । वरि आरूढला तो इंद्रजित, । दर्पहरणु देवांचा. ॥ ११ ॥ कापव्याचा महासंग्रामु । तुम्हांसि दाखविला पहिलेंचि भ्रमु; । सकळांमध्यें याचा विक्रमु, । प्रतापें आला युद्धासि. ॥ १२ ॥ आणिक पहा, हो जी रघुवीरा, । रावणा वामांगीं दुसरा; । जो युद्धीं महाधीरा । प्रतिमा पर्वततुल्य. ॥ १३ ॥ पद्मखचित रथेंचें हेम, । ध्वजीं सिंहरूपें भीम; । जुंतिले आरक्त अश्वोत्तम, । तो अतिकायनामा. ॥ १४ ॥ राया, रावणा पार्श्वभागीं अवलोकीं, । खचित रथाचां कनकीं; । विचित्रता चहू पताकीं, । ध्वजीं व्याघ्र असे. ॥ १५ ॥ जुंतिले कृष्ण खर विशाळ, । जैसला भासे महास्थूळ, । चक्षु सूर्यतुल्य तेजाळ, । तो महोदरनामा. ॥ १६ ॥ आणिक पहा, जी रघूत्तमा, । गोमेद जडिले रथींच्या हेमा; । ध्वजीं शेषाची प्रतिमा । सहस्रमुख असे; ॥ १७ ॥ लंबकर्ण रथींचे

अश्वतर, । श्वेतताम्रवर्ण, चत्वार; । तो चापशरपाणि, महाक्रूर, । कुंभनामा होये. ॥ १८ ॥ तयाचिपासें पाहें, नरनाथा, । कांचनपत्रांखचित रथा; । उच्च ध्वजा तळपे माथा, । मत्स्यैकरत्न मंडित. ॥ १९ ॥ पिवळें शुद्ध जेंसें हेम, । तैसे रंगाचे रथीं तुरंगम, । हस्तीं पट्टिश तुळित, त्याचें नाम । निकुंभ ऐसें जाणा. ॥ २० ॥ अयें ध्वजपति, पहा हो, मांदर, । वर्ण श्वेत, चित्रींचें भंडार; । भूमीसि नवरी पुढिला म्लूर, । मयाखरीं शृंगारला, ॥ २१ ॥ आरूढलासे त्याचिये पृष्ठी, । खड्ग धरिलें वळिल्या मुष्टी, । वानरचमू लक्षी क्रूरदृष्टी, । तो देवांतकनामा. ॥ २२ ॥ इंद्रवाहनातुल्य थोर । शृंगारिला कुंजर, । दंत हाणोनि मेरु । चूर्ण करूं शके, ॥ २३ ॥ ऐसेया गजस्कंधावरि । आरूढला, तुळित खड्ग करीं, । चापतूणीरअंकित कवच वरि, । तो मकराक्षनामा. ॥ २४ ॥ आणिक, राजेंद्रा, पहा हो, । वृषभु उमा शैल्समदेहो, । ज्यावरि बैसे गौरीनाहो । तयाचि सारिखा चांगु. ॥ २५ ॥ तया वृषभ रूढ, अढळु, । कांति मेघवर्ण, विशाळु, । दक्षिण हस्तीं गदा, वामें शूळु, । तो मुंडशिरानामा. ॥ २६ ॥ महानागाचिये स्कंधावरि । आरूढ, जैसा महागिरि, । महाशिळा उचलिली करीं, । तो नागांतकनामा. ॥ २७ ॥ अश्वमुख, गजानन, व्याघ्रवक्र, । एक विकटबाहू, त्रिपदनेत्र, । वाहनें यांचीं चित्रविचित्र, । पहा, जी, शतांचीं सहस्रें. ॥ २८ ॥ नानारूपी, नानानामाचे । अगणित रावणाचे, । महाभूतगण जेसे त्रिपुरारीचे, । तेसे युद्धार्थ आले." ॥ २९ ॥ ऐसें बिभीषणु सांगत आहे, । राघवु आश्चर्य करितु राहे; । शत्रुसैन्य सुग्रीवा न साहे, । मग कोपा चढला. ॥ ३० ॥ मदोन्मत्तमाची वाहिनी । लोटली मर्यादा साडूनि, । ऐसें सिंहें देखौनि नयनीं, । कैसेनि राहेल उगा ? ॥ ३१ ॥ सर्प वसती रमणीक-द्वीपीं, । गरुड अकस्मात् एकांतें झडपी, । तसा रावणावरि मुख्य कपि, । सुग्रीवु, धाविन्ला. ॥ ३२ ॥ हाक देऊनि भयंकर, । चक्र ऐसें मंडिलें शिखर; । उचलिलेंनि हस्तें कठोर । रावणावरि टाकिलें. ॥ ३३ ॥ गिरिशृंग टाकिलें सुग्रीवें, । येत देखिलें दशग्रीवें, । लक्ष लावूनि क्रूर-मार्गें । संधान केलें सातीं शरीं. ॥ ३४ ॥ येत शिखर बाणें देखिलें, । शतभग्न होऊनि भूमी पडलें, । सर्वचि रावणें हाणितलें, । सुग्रीवासि

दाही शरीं. ॥ ३९ ॥ अष्ट लागले पाणिचरणीं, । वक्षस्थळ भेदिलें दों बाणीं, । तिये व्यथेस्तव कपि रणीं । आग घाळू पाहे. ॥ ३६ ॥ शरीरीं भेदालिया भाली, । पुनरपि सत्वशीया पाजळली, । त्याहीवरि, बाणली । धैर्याचिनि वैभवें. ॥ ३७ ॥ मग वानरेशें तिये अवसरीं । पादपाकितु उन्मूळिला गिरि, । सिंहनाद करूनि रावणावरि । टाकिला क्रोधें. ॥ ३८ ॥ पर्वतु पडता देखिला लंकेशें, । दश बाणीं दहा धनुष्यें । सधान करूनि रणकर्कशें । फोडूनि गिरि पाडिला. ॥ ३९ ॥ सवेंचि एक शत शरीं, । वृष्टि केली सुग्रीवावरि, । खिळणी जाली तेणें शरीरीं । रक्तधारा सुटलिया ॥ १४० ॥ पूर्वी पिनाकपाणिपुत्रें । क्रौंचु भेदिला पडूक्षें, । तैसा सुग्रीव द्विदशकनेत्रें । बहु बाणीं भेदिला. ॥ ४१ ॥ कपींद्रावरि पडलें शरजाळ, । हे डोळा देखे वानरदळ, । मग शिखरें घेऊनि तुंबळ । रावणावरि धाविन्नलें. ॥ ४२ ॥ रज उचलूनि गिरींसि लोधी वायो, । का मेघ वाणोनि आच्छादिती सूर्यो, । तैसा कपीसि देखोनि समयो, । बहुतीं शत्रु आक्रमिला. ॥ ४३ ॥ द्रुम, शृंगें, शिळाचिया चळथा, । कपि टाकिती परचमूचा माथा, । तेणें करूनि वाजीवारणरथा । सहार होतसे. ॥ ४४ ॥ सुग्रीवदूतशिळाद्रुमादळें, । सहस्रशत पडती एके वेळे, । महामार देखोनि क्रोधावलें । राक्षसदळ उठावलें ॥ ४५ ॥ घाये हाणिती येरयेर, । मिसळले कपिनिशाचर, । युद्ध आरभलें महाघोर, । न खोटली परस्परें. ॥ ४६ ॥ कोंटते, कटारे, फरशु, तोमर, । परिघ, पट्टीश, मुसळें, चौधार, । मुद्गल, गदा, चक्रें, शूळ, शर, । इयें हातियेरें राक्षसाचीं. ॥ ४७ ॥ पादप नभचुंबित, थोर, । शिळा, शृंगें, गिरिवर, । येहीं हातियेरीं वानरवीर । राक्षसातें ताडिती. ॥ ४८ ॥ आयुधें करीं तुटूनि निकरें । धडधडा हाणिती परस्परें, । वीरश्रियेचेनि अति पडिभरें । घाये लागता नमानिती. ॥ ४९ ॥ रुधिराचे पाझर सुटले, । वीर आरक्त सर्वांगीं जाले, । कुकुमें गिरि डवरिले, । तैसी उपमा दिसे. ॥ १५० ॥ होता दोहीं दळीं समामु, । राक्षसीं ठेलिली वानरचमू, । मग सप्त कपि धरूनि निक्रमु, । रावणा उजू धाविन्नले. ॥ ५१ ॥ सुदंष्ट्र, गवय, गवाक्ष, सुषेण, । ज्योतिर्मुख, ऋषभु, नळ, सप्त जण, । याचीं अति आगळण । रिपुसंघट्टणीं. ॥ ५२ ॥ सप्त

पर्वत उचलिले, । पाणितळीं पर्वता ऐसे भवंडिले; । मग रावणावरि टाकिले । थोरें त्राणें. ॥ ५३ ॥ पडतां पर्वतांची वृष्टि । रावणें देखिली ऊर्ध्वदृष्टी; । मेढे उचलिले दाहीं मुष्टी, । संधान केलें शीघ्र. ॥ ५४ ॥ जैसें मनाचें वेगाडेपण, । तैसे मोकलिले वज्रबाण; । सप्त पर्वत शतचूर्ण । पृथ्वीवरि पाडिले. ॥ ५५ ॥ कर्दळीपत्रवत पसरटा, । रुक्मपुंखा भाली तिखटा; । तैल्घुता काठिया नीटा । चापांपासूनियां सुटती. ॥ ५६ ॥ सप्तही वानरांतें तिये अवसरीं । खिळिलें एकएके शरीं; । ते व्यथाभूत धरणीयेवरि । पडले, आक्रंदती. ॥ ५७ ॥ आणिकही बळिये प्लवंगम । हाणित होते शिळा, शृंगें, द्रुम; । तंव रावणु शरजाळीं व्योम । संपूर्ण करिता जाला. ॥ ५८ ॥ असंख्ये बाणांचेनि संहारें । भेदिलीं बहुतां कपींचीं शरीरें; । पिच्छें उभारिती मयूरें । तैसे बाण लागले अंगीं. ॥ ५९ ॥ भंगलिया वानरांच्या चळथा, । रावणशरीं पावले व्यथा; । मग शरण गेले रघुनाथा, । "रक्ष, रक्ष इये काळीं. ॥ १६० ॥ रावणें मोकलिलें शरजाळ, । तेणें खिळिलें अति कपिदळ; । पर्वतातुल्य वीर विशाळ । भंगिले दशग्रीवें." ॥ ६१ ॥ ऐशी कपींचीं आइकौनि उत्तरें, । धनुष्य उचलिलें रघुवीरें; । जैसें षण्मुखें, शिवकुमरें, । तारकासुरावरि. ॥ ६२ ॥ तूणीमधूनि काढिले शर, । वज्रासारिख्या भाळी कठोर; । गुणीं लावावे, तंव जोडिले कर । पुढें लक्ष्मणें. ॥ ६३ ॥ "अयोध्याधीशा, रघुराजा, । जानकीजीवना, ममाग्रजा, । स्फुरण होतसे माझेयां भुजां, । तूं तंव उतावीळ युद्धालागीं. ॥ ६४ ॥ मी रावणातें मारीन निर्धारें, । आज्ञा शीघ्र द्यावी उदारें;। हें आइकौनि म्हणे, "भला वरें, । कल्याण असो तुज." ॥ ६५ ॥ रघूत्तमें हें बोलिलियावरि, । लक्ष्मणु चापशरांत सज्ज करी; । भेदा सादिला सरळां शरीं, । रावणु पाचारिला. ॥ ६६ ॥ म्हणे, " अमरारि, महाखळा, । वरवें भंगिलें वानरदळा; । आतां माझी बाणवृष्टि सबळा । साहें, चळित होऊं नको. ॥ ६७ ॥ जें वसत होतें माझां मनीं, । तें आजि देखिलें लोचनीं; । तुझेनि मेदमांसें मेदिनी । चर्चित होईल आतां. " ॥ ६८ ॥ ऐसें बोलौनियां सौमित्रें, । भातांचे बाण काढिले मंत्रें; । तव आड घातले वायुपुत्रें, । रावणावरि धांविन्नला. ॥ ६९ ॥ विद्युल्लता पडे पर्वतपाठारीं, ।

तैसा आदळला रथावरि; । दोर्दंडधाप वाऊनि शिरीं । बोलता जाला रावणेसीं. ॥ १७० ॥ " अरे दशमुखा, सत्य जाण, । देवांपासूनि तुज कल्याण; । परि नरकपींपासावं निर्माण । तुझा मृत्यु असे. ॥ ७१ ॥ माझा उचलला पंचांगुळ करु । वज्रासारिखा महाकठोरु; । म्हणौनि करीन तुझा संहारु । त्यां अश्वांसहितु. " ॥ ७२ ॥ तंव दशग्रीव म्हणे, " रे वानरा, । मूर्खा, मंदमति, पालेखाइरा, । मज वन्हीचां मुखीं एकसरा । पडलासि, रे पतंगा. ॥ ७३ ॥ मर्यादा सांडूनि आपुली । भूता काळेसीं बोलसी बोली; । तुज आतां म्यां सेल दिधली, । इच्छेस्तव हाण मज. " ॥ ७४ ॥ हनुमंतु म्हणे, " माझी आंगवण । जाणतसे तुझें अंतःकरण; । केलें अक्षयासि निर्वाण, । राजधानी जाळिली. " ॥ ७५ ॥ ऐसें आईकौनि रावणें । हनुमंतु हाणितला चरणें; । वानरु महाप्रहारें तेणें । रथाखालीं पडला. ॥ ७६ ॥ सांवरूनि आपणातें वायुसुतें । रावणु थापा हाणियला कोपें बहुतें; । जैसा पर्वतु वज्रघातें । इंद्र हाणे पूर्वी. ॥ ७७ ॥ हनुमताचेनि पाणिप्रहारें । रथावरि डळंटिजे दशशिरें; । जैसी चंडवातें कर्दळीतरुवरें । स्थावरता सांडिजे. ॥ ७८ ॥ मूर्छा अमरशत्रूची गेली, । मग अतिक्रोधें मुष्टी वळिली, । उभारूनि तवकें दिधली । हनुमंता वक्षस्थळीं. ॥ ७९ ॥ तेणें घायें आली गिरिगिरी, । अंजनीकुंसिवा भूमि स्वीकरी. । रावणु गर्जे तिये अवसरीं । गुणीं बाण लाविले. ॥ १८० ॥ पर्वतु उचलूनि विशाळु । पुढें धांविन्नला कपि नीलु; । रावणावरि टाकिला वर्तुळु, । जो वज्रासि अभेद्य. ॥ ८१ ॥ पर्वतु पडतांचि रथावरि । रावणें भेदिला सातीं शरीं; । तंव हनुमंतु तिये अवसरीं । सावधान जाला. ॥ ८२ ॥ मागुतें नीळें वाहिनीश्वरें । शृंग उचलिलें दुसरें, । रावणावरि टाकिलें कोपें थोरें । आंगींचेनि बळें. ॥ ८३ ॥ लक्ष लावूनि उर्ध्व रावणें । तेंही फोडिलें नव वाणें; । वाहिनीपतीसि आलें उणें, । मग लाघव आदरी. ॥ ८४ ॥ जापिन्नला मंत्रमायेचें वैभव, । बहुत नीळ जाले नीळापासाव; । हें देखौनि दशग्रीव । अति आश्चर्य मानी. ॥ ८५ ॥ एकाचि नीळापासाः कोटि । नीळ उदैले, देखे दृष्टीं; । जैसा आकाशीं जीमूतींचां पोटीं । अमितधारावर्षावो. ॥ ८६ ॥ कां पावकापासौनि उत्पत्ति । होये स्फुलिंगें, कोण जाणे किती; । तैसी

नीळापासाव नीळीं व्यापिली क्षिती, । रावणु आश्चर्य करी. ॥ ८७॥ जेजे-कडे, पाहे पौलस्ती, । ते ते ठायीं नीळ असती. । द्रुम, शिळा, शिखरें टाकिती । रथावरि रावणाचेया. ॥ ८८ ॥ ऐसा नीळुसमुदावो उदैला, । रावणरथप्रदेशु वेष्टिला, । मुख्य स्वरूपें उडौनि बैसला । ध्वजस्तंभावरि. ॥ ८९ ॥ महा अपूर्व लाघवी कळा, । आश्चर्य वाटे द्रुपदलां, । रावणा कोपु आला, वडवानळा । जैसा सिंधु शोषितां. ॥ १९० ॥ मग काये केलें दशवक्रें ? । बाणु सजिला अग्निशस्त्रें, । उच्चारण करूनि बीजमंत्रें । लाविला कोदंडीं. ॥ ९१ ॥ पूर्ण वोढोनियां कानाटीं । चापापासौनि शर सोडी; । तंव शिखायुक्त धडधडी । पावकु पसरला. ॥ ९२ ॥ प्रहारु आदळला वाणाग्नीचा, । शिखांकरूनि पोळली त्वचा; । पतंगप्रायो देहो नीळाचा । पृथ्वीवरि पडिला. ॥ ९३ ॥ व्यथा पावलें मुख्य स्वरूप, । मग मायानीळ अदृष्ट आपेंआप; । जैसें अनिळें माल्हवती दीप । आकाशअवकाशीं. ॥ ९४ ॥ नाना पारेयाचा समुद्रु फुटला, । तो पृथ्वीवरि ठायीं ठायीं विखुरला; । पुनरपि जैसा एकवाटला, । तैसे निर्धी नीळ मिळाले. ॥ ९५ ॥ ऐसा पराभविला नीळनामा, । मारिलें कितीएकां प्लवंगमां; । पुनरपि करावया संग्रामा । रथु सारथियें प्रेरिला. ॥ ९६ ॥ जैसा सिंहासि सिंह झेंपावे, । कीं शार्दूलु शार्दूळासि भिडों पावे, । तैसा सौमित्रावरि धावे, । धनुष्य वाऊनि शिरीं. ॥ ९७ ॥ आतां दशमुखा आणि लक्ष्मणासि । महायुद्ध होईल दोघांसि; । तो वीररसाभिप्रावो मानसीं । चतुरादिकीं आणिजे. ॥ ९८ ॥ इति श्रीयुद्धकांड, रघुनाथचरित्र, । वाल्मीकिकृत, महापवित्र, । तेंचि वोळिजैल महाक्षेत्र, । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १९९ ॥

—:o:—

## प्रसंग सव्विसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । वीर पटलेयांचा करूनि पद्मु, । आणिला सेनामुखीं रथु; । पुढें लक्ष्मणु नैऋत्यनाथु । कोपें लक्षिला आला. ॥ १ ॥ वानरवीरांचीया कोटि । लक्ष्मणें घातलिया स्वपृष्ठीं; । पुढें धावूनि वीरजेठी । रावणु पाचारिला. ॥ २ ॥

होत निजभुजांचें स्फुरण, । रणमंडळीं मांडिलें ठाण, । कोदंड टणत्कारूनि, बाण । लाविले शीतीं. ॥ ३ ॥ वीरजेठी सुमित्रेचा बाळु, । रामानुजु तो वेल्हाळु, । भासला मूर्तिमंत काळु । राक्षसदळातें. ॥ ४ ॥ रावणरथाचा रावा । तोचि मर्यादावेळु जाणावा; । सौमित्रवीरश्रीसिंधुहेलावा । तेथवरि टेला; ॥ ५ ॥ कां जैसी सरलेया शार्वरी । सूर्यु प्रकाशे उदयाचळावरि; । सा कोपारूढ कोदंडधारी । दशग्रीवें देखिला. ॥ ६ ॥ रावणु छळवादें हणे, "सौमित्रा, । आतां संधान दाखवीं, राजपुत्रा. । पारे मज मार्तंडा-ढें, नक्षत्रा, । किती प्रतापतेज तुझें? ॥ ७ ॥ अरे इंद्राचेनि वज्रघातें । आणि ऐरावतीचेनि चौदंतें । युद्धीं प्रहारु लागतां, माझिया रोमेतें । वक्रता आली नाहीं. ॥ ८ ॥ ऐसेया मजशीं तू बाळकु । करीन म्हणसी संग्राम-कौतुक; । तुझा माथा गर्भमळ मस्तकु, । अद्यापि चर्चितु असे. ॥ ९ ॥ कोणे नृपासीं, कोणे संग्रामीं, । कोणे काळीं जयो पावलेति तुम्ही? । हें सांग; मग रणभूमि । आक्रमूनि राहें. ॥ १० ॥ आपणेंया म्हणविसी वीर चांगु, । पारे मजसीं न घडे, रे, सग्रामसगु; । जैसा अग्निपुरुषेसीं पतगु । तुळणा नपवेचि. ॥ ११ ॥ अरे सुपर्णु आणि भुजंगु, । केसरी आणि नागु, । महाव्याघ्र आणि मृगु । काय सम होती? ॥ १२ ॥ म्हणौनि तू मानवी, रे लक्ष्मणु, । मी राक्षसराजु रावणु; । तुज मज संग्रामु दारुणु । न घडे, रे निर्बळा. ॥ १३ ॥ उचलोनियां निजकरु । जो पडतेया गगना दे-वीरु, । तोचि मज रावणेसीं वीरु । संघट्टणी साजिरा. ॥ १४ ॥ समुद्र मर्यादा साडितां, । जो आवरूं शके भुजलता, । तयाचि वीराशीं मज समता । क्षत्राचां मडळीं. ॥ १५ ॥ माझेया धनुष्यापासूनि सुटती शर, । तेणें भेदूं शके मंदरा, मेरूचें उदर; । ते बाण लागता तुझें शरीर । कैसें उरेल पृथ्वीवरि? ॥ १६ ॥ कीटकु बळें पडे अग्निकुंडीं, । तैसा बळें सांपडलास संग्रामाच्या तोंडीं; । आता माझेनि कोपें राखोंडी । होईल तुझी ये काळीं." ॥ १७ ॥ ऐसें दशकंठु जाला बोलता. । अधिक न साहे सुमित्रासुता. । मग प्रत्युत्तर जाला देता । धीरोदात्तप्रभु. ॥ १८ ॥ म्हणे, "रे तस्करा, कापट्यनिधि, । तुज विनाशकाळीं विपरीत बुद्धि. । पुरली तुझिया आयुष्याची अवधि । मग आम्ही येथ आलों. ॥ १९ ॥ अरे, मी सुमित्रे होयें बाळु, । परि

तुझेया इंद्रजिताचा काळु; । आतां नलगतां वेळु । काय करीन, पाहें पां. ॥ २० ॥ अरे, तू दशमुड, विंशतिभुज; । परि मशकतुल्य आमुचिये दृष्टी उज्. । सिंहचपेटातळीं गजु । तैसा सांपडलासि मज. ॥ २१ ॥ तुझेया कंठाचें निवटण । करिती रघुनाथाचे वाण; । ऐसेंचि भविष्य असे जाण, । विधातेयाचें लिखित. ॥ २२ ॥ सहस्त्रभुजाचा वधिला जेणें, तो भग्नदर्प केला रावणें येणें, । म्हणौनि रामाचेनि वाणें । वीस भुजा उरी कैंची? ॥ २३ ॥ थावरलेया अगस्तिकर । आचमनें नेवपैल सागर, । हा तव विपरीत विचारु । करणें नलगे. ॥ २४ ॥ लागता सिंहचपेटप्रहारु । प्राणातें नसडी कुंजरु, । ऐसा विपरीत विचारु । करणें नलगे. ॥ २५ ॥ उदयाचळारूढ जाला दिनकरु, । निबिड न नाशे अंधकारु, । ऐसा विपरीत विचारु । करणें नलगे. ॥ २६ ॥ क्षोभलेया रुद्राक्षींचा वैश्वानरु । नव्हेल सृष्टीचा सहारु, । ऐसा विपरीत विचारु । करणें नलगे. ॥ २७ ॥ झेंपावलेया खगेश्वरु । सवढ़णीं पुरेल विषधरु, । ऐसा विपरीत विचारु । करणें नलगे. ॥ २८ ॥ आता सधान करेल रघुवीरु । आणि क्षेमें राहील दशशिरु,। ऐसा हा विपरीत विचारु । करणें नलगे. ॥ २९ ॥ असो हें, रे, बहुत बोलणें. । रामु अनंतरला याचिकारणें. । तो समयो, पाहें पा, करणें । विपरीत काराया ?" ॥ ३० ॥ काठिण बोलतसे लक्ष्मणु । कार्मुकीं सज्जूनिया बाणु, । म्हणे, "आजि दशमुड हरिणु । म्या पारधियें साधिला. ॥ ३१ ॥ तृपाक्रांत माझे शर । शोषू पाहती तुझें रुधिर. । आता सावधान होई, समोर । साहें शरसंधान माझें." ॥ ३२ ॥ ऐसें बोलिलें लक्ष्मणें । तव धनुष्यें वाइलीं रावणें. । मंदराचळु शकें भेदों जेणें । तैसे शर सोडिले. ॥ ३३ ॥ रक्तमुख, चित्रविचित्र, सरळे, । माळी विद्युल्लतातुल्य तेजाळे, । एकापरिस एक आगळे । बोटयोंढी प्रसवती. ॥ ३४ ॥ सुसाटघोपें गुणींहूनि सुटले, । आकाशावकाशीं थाणंले, । ते येत सौमित्रें देखिले । काळदडासारिखे. ॥ ३५ ॥ वीर सायका शिरोमणि, । सधान केलें लक्षूनि बाणीं. । रावणाचे शर येतक्षणीं । सोडिले भूमंडळीं. ॥ ३६ ॥ निर्जीव सर्प पसरले पृथ्वीवरी । वण तुटले तियेचिपरी; । हें देखौनि कोपें सधान करी । पुनरपि रावणु. ॥ ३७ ॥

शरवृष्टीसि पाहिलें वीरराजें । मग बाण सोडिले सुमित्रात्मजें, । जयां भालींवरि लिखित बीजें । रामनामाचीं असती. ॥ ३८ ॥ लक्ष्मणाचां तीक्ष्ण बाणीं । रावणशर तुटले संघट्टणीं. । भालींचा खणखणाटें धरणी । वैश्वानरु वृष्टि करी. ॥ ३९ ॥ शब्द शद्वातें छेदूनि सांडिती, । तैसे बाण बाणातें तोडिती; । मग रावणु विचारी चित्तीं । लक्ष्मणु निका वीरु. ॥ ४० ॥ मग रावणें बुद्धि योजिली: । पूर्वी ब्रह्मेन शक्ति होती दिधली, । ते बीजमंत्रें जपूनि टाकिली । लक्ष्मणावरि. ॥ ४१ ॥ कडकडायमान उठिला घोषु, । महाभूतांसि वाटला त्रासु, । आकाशीं उजळला प्रकाशु । सहस्रां विद्युल्लतांचा. ॥ ४२ शक्ति आदळावी जंव आवघी वरि । तंव लक्ष्मणें भेदिली येतुतां शरीं; । ते द्विभाग तुटली अंबरीं, । अर्ध पडली भूमंडळीं; ॥ ४३ ॥ अर्ध शक्ति दैदीप्य उतरली । ते लक्ष्मणाचां आंगीं आदळली, । पर्वतीं जैसी वीजु पडली, । सौमित्रु भूमीसि राहे. ॥ ४४ ॥ पडलें देखौनि लक्ष्मणातें । रावणु धांविन्नला कपटें मतें; । मुष्टी वळूनि दशहस्तें । ताडण करिता जाला. ॥ ४५ ॥ देखौनि लक्ष्मणाचा व्यथासमयो । क्रोधें खवळला अंजनीतनयो. । अग्नीस साहाय्य जैसा वायो । तैसा धाविन्नला. ॥ ४६ ॥ वेगें कठोर दोर्दंड उचलिला । रावणु वक्षस्थळावरि पीटिला. । तया प्रहारासरिसा वमूं लागला । अशुद्ध उदरींचें. ॥ ४७ ॥ मूर्छना सांवरूनि तिये अवसरीं । रावणु गेला निजरथावरि; । तव सौमित्रुही शरीरीं । सावध जाला. ॥ ४८ ॥ पुढती धनुष्यें वाऊनि मुष्टी । रावणु करिता जाला वृष्टि; । ऐसें रघुत्तमें देखौनि दृष्टीं । चापीं गुण चढविला. ॥ ४९ ॥ मारुतीच्या स्कंधावरि. । रावणारि आरोहण करी. । तूणीमधूनि बाण काढिला करीं, । अपूर्व संधान केलें. ॥ ५० ॥ सहजें रघुवीरें, रणकर्कशें, । एका शरसंधानासरिसें । लंकापतीचीं मुकुट, छत्रें, दहा धनुष्यें । छेदूनि सांडिलीं. ॥ ५१ ॥ पुढें रघुराजु म्हणे, "रे अमित्रा, । माझेया बाणांचेया प्रीतिपात्रा, । परि आजि न मारीं, दशवक्त्रा, । जीविलें रक्षिलें. ॥ ५२ ॥ आजि तुवां केला अतिसंग्रामु, । भंगिली वानरांची चमू; । ऐसेयास्तव पावलासि श्रमु । अतिमानें करूनि. ॥ ५३ ॥ पळस तरु आरक्त पुष्पैला । तैसा देहो तुझा रक्तबिंदांकित जाला, । हें जाणौनि तूणीमाजीं स्थिरावला । दुसरा बाणु माझा. ॥ ५४ ॥

अरे, तुझेया वयाचां शेवटीं । तुज मज झाली भेटी; । आता मंदोदरी बैसली तटीं। दुःखसागराचिये. ॥ ५५ ॥ तरि, शत्रु, जाण याचिलागीं । तुज आजि सोडिलें रणरंगीं; । आतां शीघ्र जाऊनि मोगीं । पुत्रकलत्र आपुलें. ॥ ५६ ॥ तुझीं कुमरीकुमरें धाकुटीं । स्नेहें त्यांसि दे भेटी. । मुखमात्रअनुभवें पाहे दृष्टी । सकळां सुहृदातें. ॥ ५७ ॥ आणिक, रावणा, सांगतों तुजः । हें राजनीतीमध्यें सरेना सहज, । मुख्यामि नव्हे ओज । पुढें युद्ध यावयाची. ॥ ५८ ॥ सर्व दळ पडलेया रणभूमी । मग युद्धाकारणें प्रवर्ते स्वामी; । अमर्याद सैन्य असतां, संग्रामीं । न निघावें नृपर्तानें. ॥ ५९ ॥ तरि तुझे अमित बंधु, कुमर । असतां बळिये, जिहीं जिंतिले सुर; । आणि मत्री, अगत्य निशाचर । चतुरग मिथुममान. ॥ ६० ॥ इतुके संहारलेयाविण । आणि तुवा माजविणें रण, । हें तुझें अनहित जाण; । आजि मृत्यु आला होता. ॥ ६१ ॥ इये वेळे येथौनि जाईं, । नको राहों रणरगाचा ठायीं; । दुसरेनि मागुता येई । मजसीं युद्धाकारणें. ॥ ६२ ॥ सुटलेया माझा शरप्रवाहो । तिळतुल्य खडेल तुझा देहो. । पुढिला जन्मीं अनुग्रहो । करीन जाण, निरोपिया. ॥ ६३ ॥ ऐसा बोलतसे रघुवीरु, । श्रवणें भग्न दशाशिरु, । अजेनें अवलोकिला अजगरु। तैसा निगातु न बोले. ॥ ६४ ॥ दरिद्र दु खें देशधडी जाला, । तैसा रावणु रणींहूनि भ्रष्टला. । परातें पृष्ठी देऊनि निघाला । निजनगराप्रति. ॥ ६५ ॥ सिंहापासूनि सुटे नागु; । का गरूडापासूनि पळे भुजगु, । जैसा पारधियाचेया सधाना चुकला मृगु, । तैसा रावणु निघाला; ॥ ६६ ॥ कां हरिनामापासूनि पापमळु, । का गंगास्नानापासूनि निटाळु, । नाना सूर्योदयीं तमकल्लोळु। दिग्मंडळ लंघी. ॥ ६७ ॥ दरिद्र जाय देखौनि भाग्य, । मोहो निरसे उदेलेया वैराग्य, । प्रकटलेया ज्ञान वैमार्ग्य । मग अज्ञान कोठें राहे? ॥ ६८ ॥ असो हें. रघुवीरापासूनि । रावणु निघाला प्राण घेऊनि, । सरिसी अमर्याद वाहिनी । मुरडली वातवेगें. ॥ ६९ ॥ मत्री, अगत्य निशाचर, । इंद्रजित, अतिकाया, महोदर । आणि कुंभकर्णाचे कुमर । परतले वातवेगें. ॥ ७० ॥ जयो न येचि लंकापर्तासि, । दु:ख तुवळलें सर्वांचा मानसीं; । उच वदनें कोण्ही कोणहासि । न बोलत निघाले. ॥ ७१ ॥ पल्लव घेऊनि मस्तकावरि । रावणु प्रवेशला लंका-

पुरी, । जैसा वनिताचक्राभीतरीं । क्लीबु आला पैं. ॥ ७२ ॥ नाना रत्न विशेषांचें भांडार । तेथें अंधासि ठाकिलें विढार, । तैसें रावणाचे मना नगर । प्रवेशतां वाटे. ॥ ७३ ॥ युद्ध करितां श्रमली सेना । तियेसि आज्ञा जाली, गेली स्वस्थाना. । सभामंडपीं घेऊनि प्रधानां । रावणु विचारीं बैसला. ॥ ७४ ॥ इति श्रीयुद्धकांडकथा रामायणीं, । भविष्य वदली वाल्मीकीची वाणी, । आतां कुंभकर्णनिद्राभंग आइका श्रवणीं । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ७५ ॥

---

## प्रसंग सत्ताविसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । नैर्ऋत्यनाथु, अमरारिपु । राघवापासूनि झाला भग्नदर्पु; । तनु वोसावली, संतापु । उदरीं वाढिन्नला. ॥ १ ॥ राहो ग्रासी जिये काळीं रविकिरणें, । तैं बिंबीं बैसे तमाचें ठाणें; । तैसीं लोपलीं वैभवलक्षणें, । म्लानें दशाननें जालीं. ॥ २ ॥ सिंहासनीं सतोषु नवटे, । सेवक पूजिती, परी मन विटे; । लज्जालक्षणशस्त्रें तुटे । गुप्त अभ्यंतरीं. ॥ ३ ॥ लज्जेचें जाळें वरि पडलें, । दैन्यें अधोगतीतें अंगीकारिलें, । वाग्देवीनें कुंठिलें । स्वव्यापारातें. ॥ ४ ॥ दर्पु हृदयींचा निगोनि गेला, । चिंताचित्तेसीं संगमु जाला, । गर्वनदीचा ओहटला । जो तुंबळ पूरु होता. ॥ ५ ॥ ऐसा निवांतु सभामंडपीं । आपुलां अंतर्यामीं कल्पी; । म्हणे युद्धासि जावें पुनरपि, । कीं कुंभकर्णासि पाठवूं ! ॥ ६ ॥ रावणासि विचारु पडला ऐसा, । हृदयीं श्रमे उद्वेगवळसा; । समयीं जया प्रधानाचा भरवसा । तया महोदराप्रति बोले. ॥ ७ ॥ म्हणे, "आजिचा कैसा विपरीत समयो ! । शशिकिरणें आच्छादिला सूर्यो, । जंबुकापासूनि पराजयो । सिंहासि प्राप्त जाला. ॥ ८ ॥ तुम्हां वीर्यवंतांसहवर्तमान । मज ठाकलें न्यूनताचिन्ह; । आजि सहस्रभगाचें वदन । थोरावलें असैल. ॥ ९ ॥ ऐसीं त्रिकूटेश्वराचीं उत्तरें । विक्रमेंरहित, अमुस्वरें, । तियें परिसौनि महोदरें । बोलों आरंभिलें. ॥ १० ॥ म्हणे, "वरि पडतां शमीपत्रें । महागजाचीं भगलीं गात्रें, । ऐसें काण्हाचेनि मुखमंत्रें । श्रवण जालेंचि नाहीं. ॥ ११ ॥ तृणाग्राचिया चुबकवणीं । कूर्मकवठेयाची झाली चाळणी, ।

हें कोण्हाचेनि मुखें श्रवणीं । आइकिलेंचि नाहीं. ॥ १२ ॥ वैश्रवणारि, तुझेनि दर्पानळें । उष्णें मरळीं सप्तपाताळें, । त्या उबारेयास्तव सर्पकुळें । आगींच्या त्वचा साटिती. ॥ १३ ॥ तुझेया प्रतापाचा उबारा । साहवेना सहस्रकरा, । वेगें पावोनि पश्चिमसागरा । रथेसीं माजी बुडे. ॥ १४ ॥ आणिक तुझिया दर्पागी । बाधा केली अमरांगीं, । त्याचेया देहापासाव धगी । सुरागनाकुचीं जडली. ॥ १५ ॥ त्याचेया चक्षु कुचासि असे मित्र, । म्हणौनि कुचावरि श्रवती नेत्र; । तेणें जळनोघें पात्र । मंदाकिनीचें तुवळलें. ॥ १६ ॥ आहळला तुझा प्रतापकरीं । वडवानलु पडला सागरीं; । मग तो तेथेंही प्राशन करी । उदक योजनें बारा. ॥ १७ ॥ तुज राज्य करिता गर्वनिधि, । दासी जालिया सर्व सिद्धि; । भयें सर्वही महोदधि । मर्यादा नसडिती. ॥ १८ ॥ रविमंडळ वावरे गगनीं, । रश्मीं व्याप्त मेदिनी; । तैसे तुम्ही लंकेसि, परि त्रिभुवनीं । प्रतापु पसरलासे. ॥ १९ ॥ ऐसेया उग्र नैर्ऋत्यनाथा, । तू कृतांतासि करिसी व्यथा; । वैरी आक्रमितीं, हा वृथा । सकलु धरिसी मनीं. ॥ २० ॥ राया, आजि संग्रामीं । तुझा शोणितें पूर्ण केली भूमी; । महायोद्धे पराक्रमी । शरप्रवाहीं खंडिले. ॥ २१ ॥ सुग्रीवु शतमग्न केला, । हृदयीं हनुमंतु ताडिला, । अपूर्व माया नीळु नडला, । त्याची जाळिली त्वचा. ॥ २२ ॥ शक्ति टाकिली सौमित्रावरि, । बाण भेदाने रामशरीरीं । तव सूर्य पळाला सृष्टिबाहिरि, । ओहटु जाला दोहीं दळीं. ॥ २३ ॥ ऐसा संग्रामु अद्भुत जाला, । मग तुम्हीं लंकाप्रवेशु केला; । तुझा अमित्री जयो आर्जिला, । हें मिथ्यामय कल्पिता. ॥ २४ ॥ कोटींच्या कोटि नैर्ऋयदळ । आहे लंकेमध्यें तुंबळ, । हेंचि संग्रामा पाठवावें केवळ, । आम्हीं तुम्हा जाणें न घडे. ॥ २५ ॥ राया, ऐसी बुद्धि माझेनि मतें । चेतवावें निद्रिता कुंभकर्णातें; । तो उठिलेया गिळील शत्रूतें, । जैसा काळु भूतें मक्षी. ॥ २६ ॥ प्रथमचि चुकी पडली, । निद्रा कुंभकर्णाची नाहीं भगिली, । असो, होणार गति ते जाली, । पुढें सूचना ऐसी असे. ॥ २७ ॥ आता शीघ्र, जी लंकानाथा, । कुंभकर्ण उठवावा सर्वथा । तो वैरियासि

---

१. अ. भक्षी तुसवा पुरुषार्थी । हा वृथा.

करील सहारव्यथा, । एतदर्थी संदेह नाहीं. ॥ २८ ॥ क्षोभलेया प्रळय-
वैश्वानरु। होईल सर्वसृष्टिसंहारु, । तैसा संग्रामा गेलेया सहोदरु। रामलक्ष्मण
वे? " ॥ २९ ॥ ऐसें महोदराचें बोलणें । यथार्थ मानिलें रावणें; ।
ा म्हणे, " तव चातुर्या वाटे उणें । त्रैलोक्य, महोदरा. ॥ ३० ॥ जें
तें माझां अंतःकरणीं । तेंचि वदली तुझी वाणी; । आतां कुंभकर्णा
ठवूनि आणीं । शीघ्र युद्धाकारणें. " ॥ ३१ ॥ दशग्रीव ऐसें बोलों सरे,।
व विरूपाक्ष, महोदरु उठिले त्वरें; । आणि दहा सहस्र पुढारें । राक्षस
ंविलले. ॥ ३२ ॥ मद्याचे घट, मांस, पशूंचीं शतें । घेऊनि चालिले सांगातें; ।
न्नपर्वत भिजवूनि शोणितें । पुढें पाठविले. ॥ ३३ ॥ चौंतोंडियांमध्यें
रूनि जळें । कुंजरांवरि, चालिले तुंबळें; । पुष्पमाळा, तांबूलें । तेंही
तलें असे. ॥ ३४ ॥ वाजी, रथ, पदाति मदोन्मत्त । महोदरासवें असं-
ख्यात; । रणतुरें वाजिन्नलीं, भयचकित । त्रिभुवन होये. ॥ ३५ ॥ सर्वें
किन्नरकन्यांचे मेळ । शंख, यंत्रविशेष, मृदंग, टाळ; । ऐसिये सामग्रीसीं
निगाले मूळ । कुंभकर्णा उठवावेया. ॥ ३६ ॥ मार्गी करिती महागजरु. ।
चालिले उठवावेया महावीरु. । कुंभकर्ण निद्रासागरु । तेथें संगम जाले.
॥ ३७ ॥ पावले कुंभकर्णनिद्रास्थळ, । योजन एक महाविशाळ, । जैसें
कृतांताचें घेवळ । निजस्थान भयंकर. ॥ ३८ ॥ दळेसीं महोदरु, विरू-
पाक्ष आले । ते द्वारिंचे द्वारीं थोकले. । तेथूनि पाहों लागले । तंव निद्रिस्तु
देखिला. ॥ ३९ ॥ भयानक त्याचें स्वरूप । देखोनि राक्षसा उदैला कंप. । एक
वळिये एकासमीप । दृढ उभे राहिले. ॥ ४० ॥ वीरु कुंभकर्णु निजेला कैसा, ।
पृथ्वीवरि पर्वतु जैसा; । मेघवर्णु सर्वांगासरिसा । भासे भयानकु. ॥ ४१ ॥
गगनचुंबित वृक्ष उन्मूळले, । तैसे करचरण चान्ही पसरले. । सागर जातीं
सामावले । ऐसें उदर दीर्घ. ॥ ४२ ॥ शैलाचा मस्तकपाठारु । ऐसा
चौफळ दृढ उरु; । वरि पडतां वज्रप्रहारु । अनुच्छिन्न नाहीं. ॥ ४३ ॥
पर्वतावरील उच्च शिखर । तैसें ग्रीवेवरि विशाळ शिर. । ललाट अत्यंत
कठोर । महाशिळेसारिखें. ॥ ४४ ॥ भयानक धनुष्याकार भ्रुकुटी, । नेत्र
जैसे कुंडींची आगिठी, । पापणियांची बाबरझांटी मोठी, । तेणें झांकली
वपु. ॥ ४५ ॥ अक्षय वटपारंबियांचीं पाहाळें । तैसीं मस्तकीं जटाजाळें; ।

दोही कर्णांचीं कर्णबिळें, । दिशांचीं मुखें जैसीं. ॥ ४६ ॥ महानासिका भीतरीं । प्रणालिका जैसी पर्वतदरी; । श्वासोच्छ्वासाची मरोवरी । प्रळयवायुसारिखी. ॥ ४७ ॥ पृथ्वीचें उदर उललें । तसें मुख विक्राळ पसरलें, । त्यामाजीं जिव्हातेळ निगाळे । सेंदुरसरिता जैशी. ॥ ४८ ॥ हारीं रोंविले शुभ्र शूळ । ऐसे दंत, दाढा विशाळ, । अधोर्ध्व ओष्ठ ते केवळ । पाळी तडागाचिया. ॥ ४९ ॥ शत्रूचें व्यायमान झाड, । तेणें साच्छादिलें असे पोट, । अलिलता जैशा तिखट । तैशिया नखाग्रिका. ॥ ५० ॥ ऐसें त्या कुंभकर्णाचें शरीर, । एक शत धनुष्यें आडवें उदर; । चरणापासूनि शरीर । सा शत धनुष्यें. ॥ ५१ ॥ ऐसा वीर आजानुबाहो । जैसा काळु पासला मोहो, । त्याचेया देहतुल्य देहो । नाहीं तिहीं लोकीं. ॥ ५२ ॥ निद्राभ्रमें दाटली घुर्मी, । सुषुप्तिस्थान बोध अंतर्यामीं, । सकळा इंद्रियांचा स्वामी । तो मनु मुरोनि ठेला. ॥ ५३ ॥ ऐसा निद्रेचा महिमा । निचेष्टितु केला कुंभकर्णनामा, । जयासि तुळे उपमा । कृतांताची. ॥ ५४ ॥ निद्रेचें स्वरूप काय सांगावें! । जगजीवव्यापक स्वभावें. । तियेचें हेंचि रूप बोलावें । जें देहभान लोपी. ॥ ५५ ॥ निद्रा महाअनर्थाचें मूळ, । निद्रा आनंदाचें फळ, । निद्रा श्रमाचा अंतु केवळ, । अनुभवी जग. ॥ ५६ ॥ निद्रा आळसासि आश्रयो, । निद्रा अज्ञानाचा समयो, । निद्रा जागृतीचा अजयो । अनुभवी जाणे. ॥ ५७ ॥ निद्रा चिंतेची वैरिणी, । निद्रा शर्वरीची सांगातिणी, । निद्रा स्वप्नीची कुळस्वामिणी । बहुत प्रकारें. ॥ ५८ ॥ निद्रेचें चाळ वरि पसरे । तें जागृतीचें वैभव विसरे. । चक्षु इंद्रियद्वारें संचरे, । सर्व शरीर व्यापी. ॥ ५९ ॥ निद्रेसि मैत्री दैत्यांचा ठायीं, । दुःख बहुत इंद्रादिकांचे हृदयीं, । म्हणोनि दर्शनासि कोण्हे समयीं । तियेसि नाणिती देव. ॥ ६० ॥ कुंभकर्णें सुरासि संग्रामु केला, । तेणें श्रमु बहुत जाणवला, । मग तो निद्रेनें जिंतिला । देवाचेनि इमाळें. ॥ ६१ ॥ निद्रेनें दिधलें परम सुख, । तेणें विसरला जागृतीचें दुःख. । कृतांतवत् उघडूनि मुख । पृथ्वीवरी पसरला. ॥ ६२ ॥ घोरत असे महाघोर । तेणें थरारे त्रिभुवन अंबर, । स्वेदाचे उठले पाझर । सर्वांगावरूनि. ॥ ६३ ॥ मुखनासिकें वायु सांडी । तेणें झडझडाट दरीचा

तोंडीं । उभे राहों जाती, त्यांच्या मुरकुंडी । पडती पैलीकडे. ॥ ६४ ॥
ती कुंभकर्णाची निद्रा देखौनि । आश्चर्य करिती राक्षस मनीं; । तव
होदर सुवचनीं । बोले विरूपाक्षासि. ॥ ६५ ॥ "अगा, बुद्धीचेया समुद्रा, ।
सेनि भंगेल याची निद्रा? । कृतांताचिया अघोछिद्रा । कोणें कष्टे
रावीं ?"[1] ॥ ६६ ॥ प्रत्युत्तरें विरूपाक्ष बोले, । "आतां काय पाहतां
गले ?" । मग कुंभकर्णासि चेवविते जाले । महाचंड प्रयत्नें. ॥ ६७ ॥
कुंभकर्णा परिवेष्टित बहुवस । उभे राहूनि राक्षस करिती मुखघोष; । तया
वनींत आकाश । पडों पाहे भूमीवरि. ॥ ६८ ॥ लागली चंड वाद्यांची
ध्वनि । तेणे कंपु आरंभला मेदिनी; । दिशाकंपु जालेया गगनीं । गति
कुंठली खेचरांची. ॥ ६९ ॥ विहगम पडले घोषावर्तीं, । प्राण सांडूनि
समुद्रीं पडती; । वाळें सांडूनि वनिता स्रोवती । वल्लभा कठीं. ॥ ७० ॥
वापीकूपतडागांचीं जळें । कोरडीं जालीं एके वेळें । ऐसेया घोषाचेनि
बळें । उलती गिरिशिखरें. ॥ ७१ ॥ ऐसा वाजत असतां चंडघोषु ।
परि कुंभकर्णाचा न भंगे निद्रालेशु, । मग महावंता आज्ञा दे सैन्येशु
महोदरनामा. ॥ ७२ ॥ निर्जेला उठेल आजानुबाहो, । अचळ पर्वतातुल्य
देहो, । त्यावरि चाल्वा समूहो । मातंगांचा. ॥ ७३ ॥ मग वरि चालती
गजभार, । परि निद्रा नसडीचि शरीर; । मग कितीएक कठोर ।
प्रयत्नासि प्रवर्तले. ॥ ७४ ॥ उन्मूळौनि महा जुवाडें । एक टाकिती
दुरौनि झाडें, । पर्वतीं वज्रप्रहार येणे पाडें । एक गदा हाणिती. ॥ ७५ ॥
कडुवटीं औषधी भरूनि नाळीं । अग्नि लावूनि छोटिती नासिकाच्या
निळीं, । तोचि निपुधूम्र उठी कपाळीं । भरिते दाटत असे. ॥ ७६ ॥
एक राक्षस दयारहित, । तीक्ष्ण शूळ घेतले नभचुंबित, । कुंभकर्णाचे
तळवे टोंचित । गाढें नेटें मथिती. ॥ ७७ ॥ एक घेऊनि लोहसांकळा । कठीं,
चरणीं लाविती कळा; । एक अर्तरें राहूनि शिळा । टाकिती वक्षस्थळावरि.
॥ ७८ ॥ ऐसा महाप्रयत्न करिती । परि कुंभकर्णासि नये जागृति. ।
संपूर्ण व्यापिला सुषुप्ती, । पडला शैलासारिखा. ॥ ७९ ॥ खड्गां, शिळांची
होत वृष्टि । जैशीं मशकें खेळती दिग्गजपृष्ठीं; । निद्रा न भंगे, तुघडे

१. क. बोल छिद्रा । कोणें काटें भरावी.

दृष्टि । निजला कुंभकर्ण. ॥ ८० ॥ उठवितां राक्षस भागले; । कितीं एक श्वासावर्ती पडले; । तंव त्याश्चर्ये महोदर बोले । विरूपाक्षासि. ॥ ८१ ॥ म्हणे, " प्रयत्न करितां दारुण । निद्रा नसंडी कुंभकर्ण. " । येरु म्हणे, नलगतां क्षण । उठवीन आतां. ॥ ८२ ॥ वर्म आठवलें मज एक । तें तुम्ही पहा, हो, कौतुक; । निश्चळ ठेले सकळिक । जैसी चित्रींची सेना. ॥ ८३ ॥ किन्नरांचिया कुमरी । हरिल्या होत्या निशाचरीं; । त्या रावणाचिया नृत्यशाळेमीतरीं । रक्षिलिया बळें. ॥ ८४ ॥ त्यांची होय गायनकळा । तें उदकीं विरती शिळा, । शेल वसे रविमंडळा, । हिमरश्म फांकती. ॥ ८५ ॥ त्या कुमरींचें नृत्यकलावैभव । भोगितां लांचावले देव; । त्या कन्यांचे अवयव । यौवनें माजले. ॥ ८६ ॥ त्यांचें शरीर आणि सौंदर्य, । गुण आणि चातुर्य । देखौनि करिती आश्चर्य । इंद्रादिक देव. ॥ ८७ ॥ ऐशा त्या किन्नरकुमरी । यंत्रविशेष धरिले करीं, । त्या विरूपाक्षें तिये अवसरीं । केलिया दारियेपुढें. ॥ ८८ ॥ कुंभकर्णाचिया मुखापाशीं । बैसविलें शत एकासि. । तेहीं गायन आरंभिलें मुस्वरीं, मुरसीं, । नानाकलान्यायें. ॥ ८९ ॥ त्यांचा आइकौनि रंगु । चंद्रींचा पडों पाहे मृगु; । इये अवनीचा करूनि त्यागु । शेपु वरि येऊं भावी. ॥ ९० ॥ होतां किन्नरकन्यांचें गायन । कडुवट करितां अमृतपान; । ऐसें मुस्वर आइकितां नयन । उघडिले कुंभकर्णें. ॥ ९१ ॥ निद्रानिशिचा अंतु जाला तात्काळ, । जागृतीचें वरि प्रकाशलें रविमंडळ, । उठोनि बैसला कृतांतु, केवळ, । मेरुचि जैसा. ॥ ९२ ॥ जांभई दिधली भयानक, । मुख पसरिलें खावया त्रिलोक; । ऐसें देखौनि महोदरादिक । मक्ष्य समर्पितें जाले. ॥ ९३ ॥ पर्वतु मांसाचा पुढें टाकिला, । तो कुंभकर्णें निमिषांत भक्षिला. । नाना पशूंचा संहार केला, । तेही समर्पिले. ॥ ९४ ॥ सुवर्णपात्र महाविशाळ । माजी सांठवूं शके सिंधुजळ, । ऐसें शोणितें, मद्यें तुंबळ । उचंबळत आणिलें. ॥ ९५ ॥ तें दोनि सहस्र एके वेळें । प्राशन केलें तृपावळें; । इतुकें सेविलें परि जठरानळें । शिखा आंवरिल्या नाहींति. ॥ ९६ ॥ नाना मांसाळिया पशूंचीं शतें । राक्षसीं मक्ष्य समर्पिलें मागुतें. । तेंही खाऊनि कुंभकर्णे जल्पातें । इच्छिलें ऐसें वाटे. ॥ ९७ ॥

चौमुखिया चर्मका जळपूर्णा । राक्षसीं सोडिलिया भेघवर्णा; । तेणें उदकप्राशनें कुंभकर्णा । आप्यायन जालें. ॥ ९८ ॥ मग तो क्रोधें क्षुधारहित । पाहों लागला पै सुचित्त. । तव शताचीं शतें नैर्ऋत । पुढें उभे असती. । ९९ ॥ देखौनि विरूपाक्ष, महोदर, । त्यांसि कुंभकर्ण बोले उत्तर. । म्हणे, "कोण कार्य माडलें थोर ? । किमर्थ निद्रा भगिली ? ॥ १०० ॥ वैरिंचीचें आयुष्य सरलें, । कीं महाकल्पांत माडलें, । कीं आकाश पडैल ह्मणौनि वर्तिलें । भविष्य कोण्हीं ? ॥ १ ॥ कीं शेष, कूर्म, वराहो । धरा धरू न शकतीच, पावले मोहो; । कीं सृष्टि बुडैल ऐसा संदेहो । तुम्हीं धरिला मनीं ? ॥ २ ॥ यथार्थ सागा, हो, माते. । कवणें भय दिधलें तुमतें ? । प्रस्तुत तुम्हीं त्रैलोक्यातें । पीडित असाल." ॥ ३ ॥ ऐशीं कुंभकर्णाचीं उत्तरें । आइकौनि महोदरें; । पुढें विरूपाक्षें जोडिले करें । बोलों आरंभिलें. ॥ ४ ॥ "संक्षेपें आइका, जी स्वामी; । सुखनिद्रा केली होती तुम्हीं, । तव शिळीं सेतु बाधौनि झरगमीं । राजधानी वेढिली. ॥ ५ ॥ राक्षसा वानरा यानतरें । महायुद्धें जालीं परस्परें; । रणभूमी भिडता वैरें । कोट्यानकोटि वीर पडले. ॥ ६ ॥ मारिता वानराचें कटक । पडले थोर प्रहस्तादिक; । यानतरें वेळा ल्वी सिंधूदक । तैसा लंकेशु निगाला. ॥ ७ ॥ तुवळ चतुरंगिणी सांगातें, । क्रोधें कपि मारिले निजहस्तें. । ते सख्या सांगों, तरि शोणितें । सागरीं सगम जाले. ॥ ८ ॥ मग दशरथाचेनि मुख्य पुत्रें । शरसंधान केलें अमित्रें. । लंकापतीचीं मुकुटछत्रें । छेदूनि साडिलीं लीळा. ॥ ९ ॥ क्षत्रींर देखौनि रामाचें । रायें युद्ध टाकिलें कालिचें, । भय धरिलें, मग तुमचें । सामर्थ्य इच्छिलें. ॥ ११० ॥ कैसा विपरीतु काळ आला ! । अहाड जाळिता वन्हि हिंवैला; । विश्व खाता काळु दत्वकला, । भूतबाधा जाली. ॥ ११ ॥ लंकानाथासि आणि भय । मनुष्याचें हें थोर आश्चर्य." । तव कुंभकर्ण म्हणे, "अकार्य । प्रथमचि जालें. ॥ १२ ॥ थोर थोर गेले मरणें, । चतुरंगदळ आटलें प्राणें, । आणि रायाचेनि अंत:करणें । चिंताभय धरिलें. ॥ १३ ॥ ऐसें बहुत बोलणें जालें, । मग माझिये निद्रेतें भगिलें । आता याचा दोष ठेवूं, तरि गेलें । त्याचा शोकु व्यर्थ. ॥ १४ ॥ आतां विरू-

पाला, महोदरा, । तुम्हीं जाऊनि सांगावें नृपवरा, । मी प्राशन परतंत्रया शत्रुमारा । जातों शीघ्रगति." ॥ १५ ॥ पुढें महोदर करी विज्ञापना, । "आधीं वधावें राजसुतना, । व तुरायासि भेटोनि, सेना । सहारा वैरियाची." ॥ १६ ॥ ऐसें महोदर बोलों सरे, । तव कुंभकर्णासि कोपु नावरे; । मग उभा राहिला त्वरें । महाउग्र, स्थूळ. ॥ १७ ॥ सृष्टीसि यावया मिठी । प्रळयीं कुञ्जलो काळु उठी, । तें कुंभकर्ण उठिला, गाठी । मनयासि पडली. ॥ १८ ॥ मंदराचळा ऐसें स्थूळ थोर । त्या धीराचें शरीर । लंकेमध्यें चालता वानर । देखते जाले प्रदेशीं. ॥ १९ ॥ इति श्रीरामायणीं कथा मार्गु, । जाला कुंभकर्णाचा निद्राभंगु. । आता पुढील परिसेसा प्रसंगु । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ १२० ॥

---

## प्रसंग अठ्ठाविसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नम । श्रीगुरुइशिराजाय नम । कुंभकर्णाचें शरीर देखोनि । अतिभय पावली कपिवाहिनी, । त्रास वेष्टिल होते, ते पळोनि । गेले रघुनाथासि शरण. ॥ १ ॥ बाढलें वृत्ताम्र्गासि भय, । त्यासि अंगदें दिधलें धैर्य, । कुंभकर्णाचा देहो देखोनि आश्चर्य । रघुपतीसि वाटे. ॥ २ ॥ बिभीषणासि पुसे अयोध्याधीशु, । "आमुसीं वरुनि युद्धाचा उद्देशु, । कवणु चाले हा राक्षसु । विशाळ लंकेमध्यें ॥ ३ ॥ एव्हढें शरीर उनायमान, । उदर दिसे पर्वतासमान, । याचें वसतें कवण स्थान, । हा कवणु, कवणाचा?" ॥ ४ ॥ आइकोनि नरेंद्राचें बोलणें, । सांगों आदरिलें बिभीषणें, । "परिसें. देवा, हा रावणें । उठविला कुंभकर्णु. ॥ ५ ॥ हे य दशाननाचा सहोदरु, । विश्रवेयाचा जाण कुमरु, । याचिये जन्मकाळीं थोरु । जीवासि प्रळयु जाला. ॥ ६ ॥ जन्मता दाहो केला प्रचंड, । तिये घडी धरारिलें ब्रह्मांड, । विशाळ पसरून धाविन्नला तोंड, । अमित जीव भक्षिले. ॥ ७ ॥ गिळूं लागला अंड पडिलें, । मग सुरपतीनें काय केलें? । अकस्मात् वीर टाकिलें । निज वज्रायुध. ॥ ८ ॥ विद्युल्ला पर्वतशृंगीं । तैसें वज्र आदळलें या आंगीं, ।

परि एकी रोमही भंगीं । गेली नाहीं तिये काळीं. ॥ ९ ॥ केव्हडी कुंभकर्णाची शक्ति ! । पुढें देखिला ऐरावती, । त्याचा दंत मोडूनि सुरपति । ताडिला देवांमध्यें. ॥ १० ॥ इंद्र होऊनि भयचकितु । विधातेयासि शरणागतु. । म्हणे, 'पुरला त्रिलोकाचा अंतु; । येणें राक्षसें भक्षिलें. ॥ ११ ॥ सृष्टि रक्षीं तूं आपुली, । याची शांति करीं वहिली. । हें आइकोनि निद्रा दिधली । ब्रह्मेन कुंभकर्णासि; ॥ १२ ॥ ऐसा विधातेयाचा शापु जाला । तैसाचि निद्रास्तु पडला, । जैसा उन्मत्त गजु उलंडला । अंधकूपामध्यें. ॥ १३ ॥ महानिद्रेचां आवर्ती । बुडाली कुंभकर्णाची जागृति, । ऐसें देखोनि ब्रह्मयाची स्तुति । दशवक्त्रें केली. ॥ १४ ॥ म्हणे, 'स्वामि कृपानिधि, । यासि निद्रेची किती अवधि?' । उत्तर देता झाला विधि, । 'जंव आयुष्य याचें.' ॥ १५ ॥ पुनरपि रावणु प्रार्थूनि बोलिला, । 'स्वामि, जन्मु याचा व्यर्थ गेला, । तरि कांहीं उःशापु पाहिजे दिधला, । तूं पूर्वज आमुचा.' ॥ १६ ॥ पुढें ब्रह्मा म्हणे, 'रावणा, आइक; । षण्मासांतीं अहोरात्र एक । हा जागृति पावेल; कौतुक । देखेल नाना सुखांचें.' ॥ १७ ॥ ऐसी ब्रह्में दिधली निद्रा, । नातरि विश्व खाता, नरेंद्रा. । आतां रावणें उठविला, गुणसमुद्रा, । तुमसीं युद्धाकारणें." ॥ १८ ॥ ऐसें सांगितलें बिभीषणें, । आश्चर्य केलें सीतारमणें; । वानरवीरांचीं अंतःकरणें । भयातें स्पर्शलीं. ॥ १९ ॥ असो. लंकेमाजी कुंभकर्णु । चालत गेला, जेथें रावणु; । गगना ऐसा मंडपु विस्तीर्णु । तेथें गेला मनोगति. ॥ २० ॥ देखोनि नमिला दशाननु. । पुढें बैसविला देऊनि मानु. । म्हणे, "आजि धन्य गा सुदिनु, । निद्रा भंगली तुझी ! ॥ २१ ॥ तमार्णवीं पडलेया दिनकरु, । का महोदधीसि पावलेया तारू, । कोंडलेया वणवेयांत, जलधरु । वर्षला शुंडाधारीं. ॥ २२ ॥ तैसा, कुंभकर्णा, तूं दयासिंधु । मज समयीं भेटलासि निजबंधु. । रामेश्वरीं मांडिला विरोधु, । तो सिद्धी न्यावा, समर्था. ॥ २३ ॥ कुंभकर्णा, तुझेनि बळें । देवांचीं हरिलीं सुखबळें; । रचिचला तळींचीं राजकुळें । दैन्यसागरीं लोटिलीं. ॥ २४ ॥ ऐसेया तुज, गा निजबांधवा, । वियोगु समयीं नव न व्हावा, । स्वर्गानि शिरकमळीं पूजोनि सदाशिवा । त्या प्रसन्न केलें. ॥ २५ ॥ आणि आकाश पडत होतें । तें तुवां उचलोनि धरिलें तळहातें."।

ऐसी स्तुति आइकोनि अग्रजातें । कुंभकर्णु वारी. ॥ २६ ॥ म्हणे, "अहो जी, हे उपचाररीति. । आज्ञा दीजो, जी, जें कर्तव्य, भूपति. । एकोदरामध्यें ऐसी पंगती । शब्दांची न पाहिजे. ॥ २७ ॥ एका महाद्रुमाचां मुळीं । निस्तीर्ण वाहाडलिया डाहाळीं; । त्या काय अनसारिखिया फळीं । फळती भिन्नवर्णी ? ॥ २८ ॥ तैसें तुझें माझें जन्मजातक, । कर्मक्रियामनेंसें वासनेचीं वर्तणुक, । परांसि विरोध, मैत्री असे एक । उभयतां जाण. ॥ २९ ॥ जें जें असे तुझां हृदयीं, । तो तो आदरु मज मनाचे ठायीं; । याकारणें काय इच्छा ये समयीं । ते सिद्धी नेईन." ॥ ३० ॥ ऐसीं कुंभकर्णाचीं वचनें । आइकोनि अनुवादिजे दशाननें: । "कालिचा युद्धीं सुराचीं वदनें । टवटवितें जालीं. ॥ ३१ ॥ जाण, गा, दशरथाचा बाळु, । जनकजामातु, वानरपाळु; । त्याचे भयाचा निटाळु । माझेया मनासि जाला. ॥ ३२ ॥ मज रावणासि मनुष्याचें भय, । हें बोलतां हासैल भुवनत्रय; । तुज सांगतां शकों तरि अन्याय । ठाकती माझां ठायीं. ॥ ३३ ॥ पीडितां क्षुधेनें, बाळकें । जननीपासीं नसांगिजे अहंकारतर्कें, । तरि कैसेनि तृप्ति कौतुकें । होईल दुर्भराची ? ॥ ३४ ॥ व्याधिव्यथा देहासि मोठी, । वरि वैद्य आलेया नेदे भेटी, । तरि क्षयनिवृत्तीचें सुख पोटीं । सकर्मेळ कवें ? ॥ ३५ ॥ पुरुषासी अगसगीं चोरी । करितां, प्रजोत्पत्ति कवणे परी ? । स्त्री साशंकपण धरी । तरि वंशवृद्धि कुळीं. ॥ ३६ ॥ म्हणौनि, गा वळानिधि, जाण, । तुज नसगतां कैसे धरे प्राण ? । समरार्णी अरिबाण । मज साहिले नवचती." ॥ ३७ ॥ ऐसें रावणें सांगितलें. । आइकोनि कुंभकर्णें बोलिलें. । "केलें कर्म फळासि आलें । अलेंचि कालेंकरूनि. ॥ ३८ ॥ शुभाशुभकर्माचिये राहटी । उपरि लोटलिया कल्पकोटि । परी मोगु न चुके, शेवटीं । अवश्य भोगणें लागे. ॥ ३९ ॥ याकारणें जें भूमीं पेरिजे बीज, । तें तें फळ पिके, हो, सहज. । ऐसेयाचें करणें नलगे चोज । विपरीत कालेंकरूनि." ॥ ४० ॥ ऐसी कुंभकर्णाची वाचा । वदली पथु परमार्थाचा. । आइकौनि अंतरु रावणाचा । मग्न मनोरथु जाला. ॥ ४१ ॥ कुंभकर्णु बोलिला छळवादें; । पुढें अनुवादु करूनि शब्दें । म्हणे, "कर्पूरपुतळेयासि दोंदें । निगाळी मज

अग्नीपुढें. ॥ ४२ ॥ अहो, ओलिये मृत्तिकेचे मीन । सोडिती समुद्रांचें जीवन; । मेणाचे विहंगम गगन । आक्रमूं पाहती; ॥ ४३ ॥ तैसे रामलक्ष्मणादिक, । सर्व पर्णभक्षकांचें कटक; । तेंहीं मारिले आदरिलें एकें एक । वधिले लंकवासी. ॥ ४४ ॥ ऐसा विपरीत काळु आला, [illegible] कृतव मज नाहीं कळला; । आतां निद्रा भंगली माझी, पुरला । आयुर्दावो वैरियांचा. ॥ ४५ ॥ न भरतां एकी घटिका । गिळैन सर्व कपिकटका; । दोघे दाशरथी यमलोका । पाठवीन, जाण." ॥ ४६ ॥ ऐसें कुंभकर्णु बोलतां क्षणीं, । महोदराची वदली वाणी. । म्हणे, "या काकुत्स्थासि समरांगणीं । कोण, पां, राहों शके ? ॥ ४७ ॥ तू रामासि जिंतिसी पुरुषार्थें, । इयें वचनें अवघींचि व्यर्थें, । जैसें शंकराप्रति मन्मथें । संधान सत्य केलें. ॥ ४८ ॥ जो जो प्रतापें युद्धा गेला, । तो मागुता लंके नाहीं आला; । तूं आगळें बोलसी बोला, । आम्हां विश्वास कैचा ?" ॥ ४९ ॥ ऐसी सभामंडपीं महोदरें । दिधलीं कुंभकर्णासि उत्तरें, । जे कां निर्भर्त्सिलियाविण वीरें । विक्रमाचेनि न धरिजे. ॥ ५० ॥ सिंधु ढकलिला भुजबळता, । का सर्पु चरणें चेंपिला अवचिता, । तैसा कुंभकर्णु बैसला होता । तो महोदरें निंदिला. ॥ ५१ ॥ हें न साहेचि कुंभकर्णातें, । मग महोदरासि बोले कोपें बहुतें. । म्हणे, "काय, रे, काळाप्रति भूतें । चेष्टा मांडिली, दिसे. ॥ ५२ ॥ जो ब्रह्मांड गिळितां नव्हे दत्त, । तो काय माईल मुंगी मुखाआंतु ? । मंदबुद्धि तव; अतिभ्रांतु । मजसीं बोलसी. ॥ ५३ ॥ अरे, तुज नाहीं सभाचातुर्य, । नाहीं रणांगणीं धैर्य, । ना कोण्हे काळीं स्वामिकार्य । सिद्धी नेलें नाहीं. ॥ ५४ ॥ तू पावसी मोहो घोरु, । म्हणोनि नाम तूझें महोदरु. । तुझेनि संगें हा नृपवरु । युद्धीं मोहो पावला. ॥ ५५ ॥ जैसा शुकु पांजरेयाभीतरीं । बैसोनि शब्द सुरस करी, । तैसा तूं सभेसि नाना उत्तरीं । राजा संतोषविसी. ॥ ५६ ॥ सभेमध्यें बैसोनि चतुरें । बोलावीं सर्वां सुखदातीं उत्तरें. । ऐसें नेणे, तो रे महोदरें । मौनेंसीं असतां." ॥ ५७ ॥ ऐसीं कुंभकर्णाचीं वचनें । आइकतां भंगलीं मंत्रियांचीं मनें. । महोदरु तो अधोवदनें । निवांतु राहिला. ॥ ५८ ॥ असुरांचें अंतःकरण । तिये काळीं जालें शतचूर्ण. । हा मानो

कल्ला सपूर्ण, । कुंभकर्णु मागुतें बोले. ॥ ५९ ॥ म्हणे, "अहो शैलारि-शत्रुजनका, । वारिधिपरिवपुरीनायका, । मिथिलापतिजामातशका । सोड, सर्पिणी जेसी. ॥ ६० ॥ परमानंददेहलाचा हृदयीं, । ल्हरिया अनुनिधींचा ठायीं. । शत्रु मारावया आज्ञा देई । युद्धासि जाईन आता." ॥ ६१ ॥ ऐसें बोलोनि उठे शीघ्र. । नमस्कारिलें नृपतीचें अग्र । सभामंडळीं नैर्ऋत्यव्याघ्र । तयासि रावणें अवलोकिलें. ॥ ६२ ॥ तव कित्येक मंत्री तिये काळीं । कुंभकर्णासि प्रार्थिती बद्धांजळी. । म्हणती, "वीरोत्तमा, तुम्हाजवळी । संग्रामीं सेना असावी." ॥ ६३ ॥ आइकोनि मंत्रियांची विनवणी । कुंभकर्णु उत्तर दे गंभीर वाणी. । "किमर्थ न्यावी चतुरंगिणी ? । एकलाचि जाईन." ॥ ६४ ॥ कुंभकर्णु बोले ऐसें । मग प्रार्थिलें लंकेशें. । म्हणे, "माझिये आज्ञेसें । सेनेसि असों दीजे. ॥ ६५ ॥ कुंभकर्णा, ममानुजा, । मज समान होसी राजा. । एकलें युद्धा जाता बोजा । वमर न मिळे, जाण. ॥ ६६ ॥ नीति ऐसी आहे यांकिकीं, । गमन न करावें एकाएकीं. । कोणी म्हणसी, तरि इतुकीं, । आइक, सहोदरा. ॥ ६७ ॥ राजा, स्त्री, धनाढ्य, बाळ, रोगी. । जगवरि, ब्रह्मचारि ज्याचा आंगीं, । या सप्तकांसि येकलें मार्गीं । चालतां अनर्थु असे. ॥ ६८ ॥ म्हणानि, कुंभकर्ण, तूं राजा समर्थु, । बंधु माझा नैर्ऋत्यनाथु, । रिपु वधावया रणपथु । एकलेया न क्रमिजे. ॥ ६९ ॥ लंकेमध्यें चतुरंगिणी । सिद्ध आहे शत अक्षौहिणी. । ते, वळनतचूडामणि, । समागमें असों दीजे. ॥ ७० ॥ सामग्री शस्त्रास्त्रांची । घेईं, रिपुसंहरणीं चाड जयाची, । शूळपाणि होयावें, जया रुची । सहल धनुर्ध्ये. ॥ ७१ ॥ सर्वांगीं घालें अगत्राणें, । त्यावरि सुरशस्त्रें जाती चूर्णें. । शतमखादिदर्पहरणें । तियें काकणें करीं घालें. ॥ ७२ ॥ शत्रूसि वधूनि भुजबळें । मुकुटमाळा जयोत्पळें । आनंदमय शीघ्रकाळें । मज भेटें मागुता " ॥ ७३ ॥ ऐसीं रावणाचीं स्नेहउत्तरें । कुंभकर्णें मानिलीं आदरें, । आज्ञा शिरीं धरिली, शंकरें । जैसी गंगा देवी. ॥ ७४ ॥ उठोनि उभा सन्मुख राहिला, । मुकुटमाळा वाहूनि त्वरें निगाला, । वीरगुठीं धरूनि ओढिला । वृत्रातें जैसा. ॥ ७५ ॥ मंडपाबाहिरी येतां क्षणीं । घेवूनि चालिली चतुरंगिणी. । वाद्यें वाजिन्त्रीं,

तेणें कर्णी । जग जाकळलें. ॥ ७६ ॥ कुंभकर्णु चालत वातवेगें, । भार तुवळले पुढें, मागें । वीर गर्जतां, तेणें स्वर्गे । पृथ्वीवरि पडों पाहती ॥ ७७ ॥ महासैनिकसमागमीं । कुंभकर्णु आला रणभूमी. । पुढें परमवीर प्लवगमी । कटु निकर्मे वाचिला. ॥ ७८ ॥ आता संग्रामु होईल थोर, । शोणितें तुंबळेल सागरु, । एकएकातें मारील रघुवीरु, । वधील कुंभकर्णातें. ॥ ७९ ॥ इति श्रीयुद्धकांडरामायण । वाल्मीकिकृत जगतारण. । पुढें, पंडितहो, करा श्रवण, । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ८० ॥

—— o ——

## प्रसंग एकूणनिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । जळराशि जसा हेलावे, । तैसे उदित कपियूथाचे थांवे. । पृथक् पृथक् जरि मागावे, । तरि सर्वही पर्वतपाणि. ॥ १ ॥ बुभु:कार करिती भयानकनादें । तेणें तडाडती शैलाचीं दोंदें, । त्या दरींमध्यें रिगती श्वापदें । अतिभयातुर ॥ २ ॥ ऐसे ते उत्तमृग थोर । संग्रामा सर्वही पुढारे, । त्यांचा पादतळीं कड्रचे भरे । म्हणोनि निश्चळता नाहीं. ॥ ३ ॥ पाहतां वाहिनी महाउग्र, । युद्धार्थ उत्कंठित समग्र. । कुंभकर्णातें देखोनि व्यग्र । एकुही नाहीं ठाणीं. ॥ ४ ॥ ऐसा विग्रमु देखानि कपींचा, । त्यावरि कुंभकर्णु बोले वाचा. । म्हणे, " रे कपींहो, तुम्हां मज संबंध युद्धाचा । हें अपूर्व वाटे ॥ ५ ॥ तारू फिरतसे समुद्रावरि । तेणें कैसें वानरावें थिल्लरीं ? मार्तंडमंडळ नमाये अंबरीं । तें मुखकपिलीं कैसें रिगत ? ॥ ६ ॥ पिपीलिकांच्या घराआंतु । कैसा धांवत ऐरावतु ? । अजापाळमंडळीं पडितु काय श्वाध्यता पावेल ? ॥ ७ ॥ म्हणोनि म्या कुंभकर्णे । तुम्हां वानरांसीं युद्ध करणें, । ऐसीं मानोनि अंतःकरणें । साक्षी नेदिजे. ॥ ८ ॥ माझा उदरीं उमळला क्षुधानलु, । जैसा प्रळयीं भुकेला काळु । तुम्हां सर्वांची प्राणाहुति करितां पळु । नलगे मज. " ॥ ९ ॥ ऐसी कुंभकर्ण बोले घोर वाणी । अंतकासमान शूळपाणि. । तया उन्नू वानरगणीं । टकमकों लक्ष लाविलें. ॥ १० ॥ कपीं कुंभकर्णु देखिला कैसा ? । टेंकणें लाविलें आ-

पाशा. । तया देवांनि अष्टदिशा । दिग्गजां आड गेलिया. ॥ ११ ॥ उचनें जैसा मंदराचळु, । त्रिभुवन माईल ऐसा कोथळु, । दक्षिण करीं धरिला शूळु, । तेणें गिरि गर्भ टाकिती. ॥ १२ ॥ ऐसा वीर उभा रणरंगीं; । नैर्ऋत्यकटक दोहीं भागीं, । तें प्रतिष्ठें युद्धालागीं । वलामृगगणेंसीं. ॥ १३ ॥ गर्जती ऊर्ध्वनिकास वक्रें, । वानरा हाणिती नाना शस्त्रें; । तयां घायांनिरिमीं कपिगात्र । शोणित स्रवती. ॥ १४ ॥ देवाचे प्रतिमल्ल राक्षसवीर, । कराळतुंड, महाक्रूर, । धनुष्यें वाऊनि सोडिती शर । मोडिती सर्वेरहित. ॥ १५ ॥ घोर तयांची शरवृष्टी, । अतिवेगु ओदिती वोटीं. । पक्षसुसाट त्यांचीं धुधाटीं । गगन गर्जतसे. ॥ १६ ॥ पर्जन्यधारा झेलिती शैलपृष्ठीं, । तेसे कपि घेती सन्मुख वृष्टि. । ऐसे रामदास देवांनि दृष्टीं । क्रोधें काळाग्नि जाले. ॥ १७ ॥ वीरोत्तम प्लवगम, । सिद्ध करीं शिखरें, द्रुम. । मुखीं उमटती शब्द भीम । चंड, 'घेघे'पणाचे. ॥ १८ ॥ पाचारूनि परवीरातें । प्रहार हाणिती ऊर्ध्वहस्तें, । तिये समयीं शोणितें । खेळों आरंभिलें. ॥ १९ ॥ वीरासि युद्धाचें परम सुख । ताडिती येरयेरातें सन्मुख, । वर्मीं घाय लागती, तें दुःख । वीरश्री निसरवी. ॥ २० ॥ अति आवेशु उभय दळीं, । निकर्में भिडती आतुर्बळीं. । पुढें कुंभकर्णु चि तत्काळीं । कपिसेनेवरी धांविन्नला. ॥ २१ ॥ भूतें भक्षावया काळु आला । तैसा तो कपींवरी लोटला. । दंताळ पसरूनि धांविन्नला । ग्रासू अमित्रातें. ॥ २२ ॥ पुढें कुंभकर्णु देखत क्षणीं । कोटि एक एकवटले द्रुमपाणि. । नसडिता रणधरणी । हाणिती शिखरें. ॥ २३ ॥ कुंजराचिये पृष्ठीवरि । मेघ वर्षे जळधारीं, । तेणें काये त्याचा शरीरीं । घाये मोटे पडती ? ॥ २४ ॥ ऐसें त्याचें वज्रशरीर, । वरि पडती पाषाणतरुवर; । परि तो घाये नमनी, वानर । सहारू लागला. ॥ २५ ॥ जिकडे एकवटती वानर । तिकडे हाणी पायांची पापर, । तयासरिसे होती चूर, । पडती पृथ्वीवरि. ॥ २६ ॥ विशाळ पसरिलें आवाळें, । नेणों ब्रह्मांड माईल सगळें. । कपि ग्रासिले एके वेळें । ते सख्या आइका ॥ २७ ॥ जेसे नवनीताचे गोळे । चोन्यायशीं सहस्र सगळे, । आठ शतें छत्तीस आगळे । मारूनि साडिले. ॥ २८ ॥ एके चरणें रणागणीं धावतु, ।

दुसरेनि वानरांतें ताडितु, । काळदंडातुल्य वाम हस्तु । तेणें त्राहाटितु आहे. ॥ २९ ॥ कपिकटकांतु भ्रमे त्रिशूळु, । जैसा क्षीरार्णवीं मंदराचळु. । वीरगणां सुटला पळु । अद्भुत संहार देखौनि. ॥ ३० ॥ रणलक्षण घाणेयाचें पोट, । मध्यें फिरे कुंभकर्णचरणांची लाट, । तेणें वानरतिळ वितट । होती शतांचीं सहस्रें. ॥ ३१ ॥ कुंभकर्णु संहारी कपिवाहिनी, । मुख्य मंडळ देखे लोचनीं; । मग जयाची माता अंजनी, । तो वीरु धांविन्नला. ॥ ३२ ॥ पुढें हनुमंतें लतामृगें । गिरि घेतला, ज्यासि शतशृंगें; । दोर्दंडें भंवडिला वातवेगें, । टाकिला कुंभकर्णावरि. ॥ ३३ ॥ पर्वतु येत देखिला दृष्टी, । हाणौनि फोडिला वज्रमुष्टी. । तो पृथ्वीवरि पडतां पृष्ठी । कूर्माची झांजरली. ॥ ३४ ॥ कुंभकर्णु म्हणे, " रे हनुमता, । उभा; पळों नको परता. । लंका दग्ध केली, तें फळ आतां । भोगीं, रे, अन्यायाचें. " ॥ ३५ ॥ हस्तीं होता महाशूळु । तेणें ताडिला अंजनीबाळु. । तयास्तव मूर्छा आली, एक पळु । पडला भूतळीं. ॥ ३६ ॥ हनुमंतु व्यथा पावला शूळें, । हें देखिलें दळेशें नीळें; । मग पर्वत घेऊनि भुजबळें । टाकिला कुंभकर्णावरि. ॥ ३७ ॥ गिरि देखौनि वानरारि, । येतु झेलिला मुष्टीवरि, । जैसा कुंजर शुंडाग्रीं । झेली कपित्थफळ. ॥ ३८ ॥ पर्वतु पिष्ट केला अवलीळा; । मग म्हणे, " उभा, रे नीळा. । तुझा देहो दिसे मांसागळा, । त्यासि टोंचीन सरळ शूळें. " ॥ ३९ ॥ ऐसें म्हणौनि टाकिला वरि; । तंव आड घातलें चौघीं वीरीं. । ते कोण? म्हणाल, तरि । ऋषभु, शरभु, गवाक्षु, ॥ ४० ॥ गंधमादनु चौथियाचें नाम. । गिरि घेतले त्यांवरि महाद्रुम, । मुखध्वनीनें गर्जविलें व्योम, । कुंभकर्णु ताडिला. ॥ ४१ ॥ चाऱ्ही पर्वत एके वेळे । येत, राक्षसें फोडिले शूळें. । भूमी पाडलेया डिखळें । सहस्रेक जाली. ॥ ४२ ॥ पुढें कुंभकर्णें काय केलें ? । घोर घोपें चौघां हाकिलें. । तिये ध्वनी थरारिलें । मंडळ अवनीचें. ॥ ४३ ॥ मग ते वानर रणांगणीं । दोघे धरिले दों चरणीं, । फिरविले वामपाणीं. । दुसरे दोघे मूर्छित केले. ॥ ४४ ॥ पांपर झाडिली मागुती, । नीळु ताडिला सेनापति. । आणिक वीर महादंतीं । घाउनि फोडिता झाला. ॥ ४५ ॥ कृतांता सम कुंभकर्णातें देखौनि कपि कांपती भयचकितें. । किती एक किष्किंधनाथातें । शरण

वाची मुरकुटी. । देखोनि कुंभकर्णु उठावा दुपाडी, । उचलूनि कांखे घातला. ॥ ८१ ॥ मार्तंडमंडळ प्रकट तपे । तें मेघमंडळीं जैसें हारपे, । तैसा कुंभकर्णाचिये कक्षागोपें । सुग्रीव गुप्त जाला. ॥ ८२ ॥ सुग्रीवु साप डला समरांगणीं, । आनंदु कुंभकर्णा मनीं. । साडिली संग्रामधरणी, । लंके उज् परतला. ॥ ८३ ॥ साधकीं साध्य जाली सिद्धि, । निर्दैवासि जोडल निधि, । तैसें सुख शत्रूसि युद्धीं । सापडलेया शत्रु. ॥ ८४ ॥ वीरदेवतें चेनि योगें । साधला पारिका प्रसंगें, । आनंदें डोलतु घातवेगें । लंके उज मुरडला. ॥ ८५ ॥ विशाळ पर्वताची दरी । तियेमध्यें सुतला केसरी, । तैसा निचेष्टितु कपींद्रु कक्षेभीतरीं । कुंभकर्णाचिये. ॥ ८६ ॥ कुंभकर्ण-कक्षेचे कनरोभार, । तेथें गळती स्वेदाचे पाझर, । तेणें सुग्रीवाचें शरीर । भिजलें बहुसाल. ॥ ८७ ॥ महादुर्गंधीचा कुडीं । पडली कस्तुरी-मृगाची मुरकुडी, । तसें सुग्रीवासि जालें, घ्राणीं, तोंडीं । दुर्वासु भरतसे. ॥ ८८ ॥ पुढें वाळीअनुजें काय केलें ? । सर्वांग आपुलें संकोचिलें, । कक्षेपासाव सोडविलें । शरीर बुद्धीस्तव. ॥ ८९ ॥ मायाप्रपंचाची मिठी । पडली विवेकियाचा कंठीं, । हें जाणोनि वैराग्य-जेठी । सोडवी आपणेयातें. ॥ ९० ॥ महाजाळींमधूनि व्याघ्र निगाला, । का भुजंग बिळांतुहिरि आला, । तेसा सुग्रीवु वेगळा जाला । कक्षेचे कोटरींहूनि. ॥ ९१ ॥ मग तो कपिचक्रचूडामणि, । प्रतिज्ञा स्मरोनि अंत करणीं, । शत्रुनासिककर्णांचीं खंडणी । करिता जाला. ॥ ९२ ॥ बरवा फावला प्रसंगु, । केला तिये काळीं अतिवेगु । पाहता पळाचा शतना भागु । इतुक्यात कृत्य केलें. ॥ ९३ ॥ दोन्ही कर्ण तोडिले दोहीं हस्तीं, । नासिक खंडिलें मुखदंतीं. । "हा हा ! ! !" म्हणत वानरपति । गच्छता जाला मनोवेगें. ॥ ९४ ॥ विटंबिला तो कुंभकर्णु, । सिद्धी नेला प्रतिज्ञापणु. । जेथें कपींसीं सीतारमणु । सुपर्णवत् आला तेथें. ॥ ९५ ॥ श्वासु नसंडित येत क्षणीं । मस्तकु ठेविला स्वामिचरणीं, । तंव परमानंदें पीयूषपाणी । गौरविला रघुनाथें. ॥ ९६ ॥ आलिंगना निगाला जांबु-वंतु, । नळु, अंगदु, हनुमंतु । येरीं पुच्छाचा पर्यंतु । मुकुटावरि केला. ॥ ९७ ॥ कुंभकर्णाचें कर्णनासिक । छेदिलें महाकौतुक, । तेणें विनोदें

वानरकटक । गर्जना करी वेळोवेळा. ॥ ९८ ॥ आता पुनरपि युद्धा-
कारणें । कुंभकर्णु येईल देखोनि रणें; । श्रीरामाचेनि बाणें । देहो ठेवील
गागणीं. ॥ ९९ ॥ इति श्रीयुद्धकांडकथारसु । श्रवणें नलगे भवलेशु. ।
लमीकु बोलिला तो साराशु, आईका; । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १०० ॥

---

## प्रसंग तिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नम । श्रीगुरुकाशिराजाय नम. । भूमं-
डळप्रमाण नासिका । खडण जालें, आडका, । आणि कर्णद्वयाचा अ-
सेका । ठावो फेडिला सुग्रीवें. ॥ १ ॥ दिसे बीभत्स, विशाळु, । रुधिरें जाला
बहुत बबाळु, । सेंदुरसरितामंडित शेळु । मस्तकापासौनि पायावरि. ॥ २ ॥
निद्रातीं महोदरें बुद्धी । मद्याचे घट पाजिले सहस्रावधि, । तयाचा चढ्
जाला शुद्धि । शरीरीं सर्वथा नाहीं. ॥ ३ ॥ सुग्रीवें कक्षेआतूनि सोड-
विलें, । कर्ण, नासिक छेदूनि नेलें, । हें उन्मतपणालागीं । नाहीं कळलें
कुंभकर्णासि. ॥ ४ ॥ समुद्रा ऐसा सहज बळें । यरि मद्य घेतलें मर्यादे-
वेगळें. । वीरश्रीचें वैभव आगळें । न सामाळे जगत्रयीं. ॥ ५ ॥ कुंभकर्णु
जाला निर्नासिकु । ऐसें देखे नगरलोकु. । हे परिसोनि रावणें नापिकु ।
शीघ्र सामोरा पाठविला. ॥ ६ ॥ तेणें गगनचुंबित वासा । घेऊनि धर्मी
बांधिला आरिसा. । कुंभकर्णासि सूर्यु ऐसा । तेजोराशि दाखविला. ॥ ७ ॥
तयातु ब्रह्मांड बिंबलें. । कुंभकर्णें मुख निहाळिलें, । तव कर्ण न देखे
आणि खडलें । समूळ नासिक. ॥ ८ ॥ तेथें भडभडा रुधिर, । श्मश्रू सिंदूर-
वर्ण, भिजत शरीर, । रूप बीभत्स जालें; मग थोर । हृदयीं दुखावला ॥ ९ ॥
कुंभकर्णु विचारी मनीं. । म्हणे, "अलंकारु नासिक वदनीं, । तोचि गेला
आतां जिऊनि । चाड काय जगामध्यें? ॥ १० ॥ लंकेशु पाहेल माझें
मुख, । त्यासि काये वाटेल सुख? । वैरीं नासिक नेलें, हें दुःख । ब्रह्मांडीं
न मायें माझें. ॥ ११ ॥ मज कुंभकर्णाचें गेलें नासिक. । आता कैंचे
उरले तिन्ही लोक? । गिळैन न चाविता कपिकटक, । रामलक्ष्मणासहित."
॥ १२ ॥ ऐसें कल्पूनि सग्रामा परतला. । दिसे कृतांतवत् क्षुभेला. । क्रोधें

उल्का सांडितु चालिला, । ज्वाळा मुखांतूनि. ॥ १३ ॥ भयानक अंगें सांवळु। जैसा कुंकुमें माखला शैलु. । वेगें रणीं आला काळु । मारे कपिवाहिनीसि. ॥ १४ ॥ कुंभकर्णासि देखौनि दृष्टीं । गजबजलिया कपि कोटि । म्हणती, आला, रे, मागुता पोटीं । घालावया आमुतें. ॥ १५ ॥ किती एक भयास्तव कपिगण । संग्रामींचें सांडिलें ठाण, । जेथें असती रामलक्ष्मण तेथवरि माघारले. ॥ १६ ॥ जैसें समुद्राचें जळ । मर्यादा देखौनि मागें सरे तात्काळ, । तैसें असंभाव्य वानरदळ । वोसरे मावारें. ॥ १७ ॥ लोटला रणचत्वरीं कुंभकर्णु, । चालत जैसा हरिणु; । नरशार्दूल सीता रमणु । तिकडेचि जातसे. ॥ १८ ॥ करितु गर्जना महाघोर, । तेणें उलती गिरिशिखर; । पृथ्वीतळावरि अंबर । तुटोनि पडों पाहे. ॥ १९ ॥ ऐसा कुंभकर्णु रामा उजू । गेला जैसा सिंहा सन्मुख गजु. । उभारिला दक्षिण भुजु । कल्पांतीं जैसा महाप्रळयीं. ॥ २० ॥ जैसा पक्षांचा पर्वतु । वज्रावरि संघटों पाहतु, । तैसा रामासन्मुख येतु । घोररूपी. ॥ २१ ॥ मुख पसरिलें भयानक. । ग्रासील नेणों तिन्ही लोक. । दोनि भाग करीत कपिकटक, । तंव लक्ष्मणें हाकिला. ॥ २२ ॥ म्हणे " रे राक्षसा, उभा राहें. । धांवें नको, शर माझे साहें. " । परु तिकडे न पाहे । लोटतु राघवा उजू. ॥ २३ ॥ तंव शीघ्र सौमित्रें शर सप्त । त्यावरि टाकिले तीक्ष्ण, तप्त. । तया आंगीं गुंतले, गुप्त । मध्येंचि जाले. ॥ २४ ॥ जैसें अक्षोभीं संधान पडे । तें मागुतें न निवडे, । तैसे राक्षसा देहीं पैलीकडे । बाण निगतीचिना. ॥ २५ ॥ संधान करित लक्ष्मणु । परि तें नमनीचि कुंभकर्णु; । जेथ ठाण मांडिलें सीतारमणु । तेथेंचि धांविन्नला. ॥ २६ ॥ गिरि होता हातीं फिरत । तो रामावरि टाकिला अकस्मात; । तव राघवें शर सोडूनि पर्वत । छेदूनि भूमी पाडिला. ॥ २७ ॥ मग संधान केलें राजीवनेत्रें । येरु धांविन्नला रौद्र शस्त्रें; । परि पुढें पसरिलेंनि वक्त्रें । धांवतसे वळें. ॥ २८ ॥ सामर्थ्य कुंभकर्णाचें देखौनि गाढें, । बिभीषणु गदेसीं आला पुढें. । म्हणे; "उभा, रे, उभा. आजि केव्हडें । नासिक दिसत तुझें. ॥ २९ ॥ कुंभकर्ण नांव तुझें प्रसिद्ध, । परि आजि कर्णेविण करिसी युद्ध. । पैल पाहें विमानारूढ विबुध । कौतुक पाहती तुझें. ॥ ३० ॥ ऐसें तुझेया बंधूचें

करणें, । सर्वही गेलेति मरणें. । म्यां हित सांगितलें बिभीषणें, । परि नाइकाचि तुम्ही. ॥ ३१ ॥ सभामंडपीं मज रावणें । क्रोधें हाणितलें वामचरणें; । कुंभकर्णा, पातकें येणें । कुळक्षयु होतु तुमचा." ॥ ३२ ॥ ऐसें बोलिला बिभीषण. । मग उभा ठेला कुंभकर्ण. । म्हणे, प्रत्युत्तर घे एक क्षण । आणि परता होईं. ॥ ३३ ॥ म्हणे, "भला, रे, भला बिभीषणा! । नाससी माझेया नासिककर्णा. । मी कोणु ऐसें, निर्गुणा, । विचारीं, पां, मानसीं. ॥ ३४ ॥ तू आमुचा सहोदर, सखा; । परि ओळखी साडिली, रे मूर्खा. । आजि महाशत्रूसारिखा । युद्धा आलासि पुढें. ॥ ३५ ॥ महाकपट तू कुळघातकु । जालासि वैरियाचा सेवकु. । आम्हां राक्षसामध्यें येकु । परमाधमु होसी. ॥ ३६ ॥ आपुली याती साटिली जेणें, । धिक् जळो त्याचें जिणें! । गोत्रातु सुख, दुःख राहणें । तोचि पुरुषार्थु. ॥ ३७ ॥ जळो तुझें जातिभ्रष्टमुख! । होईं परता. न दावावीं मुख; । नाहीं तरि मरणात दुःख । पावसी माझेनि हस्तें. ॥ ३८ ॥ आता शीघ्र परता हो गदापाणि. । म्या दृढ विचारिलें मनीं । तुज मारितां कुळखाणी । कुठैल पुढारीं. ॥ ३९ ॥ तुज मारितां अपकीर्ति जगीं । आणि असावासि कुळोत्पत्तीलागीं. । उभा न राहीं रणरंगीं, । सर्वथा सर परता. ॥ ४० ॥ आम्हा आणि रामाचा विरोधीं । सकळ राक्षस पडती युद्धीं, । पुढें कुळासि कैंची वृद्धि । म्हणौनि राखिलासि. ॥ ४१ ॥ तू न धरीं संग्रामाची चाड, । पळ, रे, जाईं राघवाआड. । रोधु माझा गगनाहूनि वाड । त्या वरिपडा हों नको." ॥ ४२ ॥ ऐसें प्रसंगें निरूपिलें कुंभकर्णें. । त्यासि उत्तर दिधलें बिभीषणें. । "मृत्यु कैंचा मज' सीतारमणें । अभय दिधलें असे. ॥ ४३ ॥ वाचा या रघुरायाची । विपरीत करूं न शके विरिंची. । माझिये आकर्णी काळाची । वाहुटी रुळते. ॥ ४४ ॥ कुंभकर्णा, तू आणि मी बंधु । परस्परें न साडितां वैरसंबंधु, । आता मी जातों; परता तुझा वधु । रघुनाथचि करील." ॥ ४५ ॥ ऐसें बोलौनि बिभीषणु । परता उडाला जैसा हरिणु. । पुढें सुरूढ येऊनि कुंभकर्णु । रामावरि धांविन्नला. ॥ ४६ ॥ देखौनि त्याचें सामर्थ्य प्रचंड । रामें ठाणीं तुळिलें दोर्दंड, । झाडूनि टणत्कारिलें कोदंड । अरिअंतक जें. ॥ ४७ ॥ कोदंडटणत्कारध्वनीं । महाकंपु जाला मेदिनी; । तडाडा फु-

टला गगनीं । स्वर्ग खचों पाहत.॥४८॥ सरिता, तडागें, सरोवरें, । त्यांचीं पाताळा गेलीं नीरें. । उलले विशाळें गिरिकंदरें, । पक्षियां प्रळयो जाला. ॥ ४९ ॥ दणाणलें सप्तपाताळ, । डोललें शेषाचें फणामंडळ, । वज्रपृष्ठी कूर्माची, ते चंचळ । जाली तत्समयीं. ॥ ५० ॥ लंकेचिया सगर्भवनिता । त्या जालिया गर्भरहिता. । समुद्रोदरींचिया जळदेवता । गगनासि गेलिया. ॥ ५१ ॥ ऐसें कार्मुक रामें बोटांगुष्टीं । टणत्कारिलें, दृढ धरिलें मुष्टी, । रत्नखचित तूणीं बांधिला पृष्टी, । जो भांडार बाणांचें. ॥ ५२ ॥ तयांतूनि ओढिले शर । चित्रविचित्र, अतिसुंदर; । अरिगणांचे प्राणहर । दक्षिण करीं घेतले. ॥ ५३ ॥ ते बाण रुक्मपुंख, निर्घोट, । तैळधूत, सरळे, सदट; । भाटी तेजाळिया, वरि खेळे पुट । वैश्वानरशिखांचें. ॥ ५४ ॥ अवनीआकाश चित्रलें भीतरीं, । लिखित, मंत्रांचीं बीजें वरि. । 'रामु' येहीं दो अक्षरीं । मुद्रा मिरवत असे. ॥ ५५ ॥ ऐसे रघुनाथें हस्तीं बाण । घेतले, वज्रापरीस कठिण. । रणरंगीं मांडूनि ठाण, । वचन बोलता जाला. ॥ ५६ ॥ म्हणे, "रे कुंभकर्णा, रावणबंधु, । दाशरथी रामु मी प्रसिद्धु. । जन्मांतरींचा वैरसंबंधु । तुम्हां आम्हां पडलासे. ॥ ५७ ॥ तुमचें सामर्थ्य सर्वांहूनि वाड । जाणौनि मज अवताराची चाड. । आतां पुरवीन तुमचें कोड । संग्रामसंघट्टणीं. ॥ ५८ ॥ मज शत्रूतें सादर निहाळीं, । आतां तुज मारीन रणमंडळीं. । तुझी त्वचा फोडूनि काळी, । काढीन गिळिले कपि. ॥५९॥ तुझें छेदूनि बीभत्स शिर । लंकेमध्यें पाडीन साचार; । दोन्ही चरण, दोन्ही कर । खंडीन द्रुमशाखां ऐसे. ॥ ६० ॥ आतां सावध राहें. माझे बाण । करूं आले तुझें विदारण. । तुझां कंठीं पंचप्राण । हरण करिती यांचें. ॥ ६१ ॥ तूं मरण पावलिया असतीं जेथें, । तुझा बंधु भेटी पाठवीन तेथें." । ऐसें कठिण बोलौनि रघुनाथें । धनुष्यीं शर साजिले. ॥ ६२ ॥ कुंभकर्णु तदुपरि । रामेसीं बोले प्रत्युत्तरीं. । म्हणे, "तू शत्रु जन्मांतरीं । हें ज्ञान असे आमुतें. ॥ ६३ ॥ रामा, तू बोलसी पुरुषार्थें । जे तुज विटवीन शरपंथें; । तरि इयें मजप्रति व्यर्थें । वचनें तुझीं, मानिया. ॥ ६४ ॥ कदर्पें विश्व भेदिलें बाणीं । परि अतनु जाला शूळपाणि; । तूं धनुर्धर निका ये धरणी, । परि मजपुढें लघु बाळक. ॥ ६५ ॥ सागर जळनिधि, तुंबळ, ।

पसरून बुडवू शके भूगोल; । परि त्याचा अगस्ती भरिला चूळ । क्षणमात्रें. ॥ ६६ ॥ म्हणौनि तुझें किती, रे, बळ ? । विचारितां मनुष्य, बाळ, । मज दृष्टी भाससी केवळ । ग्रासु एकु उत्तमु. ॥ ६७ ॥ तुवां मजवरि गुणीं लाविला बाणु, । परि मी नव्हें कनकाचा हरिणु; । ना नव्हें खरदूषणु । जे वधिले जनस्थानीं; ॥ ६८ ॥ ना नव्हें सुग्रीवाचा बंधु, । तुवां जयाचा कपटें केला वधु; । मी जाण, रामा, प्रसिद्ध । कुंभकर्णु शत्रु तुझा. ॥ ६९ ॥ अरे, या त्रिभुवनाचें भाग्य थोर, । जें मज निद्राव्यसन निरंतर; । नाहीं-तरि चराचर । उरतें कैंचें ? ॥ ७० ॥ दैत्य, दानव, यक्ष, गंधर्व, । पिशाच, गुह्यक, सर्पादि सर्व; । इतुकेयांचा विक्रमगर्व । माझिये नखाग्रीं. ॥ ७१ ॥ मी कुंभकर्णु यमाचा यमु; । तुज असे आपुला भ्रमु. । मजसीं करूनि संग्रामु । जय पावैन म्हणसी. ॥ ७२ ॥ "आतां इच्छा तव समरंगणीं । मज भेदिता होये निजबाणीं." । ऐसी कुंभकर्णाची वाणी । राघवें आइकिली. ॥ ७३ ॥ मग रामु बोलिला एक वचन. । म्हणे, "रे शत्रु, सावधान. । बाण-धारातीर्थी करवैन स्नान । देहांतसमयीं तुज." ॥ ७४ ॥ ऐसें बोलौनि राव-णारि । शर सोडिले कुंभकर्णावरि, । धगधगायमान अंबरीं । पसरलें तेज. ॥ ७५ ॥ विद्युल्लतावत् शर लखलख, । सुसाटें गर्जती सुवर्णपुंख, । देखौनि राक्षसें पसरिलें मुख, । प्राशन करिता जाला. ॥ ७६ ॥ बाण येताति बाणामार्गे. । शीघ्रता सांगों, तरि मनोवेगें. । कुंभकर्णु मुख-मार्गे । जठरीं सामावितु. ॥ ७७ ॥ जीमूत वर्षे जळ धारीं । तें सांठवे समुद्रोदरीं; । तैसा शरप्रवाह जठरीं । प्रवेशे कुंभकर्णाचा. ॥ ७८ ॥ अनिवार सुटला शरकल्लोळु; । वज्रभाली पावकतेजाळु । येत; कुंभकर्णु गिळीत, कवळु । जैसे नवनीताचे. ॥ ७९ ॥ दोन्ही पसरूनि आवाळीं । गर्जत घोषें वसुंधरामंडळीं, । जैसी झंझामारुतें जळीं । नौका डोलतसे. ॥ ८० ॥ सामर्थ्य राक्षसाचें चंड घोर । देखौनि कपिसिंधु जाला भयातुर. । म्हणती, "अद्भुत शक्ति ! याचें शरीर । वज्राहूनि कठिण. ॥ ८१ ॥ या रघुनाथाचा बाणु लागे । तरि मेरूचा गर्भ भंगे." । हें आश्चर्य करूनि सांगे । कपि एकैकापुढें. ॥ ८२ ॥ कौतुक पाहे कपिवाहिनी. । अतिवेगु रामाचा संधानीं, । दृष्टि कुंभकर्णाचा वदनीं ।

बहुत जाली. ॥ ८३ ॥ रामु रघुत्तमवी शर सोडी, । कुंभकर्णु ग्रासी, काहीं दर्ती फोडी. । काहीं क्रोधें झोलूनि मोडी । दोहीं हस्तींकरूनि. ॥ ८४ ॥ ऐसें रघुत्तमाचें शरसंधान । गिळिलें राक्षसें पसरूनि वदन. । मग घेतलें वज्रासमान । मुद्गलायुध आपण. ॥ ८५ ॥ उर्ध्व करूनि दक्षिण भुजु, । हाणिता झाला रामा उजू, । देखोनि वेग करी भरताग्रजु, । वीरचक्र-चूडामणि. ॥ ८६ ॥ प्रळयउल्का ऐसें तेज, । वायव्यास्त्राचें वारें लिखित बीज, । बाणु काढूनि, सज । कार्मुकीं लाविला. ॥ ८७ ॥ त्या बाणाचें सार्गो तीक्ष्णपण, । तरि वारेयाचें करी खडण; । त्यासि रामाज्ञा प्रमाण, । इच्छिलें कार्य करी. ॥ ८८ ॥ तो रावनें सोडिला शरु । मुखमडळी जैसा सहस्रकरु, । प्रळय वायुरत् घोर । पुत्राचा धुधुवादु. ॥ ८९ ॥ येणें नेटें शरु गेला, । कुंभकर्णाचा दक्षिणांगीं बैसला, । खनेयापासूनि भुजु तोडिला, । नव्हताचि जैसा. ॥ ९० ॥ तो बाणु आपुलेनि प्रसंगें । भुजु घेऊनि गेला गगनमार्गें. । मग पृथ्वीवरि टाकिला वेगें । गिरिशृंगा ऐसा. ॥ ९१ ॥ भुजु तोडिता सीतारमणें । मुख्य दक्षिणांग जालें उणें । मग कोपा चढला कोटिगुणें । कुंभकर्णु तो. ॥ ९२ ॥ रौद्रवेशें दाढारें रग-डिलीं, । जैसी कल्पांतविजू कडाडली, । तेणें घोषें मूर्च्छा आली । दिग-जांसि. ॥ ९३ ॥ मुख पसरूनि दिधली हाक, । तेणें कांपिन्नले तिन्ही लोक. । दचकलें वानरकटक । पाताळासि जावों म्हणे. ॥ ९४ ॥ मग कुंभकर्णें वामदोर्दंड । वाऊनि ताळ तोळिला प्रचड, । टाकिला रामावरि; शतखड । वीरराजें केला तो. ॥ ९५ ॥ वज्राहूनि विशेषें शस्त्रें समस्तें । कुंभकर्णु हाणे वामहस्तें. । तियें वरिच्यावरि सीताकांतें । बाणीं खडूनि सांडिलीं. ॥ ९६ ॥ मग रणकर्कशें राजीवनेत्रें । रौद्रास्त्र बाणु सजिला बीजमंत्रें । तो त्यावरि सोडितां नक्षत्रें । च्यवलीं पृथ्वीवरि. ॥ ९७ ॥ त्या बाणाचिये तप्तज्वाळे । करपलीं मेघाचीं पटळें. । सुसाटे शेषा कर्णी बैसले टाळें, । मग चक्षु श्रवा जाला. ॥ ९८ ॥ तो बाणु रौद्रास्त्र धगधगितु । तया सन्मुख आला अकस्मातु । स्कंधापासूनि वामहस्तु । छेदूनि नेला गगनासि. ॥ ९९ ॥ तुटला कुंभकर्णाचा दुसरा भुजु, । एक शत योजनें गेला आकाशा उजू, । सवेंचि भूमीवरि पडे, देवराजु । शैलशृंग पाडी

जैसें. ॥ १०० ॥ स्कंधापासूनि दोन्ही दोर्दंड । गिरिशृंगवत् पडले प्रचंड. । पुढें तो कोपे म्हणे ब्रह्मांड । ग्रासीन सगळें. ॥ १ ॥ प्रळयाग्नीसि तृष्णा प्रळयीं । तैसा आवेशु राक्षसा हृदयीं. । दोन्ही चरणीं समरगणाचां ठायीं । रामावरि धांविन्नला. ॥ २ ॥ पुढें दोनि शर घेतले रघुराजें । जयांवरि ब्रह्मास्त्रबीजें. । अर्धचंद्राकार तळपती तेजें । मार्तंडा तुल्य. ॥ ३ ॥ धारा पुसूनि लाविले गुणीं, । मग कानाडी वोढी चापपाणि, । शर गुज्ज बोलौनि स्वामीचां कर्णीं । सुटले घुंघाटघोषें. ॥ ४ ॥ कांचनपुंख, अति तेजाळे, । जैसे प्रळयपावकाचे गोळे; । कीं कल्पांतविजूचे पुंजाळे । पक्ष दोन्ही विचित्र. ॥ ५ ॥ ऐसे शर सोडिले रामें । आकाश उजळिती व्योमें । तेन्हां शंका मानिली सूर्यसोमें । वरि येतील म्हणौनि. ॥ ६ ॥ त्या शरपुंखाचेनि घुंघाटें । तडाडलीं अचळांचीं पोटें, । चंड भूतें जालीं एकवटें, । मूर्छित भूमी पडलीं. ॥ ७ ॥ विजूद्वय पडे गिरिपाठारीं । तैसे बाण आले कुंभकर्णावरि. । दोर्चीं पळमात्राभीतरीं । दोन्ही चरण तोडिले. ॥ ८ ॥ मंदराचळाचिये तळींचे टेंके काढिले । तैसे चरण तुटौनि पडले, । राक्षसु चौरंगी जाला, सुटले । शोणिताचे पूर. ॥ ९ ॥ शोणितसेंदुराळें चहूकडे । कुंभकर्णदेहापासाव पडे; । चालिले पूर तावडे । सागरीं संगम जाले. ॥ ११० ॥ तुटले करपाद, उरला कोथळु; । राक्षसा अद्भुत कोपकल्लोळु. । मुख पसरिलें रामा उजू, भूगोळु । माईल ऐसें वाटे. ॥ ११ ॥ जिन्हा भयानक दिसे तोंडीं, । उल्का क्रोधाग्नीच्या बाहेरि सांडी. । पुढें चालिला फरकडी, । अजगरू जैसा. ॥ १२ ॥ देखौनि आश्चर्य केलें रघुवीरें. । म्हणे, "चरणेंविण चाले उदरें. । शक्ति याची अद्भुत! ईश्वरें । निर्मिला केन्हडा! ॥ १३ ॥ मग सोडिले बहुत बाण, । पसरिलें मुख बूजिलें संपूर्ण; । सर्वेंचि करावया खंडण । इंद्रास्त्रशरु काढिला. ॥ १४ ॥ रामें रुक्मपुंख भाळी चित्राकार, । इंद्रदेवताबीजाक्षर, । तूणीआतूनि काढिताचि पृथ्वी, अंबर । झळाळित जालें. ॥ १५ ॥ तो बाण लाविला धनुष्या, । ओढितां थरारलिया दिशा. । गर्भपातु जाला आकाशा; । नक्षत्रें आलीं भूतळा. ॥ १६ ॥ बाणु गर्जतु गेला अतिवेगें, । मनाची गति तुळितां होय मागें. । पळाचेनि सहस्रभागें । तया कंठीं बैसला. ॥ १७ ॥

वज्रघातें तुटलें पर्वतशिखर, । तैसें रामबाणें शत्रुशिर. । तें ऊर्ध्व उसळलें अंबर । योजनांचीं शतें. ॥ १८ ॥ सोमार्क म्हणती शिर देखोनि, । " अरिष्ट राहेचि कीं गगनीं । ग्रासावया आम्हांलागोनि । राहो ऐसें दुसरें! ॥ १९ ॥ ऐसें शिर गगनपंथें गेलें, । धांवु पुरोनि पुनरपि परतलें, पर्वतु उडी घाली, तैसें पडलें । अकस्मात् लंकेवरी. ॥ १२० ॥ कुंभकर्णाचें शिर पडलें जेथ । भूमीसि महागर्ता पडली तेथ. । किती एक ग्रामस्थ व्यर्थ । माजी चूर्ण जाले. ॥ २१ ॥ रुंड कुंभकर्णाचें हिसळलें तें समुद्रोदरीं पडलें. । तेथ जळचरां अंतु जाला, उसळलें । ऊर्ध्वपंथें उदक ॥ २२ ॥ ऐसेया वळसागरा कुंभकर्णा । क्षत्रत्वें रामें आणिलें रणा. सरिसे राक्षस होते, ते रावणा । सांगों गेले वार्ता. ॥ २३ ॥ आतां कुंभकर्णाचेनि दुःखें । बुडती चिंतार्णवीं लंकेशाचीं मुखें. । पुढें त्रिशिरेनि मुखें । संबोधन केलें. ॥ २४ ॥ महोदरु आणि राजकुमरु । जाऊनि युद्ध करितील घोरु । तो अपूर्व वीररसु सादरु । श्रवण करावा, जी. ॥ २५ ॥ इति श्रीयुद्धकांड वाल्मीकिकृत, । कुंभकर्णवध समाप्त. । कृष्णदासु मुद्गलु म्हणे दत्त । मनाचें दीजे. ॥ १२६ ॥

---

## प्रसंग एकतिसावा.

ॐ नमो श्रीरामसचिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । कुंभकर्णाचा वधु विक्रमें । केला समरीं सर्वेश्वरें रामें, । तद्दिने रावणप्रतापरविरश्में । ग्रासिलीं राहोमुखशोकें. ॥ १ ॥ मुख नासलें, स्वस्थ नवटे, । दुःखवज्रें हृदय फुटे. । विचारितां मानसीं वाटे । बुडालों रिपुअर्णवीं. ॥ २ ॥ दशाकद्वयनेत्रद्वारें । अश्रुकण पडती गंहिवरें, । पुढें रावणु करुणस्वरें । पुत्रांप्रति बोले. ॥ ३ ॥ म्हणे, " कुंभकर्णाचें बळ आम्हां । शरणागतु सेवी ब्रह्मा. । लंकेमध्यें, पुत्रहो, क्षेम तुम्हां । हा प्रसादु कुंभकर्णाचा. ॥ ४ ॥ कुंभकर्णाचें बळ सांगों, तरि । या समान्य नाहीं ब्रह्मांडोदरीं. । संग्रामीं रुळे

येचे नखाग्रीं । वैभव वैश्रवणाचें. ॥ ५ ॥ हा सहज खालानी करतळ, । तरि पालथे स्वर्ग, पाताळ; । उर्ध्व करिता अंगुळ । आकाश येऊ पाहे भूमी.' ॥ ६ ॥ "ऐसा गाढा बधु बळनिधि. । वैरी न मारिता आजिचा युद्धीं । देहो सांडिला निशुद्धी, । सर्वां दु ख दिधलें आम्हा." ॥ ७ ॥ ऐसा शक्रजितजनकु । करी निद्रासागराचा शोकु । पुढें देवांतकु, नरांतकु, । वारी मुख्य त्रिशिरा. ॥ ८ ॥ म्हणे, "राया, गतशोक सांडीं. । विवेकशास्त्रें ममताजाळ खंडीं. । पुरुषार्थानळाचा कुंडीं । त्वचा सांडीं करुणेची. ॥ ९ ॥ राया, विचारिता तिन्ही लोक । नाश पावती एकामार्गे एक. । सृष्टिकर्ता ब्रह्मादिक । तेही जाती काळांतरीं. ॥ १० ॥ हा देहधारक जितुका प्राणी । तो मृत्यु पावेल, सारांशवाणी. । पहा, पा पचकाची मिळणी, । शाश्वत कैंचें हो! ॥ ११ ॥ अनंत मरणाचीं द्वारें, । जीव जाती साडूनि शरीरें; । आराध्यकर्माचेनि प्रकारें । पडती ते ठायीं. ॥ १२ ॥ संसारसूत्रकळा ऐसी आहे, । जन्मा आलिया कोणहीच न राहे. । परमार्थी वस्तु पाहें, । परता करीं प्रपंचु. ॥ १३ ॥ असो आता, हे प्रतापनिधि, । तू सांडीं मोहोबुद्धि. । सर्वही आटतीं माडले युद्धीं, । किती यांचें दु ख करिशी ? ॥१४॥ हा करुणाकाळ नव्हे, राया, । प्रताप धरीं शत्रु सहराया. । तूज विरिंचीनें शक्ति दिधलिया, । त्या सिद्ध असती. ॥ १५ ॥ तू शस्त्रास्त्रसामर्थ्यसमर्थु ? । सहस्रखणी ब्रह्मयानें दिधला रथु, । सामर्थ्येसीं नैर्ऋत्यनाथु । वृथा चिंता कां करिशी ? ॥ १६ ॥ आता बोलणें असो ये समयीं. । मज संग्रामाची आज्ञा देईं. । रिपु रणभूमीचा ठायीं । सहाराया जाईन ॥ १७ ॥ ऐसें जंव बोले त्रिशिरा, । तंव आवेश आला आणिका कुमरा. । अतिकाया म्हणे, "लंकेश्वरा, । मी आजि युद्धा जाईन. ॥ १८ ॥ तुझ्या शत्रूतें समरंगणी, । मारीन, राजचक्रचूडामणि, । मग तुम्ही लंकापुरपाटणीं । आनंदें उचबळा, हो. ॥ १९ ॥ प्रळयीं पावकाचे वृष्टी । तृणतुल्य भासे सर्व सृष्टि, । तैसें माझेनि मतें शत्रु संपुष्टीं । साठवीन शराचे." ॥ २० ॥ ऐसे अतिकायाचे शब्दांतीं । नरांतकु करी विज्ञप्ति. । म्हणे, "परिस, सिंधुपुरपति, । आज्ञा द्यावी युद्धालागीं. ॥ २१ ॥ तुझिया वपूचेनि सुडें । नाचवीन शाखामृगांचीं धडें. । मुख्य रिपूचें रूपडें । पायांखालीं बैसवीन.

॥ २२ ॥ याउपरी बोले देवांतकुनामा. । म्हणे, "परिस, राया सार्व-भौमा. । आजि जाईन शत्रूसीं संग्रामा, । आज्ञापुष्प वदूनि तुझें." ॥ २३ ॥ ऐसें राजपुत्र वदले विक्रमें. । पसरलीं प्रतापाचीं रश्में. । ते काळीं नैर्ऋ-त्याचीं मुखपद्में । टवटवित जालीं. ॥ २४ ॥ महापार्श्व, महोदर ते काळीं रायातें विनविती बद्धांजळी. । "आरे वधावया रणमंडळीं । अनन्य आज्ञा देइजे." ॥ २५ ॥ ऐसा मंत्रियाचा पुरुषार्थु । परिसौनि, बोले निशाचर-नाथु. । म्हणे, "शीघ्रकाळें मनोरथु । माझा सिद्धी न्यावा. ॥ २६ ॥ त्याचे आर्गी जो जो विक्रमु । तो त्या शत्रूसीं कीजे संग्रामु. । माझिये आज्ञेचा कायसा नेमु । ये समयीं सांगों तुम्हा? ॥ २७ ॥ कैसी वाहतसे विपरीत वेळा! । त्रैलोक्य तापे ज्याचिया प्रतापकळा, । तो युद्धा गेलिया, डोळां । न देखोंचि पुनरपि. ॥ २८ ॥ आतां तुम्ही बरवे बुद्धी । न्यावा संग्राम सिद्धी. । काकुत्स्थासहित वानर आधीं । निर्दाळूनियां यावें." ॥ २९ ॥ ऐसें बोलौनि ते समयीं रावणें । पुत्रप्रधानासि दिधलीं भूषणें. । मुकुट, माळा, रत्नकंकणें । साही जणांस दिधलीं ॥ ३० ॥ काळें कंठीं पाश घालौनि बोळिले, । तैसे साही मंडपाबाहेर आले. । दळेशा आज्ञा जाली, पालाणिले । चतुरंगमार. ॥ ३१ ॥ दळ सिद्ध जालें अतिभीम. । रथ, घोडे उत्तमोत्तम, । देवाचे आर्गी उभे राहे रोम । ज्यांसि देखूनि पुरीं. ॥ ३२ ॥ साही जण मुख्य नायकु, । त्यांचें अगल्य कटकु । लंकामध्य-मार्गी कितीयेकु । तुंबळौनि ठेलें. ॥ ३३ ॥ ऐरावतीचा प्रतिमल्ल कुंजरु । त्यावरि बैसला महोदरु, । हस्तें जाळा तुळिता तोमरु, । निजमोरसीं निघाला ॥ ३४ ॥ रुक्मांवरि रत्नाची वुथी । महापार्श्व बैसला रथीं. । मार्गी पुढें निजजनपथीं । उत्तरद्वारें चालिले. ॥ ३५ ॥ ऐका, पुरीं ज्या रथाचीं चक्रें । वज्रघाते ताडिलीं शक्रें, । परि ते न भंगती गात्रें । निळतुल्य. ॥ ३६ ॥ वरि रत्नाच्या मदनरेखा । तैशा जडल्या रत्नाच्या शिखा. । अश्व जुंतिले धुरेच्या मुखा, । महा अपूर्वता केली. ॥ ३७ ॥ पताका मिजरूप, मिनरूप केतु । वरि मनोहर मदण सुशोभितु, । ऐसेया रथीं बैसले राजसुत, । त्रिशिरा, देवांतकु. ॥ ३८ ॥ धनुष्यें, शर, शस्त्रें, । अस्त्रें बीजमंडित मंत्रें । येवरीं, घातरीं सुचित्रें । अगत्यागें. ॥ ३९ ॥ निघाले घडघडायमान. ।

तुंबळ सरिसें अंगलग सैन्य. । महाभीम करिती गर्जन । पदाति, प्रळयमेघ जैसे. ॥ ४० ॥ तुरंगोत्तम तेजोमय, । शुभ्र, जैसे चंद्राचा उदयो, । विचारितां भुवनत्रय । लावण्य पैं ऐसें नाहीं. ॥ ४१ ॥ पाहोनि अश्वांची अंगकळा । लज्जा तुटणें होतसे चंद्रमंडळा. । उक्षगवत शकी आगळा । सुवर्णापरिस तो. ॥ ४२ ॥ अश्वरत्नाचेनि निजपाडें । पाहतां, पृथ्वीमोल थोडें. । रावणभाग्याचेनि उजियेडें । शक्राचे पुरीं जोडला. ॥ ४३ ॥ ऐसा तो पांखरिला अश्वराजु, । त्यावरी बैसला लंकेशाचा आत्मजु. । नांव त्याचें नरांतकु, निजू । ऐसें खड्ग करीं. ॥ ४४ ॥ तो उद्दाळित निघाला मेदिनी, । पाठीं वेष्टित अगलगवाहिनी; । तंव घडघडीत रथ अवनी । महादृढ शतचक्रीं. ॥ ४५ ॥ रत्नविशेषीं विराजतु, । बहु पताका वरि मिरवतु, । संग्रामाकारणें उचबळतु । रथ आला तो. ॥ ४६ ॥ धावतां ज्याचें अंगबळ । झेलू न शके भूमंडळ, । ते घोडे जुतिले चपळ । सहस्र एक त्या रथा. ॥ ४७ ॥ ऐसिया रथनायकावरि । बैसला अतिकाया ते अवसरीं. । अगलग कटक चहू पारीं । चालिलें गर्जे. ॥ ४८ ॥ ऐसें साजणाचें दळ दणदणाट । मार्गी चालतां जालें एकवट; । ते समयीं मगळमातेचें पोट । सडतडूं लागलें. ॥ ४९ ॥ भारापुढें अतिमयतुरें । रणकर्कशें गर्जती रणतुरें. । तेणें छंदें धांवती सैरें । वाहनें पतकांचीं. ॥ ५० ॥ कुंजराचे किंकाट घोष, । घोडियां मुखीं लागला हिंस, । वीर गर्जती; तेणें आकाश । नादें कोंदाटलें. ॥ ५१ ॥ मिरवे वीरवधुचा समारंभु. । रजनटला न दिसे नभु. । पावावया मोक्षाचा लाभु । वेगें वाहिनी निघाली. ॥ ५२ ॥ रण पावतां आवेशें । तंव अपशकुनाचें फळ केसें ! । साहींच्या मुगुटावरि साही शिसें । अकस्मात् टाकिलीं गिधीं. ॥ ५३ ॥ भंगलें साहींचें अंत करण, । तंव पुढें पावलें वीरांतक रण. । तेथ पारखे उभे कपिगण. । वीरीं वीर न्याहळिले. ॥ ५४ ॥ दृष्टादृष्टि जाली दोंही दळां, । दोंहींकडे रुद्रावेशु आगळा; । वीरीं केला सिंहनाद केला । तेणें दाटलें नभ. ॥ ५५ ॥ निशाचरसेना सडक सरिता । कपिसागरीं जालिया मिश्रिता. । त्या समयीं त्या वीरदेवता । धांवणें मांडिलें. ॥ ५६ ॥ नैर्ऋत्य वानर पडखळित । उसळले, येरयेरांसि हांकित, । युद्ध मांडलें अद्भुत । देवां दैत्यांसारिखें. ॥ ५७ ॥ लपटले राक्षसवानर. ।

परस्परें हाणिती घाय कठोर. । लागतिये ठायीं रुधिर । भडभडा वाहत ॥ ५८ ॥ वीरश्रिया मातले वीरनायक । वर्में भेदिती येकाचीं येक. वक्षस्थळीं देऊनि वज्रधडक । पैजर फोडिती अस्थींचे. ॥ ५९ ॥ वी आवेशाचेनि उफाळें । झेंपा घालिती, भुजबळें । करीं धरूनि कठनाळें येक येकाचीं पिळिती. ॥ ६० ॥ आंसुडिती करचरण तवकें, । मोडित जैशीं काष्टें शुष्कें; । मुखीं हाणौनि, मुख, मस्तकें । छेदिती पक्क फळ ऐसीं. ॥ ६१ ॥ कैसीं संग्रामाचेनि कौतुकें । येकवाटलीं दोन्ही कटकें; जैसी मर्यादा साडूनि उदकें । मिळालीं दोन्ही नदाचीं. ॥ ६२ ॥ येकये काच्या घायां तळीं । आंतुडती वीर अतुर्बळी. । इच्छेस्तव युद्धाआगळी । सिझानिती आगी. ॥ ६३ ॥ पट्टीश, परशु, गदा, तोमर, । परिघ, चक्रें, कोइते, कटार, । शूळ, भाली, सुरिया, सार, । असिलता खड्गवल्ली. ॥ ६४ ॥ दशघ्नी, शतघ्नी, भिंडिमाळा, । मुद्गल, उड्डुर्डी, लोंहाचिया शिळा, । पाश, शर, नैर्ऋत्यदळा । इतुकीं आयुधें. ॥ ६५ ॥ येहीं शस्त्रींकरूनि वानरातें । मारिती स्वामीचेनि हितें. । कितीएक कपि होऊनियां प्रेतें । पडिले रणरंगीं. ॥ ६६ ॥ पर्वत, शिळा, शिखरें, वृक्ष, । येहीं आयुधीं मंडित कपींचे लक्ष. । राक्षसनीरासि मोक्ष । देताति उदारपणें. ॥ ६७ ॥ ते काळीं अशुद्ध माडलें चहूंकडे. । धावती पूर तांबडे. । उभयाचा कटकप्रदेश बुडे । इतुकी खोलींव जाली ॥ ६८ ॥ ऐसें महायुद्ध माडलें, । राक्षसदळ भिडतां भग्न जालें. । तें रावणात्मजें पाहिलें । अश्वारूढ नरांतकें. ॥ ६९ ॥ सुपर्णासम बळियाढा । दुमिळा थासनींचा घोडा, । पाहतां पवनासि वेगु थोडा; । परदळांत प्रवेशला. ॥ ७० ॥ त्या घोडियाचेनि उसळवळें । नरांतका सामर्थ्य आगळें. । खड्गेंकरूनिया शिसाळें । तोडिता जाला कपींची. ॥ ७१ ॥ चमत्कार वाजी वानरें, । वरि सरिसा राउत फिरे, । कपिसमुदाय खड्गाचिये धारे । धरपडा होतसे. ॥ ७२ ॥ पडिला नरांतकाचा उठावा, । ताडिला कपियांतकाचा धांवा. । क्षणामध्यें शतेंशत भंगा । तोडिल्या महावीरांच्या. ॥ ७३ ॥ अश्वराज तो चिंतामणि । स्वामीच्या मतें करी धांवणी. । वेगु उच्चारितां रखे चरणी । वायूचें वेगा. ॥ ७४ ॥ अश्व, गज, क्षत्री येक जाति, । ऐसी असे लौकिकीं वदंती, ।

ने गांठि पडली निगुती । अश्वखड्ग नरांतका. ॥ ७५ ॥ अद्भुत घोडियाचेनि उदाळें, । नरांतकु वावरे भुजबळें. । प्रळयविजु ऐसें खड्ग तेजाळें । विझत वानरां आंगीं. ॥ ७६ ॥ वारणभारामाजी केसरी, । कीं काद्रवेयांमाजी सुपर्णारि, । तैसा तेथें नरांतकु परनीरांवरि । उठावला मुक्ति देतु. ॥ ७७ ॥ नरांतकाचा वीरविक्रमु । करित असे कल्पांतसंग्रामु; । भूतांचे दृष्टी भासे यमु, । तैसा वानरांसि दिसे. ॥ ७८ ॥ धीट कपि हाणिती शृंगांचे घायीं, । परि घोडा न दिसे येके ठायीं; । अकस्मात् आदळे ह्रदयीं, । तंव खड्ग वैसे शिरीं. ॥ ७९ ॥ नरांतकाचें युद्ध दारुण । देखौनि पळाले कपिगण, शाखामृगनाथा सगळे शरण । 'रक्षीं, रक्षीं' म्हणौनियां. ॥ ८० ॥ सुरासुरीं मथिला क्षीराब्धि, । मग संग्रामा पेटले वैरबुद्धी; । तें वळीनें विक्रमें आर्धी । त्रिदशां त्रासिलें. ॥ ८१ ॥ मग ते अमर तये काळीं । शरण गेले शचीपतिजवळी, । "दैत्याधीश कोपला वळी, । रक्षीं, रक्षीं त्यापासूनि." ॥ ८२ ॥ तयापरी हो कपींची शतें । सुग्रीवापासीं गेलीं धांवतें. । उणीव देखौनि वाळीसुतें । निर्भय त्यांसि दिधलें. ॥ ८३ ॥ भुजंगावरि पडे गरुडाची झेंप, । तैसा तारातनयो आला नरांतकासमीप. । उडौनि हाणितली थाप, । अश्वासहित चूर्ण केला. ॥ ८४ ॥ मारिला नरांतक आणि घोडा । ते ठायीं जाला मेदमांसाचा सडा. । पसरला पूर तांबडा । शोणितमयाचा. ॥ ८५ ॥ नरांतक मारिला अंगदें; । राक्षस बोंमाती "हा ! हा ! !" शब्दें. । ऐसें देखौनि ददें । त्रिशिरादेवांतकाचीं ॥ ८६ ॥ क्रोधाच्या उल्का मुखमंडळीं । टाकित आले अंगदाजवळी. । महोदरेंही ते काळीं । कुंजरु प्रेरिला पुढें. ॥ ८७ ॥ आतां संग्राम मागुता दारुण । करिती राक्षस तिघेजण; । तें रुची ऐका चित्त देऊन । कृष्णदास मुद्गलु म्हणे. ॥ ८८ ॥

---

## प्रसंग बात्तिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । वीर अंगदु रणांगणीं । पोर घोर हांकिला तिघीं जणीं; । तेथ महापार्श्व धांवणीं ।

चौथ्यानें केली. ॥ १ ॥ मग चौवीं जणीं चौं पारीं । अंगदु वेढिला प्रेतझा-गरीं. । मग तिये काळीं अधिकां उत्तरीं । देवांतकु बोलिला. ॥ २ ॥ म्हणे, "रे मर्कटा, उसिणें घेई. । मज सांपडलासि रणांगणाचां ठायीं; । आतां नरांतकाचां पायीं । शतखंड करीन." ॥ ३ ॥ ऐसें बोलौनि देवांतकें । युद्ध मांडिलें रौद्र तवकें. । सुवर्णपुंख शर कार्मुकें । सोडिता जाला. ॥ ४ ॥ ठायीं अचळ वाळीआत्मजु, । त्रिशिरा हाणे तया उजू; । महोदरें वरि घातला गजु, । तोमरें ताडिता जाला. ॥ ५ ॥ महापार्श्वही बखाळला, । शरपंथ तारेयावरि केला, । वानरवीरराजु एकला । वज्रांगीं शरप्रहार झेली. ॥ ६ ॥ वीरांमध्यें वीरु आगळा । देखौनि चौघांचा एकवळा, । दोहीं हस्तींकरूनि दोनि शिळा । दोघांवरि टाकिलिया. ॥ ७ ॥ शतां शाखांचे अति वाड । उन्मूळिले अश्वपर्णाचे जोड, । भुजबळें टाकिलें झुंवाड । दुसरेया दोघांवरि. ॥ ८ ॥ शिळा, द्रुम वरि पडतक्षणीं । येरीं संधान केलें ऊर्ध्व वाणीं, । दशग्रीवात्मजीं दोघीं जणीं । निवारूनि सांडिले. ॥ ९ ॥ चौघांसीं झुंझतां तारातनयो, । एकट पडिला, न दिसे जयो; । ऐसा कठिण देखौनि समयो, । वीरत्रय धांविन्नले. ॥ १० ॥ हनुमंतु, नीलु आणि ऋषभु । धांविन्नले; सिंहनादें गर्जे नभु. । 'जय यशस्वी अयोध्याप्रभु' । म्हणौनि पावले पुढें. ॥ ११ ॥ या त्रिवीरांचेनि मतें त्रिभुवन । बळेंसीं तुळितां तृणासमान. । अंगदासि देऊनि समाधान । संग्रामा प्रवर्तले. ॥ १२ ॥ पर्वत घेऊनि विशाळु । ऊर्ध्वगति उडाला नीलु. । महोदराचा लक्षौनि टाळु । टाकिला दोर्दंडबळें. ॥ १३ ॥ तो भ्रमत महोदरावरि अकस्मातु । येऊनि शिरीं बैसला पर्वतु. । क्षणमात्रें राक्षस आणि मदोन्मत्तु । गजु दोघे चूर्ण जाले. ॥ १४ ॥ यापरी महोदराची शांति । जालेया जय पावला सेनापति; । तंव येरीकडे बीरमति । हनुमंत काये करिता जाला? ॥ १५ ॥ देवांतकें आगळें दाखविलें, । पवनपुत्रासि बाणीं भेदिलें, । जैसें शिवसामर्थ्यें नेणतां केलें । संधान पंचबाणें. ॥ १६ ॥ देवांतकाची शरवृष्टि । वायुपुत्रें देखौनि दृष्टी, । भुभुःकार केला, तेणें सृष्टि । कंपायमान जाली. ॥ १७ ॥ पितृगति सांडूनि मार्गें । धांविन्नला चंडवेगें, । जैसीं फणामंडळें फांकिलीं नागें । देखौनि

गजमाथां केसरी. । वचन एक बोलिला तिये अवसरीं । लंकेशात्मजाप्रति. ॥ १९ ॥ "सिंह ऐसें विश्वतोमुखीं नाम रुळे । तो शशकासि देखौनि भयें पळे; । क्षीरसागर म्हणवी त्यास न मिळे । तक्रही न मागतां. ॥ २० ॥ गजपति नांवें आळवी जनकु, । तो कुलालदास रासभरक्षकु. । जन्मादारभ्य धान्यभिक्षुकु । त्यासि इंदु माता म्हणे. ॥ २१ ॥ देवांतक तुज नाम ठेविलें, । तें विचारितां व्यर्थ गेलें. । तुझेनि हस्तें पशुही नाहीं पडलें । महात्त्वसीचां दिवशीं. ॥ २२ ॥ मार्गीं जातां रतिपति । क्लीबाचां घरीं राहिला वस्ती, । तैसी तुझेया नामाची गति । ठाकौनि जाळी जाण. ॥ २३ ॥ तरि, देवां देखतां, देवांतका, । शीघ्र जावें अंतकलोका," । म्हणौनि पदलत्ता एका । हृदयावरि ताडिला. ॥ २४ ॥ पांपर लागतां वक्षस्थळीं । देवांतकु पडला भूमंडळीं; । मुखीं वाहे अशुद्धाची उकळी, । गतप्राण तोही जाला. ॥ २५ ॥ चंड शुंडेचेनि प्रहारें । मूशका मारिलें कुंजरें, । तैसें अनिळात्मजें येकसरें । देवांतकासि वधिलें. ॥ २६ ॥ सूडु घ्यावेया कोपारूढें । त्रिशिरेन रथु प्रेरिला पुढें, । जैसा ज्ञातेयाप्रति मूर्ढे । उपक्रमु केला. ॥ २७ ॥ रावणी म्हणे, "रे शाखाकीटका, । वनचरा, द्रुमपत्रभक्षका, । जें उसिणें दिधलें देवांतका । तें आपुलें घेईं." ॥ २८ ॥ ऐसें बोलौनि त्रिशिरा । प्रवर्तला महामारा. । शर सोडिता जाला, जैशा धारा । जीमुति वर्षे भूमी. ॥ २९ ॥ हनुमंताचें वज्रांग कठिण, । न भेदती त्रिशिरेयाचे बाण, । जैसें कूर्मपृष्ठीवरि तृण । भेदु न करी लागलेया. ॥ ३० ॥ त्रिशिरेयाची त्वरा देखौनि पुढें । रावणारीनें गर्जन केलें गाढें. । परोपकारपुण्या येऱ्हडें । तरुजुवाड उन्मूळिलें. ॥ ३१ ॥ ऊर्ध्वदोर्दंडें वायुपुत्रें । झाडिलीं पादपशाखापत्रें. । आवेशें प्रहारु हाणौनि, गात्रें । रावणसुताचीं भंगिलीं. ॥ ३२ ॥ वृक्षातळीं चूर्ण जाला रथु, । त्रिशिरेया प्राप्त यमपथु; । ऐसा हनुमंताचा पुरुषार्थु । वीरांमध्यें मिरवला. ॥ ३३ ॥ पुढें आइका येरीकडे । महापार्श्वेसीं ऋषभु भिडे. । निकरें हाणिती नांतुडे । एकु एका घायातळीं. ॥ ३४ ॥ ऋषभु गर्जना करी भीम, । तेणें पळों पाहती सूर्यसोम. । शिळा, शिखरें, महाद्रुम । महापार्श्वावरि टाकी. ॥ ३५ ॥ रावणसुतु तोमरगळा । धनुर्विये अति आगळा. । मुसळसंघातें द्रुम, शिळा । भूमंडळीं पाडितु.

॥ ३६ ॥ दोघे गर्जती काळयोगें, । आयुधें टाकिती रुद्रावेशें, । उपरी आगळें केलें राक्षसें । ऋषभु भेदिला बाणीं. ॥ ३७ ॥ पुढें कपीनें काये केलें ? । पर्वतु उपडिला टांगूळें, । ग्यासि शिखरें बहुसाळें; । तो करतळें भ्रमविला. ॥ ३८ ॥ फोडिली कल्पांत आरोळी. । म्हणे, " महापार्श्वा, सांभाळीं. " । ऐसें बोलोनि तत्काळीं । पादपांक्तितु टाकिला. ॥ ३९ ॥ राक्षस निवारण जंव करी, । तंव पर्वतु आदळला शिरीं; । जैसें अकस्मात् पडलें वरि । ब्रह्मांड अवघें. ॥ ४० ॥ तया पर्वतप्रहारातळीं । महापार्श्व चूर्ण जाला भूमंडळीं. । ऋषभाति हनुमंतें तिये काळीं । शब्दें पुट दिधलें. ॥ ४१ ॥ महापार्श्व, महोदर, देवांतकु, । चौथा त्रिशिरा, पांचवा नरांतकु, । यातें प्राप्त जाला लोकु । यमपुरियेचा. ॥ ४२ ॥ ऐसा पांचांचिया मृत्याचा एकवळा । पहोन अतिकायें देखिला. । मुखांनूनि सांडी क्रोधाग्निज्वाळा, । सर्पाचें वमन जैसें. ॥ ४३ ॥ जेहीं बंधु, पितृव्य मारिले, । ते मृगांसमान अलक्ष्य केले; । रघुनाथ तिकडे चालविले । रथाचे सहस्र वाजी. ॥ ४४ ॥ चौक फोडिती कृष्ण काटपीट, । तैसे उदाळें धावती तेजिठ. । चक्रांचेनि पथें होती पीठ । वीरप्रेता या अस्थि. ॥ ४५ ॥ सारथियाचिये कुशलतेनें कसरी, । एकुचि सहस्र सूत्रधारी. । अरुणही नपवे सरी । तुळितां तयासीं. ॥ ४६ ॥ रथु निचारितां जड्, विशाळु; । परि फिरतां पवना-परीस हळु, । नाना रणमागरु तुवळु । तयावरि ताल्चि कीं तें. ॥ ४७ ॥ रामा उजू येत अतिकाय, । जैसें समुद्राप्रति पूराचें तोय. । ऐसें देखौनि कपिवीर-राय । युद्धासि उदित जाले. ॥ ४८ ॥ गवय, गवाक्ष, कुमुदु, । द्विविदु, पांचवा मेंदु; । येहीं केला चंड सिंहनादु; । शिळा शेलित वखाळले. ॥ ४९ ॥ विशाळें पर्वताचीं शृंगें । अतिकायावरि टाकिलीं वेगें; । तंव रावणसुतें शरमार्गें । पृथ्वीवरि पाडिलीं. ॥ ५० ॥ सर्वेचि सोडूनि तीक्ष्ण बाण, । व्यथाभूत केले पाचही जण. । मूतळीं पडले, जैसे हरिण । पारध्याचेनि सधानें. ॥ ५१ ॥ देखौनि अतिकायाचा विक्रमु । विभीषणाप्रति बोले श्रीरामु । म्हणे, " कोण करित संग्रामु । वेगें आला सन्मुख ? ॥ ५२ ॥ दिसतसे शरीर अति स्थूळु, । कनचवद्ध, प्रतापें अचळु, । कृष्णवर्ण, जैसा मंदराचळु । कजळें चर्चितु. ॥ ५३ ॥ रथीं पंचकद्रय कार्मुकें, । तूणी दों

आगळे सा पट्कें, । उष्णकरमंडलमुख । खेटकें । हिमरंदिमकळासंख्य ॥ ५४ ॥ रथु हाटकवर्णे शोभितु, । वीर भिरवे पताका, केतु; सहस्त्र वाजी जुंतिले वीर्यवंतु, । हा कवणाचा पुत्र?" ॥ ९९ ऐसें जनकदुहितारमणु । पुसत क्षणीं सांगे बिभीषणु. । म्हणे, "देव तुम्हांसि जैसा लक्ष्मणु, । तैसा हा इंद्रजितासि होये. ॥ ५६ ॥ जाणौं याचा पुरुषार्थु, । ब्रह्मा जो सत्यलोकनाथु, । तेणें हा यासि दिधला रथु, आणिक मंत्रास्त्रें. ॥ ५७ ॥ याचिये तनूसीं तनु तुळे, । ऐसे भुवनत्र विरळे. । चतुर्थांशीं रथु न ढळे, । म्हणौनि जुंतिले सहस्त्र वाजी. ॥ ५८ हा अतिकायानाम पराक्रमी । कपिवीरां नागवेल संग्रामीं; । तरि आत लक्ष्मणें अथवा तुम्हीं । यातें मुक्ति देईजे." ॥ ५९ ॥ ऐसें बोले बिभी षणु, । जैसा आदित्याप्रति अरुणु. । यानंतरें भरताग्रजु बाणु । धनुष्य योजिता होये. ॥ ६० ॥ वीरश्रीअलंकृत प्रतिभा । पुढें लक्ष्मणु राहि उभा. । म्हणे, "धीरोदात्ता, वैदेहिवल्लभा, । परिस विज्ञापन ॥ ६१ ॥ क्षण एक पहावें राजीवनेत्रें, । हा अतिकाया वधी मुहूर्तमात्रें. । विरिंचिदत्त याचीं शस्त्रें । त्यांचें सामर्थ्य पाहें." ॥ ६२ ऐसा लक्ष्मणु तिये अवसरीं । राघवासि विज्ञापना करी; । पुढें 'जयस्त रावणारि' । म्हणता जाला बधूसि. ॥ ६३ ॥ तैसेंचि सौमित्रें कार्मुक । टण त्कारिलें रणांतक; । तिये ध्वनीची चड धडक । बैसली वीरांच्या हृदयं ॥ ६४ ॥ धनुष्य सज्जूनि तीक्ष्णें बाणें । रण आक्रमिलें दृढ ठाणें. । पुं अतिकाया हांकिला लक्ष्मणें । वीरलक्ष्मीवैभवें. ॥ ६५ ॥ सर्वेचि अतिकाय लोटला वारें, । जैसा उन्मूळिला मंदरगिरि. । लक्ष्मण वज्रलक्षण चाप करीं धाऊनि पुढारला. ॥ ६६ ॥ सौमित्रातें देखौनि डोळा । बोले अतिकाय तोंडागळा. । म्हणे, "दशरथाचेया लघु बाळा, । किमर्थ पुढें जालासि? ॥ ६७ तुवां याया घेऊनि कौतुकें । मागावें जननीसि भातुकें. । मणगटीं बैसवूनि शुकसारिके । विनोदार्थ खेळावें. ॥ ६८ ॥ अरे, रामु मारावया गेला मृगें, सीता ठेविली तुझेनि संगें; । तुवा क्षण नलगता तयामागें । हारविली बधुप्रिया ॥ ६९ ॥ ऐसा वीरु तूं पुरुषार्थी । प्रथमाचि जाणे दाशरथि. । तो तूं आजि माझां शरपंथीं । प्रवेशु करू पाहसी. ॥ ७० ॥ पाहें आतां एके माळीसरिसें

तुझें शिर सोडीन कमळ जैसें. ।, गतप्राण पडिजे पाडसें । तैसी कबंध दशा देख. " ॥ ७१ ॥ ऐसीं अतिकायाचीं उत्तरें। परिसोनि, लक्ष्मणें वीरें पुढें सत्यवचनीं चतुरें । छळणा केली कैसी ! ॥ ७२ ॥ म्हणे, "रे अतिकाया नाम तुझें, । परि वृथापुष्ट पृथ्वीसि ओझें. । आतां सत्य वचन जाण माझें, । शरें शतखंड करीन. ॥ ७३ ॥ तुझेया आयुष्याचा शेवटीं । युद्धीं तुज मज जाली भेटी, । जैसा मृगेंद्राचिये दृष्टी । कुंजर सांपुडे. ॥ ७४ ॥ हिमाद्रीवरील जैसें शिखर । तैसेंचि दिसतसे तुझें शिर; । हें छेदीन बाणें तरिच साचार । मनुज्ञ रानणारीचा. " ॥ ७५ ॥ ऐसें बोले भरतबंधु. । अतिकाया हृदयीं हेलावे क्रोधु; । जैसा ज्येष्ठमासीं क्षीरसिंधु । लोटिनु चंड उता. ॥ ७६ ॥ चाप वोढौनि पिनाकतुल्य, । अत्यंत अपूर्व, अमोल्य, । तूणीगर्भ बाणबाहुल्य । त्यांतूनि द्वादश सज्जिले. ॥ ७७ ॥ शरमाळी तीक्ष्ण तेजाळा, । जैसिया सूर्याच्या द्वादश कळा, । कां द्वादशों विजूंचा एकवळा । रदैला, येतु दिसे. ॥ ७८ ॥ कुशळ सौमित्रु देखणा । लक्षिलें येतेयां अरिबाणां; । तितुकीचीं संख्या जाणा । तूणीगर्भ घेतले. ॥ ७९ ॥ दिघलें वज्रठाण अभग, । पुढें पाणिपदवामांग; । आकर्ण वोढूनि चांग । शरसंधान केलें. ॥ ८० ॥ अतिकायाचे बाणांवरि । धुंधाट धांविन्नले अंबरीं, । जैसे उन्मत्त कुंजरांवरि । केसरी उठावले विक्रमें. ॥ ८१ ॥ वेरें कपोतेयांवरि श्येन । झेंपावले आक्रमितां गगन, । तैसें सौमित्राचें शरसंधान । रिपुशरांवरि पडलें. ॥ ८२ ॥ गिधा गिधांसि पडे गांठि । तैसे बाण वेसले बाणां कंठीं; । असिपत्रें वागलीं पत्राचां देंटीं । खडले ऐसियापरी. ॥ ८३ ॥ अतिकायाचे द्वादश बाण । पडले, पावले खडण, । जैसे च्यवले द्वादश पितृगण । असत्यसाक्षी तयाचे. ॥ ८४ ॥ शर तोडिले लक्ष्मणें । देखौनि अतिकायें मानिलें उणें । तुटलेयांचेनि चतुर्थगुणें । सोडिले पुनरपि. ॥ ८५ ॥ हाटकपुंख, तीक्ष्ण, तेजाळे, । जैसे विद्युल्लतांचि उमाळे, । लक्ष्मणा लक्षूनि तात्काळें । गगनपथें पावले. ॥ ८६ ॥ सांरसेंचि सौमित्रिवीरें । संधान केलें रणचतुरें. । मनासि सांडूनि माघारें । बाण निगाले पुढें. ॥ ८७ ॥ अतिकायाचे शर येत होते । ते तोडूनि पाडिले मागुते, । जैसे सर्वज्ञास्त्र जाणते । पाखंड छेदिती. ॥ ८८ ॥ देखौनि

लक्ष्मणाचा प्रतापु । अतिकायातें अधिक कोपु. । मग व्याविता जाला शर-मंडपु । गगनपोकळीमध्यें. ॥ ८९ ॥ रुक्मपुंख, तैळधूत, तेजाळे, । गर्जत सुटले संख्येवेगळे; । जैसा विजूंचा समूह खेळे । प्रयळमेघोदरीं. ॥ ९० ॥ वीरजेठी तो रामानुजु, । राया दशरथाचा आत्मजु, । नामें लक्ष्मणु, मृग-राजु, । शरें शर खंडिता जाला. ॥ ९१ ॥ मार्तंडाचां तीव्र किरणीं । तेजें तुटिजे तारागणीं, । तैसे सौमित्राचां बाणीं । अमित्रबाण तुटले. ॥ ९२ ॥ पुनरपि अति आवेशें । अतिकाया विंधितु अतिक्लेशें. । भुजदंडावरि खेळतां धनुष्यें । युगसंख्या भंगिलीं. ॥ ९३ ॥ घेतलें पंचम कार्मुक, । जैसें होतें त्र्यंबक. । काळदंडाहूनि कठिण अधिक ।.शर सज्जूनि सोडित. ॥.९४ ॥ बाणांची संख्या बोलिजे थोडी ? । आकाशीं दिसती कोडी. । ते एकेंएक छेदूनि पाडी । निजबाणीं दाशरथि. ॥ ९५ ॥ पुढें बाणांची जाळेया पातळी । भरतबंधूनें तिये काळीं । हस्तक्रिया आगळी । अतिकायासि दाखविली ॥ ९६ ॥ जीमूतीचां गर्भी जळधारा । जाणवतील कोणा चतुरा ? । तैसेंच वीरतूणोदरींचिया शरां । संख्या अनिर्वाच्य. ॥ ९७ ॥ निमिषार्धे बाणजाळ । सौमित्रें सोडिलें सकळ. । निरवकाश नभोमंडळ । अतिकाया देखे. ॥ ९८ ॥ तैसेंचि विक्रमें रावणी । गगन भरिता जाला बहु बाणीं. । लक्ष्मणाचे शर छेदूनि धरणी । पाडिले मृतसर्पा ऐसे. ॥ ९९ ॥ आवेशा चढले दोघे वीर, । छेदिते जाले एकेकाचे शर; । तें कौतुक पाहती खेचर, । अमृताहारी. ॥ १०० ॥ म्हणती, " अपूर्व दोघांचा सग्रामु ! । एक एकापरीस वीरोत्तमु. । अद्भुत धनुर्विद्या, पराक्रमु; । न भूतो न भविष्यति. ॥ १ ॥ युद्ध मांडलें अति आगळें, । ठमकलीं दोन्ही दळें. । मस्तकु तुकिला घननीळें; । ' भला वीरु रावणि ! ' ॥ २ ॥ एक मानवी वीरु सुघडु, । दुसरा राक्षसु तनुजडु; । परि धनुर्विद्येचा पाडु । तुळितां समान दिसे. ॥ ३ ॥ दैत्यपति, वैरोचनाचा पुत्रु । आणि सुरेश, सहस्रनेत्रु, । पूर्वी विरोधु विचित्रु । रत्नाभिलाषें युद्ध जालें; ॥ ४ ॥ तैसे दोघे सौमित्र, रावणि । घोर युद्ध करिती समरंगणीं. । आकाशगर्भु बाणीं । तुंबळु बाणला. ॥ ५ ॥ भाळीभाळीचेनि झगटें । अग्निवृष्टि होत खणखणाटें, । तेणें तडकती गिरिकूटें, । गगनीं लागती ज्वाळा. ॥ ६ ॥ हांकिती, छळिती परस्परें, । सिंहनादें गर्जती

भयंकरें, । निर्वाणशरें हाणितां वैरें । वर्मांगें लक्षूनि. ॥ ७ ॥ अमर्याद शर सुटले, । एकएकाचे खंडितां चुकले. । सपिच्छ येऊनि खडतरले । दोघांचा आंगीं. ॥ ८ ॥ वीरश्रीचेनि येमवरोळें । आवेशें सामर्थ्य आगळें; । न लिपंती दुःखाचेनि विटाळें । बाण भेदतां अंगीं. ॥ ९ ॥ अवलिया दोघी जणीं । दाखविलीं स्थापूनि निजबाणीं. । पाउपरी अंतःकरणीं । सौमित्रें सूचिलें. ॥ ११० ॥ शर घेतला अर्धचंद्र, तेजाळु, । मुखमंडळीं अग्निफळोळु, । जैसा नक्षत्रांमध्यें मंगळु । धगधगितु दिसे. ॥ ११ ॥ तयासि कार्मुकीं सज्जिलें, । माळीवरि ब्रह्मास्त्र स्थापिलें, । शुद्धबीजाक्षरीं गुणिलें । मंत्राचें मूळाग्र. ॥ १२ ॥ वज्रठाण मांडिलें क्षितीं, । धनुष्य वोढिलें निगुंढी, । कानाडी पावली पुरती, । सोडिला ब्रह्मास्त्रबाणु. ॥ १३ ॥ गर्जतु गगनीं भरला बाणु । जैसा कांपकर्ता निजगुणु. । त्या ब्रह्मास्त्राची थोरीव कवणु । सांगों शकेल वाचा ? ॥ १४ ॥ कोटिविद्युल्लतांचा मेळा, । कीं उदैल्या प्रळयाग्नीच्या ज्वाळा, । कीं द्वादशार्कांचेया मंडळा । पगती घडली. ॥ १५ ॥ हेळावती तेजाच्या लता, । दिशा तयांस्तव लखलखिता, । आकाश आणि मंगळाची माता । हाटकवर्ण जाली. ॥ १६ ॥ देखोनि भूतगणें मूर्च्छना पावले, । खेचर प्राण घेऊनि पळाले, । आहाळले नेत्र, दचकले । उभय दळींचे वीर. ॥ १७ ॥ कोल्हाळ वर्तला तिये काळीं, । कोण्ही कोण्हातें न सांभाळी. । ठायीं ठायीं चड बळी । भयातुर टेले. ॥ १८ ॥ ऐसा ब्रह्मास्त्रमंडित शरु । जातु गगनीं तेजाचा सागरु. । त्यासि निवारण लंकेशकुमरु । करूं जाणेचिना. ॥ १९ ॥ गिरिजापतीचा नेत्रवैश्वानरु । तयासि निवारण नेणेचि रतिवरु, । तैसा सौमित्राचा ब्रह्मास्त्र-शरु । अतिकाया निरसूं नेणे. ॥ १२० ॥ बाणु तेजोराशि गर्जतु । मनो-वेगें आला अकस्मातु. । अतिकाया मंदोदरीचा सुतु, । त्याचा कंठीं वैसला. ॥ २१ ॥ बाणें छेदिलें शिर, । जैसें वज्रप्रहारें गिरिशिखर. । गगनीं उसळलें सर्वत्र रुधिर । शत एक योजनें. ॥ २२ ॥ ऐसा देहो पृथ्वीवरि पडला; । जैसा तो अद्रि उन्मूळला; । ऐसें देखोनि समूह फुटला । नैर्ऋत्य-दळा मागें. ॥ २३ ॥ पळतां कितीएक वानरीं । झोडिले, पाडिले पादप-प्रहारीं. । बहुसाल आटले; उरले दोनि, चारि; । ते घायाळ पळाले. ॥ २४ ॥

॥ २४ ॥ ते लंकेमध्यें गेले धांवत, । थबथबां अशुद्ध गळत, । रावणासि देखोनि म्हणतीं, "बहुत, । राया, वोखटें जालें. ॥ २५ ॥ युद्ध जालें तुंवळ थोर, । बहुत आटले राक्षस, वानर; । पुढें तुमचे बंधु आणि कुमर । प्रतापें उठावले. ॥ २६ ॥ महापार्श्व आणि महोदर । दोघीं संग्राम केला थोर, । परि त्या कपींचा विकट मार; । समरंगणीं पाडिले. ॥ २७ ॥ त्रिशिरा, नरांतकु, देवांतकु, । चौथा अतिकाया वीरनायकु, । येहीं संग्रामु प्रतापें अधिकु । पूर्वीपरी केला. ॥ २८ ॥ संग्राम करितां हारी पडला, । परवीरां जयो प्राप्त जाला; । मग एकु एकामागें निमाला । रणमंडळीं, राया." ॥ २९ ॥ ऐसी वार्ता ऐकत क्षणीं । दशग्रीव पडला धरणी. । शैत्य बैसलें करचरणीं, । महामूर्च्छना आली. ॥ १३० ॥ विकळ गेला मुहूर्तएकवरि, । हृदयीं लोटती दुःखाच्या लहरी. । 'हा, हा! कटकटा!' ऐसे शब्द करी । लज्जारहितु कैसा. ॥ ३१ ॥ आसुवीं स्रवती वीसही डोळे, । भूतळीं सव्यापसव्य लोळे, । कबरीभार सुटले मोकळे, । चामरें रुळती जैसीं. ॥ ३२ ॥ सभामंटपीं आसनठायीं । ऐसें देखोनि तिये समयीं, । इंद्रजितें धांवोनि हृदयीं । जनकु धरिला. ॥ ३३ ॥ म्हणे, "काय, जी, राया, ऐसें? । कालु वोळखीं, सांडा पिसें. । कठिण होआवें मानसें, । मोहो झळंबों नका. ॥ ३४ ॥ प्रतिदिनीं, हो, संग्रामीं । सखे पडती रणभूमी. । कोणकोणाकारणें तुम्ही । शिणाल, जी, शोकें? ॥ ३५ ॥ विपरीत आला समयो, । राक्षसकुळासि मांडला क्षयो, । मनुष्य, कपि पावती जयो । पुरुषार्थपणें! ॥ ३६ ॥ भविष्य आहे पुढें जितुकें । तें तरि आपणांसि ठाउकें. । आतां चंडदृष्टी विवेकें । गतशोकु न करिजे. ॥ ३७ ॥ नासलें पुनरपि जोडे । तरि अवश्य गतशोकु करणें पडे. । काळें ग्रासिलें तें सांपडे । कैसेन, भूपति? ॥ ३८ ॥ आता वज्रापरीस कठिण, । राया, कीजे अंतःकरण. । होणार बळवंत; तें जाण । होतां क्षिति कायसी? ॥ ३९ ॥ आतां संकल्पु सत्यवाचा, । संहारु करीन त्या वैरियांचा; । तरिचि पुत्र तुमचा । सहस्रमखरिपु. ॥ १४० ॥ रिपु न वधीं तरि विक् जिणें माझें! । पृथ्वीवरि झालों वोझें. । गुणराशि प्रमदारत्न तुझें । मज विऊनि वध्या जाली." ॥ ४१ ॥ ऐसें मेघनादाचेनि बोलें । लंकेशें दुःख दुराविलें; । जैसें मृत्पात्र विटाळलें । श्रोत्री सांडी परतें. ॥ ४२ ॥ दशग्रीव म्हणे, "बा रे सुता, ।

जादें नभु भरला, मेदिनी। नक्षत्रें पडलीं. ॥ ७ ॥ गाढिया गिडिबिडिवा रणमोहरी, । टाळ, शंख, शृंग, मृदंग, चंड भेरी, । पणव, काहळा दीर्घ स्वरीं। वाजों लागलिया. ॥ ८ ॥ ऐसिया दळीं मुख्य नायकु। परम योद्धा इंद्रजितु एकु, । तीव्रचक्रीं जैसा अर्कु । ग्रीष्मारंभीं मिरवतु. ॥ ९ ॥ दाटितु, गर्जतु खटाटोपें, । परम वेगें, दीर्घ दर्पे, । पुरीचेनि पश्चिमद्वारें प्रतापें। पावला रणमंडळीं. ॥ १० ॥ वरि केला भीम सिंहनादु। तेणें भूगोळु पावला भेदु.। ते काळीं कपिसेनेचा आनंदु। मंदल पावला.॥ ११ ॥ पुढें शीघ्र उतरोनि इंद्रजितें। सैन्यदुर्ग रचिलें मंत्रें, । मध्यें होमारंभु मांडिला, शोणितें। सचैल स्नान केलें. ॥ १२ ॥ विभीतकसमिधा बहुवसा, । वस्तां मंहिषांचिया मेदमांसा, । शतपत्रें, ताम्रवस्त्रें हुताशा। वदनीं हविलें. ॥ १३ ॥ बीजाक्षरीं आहुतींचीं शतें, । घातलीं अग्निकुंडीं एकें चित्तें; । गगनीं ज्वाळा लागलिया, धूम्रभरितें । भरलें दशदिशांमध्यें. ॥ १४ ॥ होमु जालेया संपूर्ण । मधूनि रथु निघाला अग्निवर्ण, । तोमर, खड्ग आणि बाण, । ब्रह्मास्त्रमंडित. ॥ १५ ॥ तिये रथीं बैसौनि इंद्रजितु । ऊर्ध्व उडाला अकस्मातु, । जैसा काळचक्रारूढ कृतांतु । प्रळयीं उड्डाण करी. ॥ १६ ॥ मेघाआड राहोनि निश्चळ । धनुष्य वाइलें चंड, सबळ. । वानरसमुदायावरि बाणजाळ । विक्रमें घालिता जाला. ॥ १७ ॥ महाप्रळयीं गजशुंडाधारीं । मेघमाळा पडती पृथ्वीवरि, । तैसें कपिचक्राचां शिरीं । इंद्रजितु हाणे. ॥ १८ ॥ विद्युल्लता पडती गिरिशिखरीं, । तैसे शर बैसती कपिशरीरीं, । कडतरतां पडती भूमिवरि; । हरिण जैसे बापुडे. ॥ १९ ॥ तुटती करचरणशिसाळें, । विदारती उदरें, वक्षस्थळें; । शतांचीं सहस्रें एके वेळे । प्रेत होऊनि पडलीं. ॥ २० ॥ हाहाकार कपिकटकांतु, । थोरु मांडला आकांतु, । महावीर म्हणती पुरला अंतु, । आकाश व्यालें शरांतें. ॥ २१ ॥ प्राणाचिया काकुळती । वीर वीरांतळीं रिघती, । तंव अकस्मात् आदळती । काळदंडा ऐसे शर. ॥ २२ ॥ ठायींहूनि एक पळों जाती । तंव भालीं चरणचि खुडिती, । नाडेसावजवत् पडती । चौरंगिये वीर. ॥ २३ ॥ ऐसिया वानरांचिया कोटि । पडलिया रणसिंधूचां पोटीं. । रुधिरपूरांचां लोटीं । प्रेतें वाहों लागलीं. ॥ २४ ॥ निबिडशरधाराकरूनि । वीरांसि पाहतां न दिसे नयनीं संधानकर्ता गगनीं कीं मेदिनी । हें कैंचें ज्ञान त्यांसि?

॥ २५ ॥ वीरचक्रचूडामणि रघुवीर । तटस्थ पाहे रणरंगवीर. । सौमित्रु म्हणे, "स्वामी, थोर । अनर्थ आरंभला. ॥ २६ ॥ नरवैडूर्या रघुनाथा, । कपिचक्र पावलें व्यथा. । महावीरांचिया पटलिया चळथा । गतप्राण पृथ्वीवरि. ॥ २७ ॥ शरयूतीरपुरपति, भूपाळा, । शर पडती, जैशा मेघमाळा. । संधानकर्ता न दिसे डोळां, । ऐसियासि काय कीजे ?" ॥ २८ ॥ ऐसें बोले अनुज लक्ष्मण. । त्यासि उत्तर दे सीतारमण. । "सर्पपाशांसारिखा कठिण । समयो आरंभला. ॥ २९ ॥ पुरुषार्थें धैर्य धरावें, । जें होईल तें पावें, । कृपा केलेया सदाशिवें । आनंदु पावों अवघे." ॥ ३० ॥ ऐसें बंधु दोघेजण । बोलती उभे रामलक्ष्मण; । तव येवों सरले बाण । वज्रप्रहारा ऐसे. ॥ ३१ ॥ माळी मेदलिया सर्वांगीं, । धनुष्यें गाळिलीं उभयपर्गी, । मूर्च्छना आलिया रणरंगीं । सुषुप्ति स्वीकारिली. ॥ ३२ ॥ पाहोनि इंद्रजितें शर टाकिले. । मुख्य कपिवीर भले भले । कोण किती बाणीं विंधोनि पाडिले, । ते सख्या बोलिजैल. ॥ ३३ ॥ पुराणसंख्या तीक्ष्ण बाणीं । गंधमादनु पाडिला धरणीं; । जेणें सिंधु बांधिला पाषाणीं । तो नळुही इतुकिया ॥ ३४ ॥ क्षीरसमुद्रोदरींचें रत्न । करितसे शिवकांतीसि गगन, । त्याचिया कळासंख्या शरीं संधान । करूनि पाडिला. ॥ ३५ ॥ रविसंख्या राशी भोगिती । ऐसेया वळवंतांच्या पंक्ति, । येचि सख्याकरूनि निगुती । ऋषभु, मैंदु विंधिले. ॥ ३६ ॥ अब्धि जितुके अवनीवरि । जांबुवंतु खिळिला तितुकां शरीं. । भरले नीळाचां उदरीं । तारकारिमुखसंख्या. ॥ ३७ ॥ ऋतुवर्षाचे दिवस भरती, । तितुका बाणीं निगुती । पाडिला किष्किंधापति । मृतप्राय मूतळीं. ॥ ३८ ॥ रुद्ररुद्रचक्षी गुणित, । पुनरपि त्यांनृनि त्रीणि गत; । इतुकां बाणीं अकस्मात् । अंगदासि हाणीतले. ॥ ३९ ॥ गज, गवाक्षु, दधिवदनु, । वेगदर्शी, पावकलोचनु, । द्विविद, सुषेण, प्रभजनु, । कुमुद, शरभ, केसरि; ॥ ४० ॥ यां एकादश वीरांतें । बाणसंख्या बाणीं निगुतें । विंधिलें इंद्रजितें । मेघमंडळीहूनि. ॥ ४१ ॥ सुमुख, दुर्मुख, ज्योतिमुख, । हेमकूट, पंचमुख, गोमुख, । या एकेकातें रणदक्षु । युगसंख्या शरीं हाणे. ॥ ४२ ॥ ऐसे कपिराज, मुख्यनायक, । एकैकाचीं लक्षांचीं शतें सेवक, । ऐसे कोटिपद्कें दश आणि शतक । खिळिले बाणीं. ॥ ४३ ॥ मुख्य कपींचा संख्या इतुकी ।

पूर्वीचि बोलिला वाल्मीकि, । तेचि सख्या कथिली; चतुरादिकीं । यथार्थ मानिजे. ॥ ४४ ॥ वरकडाची सख्या कोण करी ? । सर्वेही खडले इंद्रजिताचा शरीं, । विदारूनि पडले रणसागरीं । अगणित, असभाव्य. ॥ ४५ ॥ काळाचा काळु रावणी; । सर्वेही अमित्र पडले रणीं. । तृष्णा नै बाणे म्हणौनि वाणीं । दिग्मडळ भरिलें. ॥ ४६ ॥ सर्वीरि पडले मेदिनी, । गतप्राण देखिले नयनीं, । मग इंद्रजितु मेवासनी । चटघोषें गर्जिन्नला. ॥ ४७ ॥ आनदें अत्यत उचवळतु, । पुरुषार्थे नमाये ब्रह्मांडातु, । त्वरें उतरूनि निजकटकांतु । लंकापुरी प्रवेशला. ॥ ४८ ॥ पहा पा इंद्रजितु एकला । कोट्यानकोटि वानर वधून गेला, । तयाचा प्रतापु वर्णिला । नवचे सहस्रवदनें. ॥ ४९ ॥ एकुचि एकातें मारी । त्याचें अपूर्व निश्च करी, । एकें इंद्रजितें तरि । असख्यात मारिले. ॥ ५० ॥ मारिले ते म्हणाल निर्बळ, । तरि ते सुरांचे अवतार केवळ, । आयुधें जयाचीं वृक्ष, शैल । पुष्पप्राय करतळीं. ॥ ५१ ॥ सप्तद्वीपींच्या आणौनि शिळा । जेंहीं सिंधु बांधिला अवलीळा, । क्षणमात्रें भूगोळा । पालथें करू शकती, ॥ ५२ ॥ ऐसे वानरवीर कोटिवरि । एकलेनि खिळिले शरीं, । हें परिसोनि आश्चर्य न करी, । तो अचतुर देखा ॥ ५३ ॥ अवतारपुरुष रामलक्ष्मण, । त्यासिही भेदिलेति बाण, । येराचा पाडु कोण । वरिष्ठ बोलावा ? ॥ ५४ ॥ इंद्रजितें समस्तही पाडिले, । परि तयामध्ये दोघे उरले, । जे राघवें चिरजीवि केले । कृपाकटाक्षें, ॥ ५५ ॥ एकु बिभीषणु, दुजा हनुमतु. । त्यातें हाणेचिना का इंद्रजितु ? । ऐसें म्हणाल, तरि उत्तर देतु । वक्ता श्रोतेयाप्रति. ॥ ५६ ॥ जयावरि कृपा रघुनाथाची । त्यातें पाहेनेया शक्ति काळासि कैंची ? । आदिकरूनि विरिंची । विपरीत करू न शके. ॥ ५७ ॥ राजेयाचें जो प्रीतिपात्र । तयासि कर जोडी जगत्र. । येरोंही भजती, जेसे मित्र । बहुता दिवसांचे. ॥ ५८ ॥ म्हणोनि राजाधिराज रघुपति आहे, । तो जयावरि कृपादृष्टी पाहे, । त्यासि भयलेशु न राहे, । सुखें स्वेच्छे वर्ते. ॥ ५९ ॥ तरि बिभीषणु, हनुमतु, । त्यावरि रामस्नेह बहुतु; । येणेंचि गुणें इंद्रजितु । त्यासि विंधों न शकला. ॥ ६० ॥ रामु त्रिभुवनगामी । अतर्यामीं, । जैसा पाहता परिमळु पद्मीं । आधिष्ठ आत्मा. ॥ ६१ ॥ जैसें पाहता उदक । वृक्षगर्भी व्यापक, । म्हणौनि

पत्रें, पुष्पें, फळें, लोक । घे आपुलिया चाडा. ॥ ६२ ॥ यास्तव तैसा आत्मारामु येकु, । सत्य, चराचरव्यापकु, । जीवकर्मातीतु, साक्षीभूत; दीपकु । जैसा गृहामध्यें. ॥ ६३ ॥ " हा, हो, ऐसा सर्वात्मा रामु, । तरि किमर्थ त्यासि जन्मकर्मु ?" । ऐसें म्हणाल, तरि हा भ्रमु । सारांशअर्थे. ॥ ६४ ॥ भितिचि नाहीं, तेथ कैंचें चित्र ? । पादप नाहीं, तेथ कैंचें पत्र ? । असेचिना निर्मिलें सूत्र, । तेथें पटु काइसा ? ॥ ६५ ॥ ग्रामु नाहीं, तेथ कैंची सीमा ? । शरीर नाहीं, तेथ कैंची रोमा ? । वंध्यापुत्र गेला उदना, । हें कैसें घडेल, जी ? ॥ ६६ ॥ म्हणौनि हें मिथ्या प्रपचपिसें । वर्ततां दिसे, सत्य कैसें ? । आतां असो हें ऐसें. । शास्त्रां विवादु पडला. ॥ ६७ ॥ एकलेनि इंद्रजितें शरमुटी । भीमरणाचां पोटीं । पाडिल्या वानरांच्या कोटि, । इतुकी शक्ति त्यासि कैंची ? ॥ ६८ ॥ तरि त्याचिया हृदयांतु । आत्मारामु असे नांदतु । त्याचकारणें; एऱ्हवीं इंद्रजितु । कैंचा, कोठिल, हो, जी ? ॥ ६९ ॥ एकासि सामर्थ्यें करी आगळें, । सबळ करूनि वश्वी निर्बळें, । विचित्रलीलाविनोदरोळें । मायासूत्रें खेळवी. ॥ ७० ॥ महोदधीमध्यें येत जात तरंग, । तैसेंचि श्रीरामापासूनि जग । उपजे, वर्तल्या तें मार्ग । पावत आहे. ॥ ७१ ॥ आतां असो हा अतिप्रसंगु. । चाउन आहे जो कथामार्गु । तो सांगणें पाहिजे; रसभगु । जेणें नवटे पैं. ॥ ७२ ॥ इति श्रीरामायणग्रंथ चतुरु, । वाल्मीकिनाम नांचा सागरु, । रसलहरींचा लोटला भरु । मर्यादा लवूनि. ॥ ७३ ॥ आता हनुमंतचरित्र अलौकिक, । अति रसाळ कथाकौतुक, । तें सुचित्तें परिसोत चतुरादिक । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ७४ ॥

---

## प्रसंग चौतिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नम । कपींच्या कोडीं, लक्षांचे लक्ष । पडले, जैसे उन्मूळले वृक्ष; । त्यातु धीर हरिवाहिनीचे पक्ष, । हनुमंत, बिभीषण. ॥ १ ॥ दोघे होते दोन्ही हाटीं । दैवें पौर्णिमे रविसोम गगना पोटीं. । पुनरपि अमनाग्मेनि होय भेटी ।

तैसे परस्परें भेटले. ॥ २ ॥ दोन्ही शरीरें वज्रासारखीं । परि दोघे जाल म्लानमुखी, । दोघे परम दुःखी, । दोघे अश्रुपात गाळिती. ॥ ३ ॥ दोवां जणां गहिंवरु दाटे, । परम चिंतातुर हृदय फुटे; । आकाश पडिलें वरि वाटे, । न स्मरे विचारु कांहीं. ॥ ४ ॥ बिभीषणु म्हणे, "हे हनुमंता, । कपिश्रेष्ठा, वीर्यवंता, । विचारु काय करणें आतां ? । सांग, वीरा, यहिला. ॥ ५ ॥ सुरेशाची संपत्ति शापदग्ध जाली, । ते जाऊनि क्षीरसागरीं पडली; । तैसीं रणमांडारीं सांठवलीं । नरवानररत्नें. ॥ ६ ॥ सरिशा इंद्रियांच्या वृत्ति । सुषुप्तिगृहीं लीन होती, । तैसा सर्व वीरांसहितु सीतापति । शरपंजरांतु निश्चलु. ॥ ७ ॥ सर्पजाळ इंद्रजितें टाकिलें, । तें दळ होतें बहुत पडलें; । परि आजिचेया ऐसें देखिलें । नाहीं महारण. ॥ ८ ॥ वीर पडला एकें एकु, । जो वळें यमापरिस अधिकु, । ज्याचिये दृष्टी त्रिलोकु । तृणा समान. ॥ ९ ॥ हे सर्वही उठती ऐसा प्रयत्नु । कवणु आहे आनंदघनु ? । तो शीघ्र करीं; तंव वायुनंदनु, । बोलता जाला. ॥ १० ॥ म्हणे, "अगा, शोधावें प्रथम रण, । कवण व्यथे पडले कोठें कोण ? । किती मूर्छित, किती गतप्राण, । ऐसें कळलें पाहिजे. ॥ ११ ॥ आतां अस्त केला उष्णरश्में, । भूआकाश भरलें तमें, । ऐसेयास्तव नेत्रपद्में । न देखती कांहीं. ॥ १२ ॥ आतां नीळाचा जो जनकु । तो प्रार्थू समर्थ पावकु; । ज्याच्या शिखा देखूनि काळ भयकु । मार्गु सांडैल हिंडतां." ॥ १३ ॥ ऐसीं हनुमंताचीं उत्तरें । बरवीं मानिलीं गदाधरें. । म्हणे, "गगन भरलें अंधकारें, । साह्य अग्नि करावा. ॥ १४ ॥ पृथ्वीपासूनि आकाशीं । उचललिया तमाच्या राशी. । पाहतां आपुलें देह आपणासि । दिसत नाहीं. ॥ १५ ॥ देशस्वामीसि विदेशगमन जालें, । मागें तस्करचक्र उदैलें, । तैसें रविअस्तउपरी तुवळलें । अंधकाराचें बळ. ॥ १६ ॥ आतां तरावेया अंधकारसागरु । प्रदीप्त करूं वैश्वानरु, । ज्याचेनि मुखें मिळे आहारु । इंद्रादि देवांसि. ॥ १७ ॥ अपार अग्नीचें सामर्थ्य, । अग्नीवीण क्रियाकर्म व्यर्थ, । अग्नि होय यथार्थ । परमेश्वरमुख. ॥ १८ ॥ केव्हडी सांगावी अग्नीची थोरी, । जो व्यापकु चराचरीं ? । जीवमात्राचां जठरीं, । नांदतु आहे निर्धारें. ॥ १९ ॥ काष्ठीं, पाषाणीं गुप्त वर्ततु, । शिळजाळाचा जो कांतु । वसे तया तृतीयनेत्रांतु. । एवढा

महिमा अग्नीचा. ॥ २० ॥ हिमघ्नु, तमघ्नु, रोगघ्नु, । बहु समर्थ हा हुताशनु; । शीघ्र यातें हनुमंता प्रार्थूनु । रिगों प्रेतसागरीं." ॥ २१ । ऐसी बिभीषणाची वदे वाणी, । तंव वायुसुतें वंशसंघट्टणीं । अग्नि पाडिला तत्क्षणीं । धगधगायमानु. ॥ २२ ॥ तोडूनि घेतलीं वृक्षकाष्ठें, । जियें अत्यंत गर्मी तेलवटें, । अवघें बांधिलीं एकवाटे, । तेथ अग्नि लाविला. ॥ २३ ॥ महाघोरमय अंधकारीं । उल्का हनुमंतें धरिली करीं, । ज्वाळा लागलिया अंबरीं । धगधगिता, ताम्रश्वेता. ॥ २४ ॥ कैसें उजळलें दिग्मंडळ, । भूमी तेज पडलें तुंबळ, । दिसों लागलें सूक्ष्म, स्थूळ । लोचनेंद्रियातें. ॥ २५ ॥ अग्निदीप्ति फांकली जेथवरि । तेथूनि अंधकार गेला दूरि, । जैसा गृहस्वामी जागा देखूनि बाहेरि । तस्करु निघोन जाय. ॥ २६ ॥ कां पडतां मृगेंद्राचा वारा । पळतां भूमि थोडी कुंजरा, । नाना विवेकोदयीं दिगंतरा । जयळीळ मोह जाय. ॥ २७ ॥ उदैलेया रामनामघोष । दूरिच्या दूरि पळती दोष, । कां ज्ञानप्राप्तीसरिसा नाश । भ्रमपटळासि होय. ॥ २८ ॥ असो. अत्यंत ऐसियापरी । लोटती अग्नितेजलहरी, । तेणें अंधकारु निरसे दूरि, । नव्हेचि जैसा. ॥ २९ ॥ पुढें अग्नीचेनि उजियेडें । हनुमंतु, बिभीषणु निवाडें । देखों लागले धडमुंडें । पडलेया वीरांचीं. ॥ ३० ॥ पडलिया बीभत्स चळथा. । शरजाळांकित पावले व्यथा. । वीरांवरि वीर उताणा, पालथा । पडिला आहे. ॥ ३१ ॥ वृक्षावरि वृक्ष उन्मूळले, । कीं पर्वतावरि पर्वत लोटले, । तैसे कपींवरि कपि पडले । प्रेतदशा पावोनि. ॥ ३२ ॥ कितीएक अशीर्ष जाले, । कितीएक मध्येंचि खंडले, । कितीएकांचे तुटोनि गेले । करचरण सगळे, ॥ ३३ ॥ कितीएक पायीं जर्जरित, । कितीएक मूर्च्छावंत, । एक ते हुंकारें गर्जत । परम दुःखाक्रांत. ॥ ३४ ॥ ऐसे पडले वानरगण; । त्यांतु भ्रमती दोघे जण । जैसे शीतोष्णकिरण । गगनमंडळीं. ॥ ३५ ॥ स्थिति सर्वांची देखूनि डोळां । "कट कटा!" म्हणती वेळोवेळां. । "आहा रे कर्मा सबळा, । ऐसें काय जालें? ॥ ३६ ॥ ब्रह्मांडाचे अनंत गोळे । जो लीळेकरूनि माया खेळे, । तेणें रघुरायें कां इये वेळे । शांतिसुख अवलंबिलें!" ॥ ३७ ॥ ऐसें बोलत हिंडतां एके ठायीं । पडला जांबवंतु आरक्तें पायीं, । त्यासि देखोनि ते समयीं । बिभीषणु आरंबळला. ॥ ३८ ॥ म्हणे, " अहो जांबवंता, ऋक्षनाथा, । कैसा पडलासि पालथा? । उठोनि

बैस, गा, सांग व्यथा । आम्हांप्रति. ॥ ३९ ॥ तुझां आंगीं देखों सप्तशरा-वळीं, । दोनि दोहीं पायीं, दोनि वक्षस्थळीं, । दोनि दोहीं भुजीं, एक निढळीं, । रुतले असती." ॥ ४० ॥ ऐसें बिभीषणु बोलिला, । तंव जांबवंतु पाहों लागला. । शर उपडूनि बैसविला । सरिसा हनुमंतें. ॥ ४१ ॥ जांबुवंतु म्हणे, "गा बिभीषणा, । कोण स्थिति रामलक्ष्मणां? । सुग्रीवमुख्य कपिगणां । वर्तमान कैसें?" ॥ ४२ ॥ बिभीषणु म्हणे, "जांबवंता, । काय सांगों तुज मी आतां? । सकळ रण शोधितां । तूं बोलिलासि आमुसीं. ॥ ४३ ॥ इंद्रजिताचां तीक्ष्ण बाणीं । वीरमात्र पडले रणीं; । जैसे हिमांतकाचां किरणीं । तमतेजें उणीं जालीं. ॥ ४४ ॥ जो चिदाकाशपरमेश्वरु, । कृतांतु ज्याचा आज्ञाधरु, । मनें सृष्टि, मनें संहारु, । महिमा वेदु न जाणे, ॥ ४५ ॥ जो साकार आणि निराकार, । ज्याचें प्रतिबिंब चराचर, । लीळे अनंत अवतार । कार्याकारण धरिले, ॥ ४६ ॥ तो रघुराजु कोदंडपाणि, । महावीरचक्रचूडामणि, । मूर्छित होऊनि इंद्रजिताचां बाणीं । टेंकला अवनीवरि. ॥ ४७ ॥ तयाचा बंधु जो लक्ष्मणु, । नरवीररत्नांतु अग्रगणु, । जेणें क्षणमात्रें हरिला प्राणु । प्रतापिया अतिकायाचा, ॥ ४८ ॥ ज्याचिये धनुर्विद्येची ठेव । देखौनि शिरें डोलविती देव, । इंद्रजिताचां शरीं भग्नवैभव । तोही मूर्छितु पडिला. ॥ ४९ ॥ अष्टादश पद्में ज्याचिये आज्ञेकरूनि । मिळौनि आली कपिवाहिनी, । तो मुख्य सुग्रीवु रणमेदिनी । मृतासमान पडला. ॥ ५० ॥ जेणें रावणु केला भग्नदर्पु, । भंगिला लंकेचा सभामंडपु, । युद्धीं अद्भुत जयाचा प्रतापु, । तो अंगदुही पडला. ॥ ५१ ॥ जयाचा पिता प्रळयानळु, । ज्याची तनु, जैसा मंदराचळु, । प्रहस्तारि, सेनापति नीळु, । तोही वीर पडला. ॥ ५२ ॥ समुद्रासमान बळवीर्य, । रिपुतप्तर्णी पृथ्वीसम धैर्य, । जेणें सिद्धी नेलें सेतूचें कार्य, । तो नळुही खिळिला बाणीं. ॥ ५३ ॥ जो स्थूळदेही मेरूसमान, । प्रतापें जैसा हुताशन, । बहु राक्षस वधिले, तोही गंधमादन । पडला रणांगणीं. ॥ ५४ ॥ जेणें बहुत युद्धीं जिंकिले राय, । तृणासम मानी भुवनत्रय, । तोही रणीं पडला गवय । इंद्रजिताचां बाणीं. ॥ ५५ ॥ जयाचा खड्ग अतिविशाळ वृक्षु, । वधिला

पाठभेद. १. घ. जैसे हिमकांताचां किरणीं । गततेज उडुगणें जालीं.

राक्षसपदातिलक्षु, । परमपुरुषार्थी गवाक्षु । तोही पडिला रणीं. ॥ ५६ ॥ ज्याची फुटतां चंड हांक । लागे काळाहृदयीं धडक, । सदा संग्रामीं करी अधिक, । तो मैंदुही पडला. ॥ ५७ ॥ ज्यासि युद्ध देखोनि परमानंदु, । गर्जोनि गाळी परवीरांचा मदु, । तो बाणपंजरीं कुमुदु । निचेष्टितु पडला. ॥ ५८ ॥ लागतां दोर्दंडचपेट । वाळुका हों शके मेरूचें पोट, । तोही पडला हेमकूट । भग्न होऊनि. ॥ ५९ ॥ एकेककोटिकपींचे प्रभु, । ज्यांचे उड्डाणीं न पुरे नभु, । ते पडले रंभ, ऋषभ, शरभु, । वीरत्रय रणांगणीं. ॥ ६० ॥ ज्यांचे भुजदंड तुळती वज्रासीं, । संग्रामाचां ठायीं कृतांतवेषी, । फनस, केसरी, वेगदर्शी, । तेही तिथे पडले. ॥ ६१ ॥ सप्तसिंधु मर्यादा सांडितां । ज्यांच्या स्थिर करूं शकती भुजलता, । ते वीरत्रय, जांबवंता, । पडलेः सुमुख, दुर्मुख, दधिमुख. ॥ ६२ ॥ योजनद्वय ज्या तनु, । परवीरकरींसि पंचाननु, । तो महावीरु सनादनु । शरजाळीं पडला. ॥ ६३ ॥ मेरूसमान स्थूळ सद्गु, । सदा संग्रामीं जयवंत भुजु, । तोही बीभत्सरूपी गजु, । जांबवता, पडला. ॥ ६४ ॥ जयाचे काळतृष्णेतुल्य दोर्दंड, । वधिले राक्षस उन्मत्त उदंड, । ज्याचें नाम द्विविद, चंड । तोही बाणांकितु जाला. ॥ ६५ ॥ अगा जांबवंता, ऋक्षनाथा, । ऐसिया पडल्या कपींच्या चळथा. । तो एकैकु सांगतां, । सूर्य उदेल. ॥ ६६ ॥ ऋक्ष, जुत्पति रणा आले, । कोटि सत्तपष्ठि गणित जालें, । त्यांचे वीरभार वेगळाले । संख्यारहित जाण. ॥ ६७ ॥ शक्रजिताचां तीक्ष्ण शरीं । सर्वेही बुडाले रणसागरीं, । याचा तरणोपाय विचारीं । शीन, वीरा जांबवंता." ॥ ६८ ॥ ऐसें परिसौनि, बिभीषणातें । उत्तर दिधलें जांबवंतें. । "कल्याण असैल हनुमंतातें । मूर्च्छार सर्वेही उठतील. ॥ ६९ ॥ लंकेहूनि कोटि चारि योजनें । क्षीराब्धितटीं वानरा गिरिरत्नें; । त्यांवरि अमृतवल्लींचीं वनें । बहुत असती. ॥ ७० ॥ ॥ ३५ ॥ दों पर्वतांचीं नामें । चंद्रादि, द्रोणादि ऐसीं उत्तमें; । त्यांच्या पाठारीं "आहा रे यों, । तेथ औषधि आहेति. ॥ ७१ ॥ त्यांचीं नामें निशल्यकरणी, जो लीळेकरूनि सुवर्णकरणी, चौथी संधानी; । इया चारि प्रयत्नेंकरूनि लविला !" ॥ ३७ ॥" ॥ ७२ ॥ ऐसें ऐकौनि चिंतातुरु । बिभीषणु जाला, चळे घायीं, । त्यासि देखुनि जांबवंता, बुद्धिसागरु । परि असाध्य बोलिलासि. ॥ ७३ ॥ म्हणे, "अहो जांबवंता, १

१ सांगता कथा.

कठीण स्थूळ महदतर । मार्गु क्रमणें तो अपार, । संख्या बोलसी तू साचार । योजनें चारि कोटि. ॥ ७४ ॥ हनुमंतें बळाचेनि वैभवें । अमर्याद किती क्रमावें ? । रात्रीमध्यें जावें, यावें । कसेनि पा, हो ? ॥ ७५ ॥ जानकीची करावया आला शुद्धि, । तें शत योजनें तरला महोदधि. । तें आश्चर्य विश्व करी; वृद्धी । जाली कीर्तिसि लोकोत्तर. ॥ ७६ ॥ दहाशताचें सहस्र एक । सहस्राचे दहा दशक, । हे मेळवूनि सकळ, एक । लक्षाची गणना. ॥ ७७ ॥ ऐशा कोटि चारि, जांबवता, । योजनसंख्या गणना जातां. । पुनरपि परतोनि येता । दुसऱ्या चारि कोटि. ॥ ७८ ॥ ऐसें कोटींचेनि अष्टकें । योजनें भूमंडळ इतुकें । रात्रीमधूनि हनुमंतें एकें । कसेनि पा क्रमावें ? ॥ ७९ ॥ म्हणोनि असाध्य दिसे याकारणें, । अलत पडले दिसे आपुलें उणें. । कोण लीळा धरिली सीतारमणें, । हे कळत नाहीं. ॥ ८० ॥ चरित्र इतुकें अता आलें, । कीं अभाग्य माझें आड ठाकलें, । कीं इंद्रादिकांचा ललाटीं लिहिलें । वचन सदाकाळ." ॥ ८१ ॥ ऐसें बिभीषणु बोलतु, । अलत हृदयीं चिंताक्रांतु । त्याप्रति पुनरपि जांबुवंतु । बोलता जाला. ॥ ८२ ॥ म्हणे "परिस, नैर्ऋत्यनायका, । पुलस्तीकुळविपुळदीपका, । हनुमंताचा मूळार्थु ठाउका । तुज नाहीं, तरि आइक. ॥ ८३ ॥ जयाचा कटिप्रदेशा परिवेष्टित । माळ ब्रह्मांडाची रुळत, । तयाचें करण करूं शके गणित ? । तो सर्वेश्वरुचि जाण. ॥ ८४ ॥ पिपीलिकेसि वाहीं समुद्र आकळे, । मशक माथा मेरु घेऊनि खेळे, । गतपदी मानसापुढें पळे । हें कैसें घडों शके ? ॥ ८५ ॥ म्हणौनि तया सर्वेश्वराचें । जड जीवासि ज्ञान कैचें ? । सूतसंहितेसि जयाचें । महत महिमाप्रकरण. ॥ ८६ ॥ तो शिव, जो सत्य, सर्वात्मा, । उपनिषदें न जाणती महिमा, । त्यासि आणि या श्रीरामा । सर्वथा भेदु नाहीं. ॥ ८७ ॥ भुवननाथु तो भाळचंद्रु, । भवानीवरु, गुणसमुद्रु, । अवतरला एकादशरुद्रु । हनुमंतु कपिवेषें. ॥ ८८ ॥ विष्णु हृदय सदाशिवाचें, । शिवु तो हृदयीं विष्णूचें, । ऐसें जाणावें दोहींचें । वचन विश्वारूढ. ॥ ८९ ॥ विष्णु तो हा निधान रामु, । अनंतरला सप्रेम सर्वोत्तमु, । त्याचेया कार्याकारणें प्लवंगमु । शिवु स्वयें अवतरला. ॥ ९० ॥ जिणें पंचबाणु दग्ध केला, । तेणें संकेतें ब्रह्मचर्य नटला, । ना तो रावणातें निर्दळावया आला । अवतारा रुद्र." ॥ ९१ ॥

सैनिक वीरपुंगव । अंतकासमान. ॥ ७९ ॥ वैरियांचें अधिक बोलणें, । हें आपुलें सहजचि उणें. । असो. ऐसेयापरि सीतारमणें । कपिचक्रेंसीं चालि केली. ॥ ८० ॥ सागर शिळीं बांधोनि गेले, । कोटीच्या कोटि राक्षस वधिले, । त्यांचेनि शोणितें नदीसंगम जाले । लवणाब्धीमध्यें. ॥ ८१ ॥ इंद्रजितनामा रावणी । तेणें कपटयुद्धें निजवाणीं । कपिचक्र पाडिलें रणीं, । येकें येकु वीर. ॥ ८२ ॥ त्यांचिया उपचाराकारणें । औषधि सांगितलिया सुषेणें; । म्हणौनि तुजपाशीं जालें येणें । योजनें चारि कोडी ॥ ८३ ॥ आतां सर्वथा विळंबु नव्हीं, । चारि औषधिरत्नें मज द्यावीं, । कार्य नासेल उगवलिया रवि, । रात्रीमध्यें गेलें पाहिजे. ॥ ८४ ॥ निशल्यकरणी आणि संधिनी, । सुवर्णकरणी, संजीवनी, । इया देईं वल्ली; त्रिभुवनीं । कीर्ति उरवीं आपुली." ॥ ८५ ॥ ऐसें बोलिला हनुमतु. । परिसौनि हास्य करी पर्वतु. । म्हणे, "रे वानरा, तू मूर्ख बहुतु । देखिलासि आजि. ॥ ८६ ॥ कैंचा रावणु, कैंचा रामु, । कैंची सीता, कैंचा संग्रामु, । कैंचा आलासि प्लवंगमु । अमृतवल्ली मागों ? ॥ ८७ ॥ सांडूनियां सूर्यमंडळा.। जाती ब्रह्मांडाबाहीर फळा, । तरि तो जाईल मज वेगळा । वल्लींचा समूहो. ॥ ८८ ॥ खेचर, भूचर, क्रूर, अक्रूर । मज सेवूनि आहेति अपार, । तैसें तूही एक वानर । येथें सुखें राहे." ॥ ८९ ॥ ऐसें बोले द्रोणपर्वतु, । जो निजरूपें मूर्तिमंतु. । परिसौनि कोपारूढ हनुमंतु । उत्तर देता झाला. ॥ ९० ॥ म्हणे, "क्लीबासि कैंचें पुरुषार्थधैर्य, । निर्नासिका कैंचें सौंदर्य, । महामूढासि कैंचें कार्याकार्य, । विचार कैंचा हृदयीं ? ॥ ९१ ॥ सर्पासि कैंची शांति, क्षमा, । रासभा कैंची जगीं महिमा, । पक्षियातु काकु पापात्मा, । त्यासि शुचिता कैंची ? ॥ ९२ ॥ द्यूतकाराची सत्य वाचा ? । हिंसकासि कटाळा दोषांचा ? । स्त्रीसि कामोपशांतीचा । संकल्पु कदा सुटी ? ॥ ९३ ॥ मद्यपियासि कैंची तत्वचिंता, । सर्वस्व काय देईल अदाता, । तैसें परदुःख कैंचें पर्वता । जो पाषाणगर्भु ! ॥ ९४ ॥ म्हणौनि, रे, तू गिरि द्रोणु । यथार्थ हृदयीं पाषाणु; । तुज दया कैंची ? महाखळपणु, । अधमाधम तूं. ॥ ९५ ॥ धान्याचें भूमी अंकुरलें बीज । काढिजे बाळक सन्मूळी सहज, । पुच्छें उत्पाटूनि तैसें तुज । निमिषार्धें नेईन." ॥ ९६ ॥ ऐसें बोलिला वीरु गाढा, । करकरा मुखीं

हनुमंतु अंतःकरणीं । संतोषला बहुत. ॥ ६० ॥ चंद्राचळापरीस द्रोणाचळ। दिव्यवल्लींकरूनि पालहाळ. । त्याप्रति जाऊनि अंजनीचा बाळ । औषधि घेता जाला. ॥ ६१ ॥ तंव त्या अप्रत्यक्ष जालिया, । जैशा विजू व्यूनि गेलिया, । कां त्या प्रदीपिका विझालिया । चंडवातामध्यें; ॥ ६२ ॥ का उदयो जालेया ग्रहस्तकरा । गगनांत हारपति तारा, । तैसें देखोनि कपिवीरा । औषधि गुप्त जालिया. ॥ ६३ ॥ ऐसें पाहोनि हनुमंतु । अत्यंत जाला चिंताक्रांतु, । जैसा अर्थु हारपलेया बहुतु । कृपणु दुःखें दाटे. ॥ ६४ ॥ याउपरी कपि तिये काळीं । धैर्यसंपूर्ण, महाबळी, । येऊनि द्रोणाचळातळीं । उभा राहिला वज्रांगी. ॥ ६५ ॥ अगस्ति समुद्राचां तीरीं, । वामनु बळीचां मंडपद्वारीं, । कां इंदुमंडळाचां शखरीं । शिरोरूपु राहिला. ॥ ६६ ॥ नातरि कुठारपाणि चंदनातळीं, । कां तस्करु भांडागारमंडळीं, । कां साधकु निधानाजवळि । साधावया उभा राहे. ॥ ६७ ॥ लंकेशवनारि ऐसियापरी । नगासन्मुख वज्रशरीरी; । कार्याकारण तिये अवसरीं । बोले याचकु जैसा. ॥ ६८ ॥ म्हणे, "अगा कुळाचळपति, । दिशा धवळलिया तुझिये कीर्ती. । तूं परोपकारी धर्ममूर्ति, । पवित्र पीठ तुझें. ॥ ६९ ॥ तूं गुणसमुद्राचें आलय, । तू सौंदर्यशिरींचें वैडुर्य, । तू सुधारसाचें माधुर्य । पर्वतवेर्षे. ॥ ७० ॥ तूं इये पृथ्वीचा अळंकारु, । तू सर्व सिद्धींचा ईश्वरु, । तू देवत्रयांचा मनोहरु । देखिलासि डोळां. ॥ ७१ ॥ अगा, समर्था द्रोणाचळा, । मी प्रत्यक्ष देखतसें डोळां, । सर्वही या नक्षत्रमाळा । तुझी प्रदक्षिणा करिती. ॥ ७२ ॥ देवदैत्यांचे गुरु, । अर्कशशांक सहकुमरु, । भूमितनय, पापग्रह थोरु । राहो, केतु दोवै; ॥ ७३ ॥ ऐसी नवग्रहाची पंक्ति, । जे विश्वातें शुभाशुभ देती, । ते तुज प्रदक्षिणा करिती । अंतरिक्ष अहोरात्र. ॥ ७४ ॥ अगा, तुझिये स्तुतीकारणें । बोलिजे तितुकें उणें. । सूर्यबिंबीं उटणें । कासयाचें लावावें? ॥ ७५ ॥ अमृतासि म्हणावें किती गोड, । गगनासि किती म्हणावें थाड, । इये पृथ्वीसि लावावे पाड । कोण कोण धैर्याचे? ॥ ७६ ॥ परिसें विज्ञापना आतां. । विलंबु होतसे बहु बोलतां. । हरीं मातिये हृदयींची चिंता, । ज्याकारणें येथ आलों. ॥ ७७ ॥ योगेश्वराचा ईश्वरु, । श्रीरामु, सतमावतारु, । त्याचें स्त्रीरत्न दशशिरु । लंकेचा घेऊन गेला. ॥ ७८ ॥ त्याचें असाधारण वैभव, । वदी घातले सकळ देव. । त्यापासीं

सैनिक वीरपुंगव । अंतकासमान. ॥ ७९ ॥ वैरियाचें अधिक बोलणें, । हें आपुलें सहजचि उणें. । असो. ऐसेयापरि सीतारमणें । कपिचक्रेसीं चालि केली. ॥ ८० ॥ सागर शिळीं बांधोनि गेले, । कोटीच्या कोटि राक्षस वधिले, । त्यांचेनि शोणितें नदीसंगम जाले । लवणाब्धीमध्यें. ॥ ८१ ॥ इंद्रजितनामा रावणी । तेणें कपटयुद्धें निजबाणीं । कपिचक्र पाडिलें रणीं, । येकें येकु वीर. ॥ ८२ ॥ त्यांचिया उपचाराकारणें । औषधि सांगितलिया सुषेणें, । म्हणौनि तुजपाशीं जालें येणें । योजनें चारि कोडी ॥ ८३ ॥ आतां सर्वथा विल्बु नलवीं, । चारि औषधिरत्नें मज धावीं, । कार्य नासैल उगवलिया रवि, । रात्रीमध्यें गेलें पाहिजे. ॥ ८४ ॥ *निशल्यकरणी आणि संधिनी,* । *सुवर्णकरणी, संजीवनी,* । इया देईं वल्ली, त्रिभुवनीं । कीर्ति उरवीं आपुली." ॥ ८५ ॥ ऐसें बोलिला हनुमंतु. । परिसौनि हास्य करी पर्वतु. । म्हणे, "रे वानरा, तू मूर्ख बहुतु । देखिलासि आजि. ॥ ८६ ॥ कैंचा रावणु, कैंचा रामु, । कैंची सीता, कैंचा संग्रामु, । कैंचा आलासि प्लवगमु । अमृतवल्ली मागों ! ॥ ८७ ॥ सांडूनिया सूर्यमंडळा । जाती ब्रह्मांडाबाहीरि कळा, । तरि तो जाईल सत्र-वेगळ्या । वल्लींचा समूहो. ॥ ८८ ॥ खेचर, भूचर, क्रूर, अक्रूर । मज सेवूनि आहेति अपार, । तैसें तूही एक वानर । येथें सुखें राहे " ॥ ८९ ॥ ऐसें बोले द्रोणपर्वतु, । जो निजरूपें मूर्तिमंतु. । परिसौनि कोपारूढ हनुमंतु । उत्तर देता झाला. ॥ ९० ॥ म्हणे, "क्लीवासि कैंचें पुरुषार्थधैर्य, । निर्नासिका कैंचें सौंदर्य, । महामूढासि कैंचें कार्याकार्य, । विचारु कैंचा हृदयीं ? ॥ ९१ ॥ सर्पासि कैंची शांति, क्षमा, । रासभा कैंची जगीं महिमा, । पक्षियांतु काकु पापात्मा, । त्यासि शुचिता कैंची ? ॥ ९२ ॥ द्यूतकाराची सत्य वाचा ? । हिंसकासि कटाळा दोषाचा ? । स्त्रीसि कामोपशांतीचा । सकटु कदा सुटी ? ॥ ९३ ॥ मद्यपियासि कैंची तत्वचिंता, । सर्वस्व काय देईल अदाता, । तैसें परदु ख कैंचें पर्वता । जो पाषाणगर्भु ? ॥ ९४ ॥ म्हणौनि, रे, तू गिरि द्रोणु । यथार्थ हृदयीं पाषाणु, । तुज दया कैंची ? महाकृपणु, । अधमाधम तू. ॥ ९५ ॥ धान्याचें भूमी अंकुरलें बीज । क्रीडेनें बाळक उन्मळी सहज, । पुच्छें उत्पाटूनि तैसें तुज । निमिषार्धें नेईन." ॥ ९६ ॥ ऐसें बोलिला वीरु गाढा, । करकरा मुखीं

वाजविल्या दादा, । लांगूल वरतें वाऊनि घातला वेढा । द्रोणाचळा वेष्टित. ॥ ९७ ॥ काळपाश वैसे गतायुषाचां कठीं, । कां निधानकुंभा भुजंगें दिधली मिठी, । नाना मंदराचळासि वेंठी । वासुकीची पडली, ॥ ९८ ॥ हनुमतें ऐसियापरी । पुच्छें वेढिला द्रोणागिरि. । तो विस्तीर्ण असे पारीं । सहस्र एक योजनें. ॥ ९९ ॥ गळित फळ पडलें भूमंडळीं । देखोनि गीधु चचुपुटें कवळी, । उड्डाण करी गगनपोंकळीं, । निगे निजाश्रमाप्रति, ॥ १०० ॥ तयापरी वीरु हनुमंतु, । कपिचक्रचूडामणि, रामदूतु । पुच्छें उन्मूळौनि पर्वतु । परतला गगनपथें. ॥ १ ॥ अपार क्रमितु नभमार्गु, । अद्भुत पुनरपि वेगु, । जैसा करितसे पाठिलागु । पुढा जातेया मनाचा. ॥ २ ॥ लागूळें वेढिला द्रोणाचळु । सहस्र योजनें विशाळु, । अंहेळें अंजनीबाळु । पुष्पप्राय नेतसे. ॥ ३ ॥ ज्या पर्वतावरि नाना वनें । नंदनवनापरिस महामान्यें, । सरिता, तडागें; तेथिचीं जीवनें । अमृतोत्तमें, ॥ ४ ॥ जळचर, वनचर, विहगम, । अमित विचरती जात्योत्तम, । तपोनिधींचे बहुत आश्रम । अलौकिक, रमणीय; ॥ ५ ॥ पाठारावरि शिखरें, गुल्में । उच्च, अपूर्वें, स्वर्गोपमें; । तेथें प्राणी वसती, त्यातें सत्कर्में । बहुता जन्मीं घडलीं. ॥ ६ ॥ असो. ऐसा हा पर्वतु, । त्याचेया भाराची काय कीजे मातु ? । अनुभवी एकु हनुमंतु, । पुच्छें वाधौनि नेतसे. ॥ ७ ॥ वरिलेया औषधींचीं झाडें । जेसीं लखलखीत विजूंचीं जुवाडें, । उजळलीं तेणें उजियेडें । दिशाचीं वदनें. ॥ ८ ॥ लंघिलीं पट् द्वीपांतरें, । उटघिलीं कुळाचळाचीं शिखरें, । लंघिलीं साही समुद्राचीं तीरें । मुहूर्तत्रयामध्यें. ॥ ९ ॥ यथार्थ कपि वज्रशरीरी, । लांगूळें वाधूनि द्रोणागिरि । वेगें आणौनि लंकेवेरीं । सेनेप्रदेशीं ठेविला ॥ ११० ॥ ठेविता क्षणीं द्रोणाचळु । तेथूनि आला अनिळु, । तेणें औषधींचा पीयूषपरिमळु । कपिकटकावरि नेला. ॥ ११ ॥ तेणें सुवास्यगंधेंकरूनि । स्पर्शें सकळ वीरवाहिनी । उठिली, परमानंदु मनीं, । अपूर्व ऐसें वर्तलें. ॥ १२ ॥ निशातमदीपेंकरूनि । प्राणी आपुलाला स्थानीं । निद्रित, ते सर्व सूर्योदयमानीं । पूर्वस्थिति पावती. ॥ १३ ॥ तैसें कपिचक्र सर्वही । उठूनि, जाले दिव्यदेही; । जीर्णत्वचा साडूनि जैसे अहि । नूतनाग पावती. ॥ १४ ॥ संजीवनिया सजीविले, । निशल्यकरणीनें निशल्य केले, । संधिनिया

निकटांग सांधिले, । सुवर्णाया केले दिव्यदेहीं. ॥ १५ ॥ ऐसिया त्या दिव्य औषधि. । वानर व्यथारहित, सुगंधी । सावध जाले कृपानिधि । अनुजसहित. ॥ १६ ॥ त्या दिव्य औषधींचिया प्रभा । भूमंडळ पावलें शोभा. । वीरें धीर राहिला उभा, । पाहों लागले द्रोणाचळा. ॥ १७ ॥ चकोरासि मांदला आपत्काळु । जाणोनि, चद्रु आला सांभाळूं, । तैसा देखिला द्रोणाचळु । वानर कटकाजवळि. ॥ १८ ॥ जैसें कठिण दुर्भिक्षकाळीं । रंकतृषार्ति ग्रामाजवळि । अमृताब्धि लोटला भूमंडळीं, । असमान्य, अकस्मात्. ॥ १९ ॥ बुधशुक्रवियोगें अवर्षणें । चातकाचें अत्यंत कुळलें जिणें, । त्याचिये तृष्णेलागीं रपेणें । जीमूतानें भूमी केली. ॥ १२० ॥ कां दरिद्र भूतांचां आलावीर । कल्पतरु, जो न माये अंबरीं, । तो कल्पिली फळें, शाखा पदरीं । धावया आला. ॥ २१ ॥ असो. ऐसियापरी मध्यमे रात्रीं । वीरीं द्रोणाद्रि देखिला नेत्रीं. । वरिलां वल्लींचेनि तेजें धरित्री । चोखडी अत्यंत जाली. ॥ २२ ॥ आनद पावले कपिदळ, । व्यथेनें टंचिलें दिग्मंडळ, । यानंतरें हनुमंतें तात्काळ । पुच्छें गुडिला पर्वतु. ॥ २३ ॥ निजशक्ती, निजसामर्थ्ये । पुनरपि निगाला नभपथें, । क्षीराब्धिपारीं होता जेथें । तियेचि स्थानीं ठेविला. ॥ २४ ॥ समर्थापासूनि चाडप्रस्तु । जाई जनीं घेऊनि जाण वस्तु, । तें कार्य जालेया नेऊनि दे त्वरितु । उचलूनि आदरें. ॥ २५ ॥ तयापरी हनुमंतें तेणें । द्रोणाचळु आणिला कार्याकारणें; । पुनरपि क्षीरसिंधूचें ठेवणें । क्षीरसिंधूसि दिधलें. ॥ २६ ॥ ऐसें करूनि मारुती । परतला मानसगती, । उदयाचळारूढ होतां गभस्ति । लंकेसि आला. ॥ २७ ॥ समुद्रीं मिळाला शोणभद्रु, । कां घनमडळीं शिरला चंद्रु, । नातरि इंद्रियांचा इंद्रु । प्रियवस्तूमध्यें प्रवेशे, ॥ २८ ॥ कां कुसुमवनामध्यें आला षट्पदु, । कां गगनोदरीं भरला नादु, । नाना विष्णुआज्ञेस्तव वेदु । विरिंचिहृदयीं प्रवेशे; ॥ २९ ॥ ऐसियापरी प्रातःकाळीं । मारुती प्रवेशला कपिमंडळी; । पूर्णकळा मुखकमळीं । पौर्णिमेच्या सोमासम. ॥ १३० ॥ अवसरु जाला जानकीवल्लभा, । तव हनुमंतु पुढें राहिला उभा; । मुखकमळीं पूर्णकळाशोभा । रामचंद्रासन्मुख. ॥ ३१ ॥ विश्व पावे निशीचा अंतु । तंव सूर्य पूर्वे अकस्मातु । नभीं दिसे, तैसा हनुमंतु । वीरमंडळीं देखिला. ॥ ३२ ॥ प्रीतिपात्राति विदेशगमन जालें, । त्यातें अकस्मात् येणें घडलें, । तैसें नरवेंद्रुयें देखिलें । हनुमंतासि डोळां

॥ ३३ ॥ तेसीं श्रीस्वामीचीं पाउलें । मारुतीसि देखणें घडलें, । जेसें लोभियानें आपुलें । निधान निहाळिजे. ॥ ३४ ॥ हनुमंतें तेचि प्रसंगीं । रामासन्मुख सभारंगीं । बद्धांजळी करूनि साष्टांगीं । नमस्कार घातला. ॥ ३५ ॥ तव घटश्रोत्रारि जाला बोलता. । म्हणे "धन्य धन्य, गा, तू अंजनीसुता ! । अष्टनेत्रगोळकांतु विचारिता । तवतुल्य नास्ति. ॥ ३६ ॥ तुझेया एका उपकारासाठीं । आत्मा तुळिजे पाल्टीं, । तरि उपकारांच्या करिसी कोटि, । तेथ आत्मे इतुके कैंचे ? ॥ ३७ ॥ 'आत्मा एकु, द्वितीय नास्ति' । ऐसें वदती वेदश्रुति, । नाना घटीं एकु नभु, तैसी गति । एका आत्मया नाना देहीं. ॥ ३८ ॥ आत्मा गेला, आला हें अबद्ध, । अखंड, चिदानंदरूप, शुद्ध, बुद्ध. । पाखांडमत नानाविध । परमार्थवादें मिथ्या. ॥ ३९ ॥ जाण ज्ञाता शास्त्रपरिक्षी, । बोलिजे प्रसंगेंचि साक्षी, । जेसें एक वापीजळ नाना वृक्षीं । व्यापक वृद्धीलागीं. ॥ १४० ॥ अगें, पुष्पें, फळें, पत्रें, । भिन्न भिन्न, चित्रविचित्रें, । तैसे भिन्न देहीं भिन्न कर्मसूत्रें । भिन्न भिन्न फळें भोगिती. ॥ ४१ ॥ आतां असो हें, हनुमंता, । तू सर्वांचा प्राणदाता. । बुद्धिये कीर्तीची शुभ्रता । सुधाकरा जिंतोनि ठेली." ॥ ४२ ॥ ऐसा पुंडरीकनयनें । रद्रावताररु गोरविला पीयूषवचनें, । तव वातपत्नीगर्भरत्नें । वाक्पुष्पें समर्पिजे. ॥ ४३ ॥ म्हणे, "जी उत्तमा, गुणसंपन्ना, । क्षिति, पाळचक्रचूडारत्ना, । मुनिवरहृदयमंदिरनिधाना, । निरुपमा, नरेंद्रा- ॥ ४४ ॥ चंद्रमयासि कौतुकें । चकोरें पाठविलें भातुकें, । कां सूर्याकारणें पुंडरीकें । बहुता गुणीं बोधिलें. ॥ ४५ ॥ जीवनधाराची चातकें । तृषा हरिली दानोदकें, । का वक्षस्थळीं बाळकें । जननीसि जीवविलें, ॥ ४६ ॥ ऐसें, मंगळजननिजप्राणनाथा, । देखिलें ना आइकिलें, समर्था. । न घडे म्यां तुम्हा उपकारु कीजे हें, वृथा । महंताचेनि मतें. ॥ ४७ ॥ जे स्वयें बुडती, बुडविती आणिकातें, । ते जळनिधीमध्यें नळहस्तें । तरले, तारिलें आमुतें, । तो तवप्रतापमहिमा." ॥ ४८ ॥ ऐसें द्रोणाद्रिहरण बोलिला, । परमानंदु आनंदें उचंबळला. । सरिसाचि सुग्रीवें प्रयोगु केला । प्रसंगानुसार. ॥ ४९ ॥ म्हणे, "सूर्यप्रतापाचेनि प्रसरें । रत्नें डोळां देखिजताति जगें, । तो रवि मेरुआड गेलेया, मागें । विश्व अंधकारीं पडे, ॥ १५० ॥ तैसें हनुमंताचेनि पुरुषार्थें । सरिसीं कपींचीं सामर्थ्यें, ।

हनुमंताजवळि व्यर्थ । वैभवें आमुचीं. ॥ ५१ ॥ कैसा कठिण काळु वर्तला ! । ह्ये समयीं हनुमंत होता भला, । तरि हा दुसरा जन्मु जाला । सकळां कपिकटकांसि. ॥ ५२ ॥ एव्हडा विशाळ द्रोणागिरि । युगसंख्याकोटि योजनें दूरि, । तो आणिला, नेला रात्रींभीतरीं । आकाशमार्गें. ॥ ५३ ॥ या हनुमंताचें बळवैभव । जाणों न शकतीच देव. । हा कार्याकारण सदाशिव । सर्वथा अवतरला. ॥ ५४ ॥ दूतत्वें हनुमंतें सर्व कुळ । सिद्धी नेलें पुरुषार्थे सत्य." । ऐशीं तरणिनंदन अत्यंत । स्तुतिवचनें बोलिला. ॥ ५५ ॥ आतां असो हा कथामार्गु. । पुढील बोलिला पाहिजे प्रसंगु. जेणें श्रोतेयांचा मनोरसभंगु । कदाही नपवे. ॥ ५६ ॥ पुढें ऐसें असे कथानुसंधान, । कपि करितील लंकेचें दहन, । निजदळेंसीं कुंभकर्णाचे नंदन । आवेशें युद्धा येती. ॥ ५७ ॥ इति श्रीयुद्धकांडकथारसु । वाल्मीकिमुनीचा वाग्विलासु, । तो चित्त देऊनि परिसा सुरसु । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १५८ ॥

---

## प्रसंग छत्तिसावा.

ॐनमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुक्षीरिराजाय नमः । उच्छिष्ट बोलिजेल प्रमेय । परि तें उच्छिष्ट सर्वथा म्हणों नये; । धेनु वत्सातें प्रथम पाजी तें काय । दुग्ध उच्छिष्ट जालें ? ॥ १ ॥ गौतमें गौतमीतें आणिलें, । प्रथम तेणेंचि स्नान केलें, । तरी तें काय निंद्य वर्जिलें । उच्छिष्ट म्हणोनि ! ॥ २ ॥ मक्षिकेचेनि मुखद्वारें । मधु निर्माण जाला निर्धारें; । तो काय जनें श्रौतकारें । उच्छिष्ट म्हणोनि वर्जिला ! ॥ ३ ॥ तैसें वाल्मीकि विचित्र काव्य, । रामचरित्र असंभाव्य; । तें उच्छिष्ट कलूं नये; सेव्य । सर्वथा लोकत्रयासि. ॥ ४ ॥ भवतरणोपाय हा एकु । रचूनि राहिला वाल्मीकु; । तरि धन्य मायाचा तिळोकु । श्रवण करी आत्महिता ! ॥ ५ ॥ आतां असो हा स्वल्पनिर्वाहो. । कपींसि कारणें असे लंकेचा दाहो. । पुढें कैसें वर्तेल तें परिसा, हो । चतुर बुद्धी. ॥ ६ ॥ सुवासिंहचकाचां मध्यमंडळीं । श्रीरामु बैसला; सौमित्रुही जवळि, । तयासन्मुख ते काळीं । किष्किंधेशु वदे. ॥ ७ ॥ म्हणे, "जामदग्न्यदर्पश्रीहरणा, । मीनकेतारीचिया अंतःक-

रणा, । चंड दुःख पडलें त्या रावणा; । शीघ्र संग्रामा न निगे. ॥ ८ ॥ आतां कपिकरीं घेऊनि उल्का । दग्ध केली पाहिजे लंका; । तरि, मोक्ष-दायकपुरीनायका, । आज्ञा दिधली पाहिजे." ॥ ९ ॥ ऐसें बोले पितृव्य अंगदाचा. । उत्तर वदे नरश्रेष्ठ गंभीर वाचा. । म्हणे, "कपिपति, संकल्प तुमचा । असैल, तो सिद्धी जावो." ॥ १० ॥ ऐसें बोले दिक्संख्यावक्त्रारि. । तेचि आज्ञा सुकंठें ठेविली शिरीं; । जैसी फणामंडळावारि । काद्रवेयें धरा धरिली. ॥ ११ ॥ तैसी सुग्रीवें लक्षा एका । वीरांसि आज्ञा दिधली. म्हणे, "घ्या, रे, उल्का. । पूर्वद्वारापासूनि लंका । दहन करित जा, हो." ॥ १२ ॥ ऐसी आज्ञा हों नपुरे, । तंव लक्षावधि धांविन्नले त्वरे. । एक एकापरीस पुढारे । वायुवेगें पावले. ॥ १३ ॥ स्नेहगर्भकाष्ठांच्या चुडिया । चंड पावकें प्रदीप्त केलिया, । क्षणमात्रें धडकूनि दिधलिया । लंकेमध्यें गृहीं गृहीं. ॥ १४ ॥ लावितांचि वन्हि लागला वळें । गृहां, गोपुरांसि एके वेळें. । धूम्रेंकरूनि दिग्मंडळें । संपूर्ण जालीं. ॥ १५ ॥ गगनीं भरलिया ज्वाळा, । भस्म करूं पाहती नक्षत्रमाळा. । खेचर म्हणती, "पळा रे, पळा, । प्रळयो आरंभला." ॥ १६ ॥ अद्भुत लागला हुताशनु, । तेथें साह्य पावला प्रभजनु; । जैसा समर्थु समर्थालागूनु । कुढावा करितु. ॥ १७ ॥ वारेयाचेनि चंड मेळें । पावकु दावी आगळें. । रावणें धुववितें मेळें, । म्हणौनि वैर स्मरतु. ॥ १८ ॥ जैसें उणें पडलेयावारि । वैरियातें वैरी बहुत पीडा करी; । पूर्वीं द्वंद्व मांडिलें तिये अवसरीं । महाप्रळयो जैसा. ॥ १९ ॥ ऐसें मांडलें पूर्व द्वंद्व । अत्यंत हडबडलें जानपद. । करिते जाले महाशब्द । 'प्रळयो! प्रळयो!!' म्हणौनि. ॥ २० ॥ जिकडे पळिजे नगरलोकें, । तिकडे धांविजे पावकें; । बहुतांचिया स्त्रिया, वाळकें । भस्म होऊनि गेलीं. ॥ २१ ॥ सैरावैरा धांवती ज्वाळा; । कृष्ण, श्वेत, ताम्र, पीत, तुंवळा, । जैशा वासुकीवदनींच्या सरळा । जिव्हा सिंधुमथनीं. ॥ २२ ॥ अति कोल्हाळु प्रवर्तला. । म्हणती, "अग्नि आला, रे, आला." । प्राण घेऊनि पळों लागला । वळियापुढें वळी. ॥ २३ ॥ कैसें आरंभलें महार्णव! । भस्म होतसे रचना अपूर्व. । नचले राक्षसांचें वैभव, । असंभाव्य लागला वन्हि. ॥ २४ ॥ चित्रविचित्र राजगृहें प्रसिद्धें । सुवस्तांसहित जालीं दग्धें. । भांडारें ऋद्धिसिद्धींचीं निमिषार्धें । रक्षा होऊनि ठेलीं. ॥ २५ ॥ अश्वगजरथशस्त्रशाळा ।

अग्निमुखीं पडलिया सकळा. । मठ, मंडप, गोपुरें, चित्रशाळा । रूपरिया मह जाळिया. ॥ २६ ॥ हाट, हाटवटिया, चौबारें । जळोनि गेले एकसरें. । दुसी सोनारी जोहरी व्यवहारे । ठकले पाटीं पोटें. ॥ २७ ॥ अन्यत आर भले घोर. । बहुत दग्ध जाले नगर, । जैसें त्रिनयनें त्रिपुर । पूर्वी भस्म केलें. ॥ २८ ॥ असत पीडा पावले लोक. । नगरनाथापासीं गेली हाक, म्हणती, "काय पाहता कौतुक? । अग्निमुखीं पडली पुरी. ॥ २९ ॥ तृतीयभाग लंका दश योजनें । निःशेष भस्म केली हुताशनें । दहा सहस्र उत्तमें भुवनें । दग्ध जालीं, राया." ॥ ३० ॥ ऐसें परिसोनि लंकापति । घट्ट पडला चिंतावर्ती. । म्लानमुख कुंभनिकुंभाप्रति । बोलता जाला. ॥ ३१ ॥ "लंका जाळिली प्लवंगमीं । तरि शीघ्र संग्रामा निगा तुम्ही. । सेना, अगळग आणि समागमीं । जंबु, मत्त, गजबाहु ॥ ३२ ॥ आणिक महानाळिया यूपाक्षु. । जावो संग्रामा शोणिताक्षु । एकलेनि सुग्रीवाचा पक्षु । पळविला पूर्वी." ॥ ३३ ॥ ऐसी राजाज्ञा होतां पुरें, । तंव वीरसतक चालिले त्वरें, । जयांच्या प्रहाराचे भेदरें । भुवनत्रयासि लागले. ॥ ३४ ॥ ऐसे चालिले रजनीचर, । माताच अगळग सात भार; । कीं ते सात धैर्याचे गिरिवर । गर्जत निघाले पुढें. ॥ ३५ ॥ सातही जाले वज्ररथारूढ. । पतिनिष्ठित भार चालिले दृढ. । रणतुरें लागलीं तेणें, "बूड । भूमीचें" शेष "ताडू" म्हणे. ॥ ३६ ॥ जेथें दग्ध होतसे पुरी, । दळ चालिलें तयावरि. । कुंभें पर्जन्यास्त्र क्षणामांतरीं । घालूनि वन्हि विझविला. ॥ ३७ ॥ लंका भस्म जाली तेणेंचि मार्गें । बाहिरी निघाली वानरेंगें. । वीर आवेशें झोडिती खड्गें । विघुटनाचेनि पाडें. ॥ ३८ ॥ पावले गर्जत रणभटळ, । देखोनि आटोपलें कपिदळ; । जैसें सिंधूचें उता-जळ । वोसरलें मागों. ॥ ३९ ॥ राक्षसदळाचा मुखमटळी । जोगवे भूमि जिंकोनि, आगळी । दिधली कल्पांतआरोळी, । हाकिले परवीर. ॥ ४० ॥ कपिदळमुखीं प्रवगें । अंगदु होता, तो वीरश्रेष्ठें । परंतु क्षेटित पवनवेगें । पावला पुढें. ॥ ४१ ॥ जोगवनें देखोनि अंगदातें । विंधिले शरीं एकें हातें. । तो नमनीचि, जैसा मेघधारातें । कुंजर अजस्र करी. ॥ ४२ ॥ शर झेलितु आगासारें । अंगदें टाकिला भ्रमत गिरि, । तो बैसला जोगवना शिरीं, । वज्र जैसें अचळशृंगीं.

॥ ४३ ॥ त्या घायासवें क्रोधनु । तळवटी गेला वुजोनु । जैसा समाधिस्थित लीनु । जाला पृथ्वी पोटीं. ॥ ४४ ॥ त्याचेया साह्या सर्वेचि मागें । शोणिताक्षु पावला वेगें. । तेणें अंगदु विंधिला अगें, । भेदूनि गोळिया भाली ॥ ४५ ॥ ऐसें देखौनि द्विविद, मैंदु । पावले करित सिंहनादु; । सेणें परवीरांचा मद्दु । गेला, गतकाळु जैसा. ॥ ४६. ॥ दोघांचां हस्तीं, दोनि चड वृक्ष । अंगदाजवळि आले, रणदक्ष. । तव प्रजघु, यूपाक्ष, । शोणिताक्षा साह्य, जाले. ॥ ४७ ॥ राक्षसत्रय आणि कपित्रय । युद्धा नेहटले, धरूनि धैर्य. । परस्परें ददडपाय । कैसे करिते जाले? ॥ ४८ ॥ चड घोष साहींचां वदनीं । तेणें धडका विझे गगनीं, । कंपायमान होतसे मेदिनी । उठावे करितां. ॥ ४९ ॥ राक्षसवीर तिघे जण । शारंगें वाऊनि सोडिती बाण. । वानरही वृक्ष, पाषाण । सत्वेंरहित सोडिती. ॥ ५० ॥ ऐसा होतां महासंग्रामु । अंगदें अधिक केला विक्रमु. । उन्मूळौनि विशाळ द्रुमु, । प्रजघु झोडूनि पाडिला. ॥ ५१ ॥ तैसाचि महावीरें मैंदें । यूपाक्षु हाणितला कृतांतनादें. । शिळा टाकिली चड शब्दें । शिर शतचूर्ण केलें. ॥ ५२ ॥ तिसरा द्विविदु तिसरीकडे । मल्लयुद्ध शोणिताक्षासीं भिडे. । तिये ठायीं रुधिराचे सडे । जाले सिंदूरवर्ण. ॥ ५३ ॥ मग द्विविदें सरूनि मागें । पाणी वसविला शैलशृंगें. । शोणिताक्षु ताडिला, तेणें अंगें । कुटली सोता ठायीं. ॥ ५४ ॥ कपिवीरीं तिघीं जणीं । नैर्ऋत्यत्रिक पाडिलें रणीं, । तेणें असुरहे धरणी । असतें तृप्त जाली. ॥ ५५ ॥ राक्षसत्रयपातें जाला क्षयो, । कपित्रया लाधला जयो, । हें देखौनि कुंभकर्णाचा तनयो । कुंभ युद्धा प्रवर्तेला ॥ ५६ ॥ पितयासमान बळिवंतु, । मदिरापानें मदोन्मत्तु, । पसरलेनि वक्त्रें गर्जतु, । प्रळयीं अंतकु जैसा. ॥ ५७ ॥ म्हणे, " उभा, रे, उभा, मैंदा. । पळों नको, रे द्विविदा. । धैर्य धरीं, रे अंगदा, । रणांगणाचां ठायीं. ॥ ५८ ॥ नरवें युद्ध केलें तुम्हीं. । बळिये पाडिले रणभूमी. । त्यांचें उसनें घ्या आतां सग्रामीं, । देईन तुम्हां त्रिवर्गां " ॥ ५९ ॥ तव मैंदु म्हणे, रे, उसिनें । देसीना तरि तुझेया पूर्वजा उणें. । कोण कोणाचेनि हस्तें मरणें, । पहावें, पावतील. ॥ ६० ॥ ऐसें मैंदु बोलौनि राहे. । सर्वेचि कुंभु म्हणे, "साहें,

१ ब शतठायीं.

साहें." । येरु सरिसेंचि जंव पाहे, । तंव शर येवों सरले. ॥ ६१ ॥ नवा बाणांची पंक्ति आली, । ते मैंदाच्या हृदयीं भेदली. । क्षणमात्र काया टळं-ढळी । पृथ्वीवरि मूर्छितु. ॥ ६२ ॥ कुंभें रणवीरें तेचि क्षणीं । द्विविद् भेदिला दाही बाणीं. । तोही उलंडला धरणी, । हरिणु जैसा, उताणा. ॥ ६३ ॥ ऐसे दोघे वानरवीर । कुंभें व्ययाभूत केले थोर; । जैसे शचीवरें शृंगधर वज्रप्रहारें. ॥ ६४ ॥ वीरद्वयाउपरी अंगदु एकला । शरघातातळीं सांपडला; जैसा कुठारपाणिया जोडला । अटव्यांतु चंदनु. ॥ ६५ ॥ हांक देऊनि अंगदें, गिरि । टाकू योजिला कुंभावरि; । तव राक्षसें हस्तुचि शरीं कपीचा खिळिला. ॥ ६६ ॥ याउपरी अंगदें वीरें । वृक्षु उन्मूळिला वामकरें. । टाकी-टाकी, तव धनुर्धरें । वामहस्तु खिळिला. ॥ ६७ ॥ अंगदें युद्ध करावें जेणें । ते कर कुंभें खिळिले बाणें; । परि कपिवीरें वज्रठाणें । रण सोडिलें नाहीं. ॥ ६८ ॥ जैसा वृक्षु छेदिती कुठारघायीं । तो पळों नेणेचि पायीं; । तैसा अंगदु ठायींच्या ठायीं । उभा, शर झेलितु. ॥ ६९ ॥ अंगदासि माडलें प्राणांतिक । वानरीं रामापासीं नेली हांक. । म्हणती, "जी कांये पाहतां कौतुक? । वाळीपुतु गेला, गेला." ॥ ७० ॥ आइकौनि सुग्रीवु धाविन्नला, । अकस्मात् कुंभासमीप आला. । भुभुःकारें नभु भेदिला, । शरभु जैसा सिंहावरि. ॥ ७१ ॥ एकाकी संघट्टला हृदयीं, । चाप कुंभाचें घरूनि केलें दों ठायीं. । कुंभकर्णसुतु ते समयीं । मल्लयुद्धा मिसळला. ॥ ७२ ॥ सुग्रीवाचिये कक्षेखालीं । मस्तकें धडकु दिधली. । साहौनि कपींद्रें, समर्पिली । वज्रमुष्टि हृदयीं. ॥ ७३ ॥ त्या मुष्टिघातासरिसा कुंभु । पडिला, जैसा कदळीस्तंभु. । फुटला अंतरींचा गर्भु, । गतप्राण जाला. ॥ ७४ ॥ अंगद-जननीचा वल्लभु । पावला जयलक्षलाभु; । हें देखौनि, हाकित निकुंभु । सुग्रीवा उजू आला. ॥ ७५ ॥ देहो पर्वतापरीस दीर्घु, । वर्णें जैसा काळ-मेघु, । हेमांतदण्डा ऐसा परिघु । तुळितु वज्रबाहु. ॥ ७६ ॥ ऐसें देखौनि हनुमंतें । टाकौनि हाणिला पर्वतें. । निकुंभें परिघघातें । शतचूर्ण केला. ॥ ७७ ॥ सवेंचि हनुमंतें सप्तपर्णु । झाडूनि टाकिला विस्तीर्णु; । तोही निकुंभें अति चूर्णु । परिघें केला. ॥ ७८ ॥ हनुमंताचेया प्रहारद्वयानंतरें । आगळें दाख-विलें निशाचरें. । वज्रतुल्यपरिघप्रहारें । वायुपुत्र ताडिला. ॥ ७९ ॥ तेणें घायें हनुमंतु । किंचित् जाला मूर्च्छागतु; । जैसा अंकुशाक्षतें द्विरदु । अस-

लोपु मानी. ॥ ८० ॥ सर्वेचि हनुमंतु वज्रांगी । आवेशें उचंबळला रण-
रंगीं. । शैल उचलिला शतशृंगी, । निकुंभावरि टाकिला. ॥ ८१ ॥ परि-
घपोणि त्या पर्वतातळीं । पिष्टप्राय जाला भूमंडळीं. । हें देखौनि भयातुर पळी।
राक्षसांची फुटली. ॥ ८२ ॥ दूरि देखौनि व्याघ्राचें रूप । पळतां गोवृप-
भांचे कळप; । हनुमंताचेनि भयें आपेंआप । तैसे राक्षस पळाले. ॥ ८३ ॥
बहुसाल रणीं पडले; । काहींएक घायाळ उरले । ते लंका प्रवेशौनि, गेले ।
रायासि वार्ता सांगों. ॥ ८४ ॥ म्हणती, "सागरांतपृथ्वीपति, । महायुद्ध
जालें, तें सांगों किती? । पूर्वीं देवीं दानवीं, दैत्यीं । कदा केलें नाहीं.
॥ ८५ ॥ प्रजंघ, यूपाक्ष, शोणिताक्ष । एहीं वधिले वानरांचे लक्ष । द्वि-
विदें, अंगदें, मैंदें गिरि, वृक्ष । टाकूनि रणा आणिले. ॥ ८६ ॥ कुंभें, नि-
कुंभें याउपरी । महायुद्ध केलें रणचत्वरीं. । अमित वानर शतधारीं । खंड-
विखंड केले. ॥ ८७ ॥ हें देखौनि वानरेश्वरें । कुंभ वधिला मुष्टिप्रहारें. ।
सीताशुद्धीसि आला त्याचेनि करें । निकुंभु पडला. ॥ ८८ ॥ ऐसे महा-
योद्धे आटले संग्रामीं. । आतां दृढ विचारा, राया, तुम्हीं." । ऐसें ऐकौनि
अंतर्यामीं । रावणु दुःखें दाटला. ॥ ८९ ॥ 'कट कटा !' करितां । रा-
वणें सांगितलें तिघां सुतां. । "तुम्ही युद्धासि जा, रे, आतां, । खरा, मक-
राक्षा, विशालाक्षा. ॥ ९० ॥ कुंभनिकुंभांचेनि सूडें । नाचवा वैरियाचीं
धडमुंडें. । संग्रामु करा, कपटें कैवाडें । युद्धीं रक्षा आपणातें. ॥ ९१ ॥
सेना नेया सबळ सरिसी । जे तुल्य महोदधीसीं." । लंकेशें आज्ञा केलेया
ऐशीं । वंदूनि उठिले त्रिवर्ग. ॥ ९२ ॥ तिघे चालिले एकें वेळें, । जैसे
धोलावूं पाठविले काळें. । परिवेष्टित अंगरक्षदळें । गर्जत निगाले. ॥ ९३ ॥
विशालाक्ष, मकराक्ष, खर, । हे करितील संग्रामु थोरु. । तो रसरंगु मधि-
स्तरु । श्रोतीं पुढें परिसावा. ॥ ९४ ॥ इति श्रीरामायणिक कांडकट ।
वाल्मीकिवाग्ब्रह्मचि रसाळ; । सेवितां खंडेल भवरोगाचें मूळ, । कृष्णदास
मुद्गलु म्हणे. ॥ ९५ ॥

## प्रसंग सदतिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नम । युद्धा निगाले राजनंदन, । ज्यांचेनि भयें कांपे त्रिभुवन. । शक्ति कृतांतासमान, । शरीरें दीर्घ ऐसीं. ॥ १ ॥ तिघे रथारूढ जाले, । जैसे ग्रह निजमंडळीं मिरवले. । सरिसे असमाव्य चालिले । भार चतुरंगिणींचे. ॥ २ ॥ पदाति, अश्व, गज, रथ । रुधूनि चालती राजपंथ. । वीर दाखविती पुरुषार्थ । क्षणक्षणां गर्जोनि. ॥ ३ ॥ नदीपूरवत् धांवती फौजा, । खड्गें झेलिती, जैसिया विजा. । घायें आगळीं, तेणें दिग्गजां । भयकंपु सुटला. ॥ ४ ॥ लंकेचेनि उत्तर द्वारें । भार बाहेरि निगाले गजरें, । तंव अकस्मात कृष्ण विषधरें । मार्गु खंडिला. ॥ ५ ॥ काळसर्पें खंडिला पंथु । देखौनि वीरांचा भग्न मनोरथु । जाला, परि पुरुषार्थु । नसंडीत, रण पावले. ॥ ६ ॥ असभाव्य ल्तामृगसागर । तेथें मिळाला राक्षसवाहिनीपूर. । परस्परें हाकिती, महाघोर । संग्राम करिते जाले. ॥ ७ ॥ देखौनि परचमूचा याथा । कपिव्याघ्रीं केला उठावा । पाषाणपादपांचा सिरवा । साडिती वातवेगें. ॥ ८ ॥ भाले, त्रिशूळें, चक्रें, तोमर, । परिघें, पट्टीश, खड्गें, सुरिया, शर, । एहीं शस्त्रीं निशाचर । वानरां ताडिते जाले. ॥ ९ ॥ दोहीं दळींचे वीर मेगळे । गर्जत एकएकापरीस आगळे. । सर्वांचा भुजमंडळीं खेळे । वीरश्री परम आवेशें. ॥ १० ॥ वीर वीरासि धांवोनि निकट, । उसिना घायीं हाणिती धीट. । तृणापरीस हलुवट । जीवित मानिलें असे. ॥ ११ ॥ भिडतां येकयेकाचेनि प्रहारें । पडती छेदिलिया शरीरें; । अशुद्ध वाहे भूमी, सिंदूरें । जैशा डहुळल्या नदी. ॥ १२ ॥ ऐसें युद्ध होतां, प्लवगमीं । कांहीं एकीं जिंकिली रणभूमि. । राक्षस वीर वोसरले संग्रामीं, । वीर्य ढळौनि गेलें. ॥ १३ ॥ कपिवाहिनीचा चंड उठावा. । जैसा जळराशीचा हेलावा, । मग नैर्ऋत्याचा करावया कुढावा । मकराक्षु उठावला ॥ १४ ॥ आपुलें सैन्य घातलें मागें, । पुढें पावला पवनवेगें, । उन्मत्त वीरश्रियेचेनि रंगें । कपिदळमुखा आला. ॥ १५ ॥ हाकिते, टाकीत, गर्जेतु । क्रोधावेशें उचंबळतु । घनपटलावरि धावे चढवातु, ।

१. ब. मिरवले.

तैसा अमित्रांवरि आला. ॥ १६ ॥ चंड चाप वाइलें विक्रमें, । जें बांधाटिलें दृढ हेमें, । वरि रत्नें जडिलीं त्यांचीं रश्में। फांकती पृथ्वीवरि. ॥ १७ ॥ अमोघ शरगर्भ तुणी, । त्याची काढिली वेगळी गवसणी. । भिन्नवक्त्रांचे खणोखणीं । बाण भरिले असती. ॥ १८ ॥ जैसीं मुखामध्यें उत्तरें, । पुस्तकांचां पुटीं अक्षरें, । नाना तिर्यें रत्नेंचि मनोहरें । मांदुसेचां उदरीं; ॥ १९ ॥ ऐसे तुणीआंतौनि काढिले बाण, । हेमपुंख, सरळे, फदनीं तीक्ष्ण, । रणरंगीं धीर कपिऋक्षगण । त्यांवारि मोकलिले. ॥ २० ॥ अत्यंत धनुर्विद्येचें वैभव; । शरसुटी जैसा वर्षे माधव. । कौतुक पाहत होते देव । तेंहीं डोलविला माथा. ॥ २१ ॥ वानरकटकावरि धुंधाटा । भाली पडताती तिखटा; । तेणें वीरांचे पाणिपादं थटथटां । तुटौनि जाताति. ॥ २२ ॥ कितीएका कपींचीं शिरें तुटलीं, । कपित्थफळें जैसीं पृथ्वीवरि पडलीं; । नाना तिर्यें सहज लाखोली जाली । धरणीलक्षण लिंगासि. ॥ २३ ॥ अपूर्व मकराक्षाची शरसुटी ! । कैंची संख्या ! कोट्यानुकोटि. । बहुत संहारु जाला रणवटीं, । बहुत कपि पडले. ॥ २४ ॥ सिंदूरें घोळिले गिरिवर, । कां फुलले पलाश तरुवर, । तैसे घायीं तांबडे जाले वीर, । सर्वांगीं शोणित वाहे. ॥ २५ ॥ तुंबळलिया असृग्दाचिया नदी, । वीरप्रेतें पडलीं पदोपदीं, । कोल्हाळु माजला चंड शब्दीं, । कपिकाढावा काढिला. ॥ २६ ॥ मकराक्षु हाणी विक्राळु शूळ, शर; । साहों न शकती रणरंगधीर; । जयांचां पाणितळीं शैल थोर । भ्रमत, चक्रें जैसीं. ॥ २७ ॥ अत्यंत आरंभला शरमारु, । खोंचतसे कपिदळमारु, । ठिकाळला सर्वांगीं वीरें वीरु, । बहुतीं पृष्ठी दिधली. ॥ २८ ॥ ज्या वीरांची फुटतां चंड हांक । लागे काळाचां हृदयीं धडक, । ते जाले अत्यंत साशंक, । न रिगवे युद्धालागीं. ॥ २९ ॥ ऐसी मकराक्षाची करणी, । दिग्मंडळ भरलें बाणीं; । देखौनि काकुत्स्थ अंतःकरणीं । आश्चर्य मानिता जाला. ॥ ३० ॥ म्हणे, "भले वीर निशाचर. । एकएकाहूनि सामर्थ्य थोर. । येणें एकलेनि सर्व वानर । भग्नदर्प केले. ॥ ३१ ॥ अमोघ याचें शरसंधान, । निरवकाश जालें गगन. । हें आतां एकें शरें खंडेन" । म्हणौनि संकल्पु केला. ॥ ३२ ॥ तूणीआंतौनि ओढिला बाणु, । जैसा पाचारूं चालिला निजगुणु; । तेजोमुख, हेमपुंख, तीक्ष्णु, । चित्रांगु,

चंद्रार्धवदनु. ॥ ३३ ॥ झाडूनि टणत्कारिलें कोदंड, । तेणें घो घडपडिलें ब्रह्मांड. । नवां ठायीं पृथ्वी जाली, नवखड । तेथौनि बोलिजे ॥ ३४ ॥ धनुष्य सज्जिलें चंद्रार्धबाणें, । वामांग मांडिलें वज्रठाणें, आकर्ण वोढी वोढूनि सीतारमणें । शर सोडिला शरांतकु. ॥ ३५ निगाला बाणु गर्जतु अंबरीं, । परशरजाळखंडण आदरी; । जैसें संहारकाळीं सूर्यांवरि । काळचक्र भ्रमे. ॥ ३६ ॥ जैसी एकांगनक्र सुरी बहुतां कणिसांचें खंडण करी, । रामाचा शर तयापरी । मकराक्षाचे श तोडी. ॥ ३७ ॥ एकलेनि उष्णकिरणें । विध्वंसिजे बहुत उडुगणें; । प एकलेनि सुपर्णें । सर्प बहुत भक्षिजे; ॥ ३८ ॥ कां एकलेनि चंडवातें तोडिजे बहुतां जळधारांतें; । नातरि एकें रामनामें अमितें । पापें भस होतीं; ॥ ३९ ॥ कां एके ज्ञानाचेनि सारांशशब्दें । खडती बहुतें पाखाड पदें; । कां एकेंचि सिंहनादें । बहुत गजमद गळती; ॥ ४० ॥ तैसें नरोत्तमाचेनि एकें बाणें । मकराक्षाचे बाण तोडिले अर्धक्षणें; । याउपरि भास्करवंशभूषणें । शर घेतला दुसरा. ॥ ४१ ॥ बाणु धगधगीत, तेजःपुंज, । जैसी झळाळित कल्पांतवीज, । अग्निअस्त्रें मंडित सहज । सिद्ध होता पूर्वीं. ॥ ४२ ॥ मंत्रावृत्ति करूनि क्षणमात्रें । गुणीं बाण लाविला फुल्लारनेत्रें; । मग नयनें एके सूत्रें । लक्षिला मकराक्षु. ॥ ४३ ॥ कार्मुक ओढिलें लीला, । करकराटें दिशा हों पाहती गोळा; । महावीरां थागीं उदैला कटाळा, । कळीकाळकाळिज कांपिन्नलें. ॥ ४४ ॥ वामहस्तु मेढियासि पुढें जाला, । गुणेंसीं दक्षिण कर्ण लागला; । जैसा अंतरंगु मित्रु आला । एकांत करूं पैं. ॥ ४५ ॥ ऐसें भक्तजनभवभगें । संधान केलें वीरमार्गें. । बाणु सुटौनि मनोवेगें । गगनगर्भीं संचरला. ॥ ४६ ॥ कांचनपुंख धुधुवाटतु, । मुखौनि अग्निवृष्टि करितु, । मकराक्षा कंठीं अकस्मातु । बैसला प्राणहरणु. ॥ ४७ ॥ वैनतेय काद्रवेयाचा कंठनाळीं, । कां शक्रायुध बैसे हिमाचळीं, । नातरि शिवनेत्रानळु मंडळीं । मदनाचिये पडला; ॥ ४८ ॥ ऐसा रामबाणें तत्क्षणीं । मकराक्षें देह ठेविला धरणी, । करूनि स्वर्गांची पाउठणी । मोक्षपदाप्रति गेला. ॥ ४९ ॥ तुटला मकराक्षाचा संसार, । ऐसें देखौनि शोणिताक्ष, खर, । तेंहीं पाचारिला रघुवीर । परम आवेशें. ॥ ५० ॥ म्हणती, "राजपुत्रा, रणमंडळीं । धैर्य धरीं,

आले शर सांभाळीं; । हा काळपर्यंत अगळी । संग्रामठेय दाखविली. ॥ ५१ ॥ अरे, सर्वकाळ कैंचा जयो ? । एकादा येतो विपरीत समयो; । जैसा भ्रमत भ्रमत सूर्यो । राहोच्या मुखीं पडे." ॥ ५२ ॥ प्रत्युत्तर दिधलें पद्मनयनें. । म्हणे, "वरषीं बोलतां वचनें. । बहुत काळ दशाननें । त्रैलोक्य पीडिलें; ॥ ५३ ॥ आतां विनाशकाळु आला तुम्हां, । म्हणौनि लंकेसि येणें जालें आम्हां. । रावणललाटीं लिहौनि ठेला ब्रह्मा, । तें बळवंत ओडवलें." ॥ ५४ ॥ श्रीरामशब्दांतीं दोघीं जणीं । संधान केलें महुतीं वाणीं. । दिग्मंडळ भरल, तरणि । झांकोळौनि गेला. ॥ ५५ ॥ त्याचें बाणजाळ दशरथनंदनें । निमिषांत तोडिलें निजसंधानें, । जैसे घर्मोद्गमीं मृगपर्जन्यें । रेणु नाशातें पावती. ॥ ५६ ॥ उपरी अवनिजारमें । शरद्वय सोडिलें प्रसंगें; । वज्रें छेदिलीं गिरिशृंगें । ऐसे छेदिले दोघे. ॥ ५७ ॥ खरा, शोणिताक्षाचें अमित दळ, । तें फुटलें जैसें तडागजळ. । लंका प्रवेशले घायाळ, । रायासि वार्ता सांगती. ॥ ५८ ॥ मकराक्षाची युद्धरचना । सांगितली समूळ विवचना. । परिसौनि रावणाच्या मना । अत्यंत दुःख जालें. ॥ ५९ ॥ मग इंद्रजितासि तिये अवसरीं । लंकेशु युद्धाची आज्ञा करी. । म्हणे, "वीरचक्रचूडामणि, वैरी । नाशतीना तुजवांचूनि. ॥ ६० ॥ जे जाताति युद्ध करूं आवेशें, । तयांचीं पुरताति आयुष्यें. । सिंह बाधिजताति तृणपाशें, । ऐसा विपरीत काळु आला." ॥ ६१ ॥ ऐसा रावणु करुणावाणी । बोले, तंव उठिला रावणी. । म्हणे, "राया, न धरीं अंतकरणीं । चिंताळवलेशु. ॥ ६२ ॥ निर्वैरी हे वसुधरा । करीन आजि, नृपवरा; । हें वचन असत्य जरि, भास्करा । पश्चिमे उदयो घडे." ॥ ६३ ॥ ऐसें बोलौनि इंद्रजितु । युद्धा निगे प्रतापवंतु. । तो पुढील कथावृत्तांतु । अपूर्व वर्तैल. ॥ ६४ ॥ इति श्रीरामायण युद्धकांड । वाल्मीकिकृत पीयूषखंड । सेवा, हो; सुधारसें सवस चड, । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ६५ ॥

## प्रसंग अडतिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । युद्ध इंद्रजितु जाल प्रसंगें, । दळें चालली चतुरंगें, । घडघडायमान पुढें, मार्गें महाअसंभाव्यें. ॥ १ ॥ रणवाद्यें वाजलीं बहुसाळें । तेणें दिक्चक्र संपूर्ण जालें. । पुढें पवाडे पढत चालिले । थाट वेताळांचे. ॥ २ ॥ सुवर्णभद्राचा धांवे पूरु । तैसा चाले दळभारु. । पदातिवीरांचा आवेशु थोरु, । आकाशीं उड्डाणें घेती. ॥ ३ ॥ अद्भुत कटकाची उर्मी, । कंपायमान जाली भूमि. । रेणु उदेले, तेणें व्योमीं । भरण भरलें निबिड. ॥ ४ ॥ रत्नीं विराजित रत्नरथु, । वरि मिरवे शक्रारि समर्थु. । पश्चिमद्वारें क्रमित पंथु । रणमंडळ पावले. ॥ ५ ॥ राक्षसदळ जें होतें । तेणें परिवेष्टिलें आपणातें. । मध्यें अभिचारिक इंद्रजितें । होमकृत्य आरंभिलें. ॥ ६ ॥ वैदिकें मंत्रीं अग्नि समर्पिला.[१] । प्रथम कृष्ण पुरुषु वधिला, । नरमांसाचा ठेविला । राशि करीनि. ॥ ७ ॥ बिभीतकरातांजनकाष्ठें । होमार्थ आणिलीं वस्त्रें तांबडें, । प्रेतें करूनि एकवाटें । सिद्ध केलीं आहुतींसि. ॥ ८ ॥ आज्यें करूनि सिंचितें । अवदानें घातलीं इंद्रजितें. । उदेलें धूम्रभरितें । तेणें दिशा लोपलिया. ॥ ९ ॥ होमाची पूर्णाहुति जाली, । तंव रथु आणि कृत्या निगाली. । ते कृत्या घेऊनि मेघासनीं केली । वस्ती इंद्रजितें. ॥ १० ॥ प्रथमचि सामर्थ्य आगळें, । वरि कृत्येचेनि वळें । कपिसैन्य निजशरजाळें । पाडूं आरंभिलें. ॥ ११ ॥ पृथ्वीवरि नरवीर, वानर; । गगनींहूनि पडताति शर. । निवारण कैंचें ? थोर । कठीण आरंभिलें. ॥ १२ ॥ नमुचि प्रसवत शरांतें, । कीं काळदंडु प्रेरिजे कृतांतें, । नाना काळमेघु लोहधारांतें । सांडितु असे. ॥ १३ ॥ मला एकला राक्षस वीरु, । श्रेष्ठ, संधानी, वीर्यसागरु, । जयाची कपटविद्या ईश्वरु । तोही नेणे. ॥ १४ ॥ विद्याबळेंकरूनि । अंतरिक्ष राहिला गगनीं. । बाणवृष्टि करी तेथौनि । असंभाव्य एकला. ॥ १५ ॥ जवळिले कृत्येचें वैभव । जाणों शकतीना देव. । तियेच्या स्वरूपाची ठेव । बीभत्स बहुसाल. ॥ १६ ॥ कृष्णवर्ण देहो महाप्रचंड, । भिसभिशुळ कराळ तोंड, । चरण आणि भुजदंड । मर्यादे वेगळे. ॥ १७ ॥ पर्वतु

१. घ. वेदी करूनि अग्नि समर्पिला.

माथिल ऐसें पोट, । मुख पसरलें, दंत तिखट, । 'भक्षीन' म्हणौनि होंठ । अधोर्ध्व पसरिले. ॥ १८ ॥ अग्निकुंडवत् डोळे, । मुखांतु विजूवत् जिन्हा खेळे, । भूमी जटाभारु रुळे । त्रिशूळपाणि कृत्ये. ॥ १९ ॥ इंद्रजितु तिये संगें । वानरसेनेतें शरमार्गें । ढ्युंलावती काळवेगें । संहारितु आहे. ॥ २० ॥ अद्भुत रावणीची शरसुटी, । कपिदळ तुटलें भूतळवटीं. । निःशेषें रणदक्ष कोटि । महावीर पडले. ॥ २१ ॥ ऐसा देखोनि कठिण समयो । रघुनाथापासीं आला वायो. । म्हणे, "इंद्रजितु पावला जयो । कृत्याबळें. ॥ २२ ॥ वरूनि येतो शरसागरु, । घायीं पडला वीरें वीरु. । निश्चळ उभा रणरंगधीरु । कोणे गुणें अज्ञौनि? ॥ २३ ॥ इंद्रजिताची कृत्या मरे । तरिचि वाणवृष्टि निवारे. । आतां आंगिरास्त्र प्रयुजीं त्वरें; । तेणें नाशैल कृत्या." ॥ २४ ॥ ऐसें सांगितलें पवनें. । तें मानिलें रघुनदनें. । मग आंगिरास्त्रशरु गगनें । सोडिला सूर्यमुख. ॥ २५ ॥ बाणु आंगिरास्त्र निगाला, । जैसा शिवचक्षींचा अग्नि सुटला; । उर्ध्वपंथें गर्जतु गेला । द्वादश योजनें वरि. ॥ २६ ॥ इंद्रजितरथीं संधानकर्तीं । अचळ कृत्या बैसली होती, । तियेवरि अकस्मात् निगुती । बाणशक्ति पडली; ॥ २७ ॥ विजू भिंगिधियावरि आदळली, । कां वल्ली कुठारा वरपडी जाली, । नाना वज्रचडक विशाली । शैलशृंगावरि; ॥ २८ ॥ कां ज्ञानें अविद्या खंडिली, । कां विवेकें दुर्वासना भंगिली, । कां जागृतीनें नाशिली । दुष्ट स्वप्नावस्था. ॥ २९ ॥ ऐसियापरी आंगिरास्त्रें । कृत्या भस्म जाली क्षणमात्रें. । हें देखौनि दशग्रीवपुत्रें । भूतळीं येणें केलें. ॥ ३० ॥ मंगळाची माता धरणी । तियेसि भेटों इच्छी अंतःकरणीं, । वायुचक्रींहूनि ये, तैसा रावणी । भूतळीं उतरला. ॥ ३१ ॥ परम योद्धा, परम प्रतापी, । महावीरु, कृतांतरूपी. । धनुष्य वाऊनि पुनरपि । शर सोडिता जाला. ॥ ३२ ॥ इंद्रजितु आला रणमंडळा । ऐसें कपिवीरीं देखिलें डोळां; । मग करिते जाले एक वेळां । महामारातें. ॥ ३३ ॥ जो पवनाचा नंदनु, । जन्मकाळापासूनि वज्रतनु, । तो धाविन्नला शैल घेऊनु । इंद्रजितावरि. ॥ ३४ ॥ जो परम वैष्णवु, पवित्र सदा, । काळातें नाटोपे कदा, । तो बिभीषणु घेऊनि गदा । इंद्रजितावरि धांविन्नला. ॥ ३५ ॥ मैंदु परिघ घेऊनि चालिला; । सषेणु कुमुदकेसरींपुढें आला; । ऋषभु

तो धामिगला । शतघ्नी घेऊनि; ॥ ३६ ॥ द्विविदें चक्रातें प्रेरिलें; । गंधमादनें शक्तीतें सोडिलें; । जांबवतें विशाळ टाकिलें । गिरिशृंग एक ॥ ३७ ॥ अंगदें शिळा टाकिली; । नीळें तेजाळ सहस्त्रवली; । नळें लोह पट्टीशें प्रेरिली । परमानिर्शे; ॥ ३८ ॥ सुग्रीवें टाकिला वड शैल; । शरभें सोडिला तमाळु, । वाणनमीं सुमित्राबाळु । भिंदिता जाला; ॥ ३९ ॥ रामें भिंदिलें सातीं वाणीं, । ऐसा वेढिला इतुका जनीं, । ताडिला वीरु रावणी । रुद्रायेशें पैं, ॥ ४० ॥ परि इतुक्यांची शरवृष्टि । नाहीं इंद्रजिता-चिये दृष्टी, । शरसंधानें परिपाठीं । सर्वांचे घाये निवारिले. ॥ ४१ ॥ जैसा एकला क्षत्रायो । जीमूतकणातें करी क्षयो, । बहुतांचीं शस्त्रें लंकेशतनयो । तैसीं तोडिता जाला. ॥ ४२ ॥ कुशळ धनुर्विद्यानिपुण, । असाधारण लघुलाघव, । संधानकळा देव । जाणतीना बापुडे. ॥ ४३ ॥ निमिषार्धलवभागें । संधान केलें येणें वेगें. । शस्त्रें तोडिलीं शरमार्गें । परवीराचीं. ॥ ४४ ॥ पुढें इंद्रजितु एकला । कपीतें वाणीं भेदिता जाला. । कोण किती शरीं ताडिला, । ते संख्या ऐसी. ॥ ४५ ॥ गंधमादन अष्टादश वाणीं । मृतवत् पाडिला धरणी. । सेनेशु नीळु तत्क्षणीं । दाहीं शरीं साधिला. ॥ ४६ ॥ विश्वकर्मेयाचा सुतु, । जेणें जळार्णवीं बांधिला सेतु, । तो ताडिला अकस्मातु । नवीं वाणीं. ॥ ४७ ॥ फळ म्हणौनि जन्मकाळीं । जो झेंपावला रविमंडळीं, । तो हनुमंतु अतुर्बळी । सतशरीं भेदिला. ॥ ४८ ॥ जो सुरेशपौत्र बोलिजे । ज्याचिया वाग्विळासा कवि, गुरु लाजे, । प्रताप पाहोनिया झिजे । हृदय वळागळेयाचें, ॥ ४९ ॥ तो अंगदु नवीं वाणीं । लोळविला रणांगणीं. । मैंदासि पांचा शरीं धरणी । सैनविली साष्टांग. ॥ ५० ॥ रंभु, ऋषभु, पानकळोचनु, । शरभु, केसरी, सनादनु, । हेमकूट, दधिवदनु, । हे तीं तीं वाणीं विंधिले. ॥ ५१ ॥ फनसु, द्विविदु, कुमुदु, । जंबु, सुषेण वैद्यु, । यातें चौ चौ शरीं मेघनादु । हाणी निगुती. ॥ ५२ ॥ क्रंदनु, विनतु, प्रमथु, । गवाक्ष, गवय आणि गजु, । हे दों दों वाणीं रावणात्मजु । भेदूनि, गर्जिन्नला. ॥ ५३ ॥ पूर्वीं शिरग्रीवा नव्हती निळी, । नव्हता शशांकु नभमंडळीं, । विष्णुचरणाजवळी । लक्ष्मी नव्हती, ॥ ५४ ॥ बळी नव्हता पाताळीं, । अरुण नव्हता रविमंडळीं, । भागीरथी भूमंडळीं । वाहत नव्हती. ॥ ५५ ॥ तैंचा

ऋक्षराजु, वहुकाळी, । जांबुवंतु महाबळी, । शराष्टक त्याचा वक्षस्थळीं ।
अर्पिलें पैं. ॥ ५६ ॥ तरणितनयो वीर्यगर्वु, । जो वानरचक्राचा प्रभु, ।
तारेचा प्रेमवल्लभु, । किष्किंधेश्वरु, ॥ ५७ ॥ कपिश्रेष्ठ सुग्रीव नामें, ।
पुरुषार्थें रामसमागमें । लतामृग अष्टादश पद्में । घेऊनि आला, ॥ ५८ ॥
त्यावरि इंद्रजितें तीक्ष्ण । पंचाशतपंचकत्रय बाण । टाकिले, जेणें होय
चूर्ण । गर्वु अचळाचा ॥ ५९ ॥ ज्याचेया शरधारावर्ती । देह दिधले
वहुतीं नैर्ऋत्यीं, । प्रतापाचिया कीर्ती । दिशा दाटलिया, ॥ ६० ॥
अमोघ धनुर्विद्याधन, । तुळिता न्यून त्रिभुवन, । लक्ष्मण नामें रत्न ।
समित्रागर्भीचें, ॥ ॥ ६१ ॥ तयावरि दीर्घ तवकें । शक्रदर्पदहनें, नैर्ऋत्य-
नायकें । शर एकादशसप्तकें । टाकिले एके वेळे ॥ ६२ ॥ महत्त्वातीत,
चिदाकाश, । निर्गुण, निर्विकल्प, निराभास, । कोटि सूर्य आणि सुधांश ।
एके कळे तुळतीना, ॥ ६३ ॥ अखंडदंडायमान, परब्रह्म, । शब्दीं
नाचोजवे, निरुपम, । व्यापकत्वें जेसा व्योम । घटमठीं सहसा,
॥ ६४ ॥ श्रुतिसाराशमतें अद्वैत एक, । प्रसवलें प्रपंच लौकिक, ।
जैसें सूर्यापासाव मृगोदक । भूमीवरि भासतसे, ॥ ६५ ॥ मेघमंडळ
व्योमखोंपे । उदैजे आणि हारपे, । तैसा ज्यापासोनि दिसे, लोपे ।
प्रपंच सकळ, ॥ ६६ ॥ निर्गुण परी कार्यकारण, । अनिच्छ, लीलास्वरूप-
सगुण, । ऐसेया परमात्मयाची खूण । महामुक्त तो जाणे, ॥ ६७ ॥ ऐसा
तोचि सर्वात्मा रामु । लीलासगुण, सर्वोत्तमु, । अवतरला पूर्णकामु ।
शिवाचें हृदय. ॥ ६८ ॥ श्रुतिस्मृतींसि लागलें पिसें, । नव्हे सांगिजे,
बोलिजे तैसें, । अवतारचरित्र ऐसें । भूमंडळीं दाखविलें ॥ ६९ ॥ पाहता
स्वरूपाचेनि पडिपाडें । अनंगासि लावण्य थोडें, । ज्याचे नामगानें साकडें ।
निरसे भवार्णवींचें, ॥ ७० ॥ ऐसा नरोत्तमु, भुवनसुंदरु, । दाशरथी रामु
रणगंभीरु, । तयावरि शत शरु । टाकिता जाला ॥ ७१ ॥ ऐसें परम
प्रतापें इंद्रजितें । भग्नदर्प केले परवीरांत । महा आश्चर्य! एकलेनि वहु-
तांतें । पराभविलें कैसें ? ॥ ७२ ॥ जैसें एकलेनि मीनकेतें । जर्जर केलें
त्रैलोक्यातें, । तैसें एकलेनि इंद्रजितें । कपिचक्र भग्न केलें. ॥ ७३ ॥
तेजोराशि चंद्र, तरणि । यात राहो वैरें ग्रहणें आणी, । तैसा रामलक्ष्म-
णांसि रावणी । मोहो पावनूनि ठेला ॥ ७४ ॥ निगाला अंधकार सवळें ।

तो थाविनला । शतघ्नी वेऊनि; ॥ ३६ ॥ द्विविदें चक्रातें प्रेरिलें, । गंधमादनें शक्तीतें सोडिलें; । जांबवंतें विशाळ टाकिलें । गिरिशृंग एक. ॥ ३७ ॥ अंगदें शिळा टाकिली; । नीळें तेजाळ खड्गयष्टी; । नळें लोहपट्टीशें प्रेरिलीं । परमाविर्दो; ॥ ३८ ॥ सुग्रीवें टाकिला चंड शैलु; । रामें तोडिला तमालु; । बाणत्रयीं सुमित्रावाळु । विंधिता जाला; ॥ ३९ ॥ रामें विंधिलें सातीं बाणीं, । ऐसा वेढिला इतुका जनीं, । ताडिला वीर रावणीं । रुद्रावेशें पैं; ॥ ४० ॥ परि इतुकेयाची शरवृष्टि । नाहीं इंद्रजिताचिये दृष्टी, । शरसंधानें परिपाटीं । सर्वांचे घाये निवारिले. ॥ ४१ ॥ जैसा एकला क्षत्रनायो । जीमूतकणातें करी क्षयो, । बहुतांचीं शस्त्रें लंकेशतनयो । तैसीं तोडिता जाला. ॥ ४२ ॥ कुशल धनुर्विद्यानिमग्न, । असाधारण लघुलाघव, । नयानकुटा देव । जाणतीना बापुडे. ॥ ४३ ॥ निमिषार्धलक्षभागें । मवान केलें येणें वेगें. । शस्त्रें तोडिलीं शरमार्गीं । परवीराचीं. ॥ ४४ ॥ पुढें इंद्रजितु एकला । कर्पातें बाणीं भेदिता जाला. । कोण किती शरीं ताडिला, । ते सख्या ऐसी. ॥ ४५ ॥ गंधमादन अष्टादश बाणीं । मृतवत् पाडिला धरणी. । सेनेशु नीळु तत्क्षणीं । दाही शरीं साधिला. ॥ ४६ ॥ विश्वकर्मियाचा सुतु, । जेणें जळार्णवीं बांधिला सेतु, । तो ताडिला अकस्मातु । नवीं बाणीं. ॥ ४७ ॥ फळ म्हणौनि जन्मकाळीं । जो झेंपावला रविमंडळीं, । तो हनुमंतु अतुर्बळी । सतशरीं विंधिला. ॥ ४८ ॥ जो सुरेशापौतु वोटिजे । ज्याचिया वाग्विलासा कवि, गुरु लाजे, । प्रताप पाहोनिया क्षिजे । हृदय वळागळेयाचें, ॥ ४९ ॥ तो अंगदु नवीं बाणीं । टोळविला रणांगणीं. । मंदार्सि पांचा शरीं धरणीं । पैवविलें साथम. ॥ ५० ॥ रंभु, ऋषभु, पानफळोचनु, । शरभु, केसरी, सनादनु, । हेमकूट, दधिवदनु, । हे तीं तीं बाणीं विंधिले. ॥ ५१ ॥ पनसु, द्विविदु, कुमुदु, । जंबु, सुषेण वैद्यु, । यातें चौं चौं शरीं मेघनादु । हाणी निगुती. ॥ ५२ ॥ अंगदनु, विनतु, प्रमथु, । गवाक्ष, गवय आणि गवु, । हे दों दों बाणीं रावणात्मजु । भेदूनि, गर्जिनला. ॥ ५३ ॥ तीं विरमांना नव्हती निळी, । नव्हता शशांकु नभमंडळीं, । विष्णुचरणा-

उठविला निद्रासिंधु । करावया शत्रुबधु । समरंगणीं. ॥ २३ ॥ ज्याचेनि विश्व साशंक, । वर्ते वैश्रवणाचा हृदयीं धडक, । निद्रेनें माडिले इंद्रादिक । निमिषही न मिळे, ॥ २४ ॥ तो कुंभकर्णु वीर्यनिधि, । असमान्य क्रोधाचा उदधि, । आमजयाचें दान युद्धीं । दाशरथीसि दिधलें. ॥ २५ ॥ साटिलें निरुपम संग्रामा, । त्यजिली धीरश्री, धरिली क्षमा, । उदान न पुसता आम्हां । मुक्ति भोगावया गेला. ॥ २६ ॥ गतबंधूचें दुःख तुळिता । पर्वत उणे जाले, इंद्रजिता. । हूरा कवीं विष, तैसी चिंता । तीव्र माझा हृदयीं. ॥ २७ ॥ त्या कुंभकर्णाचा मागें चौथे कुमर, । शत्रुमारि, तुझे सहोदरु, । ज्यांचिया प्रतापाचे कर । पोळिती सूर्यातें, ॥ २८ ॥ त्रिशिरेंनि सर्प पाताळीं दडपिले, । देवांतक, देव स्थानभ्रष्ट केले, । नरांतकें निर्दाळिले । नरराजे पृथ्वीचे. ॥ २९ ॥ काय वर्णू अतिकायाचें[१] । तें रत्न बळियाचें मुकुटींचें, । महिमान तरि शरीराचें । मेरु ऐसें स्थूळपणें. ॥ ३० ॥ महापार्श्व, महोदर । शस्त्रविद्येचे दोन्ही सागर, । सरिसे चौघे कुमर, । ताही संग्रामा गेले. ॥ ३१ ॥ समागमें दळें अगळें । शस्त्रमंडित, रथतुरंगें, । ते पुनरपि न येतांचि, रंगें । राताले वीरश्रियेचेनि. ॥ ३२ ॥ पाहें कैसें, रणसागरीं । वानरलक्षणजळचरीं । बहुताळ आमिषाचियापरी । राक्षसकुळ ग्रासिलें. ॥ ३३ ॥ घोर तो रणमहोदधि, । तेथील, शत्रुमारि, तूंचि पारधी. । संधानकाठिया टाकूनि वधीं । रिपुमत्स्यातें. ॥ ३४ ॥ गवलक्षण बाणमाळीं । अमित्राचा कर्रीं धाटी, । उदरें विदारूनि, कुळवट्टी । काढीं आपुलीं ॥ ३५ ॥ बा रे इंद्रजिता, तूं सागसी, । जे मी वधूनि आलों वैरियांसि, । परि पाह पा पुनरपि त्यांसि । सावधानता येतसे. ॥ ३६ ॥ जैसा पावकु लागे पर्वतीं । द्रुमशाखा आहाळोनि पडती, । परि मुळिया गुप्त वाचती । पृथ्वीचा पोटीं ॥ ३७ ॥ पुढें जीवनाचेनि स्वभावें । आणि भूमीचेनि मार्दवें । वृक्ष मागुते शाखापटळें । पाल्हेजती कैसे ! ॥ ३८ ॥ रवि उडुगणाचें शोभायश । हरूनि किरणीं दाटी आकाश, । मागुते अस्तमानीं प्रकाश । झळकती नक्षत्रांचे. ॥ ३९ ॥ इंद्रजिता, तूं अतिप्रतापी, । निजमार्गीं खिळिसी नरकपि, । परि ते उठोनि पुनरपि । संग्राम करिताती. ॥ ४० ॥ आता एक वेळ ऐसें करीं, । आपुलीं भुवनांतक शरीं । अरि-

---

१. व. ज्याचेनि आम्ही निर्धास्त

चक्र नि शेष सहारीं, । जें न जीवे पुनरपि. ॥ ४१ ॥ पुना, तुजपाशीं प्रतापराहो । तेणे राम चंद्र पावावा मोहो, । मग नाशैल कलाकीर्तिसमूहो । पूर्णसग्रामा शेवटीं. ॥ ४२ ॥ रिपुरामचंद्राचे कर । ते हे जाण सकळ वानर, । चंदुचि ग्रासिला, पुढें येर । किरणें कैचीं, पुत्रा? ॥ ४३ ॥ अमरराजजिता, हेचि बुद्धि, । शस्त्रास्त्रीकरूनि मुख्य तो वधीं, । पुढें आपेआप अवघी । कपिदळाची पुरेल. ॥ ४४ ॥ हा, गा, मार्तंडाचे अस्तमानीं । रश्मासि रहानया ठार कैंचा गगनीं? । कुडीं विझालिया वन्हि, । शिखासमूह कोठें दिसैल? ॥ ४५ ॥ जळासि शोषोनि घेतलें, । तेथें जळचरासि सहजचि कुठलें? । आत्मेनि कायेसि साडिलें, । तेथें इंद्रिया व्यापारु कोठें? ॥ ४६ ॥ कुठारें छेदिलिया तरुमुळिया, । का सूत्र तुटलेया पुतळिया । मग स्तभीं नाचतील तिया, । हें कैसें घडेल? ॥ ४७ ॥ म्हणोनि आपुलिया शरसुटी । मुख्य पहूडवीं भूपोटीं, । यानतरें दिग्गजा भेटी । कपिचक्र जाईल. ॥ ४८ ॥ माझे हृदयींचिये चितासमुद्रीं । भ्रमे दु खाचा मंदराद्रि. । आता शीघ्र शत्रु साधीं, सुखभद्रीं । बैसवीं मजलागीं" ॥ ४९ ॥ ऐसें बोले द्विदशकचक्षु, । राक्षसबीजाचा मूळवृक्षु. । त्यानतरें उत्तर दे दक्षु । इंद्रजितनामा. ॥ ५० ॥ मथूनि चौदा रत्नाची ठेरी । पितयापासून नेली देवीं, । तें दु ख ऐकूनि जाळधरु जेंवि । समुद्रासि बोले, ॥ ५१ ॥ क्रोधाची मूर्ति केवळु, । वीरभद्र शिवबाळु । दक्षा दडावया, प्रतापकल्लोळु, । हराप्रति बोले, ॥ ५२ ॥ तैसा तो इंद्रजितु । पितयाप्रति वीर्यरतु । बोले. म्हणे, "आजि सग्रामीं अतु । पुरैल वेरियाचा. ॥ ५३ ॥ मी आजि आपुला शरपथीं । गगना घालू शकें बुधीं. । अवनी क्षणमात्रें पालथी । करूं शक कूर्मासहित. ॥ ५४ ॥ माझिया भालीचें अग्र । पिष्ट करी पर्वत समग्र, । माझेनि स्मरणें सदा व्यग्र । कृतांताचें मानस, ॥ ५५ ॥ माझेनि भयें निरंतर । आदोळती सप्त सागर, । पवनु स्थिर न राहे, अवर । भ्रमे सर्वदा. ॥ ५६ ॥ माझें अद्भुत शरसधान । जाणौनि उचावलें गगन. । सोशक अष्टदिशा होऊन । दिग्गजांआड ठेलिया. ॥ ५७ ॥ उगवूनि मज भेणें अर्कें । निमिषात पाविजे इतुकें । चारि सहस्र चारि शतें अधिकें । योजनसख्या. ॥ ५८ ॥ चक्रीं पडली मज भेणें उदरें, । पळता होतसे गगन थोडें. । चद्र क्षयरोगी बापुडें । सदा उभयपक्षीं. ॥ ५९ ॥ राया,

; निःशेष संहारीं, । जें न जीवे पुनरपि. ॥ ४१ ॥ पुत्रा, तुजपाशीं पराहो । तेणें राम-चंद्र पावावा मोहो; । मग नाशील कलाकीर्तिसमूहो । संग्रामा शेवटीं. ॥ ४२ ॥ रिपुरामचंद्राचे कर । ते हे जाण सकळ नर; । चंद्रुचि ग्रासिला, पुढें येर । किरणें कैचीं, पुत्रा? ॥ ४३ ॥ मरराजजिता, हेचि बुद्धि; । शस्त्रास्त्रींकरूनि मुख्य तो वधीं; । पुढें वैभाप अवधी । कपिदळाची पुरेल. ॥ ४४ ॥ हां, गा, मार्तंडाचे अस्तनीं । रश्मींसि रहावया ठाव कैचा गगनीं? । कुडीं विझालिया वन्हि, । ज्वालासमूह कोठें दिसेल? ॥ ४५ ॥ जळासि शोषौनि घेतलें, । तेथें जलचरांसि सहजचि कुंठलें? । आत्मेनि कायेसि सांडिलें, । तेथ इंद्रियां व्यापारु कोठें? ॥ ४६ ॥ कुठारें छेदिलिया तरुमुळिया, । कीं सूत्र तुटलेया पुत्तळिया । मग स्तंभीं नाचतील तिया, । हें कैसें घडेल? ॥ ४७ ॥ म्हणौनि आपुलिया शरसुटी । मुख्य पहूडवीं भूपोटीं; । यानंतरें दिग्गजां भेटी । कपिचक्र जाईल. ॥ ४८ ॥ माझे हृदयींचिये चिंतासमुद्रीं । भ्रमे दुःखाचा मंदराद्रि. । आतां शीघ्र शत्रु सार्वीं, मुखमर्दी । बैसवीं मजलागीं." ॥ ४९ ॥ ऐसें बोले द्विदशकचक्षु, । राक्षसबीजाचा मूळवृक्षु. । त्यानंतरें उत्तर दे दक्षु । इंद्रजितनामा. ॥ ५० ॥ मंथूनि चौदा रत्नांची ठेवी । पितयापासून नेली देवीं, । तें दुःख ऐकूनि जालधर जेंवि । समुद्रासि बोले; ॥ ५१ ॥ क्रोधाची मूर्ति केवळु, । वीरभद्र शिवबाळु । दक्षा दंडावया, प्रतापकल्लोळु, । हरामति बोले, ॥ ५२ ॥ तैसा तो इंद्रजितु । पितयाप्रति वीर्यवंतु । बोले. म्हणे, " आजि संग्रामीं अंतु । पुरैल वैरियांचा. ॥ ५३ ॥ मी आजि आपुलां शरपंथीं । गगना घाडूं शकें बुंथी. । अवनी क्षणमात्रें पालथी । करूं शक कूर्मासहित. ॥ ५४ ॥ माझिया भालीचें अग्र । पिष्ट करी पर्वत समग्र; । माझेनि स्मरणें सदा व्यग्र । कृतांताचें मानस; ॥ ५५ ॥ माझेनि भयें निरंतर । आंदोळती सप्त सागर; । परंतु स्थिर न राहे, अंबर । भ्रमे सर्वदा. ॥ ५६ ॥ माझें अद्भुत शरसंधान । जाणौनि उंचावलें गगन. । साशंक अष्टदिशा होऊन । दिग्गजांआड रेटिया. ॥ ५७ ॥ उगवूनि मज भेणें अर्के । निमिषांत पाविजे इतुकें । चारि सहस्र चारि शतें अधिकें । योजनसंख्या. ॥ ५८ ॥ चक्रीं पडली मज भेणें हुदंडें, । पळतां होतसे गगन थोडें. । चंद्र क्षयरोगी बापुडें । सदा उभयपक्षीं. ॥ ५९ ॥ राया,

माझें वीर्य तुम्ही जाणा; । चंद्राचें वैभव रजनी आकणा; । तें रामलक्ष्मणा । पाडु किती विचारितां. ॥ ६० ॥ सप्तसागराच्या पोटीं । ज्या पुरुषाची न भिजती घोटीं, । तो पिटर फुटलियाचा काय बुडेल, जी. ? ॥ ६१ ॥ म्हणौनि रामाचा कानपडीं । उसळ माझी भ्रुकुटी ! । का जे अमरेशाच्या दोर्दंडीं । पुष्प मानिलें. ॥ ६२ ॥ माझेया बाणाचा घुघाटीं । अमरा मृत्यु पाहे भेटी. । बहुत वेळा क्षितीचिये तळवटीं । वीर्यक्षीण केले. ॥ ६३ तो मी तुझा पुत्र, सार्वभौमा, । मेघनादु इंद्रजितनामा. । आजिचा संग्रामीं सौमित्ररामा । साधीन सर्वेया. ॥ ६४ ॥ राक्षसपणें बिभीषणु गळा । जाणे माझिया कपटविद्या सकळा, । परी तोही कर्पूरपुतळा । अग्निपुरुषापुढें. ॥ ६५ ॥ पुढें त्या वानरांचिया कोडी । मारीन मशकपरवडी सुग्रीवा हनुमंताची थोडी । विचारणा असे. ॥ ६६ ॥ राया, तृतीय संग्रामु केला, । परि तो व्यर्थचि पै गेला, । वैरी मारून, नाहीं मारिला ऐसें जालें तुम्हाप्रति. ॥ ६७ ॥ निर्मूळ व्याधि आणि शत्रु । कीजे, हा वचनांचा मंत्रु. । आजि निर्वैरी करीन, तरि पुत्रु । तुझा मी राया. ॥ ६८ आता, क्षितिपति, सर्वज्ञा, । आजि अमित्र वधीन, प्रतिज्ञा. । शीघ्र मयावी आज्ञा । वदाग्या मस्तकीं. ॥ ६९ ॥ इंद्रजितु ऐसा पुरुषार्थे । बोलिला, तें परिसिलें लंकनाथें. । तिये समयीं सुतशब्दपर्थें । हृदयीं सुख सकमलें. ॥ ७० ॥ यानंतरें राक्षसराजें । पुत्रस्नेहाचेनि काजें । उपदेशिलें शक्तिवर्जे, । जियें दत्त ब्रह्मयाचें. ॥ ७१ ॥ लंकेशें दिधलें शुद्धतांबूल, उठिला इंद्रजित तात्काळ. । पिता नमूनि निगाला, मूढ । काळाचे सरिसे आहे. ॥ ७२ ॥ पुनरपि करसपुटें । पितया म्हणिजे पुत्रें ज्येष्टें. । आजि तुमचीं इंद्रियें संतुष्टें । करीन सर्वेया, स्वामी. ॥ ७३ ॥ समरगणीं मूतळवटीं । नरद्वय आणि कपिकोटि । आजि नमरों, तरि हेचि भेटी । मज आणि तुम्हासि." ॥ ७४ ॥ ऐसें बोलौनि चडवेगें, । सरिसीं दळें चतुरंगें, । निगाला स्यारूड सवेगें । खचौं पाहती रणतुरीं. ॥ ७५ ॥ जेथें असे होमशाळास्थळ, । अतिघोर, अतिविशाळ, । सेनकीं द्रव्यबाहुल्य सकळ । सिद्ध पूर्वीचि केलें, ॥ ७६ ॥ तेथ इंद्रजितु सहपरिवारीं । आला कुकर्मी प्रथम प्रहरीं; । होमु आरंभिला, तिये अवसरीं । कृष्ण काळवीट वधिला. ॥ ७७ ॥

त्याचें मांस आणि शोणित, । अजाअश्वींचें घृत । हवूनि अभिचारक मंत्रीं, तूत । आराध्य दैवत केलें. ॥ ७८ ॥ प्रसन्न करूनि वारुणी । संग्रामा गेला तो रावणी. । सारिसी चतुरंगिणी । ते ठेविली पश्चिम द्वारीं. ॥ ७९ ॥ अदृष्ट अकस्मात् उडाला, । द्वादश योजनें मेघाआड गेला; । तेथोनि वरुषता जाला । असंख्यात शरजाळ. ॥ ८० ॥ तीक्ष्ण चापखंडाची वृष्टि । पडतां, खचों लागली सृष्टि. । महावीर पाहती दृष्टी । अधोर्ध्व अष्टदिशा ॥ ८१ ॥ रुणझुणा वाजती घोष, । कर्कश करकराटे धनुष्य. । परि बाणांतें प्रसवलें आकाश, । ऐसें कपींतें वाटे. ॥ ८२ ॥ इंद्रजितु प्रत्यमेघनामा । कपटें वर्ततु दुरात्मा. । तपाचां संधानीं समुद्रसीमा । सांडिली तत्समयीं. ॥ ८३ ॥ सेनामुखींचे वानर । शर झेलिताति रणरंगधीर, । पिच्छांकित जैसे मयूर, । तैसे कपि दिसताति. ॥ ८४ ॥ अति वेधा वीर पावले. । रुधिर प्रवाहीं तुंबळलें. । एक एकाआड रिगों लागले । राक्षसाचेनि बाणभयें. ॥ ८५ ॥ तेथ उदैला कोल्हाळु, । मांडला वाटे प्रळयकाळु, । किती एक कपिदळमेळु । राघवा शरण गेला. ॥ ८६ ॥ मुख्य मुख्य वानर. । बळवंत, वीर्यसागर, । ते जाले अति भयातुर, । न्याहळिती दाही दिशा. ॥ ८७ ॥ सुग्रीव, अंगदु, जांबवंतु, । नळ, नीळ, फनस, हनुमंतु, । मैंदु, कुमुदु, वरुणसुतु । हेमकूटनामा, ॥ ८८ ॥ गवय, गवाक्ष, दधिमुख, । ऋषभु, शरभु केसरी, सुमुख, । गंधमादनु, दुर्मुख, । सुषेण धन्वंतरी, ॥ ८९ ॥ ऐसे हे मुख्य नायक पाहताति खोंचतसे कटक. । रघुनाथ तयांप्रति येक । वचन बोलता जाला. ॥ ९० ॥ म्हणे, "विक्रमसागर वीरहो, । बाणवृष्टी सेना पावली मोहो. । सधानकर्ता सांगा. त्याचा देहो । पिष्टप्राय करीन. ॥ ९१ ॥ आमुचिया कटकावरि । मेघु बाणला दिसे अंबरीं; । हा उडोनि विदारावया-उपरी । संधानी दिसैल आम्हां." ॥ ९२ ॥ ऐसें रघुराज बोलतक्षणीं । उड्डाण केलें सातै जणीं. । वायु उदैला त्यांचां करचरणीं, । तेणें मेघु विदारिला. ॥ ९३ ॥ ऐसें जाणौनि तो इंद्रजितु । उतरला निज कटकांतु; । सूर्याचा जैसा अधोमस्तु । पश्चिम समुद्रीं जाला. ॥ ९४ ॥ टळलें संग्रामकपट, । ऋक्ष, नर, कपि जाले संतुष्ट; । जैसा वणवा विझालिया आनंदें पुष्ट । मृग चौताळती. ॥ ९५ ॥ आतां इंद्रजितु पुनरपि ।

ग्रासिलीं राक्षसरत्नें । लंकामांडारींचीं. ॥ ३१ ॥ जंबुमाळी, विद्युज्जिह्वा, धूम्राक्ष, । वज्रदंष्ट्री, वज्रबाहु. यूपाक्ष, । अग्निहनु, अकंपनु, पूर्णभद्रु, । प्रधान महस्त, ॥ ३२ ॥ कुंभकर्ण, महापार्श्व, महोदर, । त्रिशिरा, अतिकाया वीर्यसागरु, । नरांतकु, देवांतकु, दिनकरु । ज्याचेनि प्रतापें लोपे, ॥ ३३ ॥ ऐसे नामाधिले नैर्ऋत्यगण, । अगणग लंकेशाचे प्राण; । येरांची संख्या करील कोण, । कोटींच्या कोटि, ॥ ३४ ॥ इतुके पडले समरंगणीं, । सर्वे समुद्रा ऐसी चतुरंगिणी; । त्या सर्वांस मूळ हे पापिणी । जनकदुहिता. ॥ ३५ ॥ अरे, हे सीता चिंतेचा अवतारु, । नाना विघ्नतरंगाचा सागरु, । दीर्घदुःखाचा आगरु । वनितारूपेंकरूनि. ॥ ३६ ॥ हे दरिद्रपीठींची देवता, । कीं निष्फळमनोरथाची लता, । कलहकल्लोळजलसरिता । वोळली लंकेवरि, ॥ ३७ ॥ कीं हे महद्भयाचें जन्मस्थान, । कीं हे महादुःखाचें भुवन, । कीं हे अनर्थाचें गहन, । विस्तीर्ण स्थळ, ॥ ३८ ॥ कीं हे संतापसिंहाची दरी, । नाना क्लेशकुंजराची ठाणांतरी, । कीं हे व्यसनव्याघ्राची जन्मकरी । जाली यथार्थ; ॥ ३९ ॥ ऐशी हे कृत्या, नव्हे मही, । सर्वथा पाहिजे वधिली." । ऐसें म्हणौनि घातली । मुष्टी कंठीं सीतेचिये. ॥ ४० ॥ इंद्रजित म्हणे हनुमंतासि, । "सीता मारिली, सांग जाय रामासि." । ऐसें बोलौनि निजदळेंसीं । निघौनि गेला. ॥ ४१ ॥ निमिषाचेनि चतुर्थांशमात्रें । ऐसें कपट दाखविलें कुशात्रें, । तें सत्य मानिलें पुत्रें । पवनाचेनि. ॥ ४२ ॥ "अहा कटकटा!" म्हणौनि । आंग टाकिलें मेदिनी, । जैसा चडवातें उन्मूळौनि । महाद्रुम पडला. ॥ ४३ ॥ अर्धरें वैसलें दोन्ही नेत्रीं, । विकळता वसे सर्व गात्रीं, । ऐसा घटिका एकु धरित्री । निचेष्टित राहिला. ॥ ४४ ॥ ऐसा अंजनीआत्मजु कपि, । धैर्यवीर्यसिंधु, शिवरूपी, । मूर्छेना निरसलिया पुनरपि । उठौनि उभा राहिला. ॥ ४५ ॥ तव दुःखाचा हृदयीं नाचे मेरु, । उदरीं हेलावे चिंतासागरु, । पुढें पावला शोकाचा पूर, । नयनीं नीर वाहे; ॥ ४६ ॥ ऐसा धीर तो हनुमंतु । सीतेचेनि गहिंवरें दाटतु, । आठवीत निगाला हृदयांतु । गद्गकथा जे जाली. ॥ ४७ ॥ पहा, हो, थोर जाला अनर्थु! । आतां काय करील रघुनाथु? । इचे सीतेकारणें समर्थु । वहुत शिणला. ॥ ४८ ॥ होईल जानकीचें स्वरूप । म्ह-

गौनि आलिंगिले पादप. । देखूनि श्वापदाचे कळप, ।. म्हणे, " सीते, सीते!" ॥ ४९ ॥ रामें, निजरूपाहूनि आगळें, । सुख घरिलें सीतेचेनि मेळें. । वृक्षांचीं भक्षूनि कंदमुळें । परमानंदें होता. ॥ ५० ॥ पुढें चांडाळें रावणें । विघडिलीं कैसीं दोघें जणें! । त्या काळापासूनि सीतकारणें । आत्मारामु श्रमतसे. ॥ ५१ ॥ पाहतां सुग्रीव मित्रु जोडला, । सप्तदिक्ताल-तालच्छेदु केला, । अकस्मात् विंधौनि पाडिला । वाळी किष्किंधेचा. ॥ ५२ ॥ प्रयत्नें केली सीताशुद्धि, । शिळीं बांधिला महोदधि, । असंख्य मारिले राक्षस युद्धीं । कुंभकर्णादिक. ॥ ५३ ॥ ऐसा प्रतापु रघुनाथाचा, । केला समूह कीर्तिचा; । परि व्यर्थ जाली आजि वाचा । वाल्मीकिऋषीची. ॥ ५४ ॥ मज पहिलेचि पडिली चुकी: । शुद्धीस आलों येकायेकीं, । तेंचि स्कंधीं वाहूनि जानकी । का म्यां नेली नाहीं? ॥ ५५ ॥ प्रथमचि मी नेतों सीता, । तरि संग्रामसंबंधु न पडता; । कोणासि इंद्रजितु मारिता । जानकी म्हणौनि? ॥ ५६ ॥ निधान हस्तप्राप्त जालें । परि म्यां मूर्खें सांडून दिधलें, । जैसें मूढें गौफणिलें । सांपडलें रत्न. ॥ ५७ ॥ जै मी आलों जानकियेचे शुद्धी, । शतयोजनें उडालों उदधि, । त्या स्वामिकार्याची सिद्धी । आजि निर्फळ जाली. ॥ ५८ ॥ इंद्रजिताचां बाणीं । असंख्य कपि पटले रणीं. । बिभीषण बोलिला केविलवाणी, । महत्कृत्य सांगितलें. ॥ ५९ ॥ तैं म्यां आणिला द्रोणागिरि, । जो होता क्षीराब्धितीरीं, । कोटि चारि योजनें दूरी । लंकेहून गणना. ॥ ६० ॥ त्या औषधींचेनि जीवविले कपि, । पर्वत नेऊन ठेविला पुनरपि; । तैं स्वामिकार्याचां पुष्पीं । मस्तक माझा तुरंबिला. ॥ ६१ ॥ ते कष्टकीर्ति आजिचा दिनीं । नाशौन पडली शून्य-स्थानीं. । ऐसेया मज अभाग्यातें अंजनी । कां, पां, प्रसवली? ॥ ६२ ॥ जानकी वधिली इंद्रजितें । म्हणौनि काय सांगों स्वामीतें! । कैसा पां, हो, कर्मे बळिरतें । महा अनर्थु केला!! ॥ ६३ ॥ शुद्धीहूनि आलों तैं रघुराजा । सांगितलें 'क्षेमें जनकात्मजा;' । तोचि मी आजि कवणे वोजा । हा वृत्तांत सांगों? ॥ ६४ ॥ जैसें जेणें अमृत पाजिलें, । तेणेंचि विष वांटून दिधलें; । का जेणें पुरीं बुडतां काढिलें, ।[1] तोचि वधा प्रवर्तला; ॥ ६५ ॥ कां जेणें प्रीति लाविली गोमटी, । तेणेंचि शस्त्र घातलें कंठीं; ।

---

१. क. पोटीं.

कां जेणें गिरि वेंघविला, शेवटीं । तेणेंचि शिखरीहूनि लोटेल; ॥ ६६ ॥ तैसा आजि सीतेचा वधु । रघुनाथास सांगों दुःखसिंधु ! । कैसा पां घडला संबंधु । दीर्घकर्मोत्सव ! ॥ ६७ ॥ ऐसा वीर हनुमंतु । सचित गाहिंवरें हृदयाआंतु. । म्हणे, "आतां जो जाला वृत्तांतु । तो मध्यें राखों नये." ॥ ६८ ॥ ऐसें विचारित, तिये काळीं । गेला रघुनाथाजवळि. । कळा कैंचीं मुखकमळीं ? । अत्यंत हर्षमद. ॥ ६९ ॥ मग बोलिला अधोमुखें. । म्हणे, "इंद्रजितें वधिलें सीतेतारिखें." । ऐसें आईकौनि दुःखें । काकुत्स्थ उचंबळला. ॥ ७० ॥ ते वेळीं सर्वां वीरांसमीप । आळ्वूनि सीतेचे गुण, रूप, । करिता जाला विलाप, । तें वदवेना कोणासि. ॥ ७१ ॥ शोकसमुद्रीं सीतारमणें । प्रियावियोगें केलें तपणें; । ऐसें जाणौनि लक्ष्मणें । परमार्थु प्रकटिला. ॥ ७२ ॥ म्हणे, "भरताग्रजा, चापपाणि, । तूं चतुरचक्रचूडामणि. । विवेकखड्गें खंडणी । करीं मिथ्यामायेची. ॥ ७३ ॥ परमार्थाचेनि वैभवें । संसारदुःख हें सांडावें; । कोणाकारणें कवणी न व्हावें । शोकदुःखासि पात्र. ॥ ७४ ॥ रघुराया, इये मृत्युलोकीं । जन्मौनि, जाइजे सकाळिकीं; । तरी विचारितां, ते जानकी । निश्चावेगळी काय ? ॥ ७५ ॥ नरवेडुर्या, पूर्वज आपुले । सूर्यवंशी बहुत जाले, । ते सकळही कोठें गेले । दशरथापर्यंतनि ? ॥ ७६ ॥ म्हणौनि, जी, ये ससारीं । जन्मला जितुका देहधारी, । तो नाशु पविल निर्धारीं, । सशये नाहीं. ॥ ७७ ॥ म्हणौनि जनकादि जन । सुखदुःखीं सदा समान; । तैसेंचि करैं, जी, आत्ममन । हृदयामाजी आतां. ॥ ७८ ॥ दाक्षायणीनें देह सांडिलें । तेव्हां चंद्रमौळीनें काय केलें ? । दुःख नमनूनि जन्मविलें । वीरभद्रासि. ॥ ७९ ॥ तेणें आज्ञा मागौनि विरूपाक्षा, । जाउनि क्षपि देखतां दक्षा । अत्यंत लाविली शिक्षा, । वस्तमुख पुढें जाला. ॥ ८० ॥ मग तप करी शूळपाणि, । महातपियां मस्तकमणि. । पुढें त्यालागीं दाक्षायणी । हिमाद्रीची कन्या जाली. ॥ ८१ ॥ पार्वती पर्वतनंदिनी । जाली शिवाची पत्नी; । हें कथाचरित्र त्रिभुवनीं । विश्व गात असे ॥ ८२ ॥ परिस, अग्रजा, याचिपरी । रावणु मारीन सहपरिवारीं. । लंकेचा राज्याधिकारी । बिभीषण करीन. ॥ ८३ ॥ देवां पाठवीन अमरावतिये. । सोडवीन वंदींचे राये. । किष्किंधेशु स्वस्थानीं जाय, । हेंही करीन." ॥ ८४ ॥

तुम्ही धैर्य धरा, जी, पोटीं. । भरतासि द्यावी भेटी. । पुढें जानकीचे ल-ल्लाटीं । तूंचि भर्तार. ॥ ८५ ॥ गिरिजा पावली शिवातें, । तैसीच सीता पावेल तुमतें. । हा सर्वथा माझेनि मतें । सकल्प सूचिला, जी." ॥ ८६ ॥ ऐसें सांत्वन करी लक्ष्मणु, । तेणें निवांत राहिला सीतारमणु. । तो साक्षात् नारायणु; । त्यासि सांगील कवण ? ॥ ८७ ॥ सूर्यापुढें धरिली दिवटी, । अमृतासि मेधु वाढिला ताटीं, । क्षीरसमुद्रासि दोनि मुष्टि । क्षिप्रा समर्पिली, ॥ ८८ ॥ कां मेघासि उदकाचा चूळु, । इंद्रासि कर्पूराचा गोळु, । मलयानिलासि अंचळु । घातला जैसा, ॥ ८९ ॥ कां मेरूसि वाहिलें कनकपुष्प, । पूगीफल ठेविलें कल्पवृक्षासमीप, । मलयाचलासि धूप । दाखविला किंचित्, ॥ ९० ॥ सौमित्रें रामासि तयापरी । संबोधिलें विवेकउत्तरीं; । तो चराचरसूत्रधारी, । आदिपुरुष. ॥ ९१ ॥ रामु पूर्णानंदमूर्ति. । शिव गातसे जयाची कीर्ति, । तो पडिला चिंतावर्ती । कां, पां, ऐसें म्हणाल ? ॥ ९२ ॥ कृत्रिम सीतेचा प्रवादु । सत्य मानूनि, करी खेदु; । महाअज्ञानपणाचा छंदु । किमर्थ रघूत्तमासि ? ॥ ९३ ॥ ऐसें म्हणतील कवणी । तरि उत्तर दे कवीची वाणी. । म्हणे, "मनुष्यदेहाची सपादणी । केलीचि पाहिजे. ॥ ९४ ॥ वाल्मीकींची भविष्यकथा । ते सत्य करणें रघुनाथा, । म्हणौनि श्रवणेंकरूनि श्लोकार्था । विकल्प न धरिजे. ॥ ९५ ॥ रावणें हरण केलें सीतेचें, । हें वाक्य काय होय साचें ? । इंद्रजितें वधिलें हेंही कैंचें । घडों शकेल ? ॥ ९६ ॥ जेथें ठावोचि नाहीं श्रामा, । तेथें कैंची असेल सीमा ? । वेगळिक नाहीं सीते रामा, । तरि वियोगदुःख कोठें ? ॥ ९७ ॥ असो ऐसें. तियेच क्षणीं । आला बिभीषणु गदापाणि. । तो बोलिला गंभीरवाणी, । "जानकी क्षेमें असे." ॥ ९८ ॥ रघुपति, आईकौनि हे वार्ता, । म्यां अशोकवना पाठविलें दूतां. । 'क्षेमें तेथें आहे तुमची कांता' । म्हणौनि सांगों आले. ॥ ९९ ॥ कपटविद्या इंद्रजितें केली, । कृत्रिम सीता निर्मिली, । ते हनुमतासि सत्यचि वाटली, । हा निष्कपटु म्हणौनि. ॥ १०० ॥ आइका, दर्भाचा पुतळा । काय प्राशन करील अग्निज्वाळा ? । लवणाचें खड्ग गंगाजळा । भागदप करील कैसें ? ॥ १ ॥ अहो, कल्पांतविद्युल्लता । कैंवि येईल पतंगाचे हाता ?-।

१. घ व क. दुग्ध वाहिलें.

॥ १२ ॥ "जिंक, जाईं, तो इंद्रजितु, । भेटें पुनरपि जयवंतु," । म्हणौनि मस्तकीं वरदहस्तु । ठेविला रघुवीरें. ॥ १३ ॥ मागतेरें पाचही वीर । सौमित्रासारिखे वेगवत्तर । युद्धा जाविया वीर्यसागर । शीघ्र उमे राहिले. ॥ १४ ॥ तारकासुरावरि जातियें काळीं । स्कंदें नमस्कारिला श्रयंबकमौळी, । का देवत्रयासि बद्धांजुळी । अविनाशु आज्ञा पुसे. ॥ १५ ॥ वृत्रासुर शक्रें वधिला, । तैं गुरूचा आज्ञाविशेषु घेतला, । सुपर्णे सापत्न महार केला । तैं विनता वंदिली. ॥ १६ ॥ युद्धसामग्री सरिसीं घेतली । चापतूणीं, खड्गपटी । गुणाव्यांसि प्रदक्षिणा केली । आणि शीघ्र निगाले ॥ १७ ॥ सरिसे पाचै वीर । निगाले वेगवत्तर । नरवैडुर्यासि नमस्कार । करूनि सव्यें घातलें. ॥ १८ ॥ जीवा वेष्टित पंचप्राणपुटा । आम्यावरि पंचभूत एकवटा, । का मनासरिसें धावे वाटा । ज्ञानेंद्रियपंचक ॥ १९ ॥ पाचही वीरोत्तम ऐसे । सरिस सौमित्रासरिसे. । आणिकही नदपूर जैसे । हरषें वानर चालिले. ॥ २० ॥ पवनपुत्रा स्कंधीं लक्ष्मणु, । पुढें चालिला देखणा विर्माणु, । जैसा मार्तंडरथीं अरुणु । कुशळ, दृष्टा. ॥ २१ ॥ लागले निकुंबळेचिया वाटा, । चालता वीरासि वेगु मोठा, । पुत्रासरिसा धावतो हिंपुटा । पवनु जाला मार्गी ॥ २२ ॥ जात जाता पुढें पुढें । स्थळ अत्यंत कठिण गाढें, । घोरमयें तें अरण्यें पुढें । सारखींचि दिसती. ॥ २३ ॥ पुळकाकी पादप गंभीर, । विषम भूमि ते कठोर, । पादासि परिश्रमु नाहीं, धीर । निविडता जाळी. ॥ २४ ॥ पर्वतांचे कडे तुटले, । अरनींचे दमाटे दाटले, । विषोदकाचे दुबळले । म्हद ठायीं ठायीं ॥ २५ ॥ माजी सिंहशार्दूलादिक । गर्जताति भयानक, । ते मातंगा हृदयीं लागे धडक, । पर्वतीं वज्र जैसें. ॥ २६ ॥ तेथें सऱ्या नाही महाव्याळा, । जळवोघें वाहती गरळा, । धुधुकार साहिता, ज्वाळा । लागतो गगनीं. ॥ २७ ॥ ऐसें तें अरण्य दुर्घट, । दशकद्वययोजनें सिंधुवेट, । तें प्रवेशावया वाट । भूमीवरौनि असेचिना. ॥ २८ ॥ घडघडे लवणाब्धि, लहरी । आदळती तिये स्थळांतरीं, । तपावरत विशाळ दरी । पर्वतापोटीं पडती.' ॥ २९ ॥ ऐसिये अद्भुत निकुंबळे । परवीर पावले दत्ताविळे; । पुढें रिघु नाहीं, मार्ग न कळे । बळियाढागीं. ॥ ३० ॥ मुख्य सौमित्रादिक वीर । वीर्यवंत, बुद्धिमागर । आंत जाले, जैसे तस्कर ।

ऐसे उभे राहिले. ॥ ३१ ॥ पुढें सुमित्रेचा आत्मजु । अवलोकी बिभीषणा राजू. । यानंतरें रावणानुजु । हितार्थ बोले. ॥ ३२ ॥ म्हणे, "गुणनिधीचिया बंधु, । पुढें आड हेळावतसे सिंधु. । निबिडवृक्षांचा संबंधु, । भूमिमार्ग नाहीं. ॥ ३३ ॥ अहो लक्ष्मणा, ऐसें करावें, । खेचरगतीतें अनुसरावें; । शीघ्र जाऊनि साधावें । दुश्चित्त या शत्रूसि." ॥ ३४ ॥ ऐसें बिभीषणु सांगों सरे, । तैसेचि उडाले त्वरें, । जैसें गरुडांचें कुळ सचरे । गगनगर्भामध्यें. ॥ ३५ ॥ अंतरिक्ष आकाशमार्गु । क्रमितां वीरांसि अति वेगु; । नेणों करितांति पाठिलागु । पळतेया मनाचा. ॥ ३६ ॥ निकुंबळेचें मध्यमंडळ, । इंद्रजिताचें कापट्यविद्यास्थळ । निमेषार्धामध्यें सकळ । वीर पावले विक्रमें. ॥ ३७ ॥ तंव तेथें दशमुखसुतें । विद्यावंतें इंद्रजितें । बळियें आपणाभवतें । सप्तपौळी दुर्ग रचिलें. ॥ ३८ ॥ महाप्रळयीं कृतांतें कोपें । क्रीडा धरिलीं बहुसाल रूपें; । तियें इंद्रजितें विक्रमाटोपें । आणौनि उभीं केलीं काये ? ॥ ३९ ॥ कीं सप्त सिंधु सहस्रांपरी । जाले घोररूपधारी; । ते इंद्रजितप्रतापें सप्त हारीं । वेष्टित उभे राहिले. ॥ ४० ॥ ऐसे निशाचर खड्गपाणि, । त्यांचे सप्त परिघ उभे धरणीं; । मध्यमडळीं तो रावणि । होम करितु आहे. ॥ ४१ ॥ भूमि साविली असे न्याससूत्रें, । कुंड केलें त्यासि तीन वक्रें, । माजी जातवेदु मूळ मंत्रें । आव्हानूनि धडकविला. ॥ ४२ ॥ अग्निकुंडा परिवेष्टितें । आणौनि बैसविलीं प्रेतें; । तेथें खिळणी केली दशदिशांतें । बहुतांपरी कैसी ? ॥ ४३ ॥ घटीपूर्ण भरिलें मद्य अशुद्ध, । सर्व होमद्रव्यें केलीं सिद्ध. । अवांचें आज्य, दुग्ध । तेणें कळसलीं कैसीं ? ॥ ४४ ॥ बिभीतकाच्या समिधा । जुडिका ठेविलिया सिद्धा. । अलंबपात्रें, लोहपात्रें बहुधा । प्रकारें ठेविलीं. ॥ ४५ ॥ कृष्ण पुरुषु कुंडाजवळि । बंधिला होमारंभकाळीं. । कृष्ण कुरंगें मांसाळीं । आणि वस्तें छेदिलीं. ॥ ४६ ॥ कस्तूरि, पुष्पें, रक्तांबरें । बहुवसें ठेविलीं आदरें. । गंधधूपदीपांचीं थोरें । पात्रें भरूनि ठेविलीं. ॥ ४७ ॥ पूर्वे पसरूनि पंचप्रेतें । त्यांवरि आसन घातलें इंद्रजितें. । ताम्र वस्त्र नेसला. स्नान शोणितें । करूनि, जटा सोडिलिया. ॥ ४८ ॥ इंद्रजिताचा मनोरथु । संकल्पूनि हाचि स्वार्थुः । "अश्वांसहित प्राप्त हो रथु," । हें वैश्वानराचें दत्त. ॥ ४९ ॥ तयावरि बैसौनियां मी । नरवानर वधीन

रणभूमी; । कदा काळींही संग्रामीं । मज कव्हणीं न जिंकावें " ॥ ५० ॥ ऐसें करूनि रावणनंदनें, । अग्निप्रीत्यर्थ बीजवचनें । टाकिता जाला अवदानें । स्वाहाशब्दें जपे. ॥ ५१ ॥ मेघनादाचें आराध्य दैवत । प्रत्यक्ष अवदानें झेलित. । स्वेच्छा होतसे तृप्त । पूर्णद्रव्येंकरूनि. ॥ ५२ ॥ मेदमांसघृतांच्या चढाहुति । अग्निमुखांतु पडती; । तेणें त्वरें जाती । ज्वाळा गगन ग्रासूं. ॥ ५३ ॥ धूम्र उठिला मर्यादेवेगळा । तो नांवरे दिग्मडळा; । धुंदरल्या मार्तंडकळा, । बिंब न दिसे पाहतां. ॥ ५४ ॥ प्रळयो आरंभला पक्षिजाती, । खेचरांची कुंठली गति. । सर्व भूतें धूम्रावर्तीं । असंत पीडा पावलीं. ॥ ५५ ॥ मेदमास हवितां रावणि, । दग्ध होतां सुटली कर्पटाणी; । . जीवमात्रांचां मुखीं, घ्राणीं । दुर्गंधी दाटली. ॥ ५६ ॥ सहस्रआहुतींची सख्या केली, । त्यांमध्यें नवशतें जालीं; । पुढें एक शतें असेति उरलीं । संपूर्ण फळाचीं. ॥ ५७ ॥ तृप्त होतां जातवेदानळु । तंव त्या मुखांतूनि हळू हळू । अश्वांसहित तेजकल्लोळु । रथु किती एक निगाला. ॥ ५८ ॥ प्रथम चत्वार अश्वांचे कर्ण । निगाले, मग मुखें सपूर्ण; । यानतरें अगें अग्निवर्ण । चरणार्ध पैं निगाले. ॥ ५९ ॥ अवदानें ग्रासिता हुताशा, । घोडेयांमागोंचि सरिसा । तेजाचा महाराशि तैसा । रथु प्रकटला. ॥ ६० ॥ चक्रमय चक्रें च्यारि । अर्धगुर्ते कुंडाभीतरीं; । साटा तो संपूर्ण वाहीरि । रथु निगाला असे. ॥ ६१ ॥ एक शत उरलिया आहुती । त्या अग्निमुखीं सकळा पडती, । तिये काळीं क्षिति । रथु घडघडैल. ॥ ६२ ॥ अयोनिसभव घोडे, । जैसे कांचनाचे हुडे; । त्यांतुल्य नाहीं बळियाडे । ब्रह्मांडभांडोदरीं. ॥ ६३ ॥ त्या अश्वोत्तमांचां घदनीं । चढ हिंसें उठलिया ध्वनी; । भूमिकपु जाला, स्वर्गमेदिनी । थरथरली बहुत्त. ॥ ६४ ॥ तंव लक्ष्मणबिभीषणादिक । परवीरोत्तम सकळिक । आलेयानंतरें तेथ कटक । राक्षसाचें असे. ॥ ६५ ॥ हिंसु आइकोनि अश्वाचा । बिभीषणु सौमित्राप्रति वदे वाचा । म्हणे, " बा रे, इंद्रजिताचा । पैं रथु निगाला. " ॥ ६६ ॥ लक्ष्मणु म्हणे बिभीषणातें, । " हें कैसेनि कळलें तुमतें ? " । येरु म्हणे, " अश्वहिंसातें । आइकिलें आतांचि." ॥ ६७ ॥ मारुतें बोले दाशरथि, । " नैर्ऋत्यचक्र शरपंथीं । प्रथम मारूं, मग तो रथी । एकट संहारूं. ॥ ६८ ॥ नाना जालेयावरि

देहीं । जीवासि वसावेया ठावो नाहीं,' । 'तैसें दळ मारिलिया, पाहीं, । होईल इंद्रजितासि. ॥ ६९ ॥ मग तो रथारूढ रावणि । उभा उघडा फोडीन बाणीं." । यानंतरें गदापाणि । त्याप्रति बोले. ॥ ७० ॥ राक्षसवाहिनीचें दुर्ग । सत पवेडी अति अभंग. । एकएका वीरांचां स्कंधीं खड्ग । वज्रतुल्य; पाहें. ॥ ७१ ॥ सैन्येसीं करितां संग्रामु । पूर्णाहुतीसि पावेल होमु. । पुढें इंद्रजितवधाचा नेमु । निर्फळ जाला, हो. ॥ ७२ ॥ संपूर्ण निगालेया रथु । मग सर्वथा आम्हां अनर्थु; । म्हणौनि प्रथम सेना मारूं, हा व्यर्थु । विचारु सांडावा. ॥ ७३ ॥ अर्धी हिंसनादु केला । परि रथु पूर्ण नाहीं निगाला. । पूर्ण निगे तंव विध्वंसिला । पाहिजे, सौमित्रा." ॥ ७४ ॥ ऐसें बोलिलें बिभीषणें, । तें सत्य मानिलें लक्ष्मणें. म्हणे, 'मला! तुझेनि मतें उणें । मत महाचतुरांचें." ॥ ७५ ॥ यानंतरें ऋक्षाधिपति । जांबुवंतु बोले व्युत्पत्ति. । माझें मत बळवंतीं । मानिलें पाहिजे. ॥ ७६ ॥ दृढ विचारु इये काळीं । होमा वेष्टित राक्षसफळी; । ते फोडूनि मारूं भूमंडळीं । मी आणि गंधमादनु. ॥ ७७ ॥ ऐकु हनुमंतु, ऋषभु दुसरा, । यांहीं आक्रमावें अंबरा. । प्रभंजनगतीहूनि त्वरा । केली पाहिजे दोघीं. ॥ ७८ ॥ शिळा सांडूनि प्रचंडा । चूर्ण करावें होमकुंडा. । अग्निसंभव त्या रथतुंडा । प्रहारें पीटावें. ॥ ७९ ॥ होम विध्वंसिलेयानंतरें । रथु ग्रासिजेल वैश्वानरें; । आराध्य दैवत अनादरें । अतिमानें क्षोभैल. ॥ ८० ॥ होमकर्तेयाचें सकळ । कर्तृत्व होईल निर्फळ, । जैसें वातें विध्वंसिलें मेघपटळ । वृष्टीतें न करी. ॥ ८१ ॥ विधवेचें परम यौवन । परि तें न प्रसवे संतान, । तैसें सर्वथा पाहें हवन । निर्फळ होईल. ॥ ८२ ॥ मग लक्ष्मणें क्षत्रधर्मे । शस्त्रास्त्रीं अति विक्रमें । इंद्रजितु वधावा नेमें । इये निकुंबळेचां ठायीं." ॥ ८३ ॥ ऐसें बोलिला वयोवृद्धु । जांबुवंतु बुद्धिसिंधु; । आणि पाहतां प्रसिद्धु । बळाचा मेरु. ॥ ८४ ॥ ऐसेया ऋक्षराजाचां बोला । बिभीषणु मानवला. । सौमित्रु गौरवी. म्हणे, "मला, मला, । राघवप्रीतिपात्रा ! ॥ ८५ ॥ याचिकारणें रघूत्तमें । । तुज दिधलें समागमें; । समयानुसार बुद्धिधर्मे । वागविसी आम्हांतें. ॥ ८६ ॥ अंधकारीं चालतयापासीं पावकु, । कां मकराल्यीं नौकाचालकु, । दुःखगिरि लंघी,

तयामि विवेकु । जवळिके निरंतर; ॥ ८७ ॥ तेसा तूं, गा, उपकारी । आम्हांजवळि इये अवसरीं. । येथ येतिये काळीं तव करीं । मज ममाग्रजें दिधलें. " ॥ ८८ ॥ लक्ष्मण बोले ऐसीं वचनें. । हर्षेला जांबुवंतु अतिमानें. । परसेनाचक्र अव्यवधानें । संहारूं लागला. ॥ ८९ ॥ दुसरा कपि गंधमादनु । परवीरांसि मारी दर्पहरणु, । तोही मिळाला जैसा पवनु । चंड कदळीवनांतु. ॥ ९० ॥ हे दोघे मुख्य नायक । आणिकही कपि किती एक । होमा वेष्टित नैर्ऋत्यकटक । ताडिते जाले शिळावृक्षीं. ॥ ९१ ॥ हनुमंतु आणि ऋषभु । ऊर्ध्व उडाले गर्जवीत नभु; । " जय यशस्वी अयोध्याप्रभु ! " । म्हणत होमावारी आले. ॥ ९२ ॥ करतलंपूर्णीच्या शिळा प्रचंडा । टाकूनि विध्वंसिलें होमकुंडा. । अग्निरथाचेया मकरतुंडा । प्रहार आदळले. ॥ ९३ ॥ शिळा धसत क्षणीं कुंडावारि । अग्नि पसरला चहूं पारीं । किती एक राक्षस तिये अवसरीं । दग्धदेही जाले. ॥ ९४ ॥ लंकेशाचेनि नंदनें । शीघ्र सांडिजती अवदानें. । शतें नव आणि वीस हुताशनें । आहुती घेतलिया. ॥ ९५ ॥ तंव विघ्न उदैलें तिये अवसरीं । चंडशिळा पडलिया होमावारि; । गगनेंचि टाकिले गिरि । वरूनियां जैसे. ॥ ९६ ॥ अग्निमुख विध्वंसिलें, । कुंड सहस्रचूर्ण जालें, । पात्रें पात्र भंगलें । होमद्रव्यांचें तेथें. ॥ ९७ ॥ विकासला अग्निमुखपंथु । तो देत होता अग्निसंभव रथु; । तंव तेथ उद्भवला अनर्थु । कर्मदोषास्तव. ॥ ९८ ॥ इंद्रजितु तिये अवसरीं । शिळावृष्टि देखे कुंडावारि. । पुढें अवदानें करींचा करीं । राहिली तिये काळीं. ॥ ९९ ॥ ऊर्ध्व पाहिलें इंद्रजितें । तंव ऋषभें केलें देहधर्मातें; । तें येऊनियां निगुतें । मस्तकीं धसलें. ॥ १०० ॥ थोर दुःख जालें इंद्रजिता. । म्हणे, " कटा रे कर्म बळवंता ! । आजि आमुचें वैभव अंता । आलें निभ्रांत. ॥ १ ॥ अति प्रयत्नें अति कष्ट । करूनि अग्नि केला संतुष्ट; । फळल्या पोर्टें अदृष्ट । फळोंचि नेदी. ॥ २ ॥ जैसें साधकें केलें अंजन, । डोळां दाउविलें निधान । प्राप्त होतां पडलें विघ्न, । विरसिया गिळिलें, ॥ ३ ॥ मुरनी जैसें मरलें तारुं । फिरलें अवघा सागरु, । तटासी लागतां मगरु । बुडवोनि गेला. ॥ ४ ॥ संपत्ति मेळवूनि देशांतरीं । आला निजग्रामाचा आगरीं, । तेथें अकस्मात तस्करीं । घाडणें घातलें. ॥ ५ ॥ राजकन्या प्रयत्नें पाहिली, । लग्नकाळीं अवदशा प्रतिष्ठिली, । तव अंगस्पर्श-

आड डखिलीं । नोवरीचि काळसर्पे. ॥ ६ ॥ मज जाली ऐसी परी । हवनक्रियासपूर्णअवसरीं । रथु निगत निगता बाहीरि । होमु निम्नसिला" ॥ ७ ॥ ऐसा अत्यत दु खितु । इंद्रजितु चिंताग्रस्तु । होमद्रव्य चर्चित हस्तु । झाडूनि उमा ठेला ॥ ८ ॥ मग उठत क्षणीं सेवकजनीं । दिव्याम्बरें दिधलीं आणौनि, । तियें शीघ्र परिधान करौनि । निजरथारूढ जाला. ॥ ९ ॥ तूणी, बाण, अनेक शस्त्रें । घेतलीं, जैशीं काळवक्त्रें, । महाशक्ति त्या बीजमत्रें । गुणिता जाला. ॥ ११० ॥ आता माडला सग्रामु अद्भुत । दोहीं दळींचे वीर उदित. । वीरश्रिया केले मत्त । कृतात आवेशें. ॥ ११ ॥ पचमसग्रामसबधु । करील इंद्रजितु वीर्यसिंधु, । परि येथौनि याचा वधु । लक्ष्मणु करेल. ॥ १२ ॥ इति श्रीयुद्धकांडकथासागरु । बोलिला वाल्मीकि ऋषीश्वरु, । त्या प्रमेयाचा आइका प्रकारु । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ११३ ॥

---

## प्रसंग. वेचाळिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानदाय नम । श्री गुरुकाशिराजाय नम । होमु हनुमतें विध्वसिला । इंद्रजितु युद्धासि प्रवर्तला । महाप्रळयीं रुद्र क्षोभला । इतुका आवेशु. ॥ १ ॥ ऋषभु आणि हनुमतु । वेगें आले निजदळातु. । यानतरें सुमित्रासुतु । सग्रामा पुढारला. ॥ २ ॥ पुढें इंद्रजिताचे अगळग । कटक अतिसार चतुरग, । जें विबुधा युद्धीं अभग, । भगलेंचि नाहीं. ॥ ३ ॥ एकला लक्षावरि उठी । ऐसे असख्यात वीरजेठी. । खड्ग धारू फाळाचा कठीं । ऐसा आवेशु सर्वांतें. ॥ ४ ॥ करिती भीम गर्जन, । तेणें फुटों पाहे गगन. । तेजोराशि जाला कळाहीन । ध्वनि पडों पाहे. ॥ ५ ॥ वीरा हस्तीं शस्त्रें अनेकें, । तेजें विजूहूनि अधिकें. । वामकरीं धरिलीं खेटकें । अपारें मस्तकावरि. ॥ ६ ॥ शक्ति सर्वांगीं अति आगळी, । म्हणौनि मिरविती ग्रीवावळि. । सिंदूरें ओतिलीं कपाळीं, । जटा मोकळिया माथा. ॥ ७ ॥ ऐसे पदाति वीर बळिपाढे. । तव राउत उठावले उदाळित घोडे; । तयांपुढें सौंदर्य थोडें । चित्रलिखिताचें. ॥ ८ ॥ लोहपजर अश्वां अगीं, । शर, शस्त्रें दोहीं भागीं, । युद्धाकारणें रणरंगीं । पावले

पुढें. ॥ ९ ॥ कुंजर महामदोन्मत्त, । जैसे चरणांचे पर्वत; । वीर भीमदेही महावंत । टेंपूनि पुढें पावले. ॥ १० ॥ राक्षस नव निशितां रथीं भूलतासि पाहूनि ग्रंथीं, । वाऊनि चापाग्रें शिरीं, रणपंथीं । वडवडाय मानें. ॥ ११ ॥ ऐसा राक्षसरणसागरु, । मर्यादेवेगळा दिसे पसरु, । अगस्तिवत वायुकुमरु । प्राशन करूं पावला. ॥ १२ ॥ नैर्ऋत्यांचे निबिड मारु । देखौनि उठावले कपिवीर. । शिळा, शिखरें, तरुवर । टाकिते जाले वळें. ॥ १३ ॥ विक्रमाचेनि आटोपें, । अति वैरपणाचेनि कोपें, । मिळौनि दोन्ही दळें, प्रतापें । युद्ध करितीं जालीं. ॥ १४ ॥ गर्जन करितीं भयानक. । घोपें टळिती. एकां एक. । खड्गमंडित ऊर्ध्व हस्तक । घे, घे म्हणौनि हाणिती. ॥ १५ ॥ साधक आंगें विक्रमें । मारिती निगुती वर्मे; । चैत्रीं पळसा आगीं कुसुमें । तैसे वीर रक्ताळले. ॥ १६ ॥ थडथडां हाणिती दसिने घायें; । थटथटां तुटती हातपायें; । बहुतेक वीर स्वामिकार्य । जाणौनि गतप्राण होती. ॥ १७ ॥ वीरश्रिया मातले शस्त्रपाणि । निर्भय गेरयेरां संघट्टणीं । युद्ध करितां समरंगणीं । अमित पडले वीर. ॥ १८ ॥ ऐसा संग्रामु जाला तुंबळु; । वीर करिताति कोल्हाळु; । तेथ असृक्ताचा खळाळु । वाहों लागला सैरा. ॥ १९ ॥ एक एकां हस्तें नामाथिले । समरंगणीं वीर पडले, । कल्पांतवातें उन्मूळले । महावृक्ष जैसे. ॥ २० ॥ राक्षसदळीं विक्रम बहुतु । देखौनि क्षोभला हनुमंतु, । ऋषभु आणि जांबुवंतु, । गंधमादनु चौथा. ॥ २१ ॥ रुद्रावेशी ते काळरूप । तयां चौघांचें बळ अमुप; । महाराक्षस भग्नदर्प । करूनि मारिले. ॥ २२ ॥ शतसहस्र एकएकें । राक्षस संहारिले रणकौतुकें. । चारि मेघ गर्जती तवकें । तैसे बुभुःकारती. ॥ २३ ॥ चौघांचां हातीं चारि वृक्ष । तुंबळ करिताति रण दक्ष. । तिये काळीं लक्षानुलक्ष । नैर्ऋत्यवीर पडले. ॥ २४ ॥ ऐसें देखौनि इंद्रजितु । क्रोधें खवळला जैसा कृतांतु. । सेनामुखीं येऊनि वीर्यवंतु । शर वरुषता जाला. ॥ २५ ॥ पिनाकतुल्य तें प्रचंड । भुजांवरि खेळे कोदंड. । बाण तयापासौनि उदंड । पडत परवीरांवरि. ॥ २६ ॥ इंद्रजितें चारि वेळां कटक । मारिलें, तें देखिलें कौतुक. । अवतारपुरुष रामादिक । नागपाशीं बांधिले. ॥ २७ ॥ जेणें आपुलेनि पुरुषार्थें । अमरपुरीतें घातलें पाल्थें, । देवें देव निःसत्व

ह्ले, तेथें। आणिकांचा कोण पाडु ? ॥ २८ ॥ तो इंद्रजितु रावणात्मजु। ग्मितु पैं क्रोधाचिया निजु. । वानर मारिता जाला वीरराजु। सोडूनि शरांचीं लक्षें. ॥ २९ ॥ सेनामुखींचे वानर। बाणीं खिळिले, जैसे मयूर; । हनुमंतादिक थोर थोर। आदिकरूनि. ॥ ३० ॥ विभांडूनि शाखामृगाचीं शतें। पुढें रथु घातला इंद्रजितें. । ऐसें देखौनि सुमित्रासुतें। कोदंड टणत्कारिलें. ॥ ३१ ॥ चापटणत्काराचा ध्वनी। तडकु फुटला गगनीं, । कपु जाला मेदिनी, । भूतासि प्रळयो वाटे. ॥ ३२ ॥ उडुगणीं सैनिलें भूमंडळ, । गगना गेलें सिंधुजळ, । पर्वता आंगीं विशाळ। दरकुटी पडलिया. ॥ ३३ ॥ निकुंबळेचीं श्वापदें, । सिंह, शार्दूळ, चतुष्पदे, । कोदंडटणत्कारनादें। गतप्राण पडलीं. ॥ ३४ ॥ ऐसें लक्ष्मणें कोदंड। टणत्कारूनि वाइलें प्रचंड. । बाण वोढिले, ज्यांवरि शतखंड। पवनु पडताचि होये. ॥ ३५ ॥ ऐसा सौमित्रु वज्रठाणीं। उदितु संग्रामा समरंगणीं; । तव जवळि विभीषणु गदापाणि। तेणें आड वातलें. ॥ ३६ ॥ विभीषणु युद्धा प्रवर्तला। तो सन्मुख इंद्रजितें देखिला. । मग म्हणे, " भला, गा, तू भला। राक्षसवंशामध्यें! ॥ ३७ ॥ एव्हडे कीर्तीचें तू पात्र। जे त्यजिलें आपुलें सगोत्र. । मनुष्यां मर्कटांसि केलें मैत्र। शरणागतु जालासि. ॥ ३८ ॥ कैसी सांडिली लौकिकी लाज ? । हें वरवें वाटे तुझें तुज; । परि 'कटा! कटा!!' पूर्वज। करिती स्वर्गी. ॥ ३९ ॥ प्रल्हादु दैत्यवंशीं जन्मला। तो पितयासि अलकु जाला; । परि तो तुजहूनि भला। कोटिगुणें वाटे ॥ ४० ॥ तेणें पितयाचाचि केला नाशु, । परि पुढें राखिला सकळ वंशु, । तुवां तरि केला ग्रासु। अवघेया कुळाचा. ॥ ४१ ॥ अरे, त्या रामाची किती बुद्धि ? । जे शिळीं बांधिला महोदधि, । राक्षस वधिले युद्धीं। देवाचें दर्पहरण, ॥ ४२ ॥ यासि तूचि कारण, अधमा, । बहुत भेद सांगितले तुवां रामा. । निकुंबळेसि आणिलें संग्रामा। तुवांचि लक्ष्मणातें. ॥ ४३ ॥ माझा होमु होतां सफळु। उरल्या बाहुतो अष्टदशकमेळु; । तव वैरियातें तू चांडाळु। घेऊनि आलासि. ॥ ४४ ॥ सावधान नव्हतों ऐसे काळीं मी, । तव आकाशींहूनि तुम्हीं। विघ्न पाडूनि, संग्रामीं। प्रवर्तलेति. ॥ ४५ ॥ तरि तुम्हां सकळांची किती प्राप्ति। जे संग्रामीं साधाल ऊर्ध्व हस्तीं ? । कदा

हें न घडे, जैसा गभस्ति । नक्षत्रांतें नाटोपे. ॥ ४६ ॥ आतां तुम्हीं माझेनि हस्तें । मरण पावाल, रे, समस्तें; । जैसीं महानवमीचीं बस्तें शाक्तिस्थानीं पडती. ॥ ४७ ॥ आजि मजशीं तूं प्रसंगें । युद्धा आलासि वीरश्रीरंगें. । लक्ष्मणासि घातलें मागें । परम पुरुषार्थें. ॥ ४८ ॥ आत मांडीं, रे, वज्रटाण. । साहें माझे देवांतक बाण. । निर्वाण देखौनि शरण सौमित्रा जावों नको. ॥ ४९ ॥ विभीषणा, तूं परम अन्यायी. । आजि इये रणभूमींचां ठायीं । तुझें कलेवर कूट करीन राई, । एथवांचि जाण रे." ॥ ५० ॥ ऐसें बोले तो इंद्रजितु । सवेंचि प्रत्युत्तर विभीषणु देतु, । जैसा मूर्खापुढें पंडितु । कांहीं एक अनुवादे. ॥ ५१ ॥ विभीषणु म्हणे "इंद्रजिता, । आइक, रे मूर्खा, मूढसुता. । आत्मघातकी तुझा पिता । ऐसें त्रिभुवन जाणे. ॥ ५२ ॥ कां, रे, रघुनाथाची कांता । लंकेमध्यें आणिली सीता ? । कां, रे, तुमचें हित बोलतां । आइकिलें नाहीं ? ॥ ५३ ॥ जेणांचि आपुला स्वार्थु । पाडिला वैरसंबंधु व्यर्थु. । काळाचा काळु रघुनाथु । हे कां नेणां पहिलेंचि ? ॥ ५४ ॥ कां अंगदाची छळणा केली ? । कां शिष्टाई नाहीं घेतली ? । कां सीता नाहीं दिधली । रामाची रामा आणी ? ॥ ५५ ॥ ऐश्वर्य भोगितां मातलेति । कां गर्वसमुद्रीं बुडालेति ? । आपुली संपत्ति, संतति । आटविली अवघी ? ॥ ५६ ॥ कां, रे, सभेमध्यें रावणें । मज मारिलें वामचरणें ? । कांसेया मरणा धरणें । बैसलेति बळें ? ॥ ५७ ॥ हे परपीडा कारिजे जेणें । तो दुःख पावैल लक्षगुणें; । जैसें पेरिलें, त्याहूनें । अत्याचें बहुसाल. ॥ ५८ ॥ सभामंडपीं प्रथम मी । बोलिलों, जे 'सीता नेदितां तुम्ही । रामबाणीं संग्रामीं । राक्षसकुळेंसीं आटाल.' ॥ ५९ ॥ ऐसें बोल्तां तिये समयीं, । इंद्रजिता, तुझां हृदयीं । अग्नि लागला, मग उपायीं । आलासि वहूत. ॥ ६० ॥ त्या शब्दशस्त्रांचे घाव । लागलेया विदारिलें तें सांगों काय ? । मग देवां दुर्लभ ज्याचे पाय । त्या रामासि शरण गेलों. ॥ ६१ ॥ तुझिया शब्दशस्त्रांचीं शल्यें । खुपती, रे, बहुसालें; । आतां निःशल्य करावयासि पाठविलें । लक्ष्मणासि निकुंभळे. ॥ ६२ ॥ आतां येथि काळीं, येथि संग्रामीं । तुझें शरीर सौमित्रि पाडैल रणभूमी, । तें कौतुक देखौनि मी । निःशल्य होईन. ॥ ६३ ॥ आतां व्यर्थ जीवाचा भ्रमु । धरूनि कारितोसि संग्रामु । लक्ष्मणु तुज वधेल, हा नेमु, । सत्य वाचा माझी.

॥ ६४ ॥ या लक्ष्मणाचां तीक्ष्णबाणीं । तुझें शिर तुटौनि पडैल धरणी; । करचरणांची खंडणी । द्रुमशाखांतुल्य होईल. ॥ ६५ ॥ तुझेया शोणिताचा सडा । होईल पृथ्वीवरि तांबडा । रणगिधें येऊनि तडतडां । मांस तुझें तोडिती. ॥ ६६ ॥ तुवां चारि वेळां युद्ध केलें, । आगळें अत्यंत दारुणिलें; । परि सर्वथा आयुष्य पुरलें । आजिचे युद्धीं आतांचि. ॥ ६७ ॥ तुम्हीं जिंतिलें त्रिभुवन । तैं तुम्हांसि काळु होता प्रसन्न. । आतां भाग्य जालें सर्वथा हीन । आणि तुमचें बळ. ॥ ६८ ॥ विपरीत काळु जैं आला । तैं अमृत घेतां राहो तुटला. । जळफेणें नमुचि संहारला, । ज्याचें वज्रें रोम न तुटे. ॥ ६९ ॥ शिरीं ठेवितां आपुलाचि कर । चूर्ण जाला भस्मासुर. । अगस्तीसि एव्हडा सागर । आचमना न पुरेचि. ॥ ७० ॥ मदनाचां बाणघायीं, । पाहें, त्रैलोक्य तुटलें ठायीं; । वक्र होतां शिवाची भंवयीं । तो भस्म जाला क्षणमात्रें. ॥ ७१ ॥ विपरीत काळगति कैशी ! । गृहींचे स्तंभीं उदेली विवशी. । दैत्याधिप हिरण्यकशिपूसि । फाडिलें तेणें. ॥ ७२ ॥ ज्याचिये बंदिशाळेभीतरीं । तुझा पिता होता बहुकाळवरि, । तो सहस्रार्जुन सपरिवारीं । ऋषिपुत्रें मारिला. ॥ ७३ ॥ म्हणौनि तुम्हां सर्वांतें सबळु । भक्षित आला, रे, विपरीतकाळु. । तो कैसा, पाहें पां समूळु । क्षयो आरंभला. ॥ ७४ ॥ कोणे युगीं कोणे अवसरीं । सांग पाषाण तरले सागरीं ? । कोणे काळीं पालेखाइरीं । लंका वेढिली होती ? ॥ ७५ ॥ म्हणौनि ऐसा एकु काळु आला. । जळराशि शिळीं बांधिला. । ऋक्षीं आणि वानरीं वातला । त्रिकूटाचळासि वेढा. ॥ ७६ ॥ राक्षस कृतांतरूपी, । देवदर्पहरण, प्रतापी, । त्यांसि समरंगणीं कपि । मारिताति विक्रमें. ॥ ७७ ॥ मनुष्य रामलक्ष्मणादिक । जाले तुम्हां मुख्यांचे मृत्युदायक. । मी तुमचा तुम्हां शत्रु, हें कौतुक । देव पाहताति. ॥ ७८ ॥ जैसें वृक्षाचें शाखाकाष्ठ । वृक्षापासौनि जालें स्थानभ्रष्ट; । तें लोहच्छिद्रीं रिगौनि करी पिष्ट । आपुलेया वंशाचें. ॥ ७९ ॥ तैसा तुमचाचि, रे, मी । आतां जालों वैरियांचा समागमी. । तुमच्या वधाकारणें संग्रामीं । साक्षेपें प्रवर्तलों. ॥ ८० ॥ ऐसें होआवेया कायें कारण ? । कां मी करितसें निर्वाण ? । कां विवेक सांडूनि माझें अंतःकरण । गोत्रवधा प्रवर्तलें ? ॥ ८१ ॥ तरि, इंद्रजिता, शब्द नाहीं आम्हां. । हा विपरीत काळाचा महिमा. । उत्कट पाप घडलें तुम्हां, ।

समान कैसे होती ? ॥ १२ ॥ परिमु आणि कवडा, । ऐरावत आणि माकोडा, । महापुरुष आणि वेडा । समान कैसे होती ? ॥ १३ ॥ मज राक्षसा आणि मनुष्या तुज । समरंगणीं सरी, हे चंड चोज ! । नागपाशीं पाडिलेति, ते लाज । कोठें ठेवूनि आलासि ? ॥ १४ ॥ दुसरां संग्रामीं माझां बाणीं । रामु आदिकरूनि द्रुमपाणि । समग्रही पडलेति रणांगणीं । निर्जीव प्रेतें होऊनि; ॥ १५ ॥ तैं. लक्ष्मणा, तुम्हां अंगीं । काय शक्ति नव्हती रणरंगीं ? । ठेविली होती पाताळीं कीं स्वर्गीं । ते आतां घेऊनि आलासि ? ॥ १६ ॥ प्रतिसग्रामीं माझा शरीं । शयन करा पृथ्वीवरि, । तेंचि तुम्ही निकुंबळेभीतरीं । युद्ध करूं आलेति. ॥ १७ ॥ तुम्हीं केला असेल निश्चयो, । जे मज इंद्रजितासीं युद्धीं जयो; । तरि तें सत्य करा, रे, सूर्यो । जंव अस्तमाना नवचे. ॥ १८ ॥ अरे, हा बिभीषणु पृथ्वीवरि । हतभाग्य बहुतापरी; । म्हणौनि राज्यावाहीरि । लंकेशें घातला. ॥ १९ ॥ ऐसेया तुम्ही भेटताचि श्रेष्ठ । प्रीतीनें दिधली प्रधानवट. । सभामंडळीक मर्कट । सुग्रीवादिक तुमचे. ॥ २० ॥ तृणपर्ण जे भक्षक । त्याचें मेळवूनि आणिलें कटक. । वैर लंकेशासीं हें कौतुक । थोर दिसत आहे. ॥ २१ ॥ अरे, ज्यांचा मृत्यु जे जे ठायीं । ते तेथें जाती आपुल्या पायीं; । तैसे तुम्ही मरणप्रातिसमयीं । बळें लंकेसि आलेति. ॥ २२ ॥ आता इये निकुंबळे-भीतरीं । आपलां तीक्ष्णधाराशरीं, । लक्ष्मणा, तुझीं करपदकाडोरीं । फेडीन गगनीं." ॥ २३ ॥ ऐसे शब्द बोलिले इंद्रजितें. । ते परिसौनि सुमित्रासुतें । प्रत्युत्तरें दिधलीं, जियें वज्रातें । भेदूं शकती. ॥ २४ ॥ लक्ष्मणु म्हणे, "रे रावणात्मजा, । उन्मत्ता, गतायुष्यगजा, । तुज सिंह-लक्षण सौमित्र वोजा । विदारावया मी आलों. ॥ २५ ॥ वरता वाऊनियां मदा । मजसीं प्रतापु बोलसी गाढा. । मी कोण, रे, ऐसें, मूढा, । तुज ज्ञान नाहीं. ॥ २६ ॥ पन्नास कोडी हे महीतळीं; । वरि असिजे अष्टकुळाचळीं, । आणि सप्त सिंधु, सप्त द्वीपावळि, । दिग्गज, दिशाष्टक, ॥ २७ ॥ वनस्पति अष्टादश भार, । शिळा, पाषाण, गिरिवर; । नांदती जीव, सचराचर । स्थूळ, दीर्घ प्राणि. ॥ २८ ॥ महाजड विशाळें । नदनदीचीं तुंबळ जळें; । इत्यादिकांही भारु मंडळें । धरिला आहे सर्व. ॥ २९ ॥ ऐसी वसुधरा डिसाळा । जात होती दंचूनि

पाताळा, । तिये शेषु सत्वागळा । आधारु जाला असे. ॥ ३० ॥ सहस्र-रेच्या फणामंडळें हारी. । पृथिवी धरिली एका फणामंडळावरि; । तेणें टबीजाचियापरी । अलक्ष्य करूनि ठेला. ॥ ३१ ॥ त्या शेषाचा पूर्णावतारु । तो मी जाण लक्ष्मण वीरु, । सुमित्रासुत, कुमरु । राया दशरथाचा. ॥ ३२ ॥ वैकुंठींचा पुरुषोत्तमु । चराचरबीजफळांकितद्रुमु, । तोचि पूर्णब्रह्म आत्मारामु । अवतरला सूर्यवंशीं. ॥ ३३ ॥ महिमा नेणे वेदपुरुषु, । वर्णू न शके जिव्हाळु शेषु, । शास्त्रां मथितांही सारांशु । निवडितां न कळेचि. ॥ ३४ ॥ नित्य रामाची गुणानुवादकथा । श्रवण करणें कैलासनाथा. । दुष्टां दुःख द्यावया सर्वथा । अवतारु धरिला. ॥ ३५ ॥ याचिकारणें मनुष्यावतारु । करावेया राक्षसांचा संहारु, । हें भविष्य वाल्मीकि ऋषीश्वरु । कथूनि राहिला आहे. ॥ ३६ ॥ जितुके हे ऋक्षवानर । तितुके देवांचे अवतार. । पृथक् सांगों तरि साचार । तूं मूर्ख जाणसीना. ॥ ३७ ॥ याची साक्षी रोकडी जाण, । जे समुद्रीं तारिले पाषाण, । लंका विध्वंसिली, निर्वाण । तुम्हां सर्वांसीं मांडिलें. ॥ ३८ ॥ तुम्हांसर्वांमध्यें कुळटिळकु । बिभीषणु पुण्यश्लोकु; । जैसा असुरांमाजी एकु । प्रल्हादु वैष्णवु जाला. ॥ ३९ ॥ तरि या बिभीषणाचां मुकुटीं । अति रघुनाथाची कृपादृष्टि. । रावणवधाचां शेवटीं । हा लंकेतें भोगील. ॥ ४० ॥ असो. हें बोलणें बहुत गाढें । तुजप्रति न पाहिजे एवढें, । जैसा महामूढापुढें । पंडिताचा वाग्विलासु. ॥ ४१ ॥ आतां मी लक्ष्मणु जाण । हरावेया आलों तुजे प्राण. । या बोलाचीं चिन्हें खुण । तूं बोळखौनि घेईं. ॥ ४२ ॥ पातकियां प्राणियां मरणकाळीं । संचरे आंगीं सन्निपातु बळी; । त्यास्तव वाचा मर्यादेवेगळी । अमंगळ वदे. ॥ ४३ ॥ तैसा तूं राक्षस पापरूप. । तुझा मृत्युकाळ आला समीप । म्हणौनि करितोसि वाग्जल्प । विविधां वचनीं. ॥ ४४ ॥ जो योटिलासि पुरुषार्थु । तो आतां सर्वथा व्यर्थु. । हां, रे, शंकरापुढें मन्मथु । जय पावला काय ? ॥ ४५ ॥ अरे, रजनीचेनि आधारें । सृष्टि ग्रासिजे अंधकारें; । पुढां उगवत क्षणीं दिनकरें, । पाहें, कैसें कांजे तें. ॥ ४६ ॥ तैसें तुवां कपटविद्येचेनि बळें । मेघांआडौनि भंगिलीं दळें. । त्याचें उसिनें मी शीघ्र काळें । घ्यावेयासि आलों असें. ॥ ४७ ॥ आतां होईं, रे रिपु, सावधान. । सोभाळीं, रे,

सुटलें संधान. । तुझें शिर पाहों जाईल गगन । माझेया बाणांसरिसें. ॥ ४८ ॥ जैसे ससाणे, गीध, घार । उडौनि भ्रमती अंबर; । तैसे तुझे चरण आणि कर । खेचरगति पावती. ॥ ४९ ॥ गिरिशृंगें विदारी कुलिशपाणि, । तैसीं गात्रें छेदीन बाणीं." । ऐसें लक्ष्मणु बोले; तंव रावणि । क्रोधाच्या उल्का सोडी. ॥ ५० ॥ मंदरा ओढितां वासुकीचें पोट । दडपतांचि वमी काळकूट; । तैसी इंद्रजिताची मुखवाट । क्रोधाग्निशिखा वमी. ॥ ५१ ॥ अधरोष्ठीं रोंविले दशन, । वाटारिले भींग, रक्त लोचन, । कोदंड वाऊनि केलें संधान । शतबाणीं देखा. ॥ ५२ ॥ ते बाण सुंसात दीर्घध्वनी । मनोवेगें भरले गगनीं. । आपणांवरि पडतां लोचनीं । लक्षिले लक्ष्मणें. ॥ ५३ ॥ कुशलु देखणा वीरराजु । दशमुखारीचा अनुजु. । मेढामंडित ऊर्ध्वबाहुभुजु । करूनि शर सोडिले. ॥ ५४ ॥ शत्रुशरसंख्या मार्गण । गगनपंथें अति तीक्ष्ण; । इंद्रजिताचां बाणांसि खंडण । करूनि पाडिलें. ॥ ५५ ॥ ऐसें देखौनि इंद्रजितें । केलें शरसंधान मागुतें. । तेंही वरि पडतां सुमित्रासुतें । तोडूनि पाडिलें भूमी. ॥ ५६ ॥ पुनरपि गर्जौनि रावणि । लक्ष्मणु विंधिला षोडशबाणीं. । तेही शर आदळत क्षणीं । तोडिले मानविये वीरें. ॥ ५७ ॥ गरुड जैसा चरणचवडी । सर्प धरूनि चंचुवे तोडी, । अंबरीं भ्रमतां भूमीं पाडी । निर्जीव खंडें; ॥ ५८ ॥ तैसा दशरथि धनुर्वाडा । शक्रजिता शरसंधानाचा सडा । निजबाणीं घाली, परि योडा । निकुंबळेसि उघो. ॥ ५९ ॥ व्युत्पत्तीनें महाचतुरें । खंडिलीं मूर्खाचीं अपशब्दोत्तरें, । तैसे सूर्यवंशीचेनि वीरें । शर तोडिले शत्रूचे. ॥ ६० ॥ मग धगधगित शत्रुमर्दन । बाण गुणीं लाविले वज्रासमान. । "साहें, रे इंद्रजिता," म्हणौन । शत एक मोकलिले. ॥ ६१ ॥ कैसे धनुष्यापासूनि सुटले, । सुंसात गगनीं भरले, । नाना ते सूर्यासि सांगों गेले । प्रताप लक्ष्मणाचा. ॥ ६२ ॥ बाण नव्हती ते कीर्तीची पत्रें । देव विमानारूढ छत्रपात्रें । त्यां इंद्रजितु मारीन म्हणौनि सौमित्रें । सांगावया पाठविलीं. ॥ ६३ ॥ कीं शत्रूसि यमलोकीं गमन । मांडिलें म्हणौन मुहूर्त-साधन. । त्याचेपुढें पाठविलें प्रस्थान । सौमित्रें निजबाणीं हतीं. ॥ ६४ ॥ असो. ऐशी शरवृष्टि । इंद्रजितें येतां देखिली दृष्टी. । ऊर्ध्व वाऊनि कोदंड मुष्टी । शीघ्र संधान केलें. ॥ ६५ ॥ सौमित्राचे येत होते बाण ।

त्यांवरि इंद्रजिताचे गेले तीक्ष्ण. । तेंहीं त्यांचें केलें खंडण । वदनद्वारां-करूनि. ॥ ६६ ॥ याउपरी वीरीं दोघीं जणीं । सरिसेंचि संधान केलें तुतां वाणीं. । शर चापतूर्णीहूनि । अमित सोडिते जाले. ॥ ६७ ॥ इंहीं धनुष्मतीं प्रबळ । शंकेरहित सांडिलें शरजाळ, । ऐसेयास्तव गगन-मंडळ । संपूर्ण जालें. ॥ ६८ ॥ पवनासि फिरावेया पंथु । नाहीं, न चले सूर्यरथु. । खेचरांसि मांडला अनर्थु, । दाही दिशा कोंडलिया. ॥ ६९ ॥ दोघां वीरांच्या संधाना । उपमा न स्फुरे चतुरानना. । महद्भय आरंभलें त्रिभुवना । तिये संग्रामसमयीं. ॥ ७० ॥ त्या दोन्ही वीरांचें तीक्ष्ण बाण । सृष्टिसंहारक, जैसे काळगण; । ना ते प्रळयीं द्वादशादित्यकिरण । पसरले गगनीं; ॥ ७१ ॥ कीं प्रळयमेघीं क्रूर विद्युल्लता । बाणरूपें होत्या दोहीं वीरांचे भातां; । त्या युद्धप्रसंगें आनंदें अमिता । जन्मस्थानीं क्रीडा करिती. ॥ ७२ ॥ ऐसे बाण वीरद्वयाचे । चड चड, निर्विधो मुखाचे, । तेजोमय कांचनपुंखाचे, । काळदृष्टि वज्रातुल्य. ॥ ७३ ॥ इंद्रजिताचे बाण कैसे ? । उड्डाणें घेती रणगीध तैसे; । कीं गगनाचिये फोडूनि मुमे । भूतगण पसरले. ॥ ७४ ॥ सौमित्राचां शराचीं गति । जैसे दिव्यदेहधारी मुक्ति । स्वर्गसुखें भोगावया जाती । भूमंडळापासोनि; ॥ ७५ ॥ कीं त्या सरोवराचें नाम मानस, । इच्छे तेथोनिया ते राजहंस । गगनमंडळीं भ्रमण निर्दोष । करावया जाती जैसे. ॥ ७६ ॥ जितुक्या लक्ष्मणाच्या बाणमाळी, । त्यांवरि रामसुद्रा वीरें लिहिली, । जैसी नागफणीमडळीं ठसावली । पद्में मिरवती. ॥ ७७ ॥ आणि जैसी यमाचां दडावरि । त्रिखित यमनामांची कुसरी, । तैसी इंद्रजिताचेया बाणावरि । रावणनामावळी. ॥ ७८ ॥ त्या वीरद्वयाचे अक्षय तूणीं, । अमोघ बाणांच्या त्या खाणी, । जैसा कवि-मुखमंडळींच्या वाणी । प्रसरती पयोत्तरातें. ॥ ७९ ॥ कीं द्रुमवाहळा यन्त्रा-टिका । तेंव वाहती राहाटघटिका, । परि त्या जैसी कूपोदका । न्यूनता नये. ॥ ८० ॥ यौवनदशेचां ठायीं कंदर्पु । प्रमदाप्रमगी रंगरूपु; । नाना अवतारमा-ळेचा साक्षेपु । युगांतीनि खंडेचिना. ॥ ८१ ॥ तैसे त्या वीरद्वयाचे तूणीं । संग्रामकाळीं समरांगणीं । बाण वेंचितां त्यांतूनि, परि बाणीं । भरलेचि असती. ॥ ८२ ॥ त्या दोघांचें घोर संधान. । शरीं संपूर्ण जालें गगन. । परीक्षीनि करी परिणाम । धनुर्विद्या वीरश्री. ॥ ८३ ॥ आशाधारक जैसे

निजगण । तैसे वीरद्वयाचे ऊर्ध्व बाण । आकाशीं जाऊन, खंडण । करि जाले परस्परें. ॥ ८४ ॥ जैसे क्रूर पक्षी वैरसंबंधें । गगन भ्रमतां करि युद्धें, । चंचुपुटें हाणिती, चर्चित अशुद्धें । भूमंडळीं पडती. ॥ ८५ जैसे मत्सरवादी लोक । स्थळनिर्वाहीं शब्द अनेक, । छळणा करूनि नि र्थक । परस्परें करिताती. ॥ ८६ ॥ ऐसियापरी दोघीं सुपरिपाठी । सो डिल्या बाणांचिया कोटि. । अंतरिक्ष गगनाचां पोटीं । एकएकातें तोडिती ॥ ८७ ॥ आदळती भाल्लींसीं भाली, । तेणें खणखणाटें अग्निवृष्टि जाली; तेणें दग्ध हों लागली । मंगळाची जननी. ॥ ८८ ॥ तिडकिया उसळलि शरसंघट्टणें, । तिया वन्हिशिखा विजूंसि आणिती उणें. । ऊर्ध्व गेलेय तारांगणें । आहळौनि च्यवलीं भूमीं. ॥ ८९ ॥ ऐसे कुशळ दोघे धनु र्धारी । निजहस्त निजधनुष्यांवरि । भ्रमविती कुलालचक्राचियापरी । शर मुटीकरितां. ॥ ९० ॥ नाना सन्मुख समरंगणीं । धनुष्यविद्याकर्म दोघे जणीं । त्यांची परीक्षा दिधली बाणीं । भरूनि आकाश. ॥ ९१ ॥ दोघे अमित शर सोडिले, । परि एकाचे एकासि नाहीं लागले. । परस्परें तोडूनि टाकिले । भूमंडळावरि. ॥ ९२ ॥ त्यां दोघां वीरां युद्ध होईल पुढें । महा घोर अद्भुत गाढें; । म्हणौनि ब्रह्मांडकर्तेन एव्हढें । आकाश रचिलें ॥ ९३ ॥ गगन नसतें महाथोर । तरि यांचे कोठें सामाते शर? । विमा नारूढ सुरवर । कौतुक कैसें पाहते? ॥ ९४ ॥ तरि आतां ऐसें एक योजलें, । पूर्वी वीरश्रिया तप थोर केलें; । त्यास्तव रचौनि राहिलें । अपार आकाश. ॥ ९५ ॥ या वीरद्वयाचें वीर्यवैभव । निरुपम धनुर्विद्येची ठेव. । ऐसेयासि साक्षी ते देव । आणि ऋषि, सूर्य, सोम. ॥ ९६ ॥ दोघांचें अंगलग कटक । संग्रामीं आटलें बहुतेक. । उरले ते पाहती कौतुक, । चित्रलिखितें जैसीं. ॥ ९७ ॥ इंद्रजितु रथारूढ युद्ध करी, । प्रतियोद्धा लक्ष्मणु पृथ्वीवरि । उभा; कूर्मावतारु धैर्यें यापरी, । वज्रठाण मांडौनि. ॥ ९८ ॥ रथावरि इंद्रजितु । भूमंडळीं सुमित्रासुतु; । हें देखौनि जांबुवंतु । साहेचिना तिये काळीं. ॥ ९९ ॥ शिळा घेतली जैसा गिरि, । ऊर्ध्व पाहोनि पाणितळावरि । कुलालचक्राचियेपरी । भ्रमवीत धांविन्नला. ॥ १०० ॥ वीरश्रियेचें अतिस्फुरण । धुधुःकारें नमु जाला संपूर्ण । रुद्रावेशें हाणौनि चूर्ण । रथु इंद्रजिताचा केला. ॥ १ ॥ सारिसेंचि गंधमादनें वीरें । धांवोनि

-गिप्रहारें । रथाश्व मारिले चान्ही, रुधिरें । भूमि बीभत्स जाली. ॥ २ ॥ ोर वीरद्वयें केला पुरुषार्थु । इंद्रजिताचा भंगिला रथु; । ऐसें देखौनि देवीं रुधोपंथु । पुष्पीं संपूर्ण केला. ॥ ३ ॥ विमीषणें आणि वायुकुमरें । "भले ले, वीरहो!" ऐसीं उत्तरें । दिधलीं गौरवपुरःसरें, । सौमित्रानुमतें. ॥ ४ ॥ तेथु इंद्रजितु उभा भूमी, । मुखांतूनि क्रोधाच्या ज्वाला वमी; । पुनरपि प्रवर्तला संग्रामीं । गर्जन करितु घोर. ॥ ५ ॥ उड्डाण घालितां गजगंडस्थळीं । मृगेंद्रु फोडी भीम आरोळी, । तैसा सुमित्रासुतु तिये काळीं । गंभीर गार्जिनला. ॥ ६ ॥ वीर दोघे ते अतुर्बळी । रथरहित रणभूमंडळीं । मंत्रपुरस्कार अद्भुत आगळीं । शस्त्रें टाकिते जाले. ॥ ७ ॥ पुनरपि वीररसु मांडला, । जैसा दुसरा दिवसु उगवला. । नाना समुद्र सांडिता जाला । लतांउपरी लता. ॥ ८ ॥ वरि रंगापुढें अतिरंगु, । कां लागाउपरी महालागु, । कां तो प्रसगांतीं प्रसंगु । अद्भुत वोढवला. ॥ ९ ॥ नाना मांडला महावादु । प्रसवत शब्दासरिसा शब्दु; । ऐसियापरी वीररसविनोदु । असंभाव्य आरंभला. ॥ ११० ॥ इति श्रीकथारामायणीं । वदलीं भविष्य वाल्मीकिवाणी; । श्रियेसि सेवितां सदा शूळपाणि । मस्तक डोल्वीतसे. ॥ ११ ॥ ऐसी हे कथा सर्वकाव्यश्रेष्ठ; । महाराष्ट्र हें कथियेलें तियेचें उच्छिष्ट. । दत्तचित्त परिसावें अर्थपुष्ट । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ११२ ॥

---

## प्रसंग पञ्चेचाळिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । आतां दशशिरनंदनें । विचारिलें आपुलेनि मनें. । लक्ष्मणु नोकळे शरसंधानें । हा महाधनुर्धरु. ॥ १ ॥ आम्हीं अलक्ष्य केलें यासि । परि हा महावीर सूर्यवंशी; । धाकुटा म्हणों नये तेजोराशि, । सूर्यु दुसरा. ॥ २ ॥ अगस्ति जन्मला घटीं, । काया पाहतां तनु त्याची धाकुटी; । परि आचमनेंकरूनि समुद्र पोटीं । सामाविला तेणें. ॥ ३ ॥ दर्भाचिमात्र तें वज्र धाकुटें । परि तेणें फोडिलीं पर्वतांचीं पोटें, । त्रिविक्रमस्वरूप म्हणों नये खुजटें, । बळीदर्पहरण जें. ॥ ४ ॥ जैसी पंडितांचे हृदयीं । बुद्धि वसे जेव्हडी राई; । परि ते

व्यापक सर्वां ठायीं, । पिपीलिकेपासौनि ब्रह्मांड. ॥ ५ ॥ म्हणौनि हा धाकुटा म्हणों नये, । लक्ष्मणु महावीर होये; । यासि तुळितां भुवनत्रय । सर्वथा उणें वाटे. ॥ ६ ॥ चोरु, चांडाळ, पितृघातक । परि त्यापासीं जो गुणु अधिक, । तो घेतसे ज्ञाता लोक, । जैसें धुळींतौनि रत्न. ॥ ७ ॥ याचिये धनुर्विद्येची परीक्षा । आली माझिया परम लक्षा. । आतां या लक्ष्मणा रणदक्षा । अद्भुत अस्त्रीं साधूं. ॥ ८ ॥ ऐसें कल्पूनि अंतःकरणीं । अग्निअस्त्र जपिन्नला रावणि. । बीजवर्म निक्षेपूनि बाणीं । कोदंड सज्ज केलें. ॥ ९ ॥ पूर्ण ओढोनियां कानाडी, । 'साहें, सौमित्रा.' म्हणौनि शर सोडी. । सरिसाचि अग्नि धडाडी । अकस्मात् तेजोमय. ॥ १० ॥ व्यापूनियां रणमेदिनी । चंड ज्वाळा लागलिया गगनीं; । जैसा प्रळयकाळीं वन्हि । सृष्टि दग्ध करावेया. ॥ ११ ॥ ज्वाळा पीता, श्वेता, आरक्ता, । नीळवर्ण, काळिया, धूम्रभरिता; । जगभक्षकाचिया जिव्हा अमिता । उदेलिया जैसिया. ॥ १२ ॥ शिखा सैरावैरा वायुसंगें । धांवती क्षुधेल्या अतिवेगें. । भस्म हों लागलें प्रसंगें । जितुकें आड पडलें. ॥ १३ ॥ अग्नि सर्वभक्षकु जाला, । असे भृगूनें शाप दिधला. । कैसियापरी तरि सहज निघाला । प्रसंगु परिसावा. ॥ १४ ॥ कोण्हे एके काळीं भृगु ऋषि । गेला होता प्रातःस्नानासि. । गृहीं युवती एकी तियेसि । नाम पुलोमा ऐसें. ॥ १५ ॥ त्रिभुवनींच्या नारी विचारितां । अधिक पुलोमेची स्वरूपता. । तियेचें गुणवर्णन करितां । शेषु पुरेना. ॥ १६ ॥ तें सौंदर्यसमुद्रींचें रत्न, । यौवनवाटिकेचें लतासुमन, । माम्यद्वीपींचें भृगूनें निधान । साधूनि आणिलें. ॥ १७ ॥ विद्या अमृतसंजीवनी । जन्मली नेणों पुलोमेचां वदनीं. । तेमागौनि दैत्याचा जीवदानी । शुक्र जाला काय? ॥ १८ ॥ असो ऐसी सुंदरी ते पुलोमा. । तियेसि अभिलाषी पापकर्मा । असुर एकु आला आश्रमा । भृगुऋषीचेया. ॥ १९ ॥ त्या दैत्याचें नांव ताळजंघदु, । स्त्रीमांसलुब्धु, अतिकापट्यु, । होमशाळा प्रवेशला धीटु । कुंडा अग्नीसमीप. ॥ २० ॥ त्या अग्नीप्रति बोले वचन. । म्हणे, "पैल कोणाचें रामारत्न?" । भयातुरलें हुताशन । सत्यचि सांगता जाला. ॥ २१ ॥ म्हणे, "गा पुरुषा पुसतेया, । हे पुलोमऋषीची तनया, । भृगुऋषीची प्रिय भार्या, । जैसी

शिवासि गौरी. ॥ २२ ॥ आइकौनि अग्नीची वाणी । दैत्यु खिळिला मदनबाणीं. । पुलोमा उचलौनि तत्क्षणीं । पृष्ठीं वाइली. ॥ २३ ॥ जैसीं गजें जळांतूनि पद्मिनी । शुंडा घेतली उचलौनि, । तैसी ते सुकुमार पुलोमनंदिनी । दैत्यें घेतली स्कंधीं. ॥ २४ ॥ उदरींचा गर्भ भयें तेणें । गाळूनि ते वेंचली प्राणें. । दैत्यें निर्जीव देखौनि दोघें जणें । तेचि प्रदेशीं सांडिलीं. ॥ २५ ॥ तेचि क्षणीं भृगु आला आश्रमा, । तव मार्गी गतप्राण पुलोमा. । तैसीची गति देखिली उत्तमा, । च्यवलेया बाळकासि. ॥ २६ ॥ म्हणे, "कटा कटा! कां ऐसें जालें? । कोणें दुरात्मेनि यांसि वधिलें? । धांवोनि कुंडा अग्नीसि पुसिलें. । तेणें सांगितलें समग्र. ॥ २७ ॥ भृगु क्रोधाच्या सांडी उल्का. । म्हणे," तू काय वदलासि, रे पापका?" वन्हि म्हणे, "जी, कोपों नका. । मीं सत्य अनुवादलों. ॥ २८ ॥ घडो भलताचि विपरीत काळु । परि मज असत्याचा ना विटाळु; । जैसा सूर्य न साहे मळु । तमलेशाचा" ॥ २९ ॥ ऐसें बोलिला पावकु, । तव भृगु कोपला अधिकु. । म्हणे," अरे अग्नि, तू मूर्खु । भुवनत्रयामध्यें, ॥ ३० ॥ सत्य बोलतां घडे पातक । आणि असत्य पुण्यदायक, । हें नेणसी तरि नाइक, । बुद्धिहीना, मतिमंदा. ॥ ३१ ॥ दुर्बळाचें मांडिलें विवाहकृत्य । तें घडलें करावें बोलौनि असत्य; । तरि पुण्य असे अमित, । येथ संशय न धरीं. ॥ ३२ ॥ आपुलेया सत्यवचनावरि । दुरात्मा ब्रह्मघ्न आदरी, । तेथ अनृत बोलौनि नानापरी । घातु चुके ऐसें कांजे. ॥ ३३ ॥ आपुलिये स्त्रीचां ठायीं । असत्य बोलणें पडलें समयीं, । तरि सत्य राखावें हृदयीं । हा धर्ममार्गु होये. ॥ ३४ ॥ ऐसीं असत्याचीं द्वारें. । येथें सत्य वदतां पातकें थोरें. । तुवां, रे, मूर्खें वैश्वानरें । सचे घातु केला माझा. ॥ ३५ ॥ ऐसा तू निर्दयाळु पावकु । होईं आतां सर्वभक्षकु," । ऐसा वरुणाचा कुळ-टिळकु । शापु देता जाला. ॥ ३६ ॥ मग सिंपौनि मंत्रोदकें । पुलोमा उठविली शिंगिर्ये एकें. । च्यवलें बाळक म्हणौनि कौतुकें । च्यवन नाम ठेविलें. ॥ ३७ ॥ याउपरी तो अग्निपुरुषु । जाणोनि शापाचा दोषु, । आपुलेया व्यापारांचा उच्छादु । करुं पाहे नेटेंचि. ॥ ३८ ॥ अकस्मात पडले त्रिभुवनीं, । यागांप्रति नचडे मेदिनी, । देव उपवासी स्वर्गभुवनीं । तळमळूं लागले. ॥ ३९ ॥ मदन मारें हुताशना । सुरीं श्रुत केलें चतुराननां । मग

का विवेकें महाचतुरें । शोक संहारिला. ॥ ७७ ॥ कीं मायेचें भ्रमपटळ । टर्दलें मिथ्यामय तुंबळ, । तें परम वैराग्य तात्काळ । तोडूनि टाकिलें. ॥ ७८ ॥ ऐसियापरी घोर वातें । निरसिलिया पर्जन्यास्त्रातें, । यावरी सुमित्रासुतें । वायु अद्भुत देखिला. ॥ ७९ ॥ मग सबीज सोडिलें पर्वतास्त्रासि, । तव गिरि आड ठेले आकाशीं. । पुढें धांव तेया मारुतासि । निरोध जाला बहुत. ॥ ८० ॥ बाप लक्ष्मणाची करणी! पाहतां आकाश आणि धरणी । पर्वतीं कोट बांधिला, कोंडणी । प्रभंजनासि जाली ! ॥ ८१ ॥ कुळाचळां तुल्य ते अचळ । द्रुमशृंगीं मंडित विशाळ; । तयांमध्यें पवनाचें बळ । नचले, ठयातें पावलें. ॥ ८२ ॥ जेसें साधूचें चोखाळ मन । काम, क्रोध, मत्सर देखोन । पुढें न धावे, निजतत्त्वीं लीन । जालें, नीरक्षीरन्यायें. ॥ ८३ ॥ कीं अजेनें वनान्तरीं, हो, । देखिला सर्पांचा समूहो, । आहारीं चित्त चुकलें, देहो । चमकौनि ठेला. ॥ ८४ ॥ वायव्यास्त्राची ऐसिया रीती । हारपोनि गेली, खुटली गति. । पुढें इंद्रजितानें पर्वतीं । घालणें आरंभिलें. ॥ ८५ ॥ गिरि अलभ्य गगनीं । ते देखिले इंद्रजितें नयनीं; । मग शीघ्र वज्रास्त्र जपोनि । सोडिलें परमावेशें. ॥ ८६ ॥ तव पर्वतापुढें वज्राच्या कोटि । उसळल्या गगनाचा पोटीं. । तेहीं गिरि पिष्ट करूनि, शेवटीं । दिग्गजांवरि टाकिले. ॥ ८७ ॥ जैसें सूर्याचा सहस्रकिरणीं । उठविजे अवकाशाचीं टाणीं, । दिग्मंडळपर्यंत धरणी । शोभायमान होतसे; ॥ ८८ ॥ सुटली ऐशीं वज्रचीं शतें, । पर्वत पिष्ट जाले त्याचेन घातें. । हा चमत्कार देखिला सुतें । सुमित्रादेवीचेनि. ॥ ८९ ॥ मग जयासि नाहीं वारण । तें ब्रह्मास्त्र जपिन्नला लक्ष्मण. । निजवाणीं स्थापूनि संपूर्ण । सोडिलें व्योमपंथें. ॥ ९० ॥ अनंतविद्युल्लताचा मेळ । तैसा पसरला अग्निकल्लोळ । लखलखू लागला भूगोळ । तुंबळ तेजेंकरूनि. ॥ ९१ ॥ ऐसिया महास्त्रातें देखौनि । वज्रें निरसलीं, पडलीं शून्यस्थानीं, । जेसीं सूर्योदयमानीं । नक्षत्रें बुडोनि ठेलीं. ॥ ९२ ॥ ऐसें ब्रह्मास्त्र महाभीम । धांविन्नलें, तेजें व्यापूनि व्योम. । देखोनि इंद्रजित म्हणे, “श्रम । कासयानें करावे. ॥ ९३ ॥ अस्त्रें सोडोनि मी आणिकें । परि हें निवारेना आणिकें. । आतां ब्रह्मास्त्र सोडूं, दोन्ही एकें । तेजें एक होऊनि जातील.” ॥ ९४ ॥ ऐसें कल्पूनि रावणि ।

ब्रह्मास्त्र स्थापिलें निजबाणीं. । सोडिलें दुसरेया उजू, तत्क्षणीं । अद्भुत असंभाव्य तेज. ॥ ९५ ॥ दोन्ही ब्रह्मास्त्रांसि गगनाचां पोटीं । कैशी परस्परें जाली भेटि ? । जैसें मिळालें शेवटीं । षड्द्वय सूर्यांचें. ॥ ९६ ॥ कीं शिवा विष्णूच्या दिव्य मूर्ति, । ज्यांचीं पुराणें गाती कीर्ति, । तयांसि परमानंदें प्रीती । लीळा भेटि होये. ॥ ९७ ॥ तैशीं तीं ब्रह्मास्त्रें दोन्ही । एकवटलीं तेजें गगनीं. । अति आश्चर्य करिती देखोनि । देव, विमानें पळविती. ॥ ९८ ॥ ब्रह्मास्त्रांचें तेज आगळें । पसरलें मर्यादेवेगळें. । खेचरां, भूचरांचीं बुबुळें । विरोनि गेलीं लक्षितां. ॥ ९९ ॥ ब्रह्मास्त्रांच्या दीप्तीकरूनि । कल्लोळ हेलावती घोर गगनीं. । जांबूनदाचीं तकटें ऐसी मेदिनी । आकाशीं दिसत असे. ॥ १०० ॥ ऐसीं ब्रह्मास्त्रें तळपती वरि, । येक येकातें कांहीं न करी. । कौतुक पाहिजत असे वीरीं । दोहीं दळींचे, हो. ॥ १ ॥ जैसें जळ जळासि बुडवीना, । पवन ग्रासीना पवना, । हुताशन हुताशना । भस्म करीना मिनल्या, ॥ २ ॥ तैशीं ब्रह्मास्त्रें दोनि दों वीरीं । स्थापूनि सोडिलीं अंबरीं. । येकाशीं येक न निवारी । येकरूप होऊनि ठेलीं. ॥ ३ ॥ पुढें अकस्मात एके मार्गीं । दोन्ही गेलीं पै मनोवेगें; । जैशा विद्युल्लता पर्जन्यासंगें । उन्मळोनि लोपती. ॥ ४ ॥ ब्रह्मास्त्रें शमलीं यापरी. । सरिसें ते अवसरीं । रौद्रास्त्र कोपें लक्ष्मणावरि । इंद्रजितें टाकिलें. ॥ ५ ॥ असंभाव्य तें अकस्मात । अद्भुत उदेलें कृतांतवत. । महा गर्जिन्नलें, तेणें चकित । भुवनत्रय जालें. ॥ ६ ॥ रूप प्रगटलें अत्यंत घोर, । गगनीं न माये येव्हढें थोर, । चरणांपासूनि शिर । किती एक योजनें. ॥ ७ ॥ येक आवाळें भूतळवटीं, । दुसरें गगनाचे पैवटीं. । सगळें ब्रह्मांड रिघेल पोटीं । ऐसें पसरिलें मुख. ॥ ८ ॥ दशनदंष्ट्रा भीम कराळ, । रोविले द्वारीं जैसे शूळ; । माजी उपयचित जिव्हाकल्लोळ । कल्पांतविद्युल्लता. ॥ ९ ॥ प्रळयाग्नीच्या ज्वाळा तांवटा । तैशा रुळती माथां; वन्हि वमित मुखवाटा, । आकाश करपत. ॥ ११० ॥ नमः । महाकुंडें विशाळें, । तैशीं नयनांतील बुबुळें; । ऐसें घोररूप परि वाल्मीकि-ऊर्ध्वबाहू धांविन्नला. ॥ ११ ॥ अट्टाहासें किंकाळी पै गोदावरीचीं दोन्ही थरारिलीं; । देखोनि वानरीं सर्वें सांडिलीं, । महामाराष्ट्र न म्हणावें लोकें ।

ऐसा रौद्राचा उठाव । कवण करूं शके स्थिराना ? । देखोनि प सुटला देवां । दिशाउल्लंघन केलें. ॥ १३ ॥ ऐसें देखोनि सुमित्रेच बाळ, । धीर लक्ष्मण, काळाचा काळ, । न भरतां चतुर्थांश पळ । निवा रण योजिलें. ॥ १४ ॥ त्रैलोक्यासि जें अगोचर । अस्त्रराज महामाहेश्वर, परमात्म्याहूनि महाथोर । स्मरिलें तात्काळ. ॥ १५ ॥ विधियुक्त मं केला संकल्प, । सिद्धमंत्र स्वरूप, । बीजाक्षरीं केला जप । रुद्र संख्याआवृत्ति. ॥ १६ ॥ रुद्रास्त्र निवारावयाकारणें । शीघ्र प्रेरिलें लक्ष्मणें. । तया माहेश्वराचें रूप कवणें । वर्णावें असंभाव्य ? ॥ १७ ॥ अकस्मात प्रकटलें कैसें ! । बोलिलें त्याहूनि अनारिसें. । निमिषमात्रें तेजा सरिसें । दाही दिशा दाटल्या. ॥ १८ ॥ मेरूहूनि मोटा दीप्तिकल्लोळ, । जैसा अनंत विद्युल्लतांचा मेळ; । कीं तो उदेला प्रबळ । ब्रह्मांड भक्षावया. ॥ १९ ॥ अकरा रुद्रांचीं तपें येकवटलीं, । कीं द्वादशादित्यांचीं रश्मे मुसा आलीं, । कीं दशकाग्निचीं घोर तेजें जालीं । येकवट आकाशीं. ॥ १२० ॥ ऐसियासि उपमा दीजे काय ? । रूप अद्भुत तेजोमय. । पृथ्वी पासोनि गगनीं न माय । येव्हढें अपरांपर ॥ २१ ॥ ऐसें उदेल्याउपरी । दिशा भ्रमती कुलालचक्रापरी. । अन्योन्य वर्ते पृथ्वीवरि । महाकंप होतसे. ॥ २२ ॥ अधोर्ध्व तुवळ तेज हेलावे, । जैसें सिंधुलतांचें तोय धांवे; । कीं कोटिविजूंचा समूह हलवे । येक वेळां गगनोदरीं. ॥ २३ ॥ ऐसें स्वरूप तेजोराशि । निरुपम पसरलें आकाशीं. । ते समयीं स्थिति वाटली कैसी । त्रिभुवनांत ? आइका. ॥ २४ ॥ देव, दैत्य, दानव, किंकर, । किंपुरुष, गुह्यक, विद्याधर, । पिशाच, चारण, सिद्ध, विद्याधर, । यक्ष, रक्ष. महासर्प. ॥ २५ ॥ माहेश्वर देखोनि इतुकेही । महाभयातुर जाले,

भरतां एक पळा । रौद्रास्त्रा आच्छादिलें. ॥ १३० ॥ इंद्रजित पाहतसे नयनीं । तंव रौद्रास्त्र गेलें हारपोनि. । माहेश्वराचें तेज गगनीं । हेलावत तिसे. ॥ ३१ ॥ इंद्रजित जाला भयातुर. । म्हणे, "या अस्त्रातें मी झासियानें निवारूं? " । गगनीं पसरला तेजाचा पूर, । यामध्यें बुडैन मी आतां." ॥ ३२ ॥ तंव लक्ष्मणें तेचि क्षणीं । विचारिलें आपुलां मनीं. । माहेश्वर प्रासिजैल रावणि । तरि संकल्पु व्यर्थ गेला ॥ ३३ ॥ इच्छा ऐसी वाक्षिये मनीं । बाणीं इंद्रजिताचें शिर तोडूनि । पिटूनि फिरवावें गगनीं, । मग पाडावें पृथ्वीवरि. ॥ ३४ ॥ ऐसें कल्पूनियां लक्ष्मणें । माहेश्वरशम व्हावेयाकारणें । मंत्रबीज जपिनला; सीतारमणें । सांगितलें होतें तें. ॥ ३५ ॥ कैसें मंत्राच्या बीजाक्षरीं । माहेश्वर शांत केलें क्षणाभीतरीं, । जें समावत नव्हतें उदरीं । गगनाचिया, हो! ॥ ३६ ॥ परमधराची आज्ञा म्हणौनि । सूर्य समुद्रीं रिघे अस्तमानीं, । तैसें लक्ष्मणाचे वियेकरूनि माहेश्वर मावळलें. ॥ ३७ ॥ याउपरी तेणें इंद्रजितें । सांडिलें हृदयांतूनि भयातें. । म्हणे, "ग्रासितां कृतांतें । कां पां सोडिलें?" ॥ ३८ ॥ वीरराज भला सुमित्रासुत, । माझे इच्छेनें युद्ध करित. । या तुल्य धनुष्मंत । न भूतो न भविष्यति. ॥ ३९ ॥ माहेश्वर शमलेयाउपरीं । स्वस्थानीं राहिजे भूचरखेचरीं. । पुनरपि दोघीं वीरीं । शरयुद्ध आरंभिलें. ॥ १४० ॥ आतां पुढिले प्रसंगीं । इंद्रजितरणरंगीं । जयो प्राप्त लक्ष्मणालागीं । ऐसें कथानुसंधान असे. ॥ ४१ ॥ इति श्रीयुद्धकांडकाव्येंद । भागवतदासचकोरां पूर्ण चंद्र. । ऐका महाराष्ट्रशब्दसमुद्र । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ १४२ ॥

---

## प्रसंग पंचेचाळिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । महाराष्ट्र म्हणौनि तें कां । अप्रमाण करणें शब्द जितुका? । परि वाल्मीकिकाव्याची शुद्ध टीका । विचक्षणीं शोधावी. ॥ १ ॥ गोदावरीचीं दोन्ही तटाकें । माजी प्रवाह येकें उदकें; । तैसें संस्कृत महाराष्ट्र न म्हणावें वेगळें ।,

अर्थ एक म्हणोनियां. ॥ २ ॥ आता दोघे वीर प्रतापी, । शममत्रीं समान, काळरूपी, । असभाव्य वाणजाळ पुनरपि । सोडिते जाले असख्यात. ॥ ३ ॥ प्राण हरावया चड वैरें । छळिती, हाकिती परस्परें । वर्मांगें लक्षूनि शरीरें । परस्परें छेदिते जाले. ॥ ४ ॥ इद्रजिता लक्ष्मणाचें युद्ध, । भुवनत्रयामध्यें प्रसिद्ध । विमानारूढ विबुध । कौतुक पाहताति. ॥ ५ ॥ पूर्वी कोणासि कोण्हे काळीं । ऐसें युद्ध जालें नाहीं भूमडळीं, । स्व- अथवा पाताळीं । चडबळियांसि. ॥ ६ ॥ पूर्वी वृत्र आणि वज्रधर, । अंधक आणि गिरिजावर । परशुराम आणि कार्तवीर्य वीर, । स्वामी आणि तारक, ॥ ७ ॥ ऐशीं बहुताशीं बहुत युद्धें । जालीं वैराचेनि सबधें, । मही मेदमासअशुद्धें । तुबळ मानली; ॥ ८ ॥ परि सौमित्रा रावणीचा सग्रामा । यांचिया ससेचिना उपमा, । जैसें समुद्रा आणि व्योमा । तुळा- वया दुजें नाहीं. ॥ ९ ॥ क्रोधें उचबळत दोहींचें हृदय, । जैसें त्रिभु- वनाचें खोटे तोय. । ब्रह्मांडाबाहीरि टाकिलें भय, । परमावेशें विधिती. ॥ १० ॥ तव लक्ष्मणें अधिक केलें । लक्षूनि त्रिगुतें साधिलें । नववाण, गोहूनि फोडिलें । ललाट इंद्रजिताचें. ॥ ११ ॥ वज्रापरीस व पोळ कठिण । तेथें रुतले नवही बाण. । भाळीं, काठिया बुडाल्या सपूर्ण, । पिच्छें बाहेरि राहिलीं. ॥ १२ ॥ कीं या कपोळराशीवरि । नवग्रह बैसले हारी, । कीं नवा शक्तींचीं मुखें भीतरीं । रिघालीं शोणित शोषू. ॥ १३ ॥ नवा बाणाच्यानि मर्य- करूनि । नवखड जाली मेदिनी, । ते बाण सुटले सौमित्रकरापासूनि । चक्रारिभाळीं निघाले. ॥ १४ ॥ ऐसा राघवअनुजाचा बाणीं । ललाटीं पोळला रावणि. । उणें मानूनि अतःकरणीं । त्तसिणें देता जाला. ॥ १५ ॥ कोदड वोढूनि इंद्रजितें । चक्षुर्लक्ष्य साधिलें त्रिगुतें. । बाणत्रयें सुमित्रासुतातें । ललाटीं भेदिलें. ॥ १६ ॥ जेंहीं बाणीं त्रिभुवन । इंद्रजितें केलें तृणासमान, । त्या तिहीं बाणांचें सधान । सौमित्रें साहिलें, ॥ १७ ॥ त्रिकुटाचय पर्वतापाठारीं । पडोनि बुडे अभ्यतरीं, । तैसे लक्ष्मणभाळाभीतरीं । बाण भरले, हो. ॥ १८ ॥ बाणाचीं पिच्छें बाहेरि राहिलीं, । गुप्त गेलिया काष्टिका, भाटी । शरघाताची थोर वेथा जाली, । परि कळली नाहीं सौमित्रातें. ॥ १९ ॥ तृणाच्या शुष्क शिखा । लागल्या सिंहाच्या मवा, । तेणें करूनि तो दुःखा । प्राप्त नव्हे जैसा. ॥ २० ॥

लक्ष्मणाचे शरघात । लागतां इंद्रजित न हो दुःखित, । जैसा पुष्पवृष्टी
मदोन्मत । वेथा नमनी, हो. ॥ २१ ॥ येक येकासि भेदिती बाणें, ।
परि वेथा न मानिती त्याचि कारणे. । वीरश्रियेचें बैसलें ठाणें । सुखदुःख-
स्मरण नाहीं. ॥ २२ ॥ दोघे वीर निर्वाणद्वंद्वें । भेदिती आंगें अभेद्यें. ।
कार्मुक वोढितां पुढारीं पदें । उचलिताति वेगें. ॥ २३ ॥ इंद्रजित परिपक
झुंझार; । प्रथमशूर सुमित्राकुमर, । हें आठवूनि स्नेहाचा पूर ।
पावला बिभीषणासि. ॥ २४ ॥ कृतांतकिंकाळी येवढें । बिभीषणें गर्जन
केलें गाढें. । गदा झेलित झाला पुढें. । 'साहें' म्हणे इंद्रजिता. ॥ २५ ।
हिमालयावरि अमरनाथें । वज्र प्रेरिलें पुरुषार्थें, । तैसें सौमित्राचेनि स्नेह
स्वार्थें । बिभीषणें गदा टाकिली. ॥ २६ ॥ चंड गदा जववरि पडती,
तंव इंद्रजित लघुलाघवी; । शर सोडूनि आडवी । पृथ्वीवरि पाडिली
॥ २७ ॥ जैसा निर्भाग्याचा उदिम । निर्फळ होय, उरे श्रम; । तैसा बि
भीषणाचा गदाविक्रम । व्यर्थ जाला ते काळीं. ॥ २८ ॥ सरिसेंचि इंद्र
जितें पांच शरीं । बिभीषण भेदिला वक्षस्थळावरि; । जैसा पंचबाणें हिमा
लयाचे घरीं । चतुरानन खिळिला. ॥ २९ ॥ ऐसें देखौनि लक्ष्मणें । बि
भीषणासि आलें उणें, । मग निगुतें रमापर्णबाणें । रिपुधनुष्य छेदिलें
॥ ३० ॥ इंद्रजितें सवेंचि कोदंड । वाइलें शिवचापातुल्य प्रचंड. । शर सो
डिता जाला काळदंड । जैसे व्योमींहूनि पडती. ॥ ३१ ॥ लक्ष्मणासि
भेदले बहु बाण, । मांडलें महावीर निर्वाण. । वीरद्वयामध्यें कोणासि कोण
जिंकेल, हें न कळे. ॥ ३२ ॥ दोघांचे देह दोहीं वीरीं । खिळिले परस्परे
तीक्ष्ण शरीं, । जैसे माधवमंडपीं मयोरीं । पसरिजताति पिच्छें. ॥ ३३ ।
तंव लक्ष्मणासि देव साह्य जाले, । ऋषि कल्याण चिंतूं लागले. । आ
काशदेवींचे शब्द उठिले, । 'जय सौमित्रासि' म्हणौनि. ॥ ३४ ॥ घोर
गर्जिन्नले वानरसुभट, । तेणें तृप्त जालें गगनाचें पोट. । ते समयीं अधि
काधिक पुठ । सौमित्रासि चढलें. ॥ ३५ ॥ जाला लक्ष्मणासि मनोदय,
जे प्राप्त सर्वथा मज जयो. । येके बाणें रावणतनयें । परलोका
पाठवीन. ॥ ३६ ॥ ऐसें करूनि सुमित्रात्मज । तूणीगर्भींहूनि शर घेतला
सतेज; । जैशी निवडिली कल्पांत वीज । प्रळयमेघांतूनि. ॥ ३७ ॥
कीं शिवचक्षूहूनि पावक । प्रगटला तो मदनांतक, । तैसा तूणींतूनि अति

अंतक । सौमित्रें शर काढिला. ॥ ३८ ॥ जैसें मार्तंडचक्र वर्तुळ । तैसें बाणाचें मुखमंडळ; । चक्रधारेपासूनि अग्निकल्लोळ । टपटपां गळती. ॥ ३९ ॥ जैशा रविरश्मींच्या रेखा । तेशी उपमा त्या शरपुंखां; । वरि मुद्रा मंडित मिरवे देखा । बीजाक्षरीं "श्रीराम" ऐसी. ॥ ४० ॥ तो बाण धनुर्ध्यीं सौमित्रें । सज्जिला क्षणाचेनि शतभागमात्रें. । आकर्ण योढिताचि नक्षत्रें । पृथ्वीवरि च्यवलीं. ॥ ४१ ॥ ते समयीं वीरें लक्ष्मणें । सूचिलें ऐसें अंतःकरणें: । इंद्रजिताचें शिर ये बाणें । छेदो कीं सर्वथा. ॥ ४२ ॥ राम सर्वात्मा, सत्यप्रतिज्ञ, । भास्करवंशभुवनप्रिय भगवान, । कार्याकारण चिदानंदघन । अवतरला असे, हो. ॥ ४३ ॥ मी कायावाचामानसें । रघुपतीतें सेवितसें, । वानर देव अवतरले ऐसें । जरि घडलें असेल, ॥ ४४ ॥ निष्कलंक अशोकवनीं । असेल श्रीरामाची पत्नी, । प्राणनाथाचे चरण ध्यात मनीं, । जैसा चकोर चंद्रातें, ॥ ४५ ॥ इतुकेंही सत्य असेल । आणि वाल्मीकिकाव्य मिथ्या नव्हेल, । तरि या बाणें शिर तुटेल । इंद्रजिताचें आतां. ॥ ४६ ॥ ऐसें चिंतून लक्ष्मण । सोडिता जाला रविचक्रबाण; । जैसा वैकुंठीं नारायण । चक्र दैत्यांवरि प्रेरी. ॥ ४७ ॥ लक्ष्मणें आपुले नेत्रकमळीं । इंद्रजिताचे कंठनाळीं । लक्ष्य लावूनि ते काळीं । शरसंधान केलें. ॥ ४८ ॥ सबळमुशळहस्तशरमुटी । बाण भरला गगनाचा पोटीं, । पिच्छवाताच्या घुघाटीं । जीमूतीसि छळिलें. ॥ ४९ ॥ थोर अंतःकरणाचा वेग, । तयापरीस बाणें साधिला ऊर्ध्व मार्ग; । जैसा अमृतहरणीं स्वर्ग । गरुड आक्रमीत गेला. ॥ ५० ॥ बाण वेगें जात याचिकारणें, । जे आज्ञा केली असे लक्ष्मणें. । रावणीचें शिर तोडूनि तारागणें । दाखवीं सकळिक. ॥ ५१ ॥ समरंगणीं दशग्रीवात्मज । शर देखोनि शर केला सज्ज. । दक्षिण कर्णी दक्षिण भुज । लावूनि योढि काढिलें. ॥ ५२ ॥ लक्ष्य, नयन आणि अंतःकरणें । लाविलें देवढे ठाणें. । विधार्ते तंव लक्ष्मणाचेनि बाणें । येऊ सरिजे वेगीं. ॥ ५३ ॥ रविचक्राकार बाणाची भाळी । अकस्मात कंठीं बैसली. । तेणें शिर तोडूनि भुजा छेदिली । स्कंधाचें परिमाण. ॥ ५४ ॥ नखें फुड्यार तोडिलें, । कीं सुरिया कणिस खुडिलें, । नाना पर्वतावरि छेदिलें । शृंग वज्रेंकरूनियां. ॥ ५५ ॥ ऐसियापरी लक्ष्मणें । इंद्रजिताचें एकें बाणें । अग्रगण्य पुरुषा-

प्रेमपणे । शिर छेदूनि साडिलें. ॥ ५६ ॥ लक्ष्मणाचा दक्षिण कर । संग्राम करितां शिणला थोर. । आरेकडी आदळताचि शर । आपळे ठायीं निमाला. ॥ ५७ ॥ इंद्रजिताचे ग्रीवेपासूनि । तुटलें शिर भरलें गगनीं, । किरीटकुंडलेंमंडित, मेदिनी । शोणित श्रवत असे. ॥ ५८ ॥ मूज उसळौनि पडली लंकेवरि, । शिर भरलें ऊर्ध्व अंबरीं, । नक्षत्रलोकाचे अधोपारीं । धाव पुरली त्याची. ॥ ५९ ॥ शिर आलें देखौनि चंद्रार्कीं । अत्यंत बाधली चंड शंका । विवें फांकती, जैशीं वातोदका- । मधील नलिनीदळें. ॥ ६० ॥ म्हणती, "व्योमपथींचा वाटपाडी । ग्रहणीं आम्हुतें राहू नाडी; । तैसें हें शिर राहोनि परवडी । पर्वी ग्रासील्ना कीं?" ॥ ६१ ॥ देखोनि सुरवर साशंक जाले, । सकळ गगनचर भये वावळे, । तैसेच हर्षातें पावले । रावणि पडला म्हणौनि. ॥ ६२ ॥ प्रथम मेघनाद नाम रावणीं, । पुढें इंद्र जिंकिला समरगणीं, । त्यास्तव वदे त्रैलोक्याची वाणी । इंद्रजित ऐसें. ॥ ६३ ॥ ते काळींहूनिया इंद्रातें । शैल्य हृदयीं बैसलें होतें, । तें नि शैल्य केलें सुमित्रासुतें, । जानकीरमणानुजें. ॥ ६४ ॥ धन्य लक्ष्मणाचें वीरश्रीवैभव! । अपूर्व, अद्भुत संग्रामठेव! । ते समयीं विमानारूढ देव । पुष्पवृष्टि करिते जाले. ॥ ६५ ॥ ऋषीश्वरीं केला अभिशेश, । वानरीं केला आनंदघोष. । चतुरानन आणि महेश । संतोषले ते समयीं. ॥ ६६ ॥ इंद्रजिताचें अगलग दळ । दिशा लंघिते जाले तात्काळ, । जैसें तडागींचें तुंबळ जळ । चहू पारीं फुटौनि गेलें. ॥ ६७ ॥ मुख्य धुराचे मारिली लक्ष्मणें, । पुढें कोणापाशीं राहवें कोणें? । जैसीं सूर्यअस्तमानीं किरणें । सरिशीं आच्छादती. ॥ ६८ ॥ निकुंबळेचा रणभूमी । इंद्रजित पडला संग्रामीं. । धड धरणी, शिर ठेलें व्योमीं । उसळलें, हो, तें पैं. ॥ ६९ ॥ धाव पुरोनि पुनरपि । शिर मनोवेगें पृथ्वी ठिपी । तें देखते क्षणीं ऋषभ कपि । वरिच्यावरि शिर झेली. ॥ ७० ॥ वैरियाचें शिर हस्तीं चढे । तेणें हृदयीं आनंद वाढे. । या आनंदाशीं तुळिता न घडे । नाना आनंदराशि. ॥ ७१ ॥ जन्मा आलिया हेंचि सार्थक । दाखविजे पुरुषार्थाचें कौतुक. । तेणें 'धन्य, धन्य!' म्हणती लोक । आणि मस्तक डोलविती. ॥ ७२ ॥ दाते देखोनि याचकाचें दारिद्र । पळे लंघूनि सप्तसमुद्र. । भयंकर मार देतां नरेंद्र । तेचि येक पुरुषार्थी.

॥ ७३ ॥ शरीर वेंची परोपकारीं, । वेदाची आज्ञा नाहे शिरीं, । परस्त्री माग जननीपरी । तोचि येक पुरुषार्थी. ॥ ७४ ॥ नित्यविचारें मन बुद्धि सकळ शास्त्राचा साराश शोधी, । सत्कर्म करी निष्कामबुद्धी । तोचि येक पुरुषार्थी. ॥ ७५ ॥ धर्म, अर्थ, तृतीय काम । यासीं वैर नाहीं, सद सगम, । हे तिन्ही येकवट तयाचे आश्रम, । तोचि येक पुरुषार्थी. ॥ ७६ । देव, ऋषि आणि पितर, । अग्नि, ब्राह्मण, क्षुधातुर । ज्याचे गृहीं तृप्त निरंतर, । तोचि येक पुरुषार्थी. ॥ ७७ ॥ जयाचा अपूर्व वाग्विलास, तुळिता हळू वाटे सुधारस, । श्रोतेया चकोरा सत्य सुधारस, । तोचि येक पुरुषार्थी. ॥ ७८ ॥ मनुशिराची लाखोली । जेणें समरंगणी मूळिंग वाहिली, । सागरात पृथ्वी भोगूनि त्यागिली । तोचि येक पुरुषार्थी ॥ ७९ ॥ म्हणौनि पुरुषार्थामाजी पुरुषार्थी । परम येक लक्ष्मण दाशरथि. देवदर्पहरण बाणपर्थी । पाडिला पृथ्वीवरि. ॥ ८० ॥ जेणें इंद्रजितें त्रिभुवन । मानिलें तृणासमान, । त्याचें समरंगणीं प्राणदान । वीरें लक्ष्मणें घेतलें. ॥ ८१ ॥ सौमित्रें इतुके पदार्थ केले, । दासत्व श्रीरामाचें सिद्ध नेलें, । आपुले प्रतापासि वाढविलें । मर्यादेहूनि आगळें; ॥ ८२ ॥ इंद्राचें केलें उजळ मुख, । बिभीषणासि दिधलें परमसुख, । दशग्रीवाप्रति दीर्घ दुःख । पाठविलें विक्रमें. ॥ ८३ ॥ ऐसा करूनिया पुरुषार्थ । लक्ष्मण वीरश्रीमंडित समर्थ । त्वरें निराळा रघुनाथ । कपिचमूसीं जेथ असे. ॥ ८४ ॥ इंद्रजिताचें शिर कुपमें । सरिसें घेतलें येणें दोमें, । जे दृष्टी वैदेहीपलमें । देखानें म्हणूनियां. ॥ ८५ । मार्गत्रय पावला इंद्रजिताचा देह । धट निवुवलेसि, लक्ष्मणें बाणें, । शिरानें शस्त्रसमूहो । घेऊनि गेले अमती ॥ ८६ ॥ इंद्रजिताचे शरप्रहार । तेणें सौमित्राचें छिन्नभिन्न शरीर. । असत वेधा होनसे, रुधिर । सुरलें पैं सर्वांगीं ॥ ८७ ॥ ज्या इंद्रजिताचे बाण । वज्राहूनि अति कठिण, । अग्नीपरीस अति उष्ण । हळाहळातुल्य, ॥ ८८ ॥ तरि धन्य धैर्य लक्ष्मणाचें । अन्य धन्य आगीं आदिपुरुषाचें, । जेणें वोझें विरिंचिअंडाचें । पुष्पप्राय धरिलें. ॥ ८९ ॥ येथा न माय त्रिभुवनीं । पीर लक्ष्मणें धरिली नाहीं मनीं, । जैसा जनकासि देह असौनि । विदेहपण सार, ॥ ९० ॥ कीं नलिनीपत्र जळवारें कळे । पारे ता अलिप्तिमि

वातळे, । तैसें लक्ष्मणाचें चित्त नातळे । वैयेचिया भोगामध्यें. ॥ ९१ ॥ नाना परम तो ज्ञानधारी । जगातीत, जगामीतरीं, । सौमित्र वेगळा तयापरी । वीर सूर्यवंशी. ॥ ९२ ॥ जय पावला लक्ष्मण । म्हणौनि स्तुति करी बिभीषण. । झाडूनि घेतला चरणरेणु, । भाळी आपुले ढंवरिला. ॥ ९३ ॥ "आतां चालावें, नलवावा उशिर, । वाट पाहतसे वैदेहीवर." । ऐसें बिभीषण बोले, तंव भार । उदित जाला कपींचा. ॥ ९४ ॥ सीताशुद्धि केली हनुमंतें, । तें म्हणे, "केधवां भेटेन रामातें?" । तैसेंचि वधूनि इंद्रजितातें । लक्ष्मणासि वाटे. ॥ ९५ ॥ मग हनुमंतें ते अवसरीं । लक्ष्मण वैसविला स्कधावरि. । ते उपमा जैसा उदयगिरि । बाळसूर्यमंडित, हो. ॥ ९६ ॥ बुद्धिमंडित कुशलपणें । हित सांगितलें बिभीषणें. । म्हणे, "आम्ही आलों मार्गे जेणें । तैसेंचि जावें, वीर हो." ॥ ९७ ॥ उत्तर दिधलें सुमित्रासुतें. । "हें काय, हो, सांगतां आमुतें? । जो निर्धार तुमचेनि मतें । तोचि प्रमाण,. गदापाणि. ॥ ९८ ॥ मनासि जैसें आवडे । तैसेंचि इंद्रियांसि करणें पडे. । अरुणाचेनि सूत्रें सप्त घोडे । नमोमार्गे क्रमिती. ॥ ९९ ॥ म्हणौनि व्योमार्गे न्याल तुम्ही । तेचि मार्गे येऊं आम्ही. । बिभीषणा, तूं समागमीं । प्राणांपरीस प्रिय." ॥ १०० ॥ ऐसें वदे लक्ष्मण. । हर्षें उत्तर दे बिभीषण । म्हणे, "प्राणांपरीस प्रिय सीतारमण. । मी शरणागत तुमचा." ॥ १ ॥ ऐसें बोलोनियां ते काळीं । वीर सकळ आतुर्बळी । निकुंबळा सांडूनि नमोमंडळीं । पक्षांतुल्य प्रवेशले. ॥ २ ॥ लंकेचें उत्तरद्वारभूमंडळ, । जें संग्रामाचें विशाळ स्थळ, । तेथें मनोवेगें आले सकळ । आपुलिया कटकांत. ॥ ३ ॥ असंभाव्य वानरसमुद्र, । किष्किंधेश तयाचा इंद्र; । त्याचाही प्रभु रामचंद्र । वाट पाहे बंधूची. ॥ ४ ॥ महावीरसभामंडळीं । सुग्रीव असे निकट जवळि. । तयाप्रति रघुनाथ ते काळीं । बोलता जाला. ॥ ५ ॥ म्हणे, "निकुंबळेसि गेला सौमित्र । वधावया शक्राचा मूळ शत्रु, । तो कां पां नयेचि अद्यापि, नेत्र । दक्षिणांगींचा स्फुरतसे? ॥ ६ ॥ बिभीषण, जांबुवंत, वायुनंदन, । ऋषभ आणि गंधमादन, । लक्ष्मण यांसहवर्तमान । कां पां अझूनि नये? ॥ ७ ॥ महा कठिण तिये निकुंबळे । काय पां संग्रामाचिये वेळे ।

वर्तलें असेल, तें न कळे; । कवणा जय, पराजय ? ॥ ८ ॥ प्रथम युद्धीं जेणें इंद्रजितें । सर्पपाशीं पाडिलें आमुतें, । दुसरे संग्रामीं मागुतें । सर्वां शरीं खिळिलें. ॥ ९ ॥ ते समयीं यश आलें हनुमंता, । जाला सर्वांचा प्राणदाता. । द्रोणागिरि आणूनि मागुता । क्षिराब्धितटीं ठेविला. ॥ १० ॥ म्हणौनि इंद्रजित परम योद्धा, । जेणें दीन दशा दिधली विबुधां. । कपटविद्या, कळा नानाविधा । ब्रह्मादिकां न कळती. ॥ ११ ॥ ऐसा त्रिभुवनजित रावणि । आणि सौमित्रातें बाळदशा अझूनि. । समता विचारितां समरंगणीं । महदंतर असे. ॥ १२ ॥ कृतांततुल्य तें निकुंबळा । तेथें युद्धा गेला मजवेगळा, । तो केधवां मी आपुलां डोळां । देखेन सहोदर ? ” ॥ १३ ॥ ऐसा अवनिजावल्लभ । अपेक्षी निजबंधुभेटीचा लाभ. । हें परिसौनि कपिचक्रप्रभु । सुग्रीव अनुवादे. ॥ १४ ॥ अहो सहस्रार्जुनशत्रुजिता, । वीरचक्रचूडामणि, धनुष्मता, । सर्वथा सौमित्राची चिंता । आपणांसि करणें न घडे. ॥ १५ ॥ रात्रीचे भारीं बैसोनि निजनीवीं । कां पां उगलीचि चिंता करावी ? । निशांतीं उगवेल कीं नुगवे रवि । म्हणौनियां, जी स्वामी ? ॥ १६ ॥ सौमित्र समागमेयांसहित । निकुंबळेसि जाला जयवंत, । समरंगणीं पडला इंद्रजित । यांत संशय नाहीं. ॥ १७ ॥ याच क्षणमात्रामध्यें, स्वामी, । लक्ष्मण आलिंगाल तुम्हीं. ” । ऐसें कपींद्र बोलतां, अंतर्यामी । आत्माराम आनंदला. ॥ १८ ॥ श्रीरघुनाथ, देवाधिदेव, । ज्ञातेयाचा गुरुगम्य राव, । परि आलेया प्रसंगाचा अभिप्राव । पाहिजे ऐसा दाखविला. ॥ १९ ॥ सर्पाकारणें स्वर्गा सुपर्णु । गेला होता वळें अमृत आणूं, । तैं विनता वाट पाहे, म्हणे अझूनु । कां पां नयेचि पुत्र; ॥ २० ॥ तैसाचि आर्तकृपासिंधु । म्हणे इंद्रजिताचा करूनि वधु, । केधवां येईल आत्मबंधु, । म्हणौनि वाट पाहे. ॥ २१ ॥ यानंतरें तेचि काळीं । वानरसिंधूंचिये पाळीं । पावले वीर आतुर्बळी । लक्ष्मणप्रमुख. ॥ २२ ॥ असंख्य वानरांचिया कोटि । हेलावती रणसिंधूचें पोटीं. । मर्यादेवेगळी तळवटी । लंकेचे चक्रदुर्गा. ॥ २३ ॥ कपिकटकीं लक्ष्मण आला । तो अकस्मात् वानरीं देखिला, । सरिसा परिवार होता गेला । तितुकियांसहित. ॥ २४ ॥ जैसा किरणसमूहेंसीं आदित्य । जाय

तां पश्चिमेसि अस्त, । तो उदयाचळीं अकस्मात, । तैसा लक्ष्मण देखिला. ॥ २५ ॥ वानर देखोनि आनंदले, । पुढें मनोवेगें सांगों आले, । श्रीरामाप्रति म्हणती, "जी, आले निकुंभळेहूनि वीर. ॥ २६ ॥ लक्ष्मण, बिभीषण, हनुमंत, । ऋषभु गंधमादनु, जांबुवंत. । आदिकरूनि ... दयांत । नरेंद्र आणि कपींद्र. ॥ २७ ॥ शीघ्र सुग्रीव पुढारा जाला, । त्र लक्ष्मण येऊं सरला. । हनुमंताचे स्कंधींहूनि उतरला, । जैसा इंद्र बैदंता तळीं. ॥ २८ ॥ शरघातें भेदलें शरीर । तेणें भूमी चाले स्थिर स्थिर. । हनुमंतें, बिभीषणें दोनि कर । दोहींकडूनि धरिले. ॥ २९ ॥ श्रीराम सन्मुख देखिला, । येऊनि लक्ष्मण चरणासि लागला; । तंव कृपानिधीनें आलिंगिला । उचलूनियां हृदयीं. ॥ १३० ॥ भेटले बंधु दोघे जण । सूर्यवंशी रामलक्ष्मण. । साक्षात् शेषनारायण, । अवतारपुरुष. ॥ ३१ ॥ तारकासुराचा वधा अंतीं । स्कंद आलिया आलिंगी उमापति, । तैसें सौमित्रातें तेचि प्रीती । रघुनाथें आलिंगिलें. ॥ ३२ ॥ साधिलिया अमृतसंजीवनी । गुरुपुत्र आला कच देखोनि, । इंद्रें आलिंगिला स्वर्गभुवनीं । तेसाचि सौमित्र श्रीरामें. ॥ ३३ ॥ इंद्रजितासीं करितां संग्राम । सौमित्रासि जाला बहु श्रम, । तो निरसला आत्माराम । भेटलेयावरि. ॥ ३४ ॥ बंधु धरिला असतां हृदयीं । कृपासिंधु बोले ते समयीं. । "या रे, युद्धीं रणांगणाचां ठायीं । श्रमलासि घोर. ॥ ३५ ॥ जेणें सर्पपाशीं आम्हांतें । बांधोनियां पाडिलें होतें, । त्यां वधिलें त्या इंद्रजितातें, । घोर पुरुषार्थ केला. ॥ ३६ ॥ आतां या संग्रामीं लक्ष्मणा, । नेमेसीं वधीन मी रावणा, । जैसें कनकाचिया हरणा । गोदातटीं वधिलें. ॥ ३७ ॥ नीराक्षसी केलिया राजधानी । बिभीषण बैसेल राजसिंहासनीं. । देव बंधमुक्त स्वर्गभुवनीं । सुखें जातील. ॥ ३८ ॥ जानकी भेटेल आम्हां, । कल्याण सर्व प्लवंगमां; । पुढें परमानंदें नंदिग्रामा । भरता भेटी जावों." ॥ ३९ ॥ ऐसें बोलतां सीतारमण । आलिंगूनि बैसविला लक्ष्मण. । सवेंचि चरणाबुजें सेवी बिभीषण । जमदग्निजिताचीं. ॥ १४० ॥ तोही आलिंगिला रघुवीरें. । म्हणे, "जी मित्रा, तुझेनि उपकारें । घोर दाटलों, येणें अवतारें । उत्तीर्ण नव्हिजेल." ॥ ४१ ॥ पाठपरी जांबुवंतें नमस्कार । केला. हास्यमुख बोले रघुवीर. । म्हणे,

लांबटा; । शंखवर्णा, तिखटा । दंतदाढा विक्राळा. ॥ ५ ॥ मायां वाढ वात्रशांटी । ते ऋपमें धरिली वाममुष्टीं. । जैसगुढीसीं जगजेठी । गे श्रीरामापाशीं. ॥ ६ ॥ मागां वर्तला काय वृत्तांतु: । युद्धीं सौमित्रें तोडि हस्तु, । तो लंकेवरि पटत पडतु । गृध्रन्यायें उसळला. ॥ ७ ॥ वे वळवोनि गगना । आला लंकेचिया भुवना; । सुलोचनेच्या आंगणा- माजी पडला दंडवत. ॥ ८ ॥ ते चक्षुःश्रवेयाची आत्मजा; । स्नुषा रा राक्षसराजा; । शैलारिशत्रूची भाजा, । रक्षोंगनास्वामिणी. ॥ ९ ॥ तियेच स्वरूपाची देखौनि दिप्ती । दिपली चद्राची माधवी. । देवांगना त्या निर्दैवी पूर्वींचि केलिया राक्षसीं. ॥ १० ॥ शतक्रतूचें लोटोनि माप । सहस्रनयें भोगिजे रूप, । तिये शचीचा लावण्यदर्प । इयेतें पाहूनि पारुषे; ॥ ११ शंबरारीची भार्या । तेही गुणांविगळी केली इया, । तेथ दमयंती नैषध जाया । उणीव अपारें तियेसि; ॥ १२ ॥ यापरी ते मृगनयना सुलोचना, सुभगानना; । आंगींची प्रभा दिव्य रत्नां । वे देत सौंदर्य. ॥ १३ ॥ ते हेममचकीं निजमंदिरीं । उपविष्ट कुसुमांच अरुवारीं, । दासीत्व करीती विद्यावरी । अहोपत्र जवळि. ॥ १४ । सकळें सतोषें दोंदिलीं । रजविताति रंजका बोलीं, । तंव परमारिष्ट येऊनि पडिली । भ्रतारभुजा आंगणीं. ॥ १५ ॥ ते दणकेयाची दीर्घ ध्वनी पडली राजांगनेचा श्रवणीं; । तव दासी धांवूनि दहा जणी । गृहांगण पातलिया. ॥ १६ ॥ पाहतां पांचूवद्ध भूमिके । उमटले अशुद्धाचे टिवके. कक्षेपासौनि देदिछ, देखें, । काळदंडासारिखा. ॥ १७ ॥ दासी जाऊनि म्हणती, स्वामिणी, । परम अद्भुत पाहतां नयनीं. । नेणों कवणाच आंगणीं । वीरपाणि पडिलासे. ॥ १८ ॥ वाटे स्वर्गी जाटे झुंज, । त्याची खमार्गे पडली भुज; । कीं अमिषें नेतां अरुणानुज । ' गळूनि पडला ये स्थानीं." ॥ १९ ॥ चोज सांगती निजवार्तिका, । पासौनि कादंबपुत्थुल्लबालिका । ठेवूनि अंध्रियुगुळीं रत्नपादुका, । शीघ्र येती जाली. ॥ २० ॥ दचकु बैसला अति मानसा, । पोहटु पडला सुखेंदुमं- काशा, । स्वेद भंचळ, रावणस्नुषा । सांवरीत चालिली. ॥ २१ ॥

१. क. मुष्टी ठेवली २. म. कोदनोवट. ३. अ. व क. आविद्या. ४. अ. शंभर स्वेदा. ५. क. न सोवरीत.

तांबूल राकिलें वदनींचें, । अंजन ढळलें अश्रुकांचें, । वपुचुंबित स्वेदोदकाचें । मुद्दर बिंदु बाणले. ॥ २२ ॥ मुख्य सखीतें म्हणे सद्गद. । "रामा रावणा दारुण द्वंद । लागलें असे हानिप्रद । जनकात्मजेकारणें. ॥ २३ ॥ कुंभकर्णा ऐसे निशाचर । रणीं आटले महावीर, । अश्रुद्वनदीचे तुंबळ पूर । लंकेपुढां लोटले. ॥ २४ ॥ त्यांचा सूड घ्यावया, पहा हो; । युद्धा गेलासे आमुचा नाहो. । काय करील कैलासरावो । तें न कळे आम्हां." ॥ २५ ॥ ऐसें बोले नृपसुंदरा, । सवेग पातली गृहद्वारा; । तंव नागचिन्हांकित सामोरा । भुजदंड देखिला. ॥ २६ ॥ बैसूनि स्वहस्तें पतिहस्त पाहे. । म्हणे, " वल्लभें पाठविली बाहे. । एकलेया मार्गु न कंठे, माये, । वैकुंठींचा म्हणौनि." ॥ २७ ॥ ओळखिला इंद्रजिताचा हस्त । नवरत्नमुद्रिकामंडितु । वीरकंकणीं विराजितु । कीर्तिमुखें भुजदंडीं मिरवती. ॥ २८ ॥ म्हणे, " आजि जगडोळु जाला मातें, " । म्हणौनि वदन पिटिलें हातें. । भंवतीं नायकांचीं शतें । तेंहीं शंखस्फुरणें मांडिलीं. ॥ २९ ॥ चंड वातें कर्पूरजननी । उन्मूळौनि पडे जैसि मेदिनीं, । तैसी अचेतन आंगणीं । सुलोचना मूर्च्छागत. ॥ ३० ॥ पुढती आक्रंदौनि उठी, । नयनीं होय उदकवृष्टि, । सुटली मोकळी वीरगुठी । क्षितीवरि लोळतसे. ॥ ३१ ॥ ते वेळीं सखिया विचक्षणा । तेंहीं सांवरिली सुलोचना. । म्हणती "गतशोकु सांडूनि मना । पुढील सूचना विचारीं. " ॥ ३२ ॥ विवेकेंप्रबुद्धा उत्तरीं । सांत्वन करिती बहुता नारी; । परि त्या शोकार्णवाचिया लहरीं, । नावरती विचारा. ॥ ३३ ॥ उचलूनि प्राणेश्वराची भुज, । म्हणे, " मूळ, सये, आलीसि मज; । तरि मौनेंसीं कां! आपुलें गुज । सर्व सांग मजप्रति. ॥ ३४ ॥ मी होय पतिव्रता मनोभावें, । साक्ष असिजे सदाशिवें । तरि लिहूनि गुज प्रकटवावें, । अचेतन हस्तें हृदयींचें." ॥ ३५ ॥ म्हणौनि नाटकरसें मांडिली । पुढें ठेविली रत्नदौती; । चंचुमुखी योपिली हस्तीं । अपर्णापति स्मरौनि. ॥ ३६ ॥ लेखणी घेऊनि बोटीं । पसरिलें भूर्जपत्र भूतळवटीं, । निर्जीव

---

१. क. मद्दुर बुंद बाणिलें. २. ब. ख. क. निर्जी नेणवे. ३. अ. नामें लाहे.
४. क. विवेकप्रबोधकी.

हस्त लिही, हें सुंदरी। महाद्भुत वर्तलें. ॥ ३७ ॥ सर्व मुज सजीव जाली। अक्षरें सार्थकें पत्रीं लिहिलीं, । पुढती लेखणी भूमी पडली, । कौतुक पाहती सकळिका. ॥ ३८ ॥ पत्र वंदूनि शुभनयना। वाचितां आंसुवें आलीं नयनां. । साखिया सांडूनि बहु वचनां। आइकों ठेलिया निवांता. । ॥ ३९ ॥ "मंदरकटिबंधबंधुकुमरी, । वचन आइकें, प्राणेश्वरी. । माझिये देहांतअवसरीं। होतीसि दूरि ममप्रिये. ॥ ४० ॥ इन्द्रानि शत्रुनृदाचा वधु। राया रावणातें जय साध्यु । होवावयालागीं जातवेदु । प्रसन्न करितां हव्यमुखें, ॥ ४१ ॥ तंव फळप्राप्तीचां अवसरीं । दूदीं वेळा साधिली पुरी. । घाला घालौनि वानरवीरीं । होमु माझा विध्वंसिला. ॥ ४२ ॥ पुढें दारुण युद्ध मांडलें, । परि न फळेचि. दैवें[3] उणें पाडिलें; । म्हणौनि सौमित्रें साधिलें, । रणीं घेतलें जीवदान. ॥ ४३ ॥ मी संग्रामींचा दानशूर, । याचक सौमित्रु तो सत्पात्र, । विमुख नव्हेचि, दिधलें शिर- । दान तयालागीं. ॥ ४४ ॥ रणमंडळीं उभें शरीर, । रघुनाथदर्शना गेलें शिर, । तुजलागीं मूळ धाडिला कर." । ऐसें पत्र वाचीतसे. ॥ ४५ ॥ "तूं सतियांचें शिरोरत्न, । गुणधनाचें विशाळ गगन, । जीतां दिधलें तुज प्रमाण । तो आळवु असों देणें. ॥ ४६ ॥ मयांधकूपाचां परतीरीं । उभी तिष्ठतु असे सुंदरी. । हातु दिधला खेहें करीं । तुज बाहीरि निगावया. । ॥ ४७ ॥ म्हणौनि आतां सत्वेग येई, । बहुत लिहिणें नलगे कांहीं." । ऐसें पत्र वाचित वाचित मही- । तळीं पडे हरिणाक्षि. ॥ ४८ ॥ भुजा आलिंगौनि सुंदरी । रुदन मांडिलें दीर्घ स्वरीं. । तेणें थरारली धरित्री । भूधरकुमरीचां मोहें. ॥ ४९ ॥ म्हणे, "इंद्रजिता वीरश्रेष्ठा, । झुंझारांमाजी चक्रिवटा, । आजि अवचितं[1] वैकुण्ठ । गमन केलें मजविण. ॥ ५० ॥ तूं वीर्याचा महासमुद्र । धैर्य पडिला मृगेंद्रु, । प्रतापपुष्करीं सहस्रकर । रिपु खद्योतगणातें. ॥ ५१ ॥ कादंब- जाली. ॥

४ वी ओवीपुढें क प्रतीत पुढील दोन ओव्या आहेत:—कमनिया शंकरस्मरण । कास्ता, । ... पसन्न । अचेतन भुजेतें प्रार्थून । करावें लेखन यथोचित. ॥ ... मी भुज । लेहूं आरंभिलें निर्वाचि तुज. । निमेष नलगतां वाज ।

1. क. तुष्टी ॥ 2. ब व क. मंदरकटिबंधनामकुमरी. 3. क. दैव 4. ब. सांगतें किल्ला. रणीं कबंध आहे समर्थ । मज झाकणें आहे स्वर्गद्वार । म्हणौनि ... र." । ऐसें पत्र वाचिताहे. ॥

जी, रणसरोवरकुंजरा, । अरिकुलनिर्मूळकरा, । आजि सौमित्रकार्मुकआहारा । देह कैसें दिधलें ? ॥ ५२ ॥ कल्पांतकाळीं कृतांतमिठी । पडतां आंवळिमी त्याची घांटी, । तो तूं मानविया लक्ष्मणाचिया कंठीं । कैंवि सगळा गिळिलासि ? ॥ ५३ ॥ तुझा स्मरतां चपेटघातु । उभें आंग घाली ऐरावतु, । शाहारेन मरे निर्जरनाथु । तुझें नाम आइकतां, ॥ ५४ ॥ तेणें त्यां मानवियाचां शरीं । तनु त्यजिली वनांतरीं, । पेणें केलें दुरिचां दुरी । मज भवपुरीं सांडोनि. ॥ ५५ ॥ संसारसिंधूचां पैलपारु । मातें उत्तरितें अनर्घ्य तारूं, । तें आजि अजराजपौत्रमकरु, । तेणें मध्येंचि बुडविलें. ॥ ५६ ॥ अगाध ब्रह्मकल्पावधि । ऐसा माझा भाग्योदधि । सौमित्रकुमजें कुबुद्धी । आजि प्राशिलासि निजकरें. ॥ ५७ ॥ अहा कटकटा ! वोखटें जालें, । दिवसा चुडेयां खान पडलें, । अंतकें आहेवपण हरिलें, । तुटून पडलें गळसूत्र. ॥ ५८ ॥ एका इंद्रजितावीण । उद्वस दिसे त्रिभुवन; । त्यातें न देखतां प्राण । पळप्राय देहीं न राहे. ॥ ५९ ॥ माझी संकल्पनारिकेळी । कैसी उपडिली गोळांगुळीं ? । शीस नारिकेळ करतळीं । शोणित नेलें बुबेळें ! ॥ ६० ॥ तुज अमरांतका स्पर्शेल मरण, । हें स्वप्नींही नमनी मातें मन. । परि वैरियां भेदला बिभीषण । तेणें कार्य नासलें. ॥ ६१ ॥ अमित्रां फळिलें फळावर्म, । तेणें सौमित्राचें सुफळ संग्रामकर्म. । पुलस्तिकुळ होतसे भस्म । पौलस्तिपापपावकें. ॥ ६२ ॥ कपटें हरिली सीतासुंदरी, । शिकविलें नाइके दुराचारी, । त्याचेनि दोषें दुःखसागरीं । सर्व आम्ही बुडालों." ॥ ६३ ॥ ऐसे पौलस्त्यिपुशत्रुवनिता । शब्दीं विलाप करितां, । वृक्ष, वल्ली, गुल्मलता । त्याही गहिंवरती. ॥ ६४ ॥ पशुपक्षी करिती रुदनें; । गज, अश्व नेघति तृणजीवनें, । कमळें कोमाइलीं, उष्णें । उदकें जालीं तडागीं. ॥ ६५ ॥ तेन्हां विवेकरत्नाची खाणी । भानकळा नावें सोमांतिणी, । ते म्हणे, "सुलोचने, शाहणी । होऊनि सांडी अनुचित. ॥ ६६ ॥ जें जें दिसे तितुकी माया, । जैसी न सांडी निजांगीं छाया, । हे मर्यादा जाईल विलया । कल्पांताचिये अवधीं. ॥ ६७ ॥ जे जे ठायीं वसिजे प्राणें, । पूर्वें आवतिली तिये तिये स्थानें, । जैसे तरंग नुपजतां जीवनें । आधींचि व्यापूनि असिजे. ॥ ६८ ॥ मधुकुंभ नवच्छिद्र, भग्न, । आमोदकें भरला पूर्ण, । त्यांत नवल राहिलें जीवन । दिसे. तेंचि

अद्भुत. ॥ ६९ ॥ तयाचिपरी जाण, वो माये, । मरे तयाचें नवल काये? । शिथिल देहीं प्राणी जिये । हें आश्चर्य मानीं कां. ॥ ७० । तूं पतिव्रताशिरोमणि, । अति वल्लभसांगातिनी, । वियोगें सत्वाची हानि । शोकु करितां हों पाहे. ॥ ७१ ॥ आतां जाऊनि लंकापुरा । वृत्तांत सांगे दशवक्त्रा । तो आणौनि देईल शिरा । इंद्रजिताचेया तुजलागीं." ॥ ७२ ॥ ऐसी आइकौनि सखीची गोष्टि, । गृहांगणांतूनि वेगें उठी. । गृह प्रवेशली तंव दृष्टी । सर्व संपत्ति देखिली. ॥ ७३ ॥ जांबूनदकनकाचिया खोटी, । तेणें मांदुसा भरलिया साठी, । ज्या व्योमातुल्या वाड, पोटीं । सांठविती पर्वतां. ॥ ७४ ॥ वैडूर्य, माणिकें, मुक्ताफळें, । पेरोज, पुष्कराग, पाचि, नीळें, । गोमेद, प्रभाकर, प्रवाळें, । पद्मराग महामणि. ॥ ७५ ॥ गणित नाहीं ऐसेयां रत्नां, । मिती नाहीं अलंकारखेवणां, । दिव्यवस्त्रां, दिव्याभरणां । मोविती मना मुळवण. ॥ ७६ ॥ वाजी, वारण, पदाति, रथ, । शिबिका, दिव्यवाहनें रत्नमंडित, । कामगौवांचीं खिल्लारें दुभत । कोट्यनुकोटि घरीं. ॥ ७७ ॥ असो. हे संपत्तिजाति जितुली । रिद्धि, सिद्धि असे भरली. । एक वल्लभेविण त्यजिली । वमनप्राय मानसें. ॥ ७८[1] ॥ सज्जनीं सांडिली गुणदोषनिंदा, । निरासें त्यजिली घनसंपदा, । विरक्तें हेळिली प्रमदा । रंभेतुल्य जरी जाली. ॥ ७९ ॥ मराळीं वाळिजे शेवाळा, । शशिमित्र न सेविती गोमयगोळा, । तैसी पाताळफणीची बाळा । सर्व माग्या उबगली. ॥ ८० ॥ पांजरा होते सारिका, शुक, । ते गगनीं सोडितां करिती शोक. । मोर, तित्तिर, प्रीतिल्यावक । पायां भंवते भ्रमताति. ॥ ८१ ॥ जगादी प्रसनतीं वनबिडाळें, । कस्तूरिमृग, सारंग, नकुळें । सोडूनि म्हणे, "तुम्हीं सफळें । स्नेहें बहुसाल असावें." ॥ ८२ ॥ पुतळिया विचित्रा खणोखणीं । त्या निर्जीवा बोलती वाणी. । "आम्हां कवणां निरवूनि । कोठें जातेसि, जननिये?" ॥ ८३ ॥ "तुम्हांस निरविलें कंळमनाथातें. । चिरकाळ असा शोभिवंतें." । ऐसें बोलूनि त्वरें बहुतें । मंदिराबाहीरि निगाली. ॥ ८४ ॥ नमन केलें सदना ऊनु । शिबिकेमीतरी बाइला मुजु. । लंकेसि चालिली,

१. प, क. इंप, वा । २. ब. वमना; क. [illegible].

जेष पूर्वज । असे पतीचा. ॥ ८५ ॥ उच्चैःश्रवेयाची कनिष्ठ भगिनी । तैसी शृंगारिली दिव्य अश्विनी, । रत्नखचित कनकाभरणीं । अंगप्रत्यंग मंडित. ॥ ८६ ॥ तियेवरि आरुढे सुलोचना, । वेष्टित चालिली निशाचर-सेना. । वाद्यें पृथक् ध्वनींचीं नाना । गर्जतां गगन कोंदलें. ॥ ८७ ॥ भर्तारशोकाचे डोंगर । मनोंचि करीत चढउतर । परम सायासें सुंदर । लंकापुर पावली. ॥ ८८ ॥ दुर्गद्वारा अतरें आली, । तंव रक्षपाळां हडबड जाली. । म्हणती, " सुरांची मांदी उतरली, । वानरसाह्याकारणें. ॥ ८९ ॥ दक्षिणद्वारें करितील लाग, । दाटोदाटी घेतील दुर्ग; " । म्हणौनि मांडिली लगबग । सरसाविती आयुधें. ॥ ९० ॥ प्रतापरुद्रें राघवें तेणें । सुवेळाचळीं घातलें ठाणें; । त्याचेनि धाकें राक्षसगणें । गड रक्षिजे साटोपें ॥ ९१ ॥ द्वारीं दिधलीं वज्रकपाटें, । राक्षस गर्जती खिकाटें. । यंत्रें सज्ज करिती नेटें, । एक उत्कटें उसळताति. ॥ ९२ ॥ हुडां हुडां वळवळे वीर, । झळकती खड्गें, तोमर; । सिंहनादें येरांसि येर । धीर शब्दें देताति. ॥ ९३ ॥ एक चढौनि गोपुरशिखरीं । फुंकलिया रणमोहरी, । वळकाविला त्रिकूटगिरि । रघुनाथभयें. ॥ ९४ ॥ दूरि धोकौनि नृपसुंदरी, । पुढां धाडिले वेत्रधारी. । वचनीं ओळखी देतां पुरी, । क्षुद्र कपाटें उघडिलीं. ॥ ९५ ॥ भीतरीं प्रवेशली सुलोचना. । शीघ्र पातली गडपस्थाना. । सन्मुख देखौनि दशानना, । केलें चरणा दंडवत. ॥ ९६ ॥ तंव सासुरा आपुलां करीं । सुनेचें मस्तक उचलूनि धरी. । म्हणे, " माये, तुझां वदनचंद्रीं । नीलांकु दिसे चिंतेचा. ॥ ९७ ॥ ते काय सांगें गुह्य गोष्टि." । मीन्ये स्पर्शिली करतटीं. । येरी सद्गदित कंठीं, । शब्द न फुटे बोलतां. ॥ ९८ ॥ पत्र देऊनि दाखविला भुजु, । देखौनि चाचिरा राक्षसराजु. । अक्षरें वाचितां आत्मजु । रणीं अमित्रीं पाडिला. ॥ ९९ ॥ परिसौनि पुत्रनिधनवार्ता । गहिंवरु आला लंकानाथा. । सिंहासनींहूनि खाली ता, । वृक्ष जैसा, उलथला. ॥ १०० ॥ सुटली कबरीची मोकळी, । दाही मुगुट भरले धुळी. । पुरोहित, मंत्री होते जवळि । तेहीं सावरूनि बैसविला. ॥ १ ॥ गजबज परिसौनि गडपद्वारीं, । सत्वर पातली मंदोदरी. । एकाएकी मनें

१. म. यत्रे पार करिती नेटें, । धरसावती महाघोंडे. क. यंत्रद्वारपटपरांटें । महाद्वाळ मांडिला. २. क. पौरेसी उपाय.

ऐशीं सहस्त्र नारी । धांविनल्या. ॥ २ ॥ पुत्रमरणवार्ताबाणें । मंदो मूर्छित प्राणें. । आक्रंदली, कपाळ हाणे, । भूमी लोळे गडबडां. ॥ ३ मोहें सुलोचनेचां कंठीं पुत्तलिस्तपा घालूनि मिठी । शोकु करी, ते सृष्टी । आकांत अद्भुत. ॥ ४ ॥ अखया ग्रासिला वनचरें, । अमर मारिला मनुष्यवीरें, । अदृष्ट जालें पाठिमोरें, । सत्व शंकरु क्षोमला. ॥ ५ सुलोचना म्हणे, "आतां । पुरे नव्हे शोकु करितां, । मातें लावूनि मो पंथा । मागें करा मग्नचिंत. ॥ ६ ॥ जी, जी, वचन आइका, मामा; पतिशिर आणूनि द्या आम्हां. । मांडिलें व्रत मिळे धर्मा । ऐसें वे पाहिजे." ॥ ७ ॥ ऐसें रावणु आइकौनि, म्हणे. । "शीघ्र चमू सि करणें. । वैरी मारणें अथवा मरणें । आजिचे संग्रामीं. ॥ ८ ॥ इंद्र ताच्या शिरासरिसें । छेदीन आठां जणांचीं शिरें. । तियें कोणकोणा म्हणाल ऐसें, । तरि आइका, रे मंत्रीहो! ॥ ९ ॥ जेणें वधिला ज्येष्ठ पुत्रु तो आणि रामु मुख्य शत्रु, । तिसरा सुग्रीव वानरु, । चौथा कपटी म भ्राता, ॥ १० ॥ अखया वधूनि जाळिली पुरी, । त्याचें शिर छेदू शस्त्रीं, । बांधीन लंकानगरद्वारीं । सुरां, असुरां देखतां. ॥ ११ इंद्रजिताचें शिरकमळ । घेऊनि गेला गोलांगुळ । त्या ऋषभा टोंचूनि शूळ । दुर्गापारीं मवंडैन. ॥ १२ ॥ संग्रामीं शक्रारीच रथु । भंगिला तो ऋक्ष जांबुवंतु । आणि आठवा तो वाळीसुत मागां शिष्ट जो आला. ॥ १३ ॥ हे आठही आजि अरिरं करणें, । घेईन पुत्राचें उसिणें." । ऐसी होड बांधूनि, म्हणे. । "उठ वहिले संग्रामा." ॥ १४ ॥ कोपला देखोनि लंकापति । मंदोदरिया सूर हातीं । धरूनि नेली एकांतीं, । हितविचारु उपदेशी. ॥ १५ ॥ मयजा म्हणे, "वो सुलोचने, । आजि म्यां देखिलीं वोखटीं स्वप्नें. । इंद्रजित् लक्ष्मणें । रणीं मारिला, वो, ॥ १६ ॥ लंकेपुढां रावणाचीं शिरें । रावणें पाडिलीं निर्वाण शरें । वाहटूनि भेरी, मंगळतुरें । बिभीषणु राज्यीं स्था पिला. ॥ १७ ॥ तुटली नवग्रहांचीं बांदोडी, । देव सुटले तेतीस कोडी, । उभवूनि रामराज्याची गुढी । दिंडी पिटिली तिहीं लोकीं. ॥ १८ ॥ स्वप्न नव्हे हें, साच, माये, । येथूनि ऐसेंचि होईल पाहें. । या-

१. ब. बेरी. २. ब. मेडे.

त्यागीं तूंचि स्वयें जायें, । जें वर्ततां सुचैल, तेंचि करीं. ॥ १९ ॥ जानकीवदनारविंदभृंग । त्यासि प्रार्थूनि पतिशिर माग. । इतुकेनि तुझा स्वधर्म सांग । शीघ्र पावैल सिद्धीतें. ॥ २० ॥ झुंझतां रावणु पडैल रणीं, । शेखीं शिर नेदी चापशरपाणि. । उपवास करितां तूं, साजणी, । शणु पावसी चिरकाळ. ॥ २१ ॥ रावणु जितो तव होईल सोहळा, । मग अंधारु आमुच्या डोळां, । तिळांजळी द्यावेया कुळा । एकु बिभीषणु उरैल. ॥ २२ ॥ म्हणसी शत्रुसभे कैसें जावें, । मद्रूपें विश्व मोहो पावे ? । सीतेची साटी केली राघवें, । तरि मग काय विचारु ? ॥ २३ ॥ ऐसा विकल्प कल्पितां मनीं, । दोषक्षापदें संसारवनीं । चोंढूनि पाडिला जन्ममरणीं । आकल्पपर्यंत. ॥ २४ ॥ तरि तो अनाथ जनां अंगिकारी, । अडळेयांचा कैवारी, । एकपत्नीव्रतधारी, । मायबापु विश्वाचा ॥ २५ ॥ तो रघुराजु परमद्‌मूर्ति । शिर देईल देखौनि भक्ति, । शेखीं वरीं सायुज्यमुक्ति, । उचित गौरव लाधसी. ॥ २६ ॥ ब्रह्मचर्यस्थ सुमित्रासुत, । मारुती तरि ईश्वरांचा नायु, । बिभीषणु तरि आमुचा भ्रातु । सहज असे तिये ठायीं. ॥ २७ ॥ येरें वानरें ताराकांतु । वारूनि तुतें देईल पंथु, । आतां राक्षसराजेया मातु । सांगौनि शीघ्र जाइंजे. ॥ २८ ॥ तें आले सुलोचनेचां मना. । मग येऊनि वंदिलें श्वशुरचरणा. । म्हणे, "स्वामी, दीजो आज्ञा । सुवेळाचळा जावया. ॥ २९ ॥ शिर मागैन राघवाप्रति, । तया समवेत रिगैन सती. । वाट पाहतां शिणला पति । तयासांगातें जाईन." ॥ १३० ॥ रावणु म्हणे, "वो सुभानने, । आम्हीं आणिलें रामांगने । तेणें मत्सरें रघुनंदनें । हरण तुझें करिजैल. ॥ ३१ ॥ व्याघ्रवदनीं घालितां हातु, । वळे आंगीं ये अनर्थु; । तैसी वैरियां करीं वस्तु । शिरफळिया काय करावें !" ॥ ३२ ॥ येरी म्हणे, "दशवक्त्रा, । ऐसें अंतरीं धरणी विचारा, । परस्त्रीसि बळात्कारा । प्रवर्ते ऐसा कोण पापी ! ॥ ३३ ॥ पतिव्रतेचा अभिलाषु करी । तयातें विमुख पुरुषार्थ चारि. । शस्त्र घाउनि आपुलां उदरीं । प्राणु त्यजैन त्यापुढें" ॥ ३४ ॥ देखौनि रावणु म्हणे पुढती. । "शिर मागतां अमित्रांप्रति । सभे बैठतां छद्मपुरुषीं । निर्भयाचीं बुद्धि असावी. ॥ ३५ ॥ तुझिये रोंगसि देतां त्रासु । निर्दोळीन

---

१. अ. धुंपी.

भास्करवंशु." । येरी न मानेनि अनन्योपदेशु, । निके म्हणोनि निगाली. ॥ ३६ ॥ पांच शतें भाट वंदीजन, । सुवह वोलके, विचक्षण, । कार्यार्थ बोधें जाणती मन । वैरियांचें अवसरीं. ॥ ३७ ॥ वेष्टित दासी निजशत एक, । पुढां वेत्रपाणींचे दशक. । सहस्रार्ध, स्वहित लोक । अश्वारूढ पार्श्वशीं. ॥ ३८ ॥ ऐसी घेऊनि चालिली संगें । लंकाप्रदेशु टाकिला मागें; । तंव देखती जालीं शृंगें । तिये सुवेळेचीं. ॥ ३९ ॥ उतरले वानरांचे दळभार; । दुरौनि दिसती जैसे गिरिवर. । गर्जना करिती अहोरात्र । 'जयजय रघुराजु'शब्दें. ॥ ४० ॥ सभामंडपीं अयोध्यनृपु । जैसा कोटिमदनांचा बापु. । कीं अनंतरवींचा प्रकाशदीपु । एके ठायीं उजळिला. ॥ ४१ ॥ नवनीळघनाचेनि विरोरें । प्रभा दाविजे तुंगारपत्रें, । मृगांकमरीचि तैसीं चामरें । अंगदु, मारुती वीजिती. ॥ ४२ ॥ गरुडपक्षांचा फडत्कार, । विद्युल्लताप्राय पताकाचिर, । चित्रिलें दशावतारांचित्र । गगनचुंबित युगमार्गी. ॥ ४३ ॥ सौमित्र, सुग्रीव दक्षिणमार्गी, । बिभीषणु उपविष्ट वामार्गी, । त्याचिसमीप कृष्णांगी । जांबुवंत वैसलासे ॥ ४४ ॥ अष्टादशपद्में महावीर । उभे असती जोडूनि कर, । इतर वानरांचे भार । दाही दिशा थोकले. ॥ ४५ ॥ दुरौनि सभा देखिली नयनीं, । हृदयीं स्मरिला शूळपाणि । अश्विनं खालीं उतरोनि । चरणचाली चालके. ॥ ४६ ॥ आतां जानकीजीवनाप्रति । शिर मागेल युक्ती । तें पुढिले प्रसंगीं श्रोतीं । सावध चित्त परिसावें. ॥ ४७ ॥ इति श्रीयुद्धकांडकथारसु । सुलोचना अग्निप्रवेशु. । विनवी मुद्गलु कृष्णदासु, । रामापुढें उभी राहेल. ॥ १४८ ॥

---

## प्रसंग सत्तेचाळिसावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुस्वामिराजाय नमः । इंद्रजित उताविळे चित्तें । मार्गी घातिले रघुचमूतें । म्हणती, "जी, प्रभूचेनि सामर्थ्यें । विपरीत कैसें वर्तलें ! ॥ १ ॥ इंद्रजितु पडलेया रणीं ।

१. अ. वोधें जाणती वचन. २. ब. तुंगारपत्रें.

रावणु भयव्याप्त अंतःकरणीं, । जानकी आमुची जननी । पाठविली, स्वामिया." ॥ २ ॥ आइकौनि रामु बोले जगजेठी, । "पुढती मनासि आणा गोष्टि । रावणवधु नसता, दृष्टी । सीता न दिसे सर्वथा. ॥ ३ ॥ असो. सन्मुख देखौनि सुलोचना, । वीरीं खालुतिया घातलिया माना, । कां जे रामसभेमाजी कल्हणा । पापवासना नाहीं. ॥ ४ ॥ रामु अवलोकी विभीषणवदना, । तंव अश्रु आले त्याचिया नयना. । म्हणे, "देवा हे सुलोचना, । इंद्रजिताची कुळवधू ॥ ५ ॥ हे सत्वोदकाची पूर्ण गंगा, । परम सती, वंद्य त्रिजगा. । काहीं कार्यार्थ, मैथिलीरंगा, । आली गमत आहे " ॥ ६ ॥ तंव सभेसमोर पतिव्रता । दृष्टी निहाळूनि भार्गवजिता, । जयजयकारसहित समस्ता । लोटांगण घातलें. ॥ ७ ॥ कयाधू हिरण्यकशिपूची राणी । मस्तक ठेवी स्तंभोद्भवा चरणीं, । का दक्ष प्रजापतीची पत्नी । वंदी कर्पूरगौरातें, ॥ ८ ॥ तयाचिपरी शत्रुभाजा । आवडी वंदी रघुराजपदांबुजा. । आपुलेनि शीसभ्रमरीं पूजा । नमस्कारीं बांधिली ॥ ९ ॥ अगुष्ठद्वय धारूनि मुखीं । शेषकन्या आदरें चोखी. । नेत्रीं नखचंद्रींचीं पीयूषीं । चकोर जालीं मानसें ॥ १० ॥ हिरौनि बालार्कोंची कळा । तेणें रंगिलें पादतळां, । याळागीं तियेच्या नयनकमळा । स्पर्श करितां आल्हादु ॥ ११ ॥ पायीं जन्म जान्हवीजळा । जे शिरमुकुटीं सुमनमाळा, । म्हणौनि हृदयीं धरी वेल्हाळा । तापशमनार्थ. ॥ १२ ॥ केली लवणासुरा चकचुरी, । बळी राजा सूदिला विवरीं, । तो श्रम हरणार्थ सुंदरी । पाडलें चुरी करकमळीं. ॥ १३ ॥ मुनिमानससमांदुसेचें रत्न, । ठेवूनि करिती जीवेंसीं जतन, । सनकादिकीं साधनप्रयत्न । बहुकाळ करितां नपविजे, ॥ १४ ॥ अवचट स्पर्श होतां, पहा हो, । अहल्या पावली दिव्य देहो, । स्मरारीचा गरळदाहो । शांत जाला चिंतनें ॥ १५ ॥ तियें आजि देखिलीं दृष्टी। सडली जन्ममरणाची गोष्टि." । म्हणौनि वारवार गोरटी । मस्तक न्यसी रामचरणीं ॥ १६ ॥ आणिक एक गमत भावो, । रघुराजपदें ते प्रयाग पां हो, । कल्मषारिकैवल्यठावो । तीर्थराज दिसताहे. ॥ १७ ॥ सुनीळ केवळ जानुयुगुळ । तेचि यमुनेचें ओघ मळ, । नभो नळ यांकीचा मध्यळ । तेचि जान्हवी जगत्रय, ॥ १८ ॥ तळवा रंगली रत्नज्योति, ।

प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द; । चहूं प्रमाणीं दिसे अबद्ध. । अचेतन हस्त ल्हिी, हें सुबद्ध, । साचावारी नेवती. ॥ ५४ ॥ तरि याची प्रतीति हेचि, जीं रामा, । जरि हास्य करवील वक्रपद्मा; । तरिचि साच येन्हवीं उपमा । असत्याची पावेल. ॥ ५५ ॥ आइकौनि बोलें अवनिजाकांतु. । म्हणे, "जियेचेनि सर्वें पावला हस्तु, । ते शिर हांसवैल हे मातु । आश्चर्य बहु नव्हे. ॥ ५६ ॥ ऋषभ सुणावी वानरेश्वर. । तेणें त्वरा आणिलें शिर. । महाविक्राळ भयंकर, । बावरझांटी मोकळिया. ॥ ५७ ॥ खदिरांगार तैसा डोळा, आरक्तता दोहीं बुबुळां, । खांडमिरिया जैशा ज्वाळा । धूम्रांकिता तामसा ॥ ५८ ॥ हनुवटीतळीं लोंबे रसना । दांत फेंडगरी काढिले वदना, फुंफाट करि जेंवि सुपर्णा । देखौनि अजगरु. ॥ ५९ ॥ वाम लोचन उघडा दिसे, । सव्य चक्षु झांकिला असे, । ऋषभें भवर्टानि चक्र जैसें सतीपुढां टाकिलें. ॥ ६० ॥ येरी देखौनियां दृष्टीं । उचलूनि मेळविलें ललाटीं. । हृदयीं आलिंगौनि गोरटी । रुदन करी अधोमुखें. ॥ ६१ ॥ वळिया इंद्रजिताचें शिर । भूमीवरी आपटिती वानर ! । विमुख होऊनि शंकर । एन्हडें दृष्टी दाखविलें. ॥ ६२ ॥ मग पदरें पुसौनि करी निर्मळ, तळीं आंथुरिलें चेळांचळ; । त्यावरि ठेविलें शिरकमळ । वल्लभाचें आवडी ॥ ६३ ॥ मग म्हणे, "प्राणपति, निधाना । तुवां सत्य करावें या वचना; । जे तुमची शत्रुसेना, । 'धन्य ! धन्य !!' मज म्हणे. ॥ ६४ ॥ कैसें वैरि यांसि देऊनि यश, । साहिली जीवित्वाची आस ? । मज न पुसतां परात्र प्रदेश । सेवावया गेलेति ? ॥ ६५ ॥ दाशरथि आणि कपिपुंगव, पिशुन पाहती स्वर्गींचे देव. । तुम्ही हास्य न करितां, सर्व । सत्व जाईल माझें. ॥ ६६ ॥ मज देखौनि प्रीतिविनोदें । हांसवा तुम्ही नाना शब्दें, । आजि मौन कवणें संबंधें । धरिलें असे मजवरी ? ॥ ६७ ॥ अपराध असेल तो सांगिजे, । रुसणें सांडूनि अनुवादिजे, । माझें सतीपण दाखविजे । राघवेंसीं कपिकुळा. ॥ ६८ ॥ सौमित्रे शरें छेदिला कंठ । ते वेळीं जाहले बहुत कष्ट. । म्हणौनि मुखरंध्रीं कपाट । पडलें दुःखें हृदयींच्या. ॥ ६९ ॥ कीं अपूर्ण होमाचा वाघु । वाढला, याला ीं पुन्हें

१. ब. भूपरी. २. ब. करण्या ओढें. ३. ब. शव. ४. ब. न फुटे.

शब्दु; । कीं विजयश्रीविमुखतेचा खेदु, । जिवाआंतु वोटतसे ? ॥ ७० ॥ कीं सौमित्रहस्तें मृत्यु जाला, । साधुज्यसुखाचा निधि जोडला, । तेणें सहजें शब्दु कुंठला, । मौनमुद्रा पडली असे ? " ॥ ७१ ॥ ऐसी करुणा बहु भाकिजे, । परि शिरें हास्यमुख न होइंजे; । मग म्हणे विनोदुं अनुवादिजे, । जो कां हेतु हास्याचा. ॥ ७२ ॥ " होम करितां पुच्छीवस्तें । क्रूपमें केलें देहधर्मातें, । तें क्षाळावया तुमतें ।' असे मज्जन सारिलें ? ॥ ७३ ॥ शूर्पणखा तुमची पितृभगिनी । सौमित्रें गौरविली जनस्थानीं, । नाकीं ठेवविलें सुपाणी । तें नावेक दृष्टी अवलोका. ॥ ७४ ॥ तिये भगिनीचें भूषण । आहे कर्णनासिकीं सपूर्ण, । रणीं ठेला कुंभकर्ण । जनकानुज तुमचा. " ॥ ७५ ॥ ऐसा विनोद, कांहीं करुणा । बोले परि हास्य नये वदना. । मग म्हणे, " कटा कटा ! त्रिलोचना, । फुकट जिव्हा श्रमविली. ॥ ७६ ॥ रामरायाचिये सभेमाजी । लटिकेपण मज सालें आजि; । या मातभगाचीं ओझीं । मेरुतुल्य जालीं. ॥ ७७ ॥ पूर्वीचि सांगतेति मातें । तरि मी आणितें सहस्रमुखातें. । पाठीसि घालुनि तुमतें । पराभविता शत्रूसि. " ॥ ७८ ॥ इतुकें आइकोनि उत्तर । गदगदूनि हांसिलें शिर. । झाकिला होता उजवा नेत्र । तो पद्मन्यायें उघडिला. ॥ ७९ ॥ कुलपति म्हणती, "जी अयोध्यापति, । शिर हांसिलें कवणे युक्ती ? । देवो म्हणे समस्तांप्रति, । " हा श्रेष्ठार्थ कां नेणा ? " ॥ ८० ॥ क्षेत्रु सोचि सुमित्रासुतु, । श्वशुरहस्तें जामातमृत्यु. । शिर हांसलें, याचा अर्थु । ऐसा असे, वीरहो. ॥ ८१ ॥ प्रथम पाहिला लक्ष्मणु, । म्हणौनि उघडिला वाम लोचनु, । मज देखावया सव्य नयनु । उघडिला इये काळीं." ॥ ८२ ॥ सत्यचि मानलें वीरां समस्तां. । म्हणती, " हे परम पतिव्रता. " । तव श्रीरामाप्रति बोलता । सुमित्रात्मजु जाला. ॥ ८३ ॥ म्हणे, " दशवक्त्रारि, मम पूर्वजा, । हे बहु जन्मांची, महाराजा, । सोइरी, ऐसें मनमुमन सहजा । अतरीं साक्ष देत आहे. ॥ ८४ ॥ या प्रिय मुम्हातें विघडिलें, । जैंवि मृगीनिगळें मृगा वधिलें, । ब्रह्मांडतुल्य पात्र भरलें । पापोदकें, माझेनि. " ॥ ८५ ॥ रामु म्हणे, " वीरशार्दूळा, । कमळोत्पन्नकुळारांच्या फाळा, । क्षेत्रियांचा धर्मु आंजळा । नेमिला

१. ब. वाजत असे ? १. ब. प्रतीत नाहीं. ३. ब सिणविली.

असे विधानें. ॥ ८६ ॥ पळतया पृष्ठी न सिंपिजे[1] पाणि, । जयो जाळिप नेघावी तरुणी, । निष्कपट होऊनि अंतःकरणीं । धर्मयुद्ध करावें ॥ ८७ ॥ तेथ पिता, पुत्र हो, का बंधु, । संग्रामीं आलेया घडे वधु; त्यासि सर्वथा नाहीं बाधु, । याची साक्ष शास्त्रार्थ. ॥ ८८ ॥ म्हणाल ऐसी धर्मसरळी । तरि कपटें वधिला का वाळी? । ना हें अनुचितचि तिये काळीं । अंगिकारिलें आम्हीं. ॥ ८९ ॥ म्हणौनि, सौमित्रा, खेद माडा. । क्षत्रधर्मु हा ऐसाचि फुडा. । तुमचा पुण्याब्धीचा पवाडा । पुरुषार्थमुकुटीं[2] वसिन्नला." ॥ ९० ॥ सौमित्रु म्हणे, "सत्य, स्वामी, तुमचिया चरणसेवा आम्ही । सर्वदा धन्य संसारग्रामीं; । पापपुण्य नातळों. ॥ ९१ ॥ परि संसारीं वोखटा स्नेहो. । प्रियवियोगें वाटे प्रळयो. त्रिभुवनजनितांधकारसूर्यो[3] । म्हणे, "हे प्रतीति मज आहे. ॥ ९२ । पादपपापण गौतमींतटीं । सीता म्हणौनि धरितां पोटीं, । दशा वर्तली दृष्टी । देखिली त्वा, लक्ष्मणा." ॥ ९३ ॥ ऐसें बोलतां श्रीरामचंद्रु । कळवळोनि द्रवला दयाकुरु. । म्हणे, "मी उठवीन ईचा वरु । अमृतहस्तें करूनि. ॥ ९४ ॥ माझी थाज्ञा यमु, काळु वंदी, । नामेंचि नाशे जन्मव्याधि, । तो मी पीयूषकरानंदीं । इंद्रजिता जीववीन." ॥ ९५ ॥ तव सुलोचना बोले शब्दु, । "जी जी राघवा, कृपासिंधु, । निसरलासि वैरसंबंधु । माझें कारुण्य देखौनि. ॥ ९६ ॥ तूं जगदात्मा, अद्वय ब्रह्म, । निर्गुण, अवाप्तसकळकाम, । तुज द्वेषाद्वेष, हा भ्रम । ओरोपिती अज्ञानें. ॥ ९७ ॥ जरि उठविसी इंद्रजिता । तरि हा दुसरा जन्म मागुता." । बोलिलें देखौनि त्रैलोक्यनाथा । महावीर गजबजिले. ॥ ९८ । सकळ एकमुख होऊनि । लागती परस्परें कानीं. । म्हणती, "हें काय धरिलें मनीं । जें सर्वांचें अनहित?" ॥ ९९ ॥ सुग्रीव खुणावी ताराकांतु । बोला धा... नैर्ऋत्यनाथु, । भूसंकेतें जांबुवंतु । दुर्निवार विचारा, म्हणे ॥ १०० ॥ तव हनुमंतु साइनि भिडे । म्हणे, "हें औदार्य देव एकीकडे. । अघटित, मोडिलें तें, न घडे । वाल्मीकाचेनि वाक्यें. ॥ १०१ ॥ गाये म्हणौनि पाळिजे वाघु, । बाळकासरिसा पोसिजे उरगु, । पुढें तयाचा

1. ब. करिजे 2. ब. मुकुटी. 3. ब. त्रिभुवनी मुळिंतो अंधकार सूर्यो. 4. ब. माझेंचिदी.

वदीजनीं । जोहारिले दाशरथि दोन्ही. । मग वर्णना करीत सहस्वामिणी । नागरमार्गें निगाले. ॥ १९ ॥ शिर घेऊनियां हातीं । अनिळवेगें चामके पथीं. । लंकादुर्गा टाकेया हातीं । रणमंडळा पातली ॥ १२० ॥ सगार-नगरीचे तान्ह । निगाले केणें वस्तूचें भंडू, । तें मोक्षद्वीपालरा चालिलें कीड । शिरपटें फटकत. ॥ २१ ॥ अशिरी इंद्रजितु असे उभा, । दैवें लाजनी मद्दस्तमा. । भरती श्वापदाची सभा । मासवाटणी करिताते. ॥ २२ ॥ देखना धावोनि लागली पायीं, । आलिंगिलें दोहीं बाहीं । रत्नशिबिके वाऊनि मोई । समुद्रतीरा आणिला. ॥ २३ ॥ रमणीय त्रिकूटाचळनमूला । तळपनीनाम पुण्यसरिता. । ते सिंधुगामिनी उगवे सरिता । तेणें मुळें जाली असे ॥ २४ ॥ तेथ निर्मळजळ विस्तीर्ण कुड, । जेसें नगरदेवीचें तोंड, । आतु जिव्हा तेचि उमड । नवळ शिळा वन्हीच्या ॥ २५ ॥ त्यामाजी निजविली पतिरूपु । सारोनि जीवींचा सकल्पु, । चितासि मानिला नखरूपु, । अवदान तनु आपुली ॥ २६ ॥ अगरचंदनवेळकाष्ठें । ज्वाळा फाकलिल्या दिव्यवाटें. । गगनचुंबित वडवा-वाटें । दिशा धूम्रें दाटलिया ॥ २७ ॥ मग सुलोचना आपण । सिंधुसंगमीं करूनि स्नान । सौभाग्यद्रव्यें देतसे दान । गौरीहरासंन्यस्त. ॥ २८ ॥ गंधर्वकन्या, विद्याधरी । वागें देतसे कनकपत्रीं, । नाना रत्नीं अळ-कारीं । सुवासिनी पूजिलिया ॥ २९ ॥ रावणु पातला सहपरिवारीं, । सर्वांगनासीं मंदोदरी, । लंकावासी पुरुष, नारी । कौतुक पहावया आली. ॥ १३० ॥ अनन वाद्याचा आरावो, । पदोपदीं 'हर, हर, महादेवो,' । वेगीं मिरवत पातली पा हो । वर्मशिळे जवळिके ॥ ३१ ॥ कुढोनि प्रदक्षिणा केली, । वर्मशिळेवरि उभी ठेली, । तयांनि गगनदर्पणु निहाळी । तव आश्चर्य देखिलें ॥ ३२ ॥ विमानीं दाटले अमर, । कौतुक पाहती सुरवर, । सिद्ध, चारण, विद्याधर । एकें एक पातले. ॥ ३३ ॥ अहल्या महासती, । अत्रीची अनसूया पाहती, । लोपामुद्रा, अरुंधती, । घटोद्भव वसिष्ठसहित. ॥ ३४ ॥ मृगफर्मामीं दिसे पुलोमा, । तारेसीं पाहे बृहस्पतिसोमा, । जाहे घरीं व्योमा । वृंदा नरी उभा असे. ॥ ३५ ॥ इंद्र, इंद्राणी, इंद्रासन । हेमरताति देखिले विनयना, । येती सामोरिया, सुलोचना । रत्नागर्भ

१ व दिसे प्रकाशम

म्हणोनियां. ॥ ३६ ॥ करीं वेजनि अक्षतानीं । देवांगना उभिया गगनीं. । देवदुंदुभीचिया ध्वनी । पडले कानीं महाघोष. ॥ ३७ ॥ स्वाहास्वधांसी हुताशनु । कुंडी देखिला देदीप्यमानु । चन्द्रांशिरंग, त्रिनयनु, । सतहस्तीं उमा असे. ॥ ३८ ॥ वरि दिव्यदेही दीप्तिमंतु । दिव्य पुष्पकीं इंद्रजितु । विराजमान घवघवितु । वाट पाहत तिष्ठतु. ॥ ३९ ॥ ऐसें देखताचि दृष्टी । जीवें धांवोनि घातली मिठी. । देह साडिलें हव्यवाटीं । 'जय शंकर' म्हणोनि. ॥ १४० ॥ उडी पडताचि हुताशनीं । ज्वाळा उर्ध्व धडकल्या गगनीं. । कुडीं राक्षस पाहती नयनीं । परि कवणी नसेचि. ॥ ४१ ॥ चंद्रसूर्यमहेंद्रपदें । तुच्छ करूनि साडिती स्वात्मबोधें; । श्रीरघुनाथपदप्रसादें । सायुज्यसदनीं राहिवासु. ॥ ४२ ॥ आजि वडील पुत्र, वडील सून । दोघां केलीं बोळवण. । मंदोदरी, दशानन । शोक करिती आक्रोशें. ॥ ४३ ॥ मग वस्त्रें झाकोनि दश वक्रें । लंका प्रवेशिजे सहकल्त्रें. । नगरवासी स्तुतिस्तोत्रें । श्रीरामाचीं पढताती. ॥ ४४ ॥ "धन्य हृदय रघूत्तमाचें ! । निधान प्रकटलें सूर्यवंशींचें. । सार्थक केलें सुलोचनेचें । शिर पतीचें देऊनिया. ॥ ४५ ॥ येता संतिचा उद्भार । तरि कोण तयासि शकतें वारूं ? । परम धार्मिक प्रतापशूर । अपकीर्ति नातळेचि. ॥ ४६ ॥ थोर यश जोडिलें रामें, । तयासि दिग्विजयो संग्रामें." । ऐशीं लोक शब्दकुसुमें । तयाप्रति वर्षताति अपारें. ॥ ४७ ॥ ऐसें रघुरायाचें आख्यान, । एकें नामें निवारे जन्ममरण, । महादोषाचें होय दहन । श्रीरूपाद परिसता. ॥ ४८ ॥ येथ आक्षेपिजैल श्रोता जनीं । जे सुलोचना प्रवेशली अग्नि, । ऐसी वाल्मीकिवाणी । वदली नाहीं मूळकाव्यीं. ॥ ४९ ॥ तरि वाल्मीकि वदला नाहीं ऐसें । म्हणावया सामर्थ्य कवणा असे ? । शतकोटिग्रंथ त्रिजगीं वसे । तो कोणें, कैसा शोधिला ? ॥ ५० ॥ परि प्रस्तुत अग्निपुराणें । साक्षी बोलिजे व्यासवचनें; । तें न पाहतां विचक्षणें । कल्पिजा दोषु न ठेविजे. ॥ ५१ ॥ शुद्धमानें रघुनाथकथा । हे अमृतप्राय सर्वथा, । श्रवणें हरे भवव्यथा । हें सर्वथा सत्य मानिजे. ॥ ॥ ५२ ॥ इति श्रीयुद्धकांडरसु । संपूर्ण सुलोचनाअग्निप्रवेशु. । विनवी मुद्गलु कृष्णदासु । श्रोतेहो, कीजे अमृतपान. ॥ १५२ ॥

---

॥ १७ ॥ तेणें काये तुज आजिचा दिनीं । मक्षिलें घालूनि वदनीं ? । वैरी बैसौनि विमानीं । आनंदले असती ॥ १८ ॥ हसतुळिकेचा अरुवारीं । निद्रा करिसी निजमंदिरीं, । तो तूं आजि पृथ्वीवरि । रणागणीं पडलासि. ॥ १९ ॥ चंदन लावूनि तुझा पायीं । सुलोचना निववी हृदयीं, । त्या तुज रणागणाचा ठायीं । गीध चचुवे तोडिती. ॥ २० ॥ अति सौंदर्य मुखमंडळीं, । कर्णीं कुंडलें, माथा मुकुट झळाळी, । तें शिर आजि भरौनि धुळी । पडलें असेल कोठें ? ॥ २१ ॥ बहुत करिता संग्रामु । पावलासि बहुत श्रमु. । म्हणौनि आजि वीरधर्मु । साडूनि विश्राति केली ? ॥ २२ ॥ भूतें मक्षिला पैं काळु, । पतगें ग्रासिला प्रळयानळु, । मशकमुखातु भूगोळु । सामावूनि ठेला. ॥ २३ ॥ मनुष्या लक्ष्मणा हस्तें । जीवित सांडिलें इंद्रजितें, । आता कोणु रक्षेल कोणातें ? । वेरिया कोण पाठवू ? ॥ २४ ॥ मज कुंभकर्णादिक सर्व । मत्री प्रहस्तादिक राक्षसपुगव, । एकें इंद्रजितेसीं उर्णाय । तुळिता सकळिकांसि.' ॥ २५ ॥ ऐसें बोलतां भूमी लोळे, । जळ सांडिती वीसही डोळे. । जुडे सुटौनि मोकळे । कनरीभार जाले. ॥ २६ ॥ ऐसा सभामंडळीं राजा । पुत्रशोक करी साडौनि लज्जा. । पुढें प्रधानीं धरूनि भुजा । सुपार्श्व बोलिला. ॥ २७ ॥ म्हणे, "राया आवरीं वपु, । न करीं दीर्घस्वरें विलापु, । कन्याकुमरीं भरला मंडपु, । आकांतु आरंभिला. ॥ २८ ॥ रणीं पडला मुख्य राजतनयो, । लक्ष्मणु घेवूनि गेला जयो, । म्हणौनि दु.ख करितां, परि समयो । सर्वथा नव्हे, स्वामी. ॥ २९ ॥ विलाप करीं बैसलेत तुम्हीं, । जरळि दु खित होतों आम्हीं, । वेरी वधावे संग्रामीं हा विचारु राहिला. ॥ ३० ॥ गतशोकु साडीं, पुढा पाहें, । होणार तें होत आहे. । वज्रचित्त होऊनि पाहें । आयतापासौनि. ॥ ३१ ॥ गेलेयाचें दु.ख करणें घडे । जरि विलापु करिता मागुतें जोडे. । मिथ्या शोकु करिता जडे, । मूर्खत्वाचा डागु. ॥ ३२ ॥ म्हणाल मोहो झळकत थोर तरि हा कोण, जी विचारु ? । सर्वांसि मांडला सहारु, । एकुही वाचत न देखों. ॥ ३३ ॥ पहिले आटले बहुतेक, । उरलासे उरले कोंहीं एक, । तेहीं आटती हें कौतुक, । पाहों ठाकले दे ॥ ३४ ॥ प्रथमचि सीता पाविणीं । आणिली राम्यवुटवणीं.

'बुद्धिः कर्मानुसारिणी'। तुम्हांसि शब्दु काइसा?" ॥ ३५ ॥ ऐसें सुपार्श्वु बोलिला. । रावणु शोकु सांडूनि कोपला. । सीता वधीन म्हणौनि उठिला । पिशाचवत्. ॥ ३६ ॥ "सीतेचेनि प्रसंगें अखिल सागरातुल्य पैं समूळ । क्षयो पावलें राक्षसकुळ । सर्व सपर्यासहित ॥ ३७ ॥ सुंदरा नारी लंकेचिया, । जेंहीं देवांगना दासी केलिया, त्या सकळ विधवा जालिया, । त्यासि कारण सीता हे. ॥ ३८ ॥ हे सीता नव्हे, काळदंष्ट्र केवळ, । इया भक्षिलें राज्य सकळ; । आतां छेदीन इयेचें शिरकमळ, । टाकीन रिपुसागरीं." ॥ ३९ ॥ बोलतु ऐसा हरवरीं.। हृदयीं लोटताती दुःखल्हरी. । असिलता घेऊनि करीं । अशोकवनासि गेला. ॥ ४० ॥ ऊर्ध्व उचलूनि खड्गावळी । सीते उजू घाव घेतली, । तंव ते देखौनि दचकली । अकस्मात् तिये काळीं. ॥ ४१ ॥ जैसा भक्षावया आला काळु, । कां डसूं पातला दीर्घ व्याळु, । ना तो पुढें पेटला अनळु । भस्म करावया? ॥ ४२ ॥ कमळिणीवरि गजु पातला, । का घातुकर्ता औषधींजवळीं आला, । कां कुठारपाणि निकट जाला, । चंदनशाखानुळीं. ॥ ४३ ॥ बुद्धीवरि पातला कोपु, । का प्रीतीवरि विरोधु, । नातरि तपश्रीवरि प्रसिद्धु, । मदनु उठिलु आला ॥ ४४ ॥ रावणु सीतेनें ऐसियापरी । वधूं येत देखिला दूरि; । मग रामचरण हृदयाभीतरीं । स्मरती जाली. ॥ ४५ ॥ म्हणे, "स्वामी, लंकेसि आलेयातार्टी । तुज मज नव्हेचि भेटी; । मानिनी अबळ लल्लाटीं । अपमृत्यु मांडला. ॥ ४६ ॥ मज रावणु वधितो इये काळीं, । कोणु सांगेल तुम्हांजवळि? । शुद्धि करूं आला वानर बळी । तोही कैसेनि जाणेल? ॥ ४७ ॥ रामा, तुम्हीं आणि लक्ष्मणें । बहु कष्ट केले मजकारणें. । बहुत कपि गेले मरणें । बहु राक्षस मारूनि. ॥ ४८ ॥ बहुतेक कार्य सिद्धी गेलें । परि सिद्धि पावता विघ्न उदैलें, । जैसें गिरिमस्तक पावतां जालें । पुनरपि पतन भूमी. ॥ ४९ ॥ ऐसी भयातुर वेपिली । भावना करी हृदयकमळीं; । तंव रावणु येऊनि जवळि । खड्ग झणिता जाला. ॥ ५० ॥ ऐसें आरंभिलें दशग्रीवें. । जंव घाव सीतेवरि टाकावें, । तंव हस्तु धरिला सुपार्श्वें. । म्हणे, "स्त्री वधूं नये." ॥ ५१ ॥ आपणेया आड घालती सीता, । घेतली हातींची असिलता. । सुपार्श्व लागला बोलता. । म्हणे, "परियेसा, जी नृपति. ॥ ५२ ॥

धर्मशास्त्रक्रम बोलिला ऐसाः । एक स्थूलमरि लघुजीवहिंसा । तरि स्थूळ पशूचा वधु, लंकेशा, । समान म्हणिजे. ॥ ९३ ॥ ऐसे स्थूळ पशूचा वधु कोटिभरि, । ते गोहत्या एकी सरी. । कोटि गोहत्या एसियापरी । एकी ब्रह्महत्या समान. ॥ ९४ ॥ कोटि ब्रह्महत्याचा दोष एकीकडे । तुळिता एका यतीची हत्या वडे, । ऐसेया कोटियतींचा वधु, तरि जोडे । स्त्रीहत्या एकी. ॥ ९५ ॥ म्हणौनि, सर्वज्ञचूडामणि, । स्त्रीहत्या नाइकावी श्रवणीं. । करिता विचारा अत करणीं । पर्वतु पातकाचा. ॥ ९६ ॥ स्त्री, बाळक, शरणागतु, । पिशाच, गो, ब्राह्मण, व्याधिवंतु, । इतुकेया-वरि नुचलावा हातु । जाणतेनि पुरुषें. ॥ ९७ ॥ तू तरि जागता, पुण्यश्लोकु, । पुलस्तीचा कुळटिळकु, । हा स्त्रीवधाचा कळंकु । लागों नेदिजे सर्वथा. ॥ ९८ ॥ तू परम सदाचार, सुशीळु, । आजन्मपर्यंत उत्तम काळु । सारिला शास्त्रोक्त अमळु । ब्रह्मकर्मविषयीं. ॥ ९९ ॥ संहिता, पद, क्रम, ब्राह्मण, जटा, । या वेदाध्ययनाचिया पाच वाटा, । त्या तुज जिव्हाग्रीं, सुभटा, । अर्थु करतळामळु. ॥ १०० ॥ अगाध न कळे वेदु, । मग तुवा केला शाखाभेदु, । विस्तारला तुझा ज्ञानकंदु । लोकोपकाराकारणें. ॥ १०१ ॥ तुझेया गुणाचा ग्राहिक । विधाताचि जाण एक. । तुम्हासि राक्षस म्हणती लोक । नेणता मूढबुद्धि. ॥ १०२ ॥ सूर्य सर्वांसि प्रकाशवी । त्यापुढा धरिला उजळूनि दिवी, । तैसा मी बोलिलों, गोसावी । सर्वज्ञ सर्वथा. ॥ १०३ ॥ हे सीता वधूनि कोण फळ ? । काय राज्य धानेळ अखिल ? । काये पटेल राक्षसकुळ । उठेल पुनरपि ? ॥ १०४ ॥ आता जालें तेंचि प्रमाण, । होणार न चुके सर्वथा, जाण. । पुढ प्रभातें प्रतिपदी निर्वाण । चाला समर युद्ध करूं." ॥ १०५ ॥ ऐसें बोलिला सुपार्श्व, । निवेकें योजला दशग्रीव. । धन्य बुद्धीचें वैभव ! । सीतेसि उपयोगा आलें. ॥ १०६ ॥ सुपार्श्वें केला बोधु । तेसाचि रावणें आवरिला क्रोधु, । जसा येव्हा ग्धिता सिंधु । ओसरला मागें. ॥ १०७ ॥ पारधी नेस्तनि काताडी । हरिणीवरि शर सोडी, । तव अकस्मात् निळातोनि आडी । सर्प पायीं घातली. ॥ १०८ ॥ धेनुवरि व्याघ्र झेंपावला, । तव सर्पें सिंहें ताडिला, । तेसा रावणाचा यात्ना खटिला, । सुपार्श्वें तिये काळीं. ॥ १०९ ॥ धुधुवाटे वायु धावतु । स्वामि

ी पर्यंत, । तैसा सुपार्श्वे केला शातु । क्रोधु रावणाचा. ॥ ७० ॥
म्हणूनि करु । सुरटविला लंकेश्वरु, । ऐसें देखौनि हर्ष थोरु ।
ा जाला. ॥ ७१ ॥ जिव्हा व्यालित काळरूपु । आगावलूनि
ु, । तैसें सीतेसि जालें, लंकाविघु । सुरडोनि गेलेया. ॥ ७२ ॥
ळा परि सेवटीं । भय होतें सीतेचा पोटीं, । जैसा पूर वोहट-
टी । तीरीं थांबली असे. ॥ ७३ ॥ शिशपावृक्षाचा तळीं ।
देखौनि मैथिली, । त्रिजटा होती जवळि । ते बोलती जाली.
॥ "परिस, वो सीते सुमानने, । रघुराजराशटिळकागने, । देवाधि-
ा आज्ञे । होणार होऊनि ठेलें ॥ ७५ ॥ शतकोटि विस्तारें निकें ।
कथिलें वाल्मीकें. । तें सर्वथा नव्हे, वो, टटिकें । चरित्र श्रीरामाचें.
॥ असे भाविनी कर्मरेखा । जे रामा हस्तें मृत्यु दशमुखा, ।
ेमीपणा, सर्व सुखा । सुर प्राप्त होतील. ॥ ७७ ॥ तुजसीं
वटमें । भेटिजैल शीघ्रकाळें, शुभें, । कपिचक्रेंसीं समारंभें ।
सि जाशील. ॥ ७८ ॥ आत्मारामु सर्वत्र नांदतु । जो वसे
दयाआतु, । तो काय करैल घातु, । ऐसें घडेल कोठें? ॥ ७९ ॥
णें, यो गुणवते, । वधुद्वय जालें वन भ्रमतें. । झाडें, श्वापदें
, 'सीते ! सीते !'। ऐसें वदे रामु. ॥ ८० ॥ उत्पत्तिपालन-
र्ता । ऐसा जो, तू तयाची कांता. । तुज काळत्रयीं अभय, वो,
। साडीं सर्वथा, माये." ॥ ८१ ॥ ऐसें त्रिजटा बोलिली. । तेणें
ठ शंका सीतेची गेली, । जैसी गगनींची विजू निवाली ।
ोकळीमध्यें. ॥ ८२ ॥ उपरी मिथिलेश्वराची पुत्री । म्हणे,
जटे धन्य तुझी मैत्री ! । थोर पुण्यें घडली, धरित्री । साक्षी
आत्मारामु ॥ ८३ ॥ रामवियोगाचें दुःखओझें । तें त्वा वाटूनि
माझें. । या राक्षसचक्रातु तुझे । असाधारण गुण. ॥ ८४ ॥
खदिरवनातु पीयूषवल्ली । जैसी सदाफळ लागेली, । तैसी तू. त्रि
इये काळीं । राक्षसींमध्यें आहेसि. ॥ ८५ ॥ कैकटदेशामध्यें गया,
त्र अरण्यातु ठाया, । नाना परपार पावावया । नौका महाप्रळयीं,
॥ का पाषाणप्रासादीं देवी, । का भूतस्थळीं निधानठेवी, । नाना
र्शीं चड दिनी । चालता आधारभूत." ॥ ८७ ॥ ऐसें मधुरा

वाणी गौरवें । जानकिया त्रिजटेसि सतोषविलें बरवें. । पुढें सभेसि गेलेया दशग्रीवें । मग कैसें वर्तलें? ॥ ८८ ॥ अग्नि लागला वृक्षखडामीतरीं, । मध्यें गजु कोंडला तिये अवसरीं, । तुटौनि वेळुवाची जळत काडोरीं । येऊनि आगीं आदळती, ॥ ८९ ॥ का बुडत असता समुद्रोदरीं, । माजी सर्वांग फोडिलें जळचरीं, । नाना प्रळयीं मरणातकविवरीं । कोटि वृश्चिक लागले. ॥ ९० ॥ ऐसियापरी तिये समयीं । लंकेशाचें सर्वांग दु खाचा घायीं । तुटतसे, पडला प्रवाहीं । चितानदींचा. ॥ ९१ ॥ मन्त्रियाचेनि मतें निचारु । करूनि तियेकाळीं लंकेश्वरु, । सिद्ध होता सेनासागरु । तो युद्धा पाठविता जाला. ॥ ९२ ॥ रथी, अतिरथी सैन्यक, । अश्वस्वार, गजस्वार, अनेक । पदाति, ऐसें कटक । चतुरग सिद्ध जालें. ॥ ९३ ॥ ते दळ राजाज्ञेकरूनि वेगें । चालिलें पूर्वद्वारमार्गें. । वाद्यें, वीर गर्जती, तेणें स्वर्गें । भूमी येवों पाहती. ॥ ९४ ॥ परम दळाचा खटाटोपु, । जैसा प्रळयकाळींचा कोपु, । रण पावतां केला भग्नदर्पु । वानरीं चडघोपें. ॥ ९५ ॥ आता रघुनाथ रिपूचें दळ । शरघातें सहारेल सकळ, । तें श्रोतीं चित्त निश्चळ । करूनि परिसावें. ॥ ९६ ॥ इति श्रीरामायण-कथाखड । परम रसाळ युद्धकांड, । वाल्मीकिकृत दीपग्न चड । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ९७ ॥

---

## प्रसंग एकुणपन्नासावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानदाय नम । श्रीगुरुकाशिराजाय नम । पुढें राक्षसदळाचिया कोटि । लोटलिया रणागणाचा पोटीं. । हें देखौनि रघूत्तमें दृष्टी । कोदडा सीत चढविलें ॥ १ ॥ खवळले कपियूथप । करीं घेऊनि पाषाण, पादप । सहारिते जाले सकोप । अमित्रवाहिनीतें ॥ २ ॥ अश्वस्वार, गजस्वार, रथी । संडूनि मृत्युभयाची चुथी, । परमवेशें रणपथीं । सघट्टले परवीरांसीं ॥ ३ ॥ सिंहनाद उमटत वदनीं, । तेणें थरारत मेदिनी, । निजखड्गखणाणें वाहिनी । तोडिती वानराचिया. ॥ ४ ॥ आयुधयुक्त ऊर्ध्वबाहो, । प्रहार लागता नपवती मोहो. । अशुद्धें स्रवती देहो, ।

एकमेकां न लोटती. ॥ ५ ॥ पदाति गदामुद्गलीं भिडती, । अश्वारूढ त्यांसि, शूळ हाणिती, । गजनाहन सोडिती शक्ति, । रथिये वर्षति शर. ॥ ६ ॥ वानर पादप, पाषाण, शिळा । हाणिती शृंगाच्या चडळा; । परिघ, पट्टीश, भिंदिमाळा, । तेणें राक्षसांतें ताडिती. ॥ ७ ॥ ऐसें युद्ध परम निकरें । माडलें परस्परें वैरें. । याउपरी पहिलेंचि रघुवीरें । कार्मुक सिद्ध केलें होतें. ॥ ८ ॥ सूर्याची करानया शांति । पहिले काळासि तृष्णा होती; । पुढें महाप्रळयीं तृप्ति । करिता जाला स्वेच्छा. ॥ ९ ॥ तैसें प्रथमचि रामचंद्रें । अनुष्य सज्जिलें होतें गुणनम्रुद्रें, । युद्धा दळ पाठविलें राक्षसेंद्रें । त्यांसि सहारिता जाला. ॥ १० ॥ जैसा दावाग्नि धडकलेयावरी । एकला झाडखडाची रक्षा करी, । तैसा भगवतु निजशरधारीं । परसेना मारिता जाला. ॥ ११ ॥ सोडिले रुक्मपुख बाण, । तेणें नमु जाला सपूर्ण; । गजाश्वराक्षसशिरखडण । मांडिलें अकस्मात्. ॥ १२ ॥ संख्यारहित एके वेळे । गगनीं उसळती शिसाळें; । मर्यादा सूर्यसोममडळें । तेथवरि जाती. ॥ १३ ॥ नाना रामबाणीं पडलेया वेगें । निगाले मोक्षपदमार्गें, । त्यांसि काय शिरें पाठिलागें । बोळवित जाताती ? ॥ १४ ॥ कीं रामु मुक्तिदाता जाणोनि । कृतोपकार करवें मानिती मनीं; । म्हणोनि स्वशिराच्या गगनीं । गुर्वेडिया वोंवाळिती; ॥ १५ ॥ कीं रामें सूर्य देखिला. । म्हणे, "हा आमुचा मूळपुरुष पहिला;" । म्हणौनि पूजा समर्पिता जाला । राक्षसशिरपुष्पाची. ॥ १६ ॥ नाना आणिकही पक्षांतर. । सूर्या राक्षसा सदा वैर, । सध्याकाळीं निरंतर । महायुद्ध होतसे. ॥ १७ ॥ ऐसें जाणूनि रघुवीरें । तोडिजति राक्षसशिरें; । सूर्यासमीप आदरें । दापविलीं कैसीं ? ॥ १८ ॥ असो. ऐसियापरी प्रबळु । रामें मांडिला वीरश्रीचा खेळु. । गगनदेवता वाळिती गोंधळु, । भूतगण नाचती मोजें. ॥ १९ ॥ रणकर्कशें रामचंद्रें । बहु बाण सोडिले कोदडचक्रें. । चतुरंगदळाचीं रुंडमुंडें अपारें । पृथिवीवरि पाडिलीं. ॥ २० ॥ जैसें ऋषिनंदनाचेनि सुतें । क्षत्रिय मारिले शरघातें, । तयापरी नैर्ऋत्यनायदळातें । श्रीरामें सहारिलें. ॥ २१ ॥ चौं घटिकामध्यें कौतुकें । रावणें दळ मारिलें इतुकें. । सख्या बोलिली वाल्मीकें, । ते परिसा, पडितहो. ॥ २२ ॥ अयुत एक रथी धनुर्धर, । अयुताष्टक गजस्वार, । चौदा सहस्र वाजीस्वार, । पदाति लक्ष

दोनि; ॥ २३ ॥ इतुके रावणबाणीं । निःशेष पडले रणीं. । घायवट ते कोण गणी? । पळत गेले पुरीमध्यें. ॥ २४ ॥ रामबाणाचें घायवारें । लागलें, तेणें भये फुगलीं उदरें. । 'मारिलों, मारिलों!' म्हणौनि थोरें । बोंबें आराडती. ॥ २५ ॥ तिये काळीं थोर आकांतु । लंकेमध्यें वर्तला अद्भुतु. । तो सांगता उपमेरहितु, । परि प्रळयकाळु जैसा. ॥ २६ ॥ ऐसें रावणें देखिलें डोळां । कोपला मर्यादेवेगळा, । जैसा संन्निपातैलेया वरळा । रोगियासि होत असे. ॥ २७ ॥ विरूपाक्षु, युद्धोन्मत्त आणि मत्त, । हे राक्षसत्रय बळें उचबळत; । तयांप्रति रावणु म्हणे, "प्रस्तुत । तुम्ही जा युद्धालागीं." ॥ २८ ॥ ऐसी राजाज्ञा हों पुरे । तंव तिघे उठिले त्वरें. । एकैकु त्रिभुवना नावरे, । ऐसे तिघे चालिले. ॥ २९ ॥ सभेमध्यें राक्षसराणे, । देव दीन केले जेंहीं आगवणे, । रावणु तयांतें म्हणे. । "बैसोनि आतां कोण फळ? ॥ ३० ॥ समस्तीं संग्रामासि जावें, । मरावें का शत्रूसि मारावें, । यावेगळें प्राकृत विचारावें । ऐसें दिसत नाहीं." ॥ ३१ ॥ डोळत आसनीं ज्योवानळें । भ्रमवी रक्तवर्ण बुबुळें, । धूम्रधुधुकार सांडिजे व्याळें । तैसे श्वास खेळत घ्राणीं. ॥ ३२ ॥ जैसा प्रळयमेघांचा कडकडा, । तेंवा दशमुखीं वर्षरती दाढा. । शुभ्रदंतीं अधरोष्ठीं तानडा । क्षणातु रंग उमटला. ॥ ३३ ॥ तंव शुभलोचना आलिया समीप, । करूं लागलिया दीर्घ विलाप, । म्हणती अहा राया, जघन्यपाप । काय आचरलासि! ॥ ३४ ॥ तिये शूर्पणखेचेनि बोलें । सीताहरण कां पां केलें[1]? । राज्य सकळ बुडविलें । लंकापुरीचें कैसें? ॥ ३५ ॥ ते शूर्पणखा दीर्घ चांडाळी, । बुभुक्षित कटक उदरजाळी, । कामविकारें रामाजवळि । जनस्थानीं प्रवेशली. ॥ ३६ ॥ रामु कोटिकामचूडामणि, । शूर्पणखा कुमंगळ पापिणी, । क्षीरसमुद्रासि वैतरणी । मिळेल केंवि? ॥ ३७ ॥ तियेचेनि कुकर्मपर्वे । विटंबना केली रघुनाथें. । कर्णनासिक छेदिलें, तेणें अर्थे । खरदूषण गेले. ॥ ३८ ॥ चौदा सहस्रांसीं निशिरा । केलें प्रयाण यमपुरा. । तेणेंनि कारण मूळ थेरा । तिये पापिणीनें केलें. ॥ ३९ ॥ लंकेसि आली आक्रंदत, । रायापुढें सांगितलें विपरीत, । सीता आणितां प्राप्त । ऐसें मन जालें ॥ ४० ॥ सीताशा उपजवूनि ते काळीं । अग्नि

१. व व क सीताहरण पापिणी.

लाविला राक्षसकुळमूळीं, । ऐसी शूर्पणखा चांडाळी । राज्याभजती भोंविन्नली. ॥ ४१ ॥ राया, तुम्हीं नियेचेनि बोलें । का पा सीताहरण कपटें केलें ? । सवाधव पुत्र वधविले । नरवानरा करवीं ? ॥ ४२ ॥ ऐशा राक्षसागना तिये स्थळीं । येऊनि बोलती रायाजवळि. । पोटें, ललाटें पिटिती, धुळी । टाकिती मस्तकावरि. ॥ ४३ ॥ ऐसेयापरी रोदनबोल । करिती राक्षसागना बहुसाल, । तें रावणें प्रळयातुल्य । देखिलें नयनीं ॥ ४४ ॥ आटले पुत्र आणि बंधु, । वैरीं केला सकळांचा वधु, । लंकेमध्यें वाहिनीसिंधु । तोही आटौनि गेला ॥ ४५ ॥ "आता हाचि बुद्धीचा निश्चयो, । रिपु सहारौनि पावों जयो, । नाहीं तरि गेला तनयो । तेणेंचि मार्गें जावों." ॥ ४६ ॥ ऐसें बोलौनि राक्षसेंद्रु । आवेशला, जैसा प्रळयरुद्र, । वेळा साडी क्रोधें समुद्रु, । तैसा निजासनौनि उठिला. ॥ ४७ ॥ जळत श्वास नाकीं, तोंडीं, । दशकनयद्वारें साडी, । जैसा शेषु क्षोभलेया साडी । धुधुकाराच्या भरोवरी. ॥ ४८ ॥ सेवकातें म्हणे वाचा. । "रथु आणा वज्राचा. । अश्व योजा जयाचा । महावेगु असे. ॥ ४९ ॥ विरूपाक्षा, युधोन्मत्ता आणि मत्ता, । तुम्ही सिद्ध होऊनि त्वरिता । उत्तरद्वारमार्गें समस्ता । सेनेसहित चाला." ॥ ५० ॥ ऐसें लंकानाथु बोले, । तव ते त्रय रथारूढ जाले, । वाहिनीवेष्टित चालिले । परम खटाटोपें. ॥ ५१ ॥ काळ, कृतांत आणि यम । जाला तिहींसीं समागम, । तैसे ते तिघ निरूम । रायासि दाखवित जाती ॥ ५२ ॥ दशग्रीव आरुढे निजरथीं, । सरिसा चालिला तेचि पथीं, । अगळगाचीं शतें पालथी । पृथ्वी घाळू शकती. ॥ ५३ ॥ तुबळ सेना पुढें, मागें । उग्र जाती अति वेगें, । जैसे मार्तंडमडळासगें । मरीचिसमूह, ॥ ५४ ॥ का वज्र वेष्टित तीक्ष्ण धारीं, । का प्रळयाग्निसवें ज्वाळा थोरी, । नाना भूतनाथासगें भयकरी । चळथा भूतगणाचिया ॥ ५५ ॥ पुढा रणवाद्याचा एकवळा । जाला मर्यादेवेगळा, । तेणें घोषें दिग्मडळा । सपूर्णता जाली. ॥ ५६ ॥ गज, रथ, तुरग, पदाति वीरीं । चालिजे उफाळत राजमार्गीं. । रजु उचवळलें, तेणें अबरीं । आदित्यु आच्छादला ॥ ५७ ॥ शस्त्रास्त्रांची साउली । निबिड कटकावरि पडली, । जैसीं अभ्रें आकाशीं मिळालीं ।

---

१ च व क निजासनींहूनि

वरुनाचो करावया. ॥ ५८ ॥ पुढें अपशकुन देखिला नयनीं; । परि वीरासि शंका नाहीं मनीं. । वीरश्रियेचेनि मेदिनी । स्थिरता कैंची असे ? ॥ ५९ ॥ विरूपाक्षु, युधोन्मत्त, मत्त । हे सैन्यमुखीं बळवंत; । सिंहनाद करूनि अकस्मात् । विरूपाक्ष पुढें जाला. ॥ ६० ॥ तो पुढें जालेयावरि । रावणहृदयाभीतरीं । लोटली क्रोधलहरी, । अरिदळ असह्य जाऊनें. ॥ ६१ ॥ मग गर्जन केलें भयानक, । तेणें चकित उभयसैन्यक. । महावीर रामलक्ष्मणादिक । आश्चर्य करूनि, सिद्ध जाले. ॥ ६२ ॥ तंव सेनेचां मुखमंडळीं । होते कपिवीर अतुर्बळी; । तेहीं सिंहनाद करूनि तिये काळीं, । रावणा उजू धांविन्नले. ॥ ६३ ॥ चंडशिळा, अद्रिद्रुमशृंगें । झेलिती वीरश्रियेचेनि रंगें. । दशाननावरि चडवेगें । टाकिते जाले. ॥ ६४ ॥ ऐसें देखौनि दशकंधरें दृष्टी । घेऊनि चापदशक मुष्टी, । ओढूनि केली वृष्टि । बहुत बाणाची. ॥ ६५ ॥ मुटलिया शरांचा कोडी, । संख्या बोलिजे तितुकी थोडी. । ते बाणक्षणवाकुडी । वानरसिंधूवरि वरुषे. ॥ ६६ ॥ केलें रावणेंशरजाळें । कठीण आरंभिलें ? एके वेळें । कपींचीं करचरणशिसाळें । उसळतीं गगनोदरीं. ॥ ६७ ॥ वानर खोंचले बहुसाळ । जे दीर्घदेही पर्वतातुल्य. । कोण किती बाणीं वीरमेळ । भेदिले, तें आइका. ॥ ६८ ॥ अष्टादश बाणीं गंधमादनु, । नवा बाणीं नळु आणि अग्निदत्तु, । अंगदु वीरपंचाननु । अष्टादशकीं. ॥ ६९ ॥ बाणत्रयीं ऋषभु भेदिला, । मैंदु शरचौकीं खिळिला, । शरभु पृथ्वीवरि पडिला । ऐकेचि बाणघातें. ॥ ७० ॥ शरत्रयीं हनुमंतु, । चतुर्दश बाणीं जांबुवंतु, । दोघे चौ चौ बाणीं वीर्यवंतु । ऐसा विंधिता जाला. ॥ ७१ ॥ लक्ष्मणावरि टाकिले दोनि शर । बज्रा ऐसे अति कठोर. । रघुनाथावरि पांच शर । सोडूनि, गर्जिन्नला. ॥ ७२ ॥ बहु.कदन कपिवीरांतें । रावणु करिता जाला शरघातें. । रुधिरनदी उचंबळली, तेणें प्रेतें । वाहों लागली. ॥ ७३ ॥ वीर बहुसाळ बहुबाणीं । मर्मस्थळीं पाडिले धरणी. । हें देखौनि अंतःकरणीं । सुग्रीव कोपला. ॥ ७४ ॥ वैरियाचें देखौनि आगळें । उचलले दुणेडेनि बळें. । म्हणे, "यावेपा निर्लाजगळें । सामर्थ्य दाउवीन आता." ॥ ७५ ॥ म्हणोनि सुग्रीवें याकारणें । रावणाचेनि अपकिरणें । कोपौनि गर्जन दारुणें ।

वृक्षपाणि पुढें जाला. ॥ ७६ ॥ वेगें चालिला सूर्यसुतु, । जैसा पायांचा पर्वतु. । रावणातें हांकितु, टाकितु । सेनामुख सांडूनि आला. ॥ ७७ ॥ पृष्टी वानर निजगडे, । जे वीर्यसागर वळियाडे, । जे गर्जोनि स्वर्गीचे हुडे । पृथ्वीवरि पाडूं शकती. ॥ ७८ ॥ एकाचां हस्तीं चड खड्ग, । एकीं घरिलीं लोहखट्वांगें, । एकीं पाषाणशैलशृंगें, । एकीं गदा, शूळ, परिघ, ॥ ७९ ॥ एकीं घेतलिया भिंडिमाळा, । एकीं शतनिया निशाळा, । एकीं तोमर, मुद्गल, तेजाळा । असिलता, सुरिया, ॥ ८० ॥ एकीं घेतलीं पर्वतशिखरें, । पट्टीश, चक्रें, फरश, कुठारें, । एकीं साल, तमाल गर्भारें । घेतले असती. ॥ ८१ ॥ ऐसें कपिचक्र स्वामीसरिसें । युद्धा निगालें रुद्रवेशें; । भूतगण अद्भुत जैसे । भूतनाथा परिवेष्टित. ॥ ८२ ॥ कल्पांतिकिकाळिया देतां, । तेणें थरारत असे क्षिति; । जैशी मकरालयीं महानदी । नौका डोलत असे. ॥ ८३ ॥ ऐसा सुग्रीवाचा रणडळावा । जैसा लवणार्णवांचा हेलावा; । हें देखोनि दशग्रीवा । अति आश्चर्य वाटलें. ॥ ८४ ॥ऐसा देखोनि कपिकटोळु । राक्षस नामा महाबळु, । तो पुढें जाला विशाळु । लंकेश्वरा देखता. ॥ ८५ ॥ बैसला होता गजावरि, । जैसा गिरीपाठारीं दुसरा गिरि, । नाना मेघावरि मेघु अंबरीं । उदैला जैसा. ॥ ८६ ॥ तेणें शीघ्र सुग्रीवा उजू । चोटिला निजवाहन गजु. । शूळु घेतला तेजोमय, विजू । लखलखीत जैसी. ॥ ८७ ॥ जैसा समुद्राचा लोटु । तैसा गज आला सुग्रीवा निकटु; । तव वानरेश्वर सुभटु । कैसें करिता जाला ? ॥ ८८ ॥ घेतली चटशिला वर्तुळ, । पाणितळीं झेलिली, जैसें नारिकेळ, । पाडूनि कुंजराचें कपोळ । दिधली वज्रप्राय. ॥ ८९ ॥ घायासरिसी तिये अवसरीं । नदोन्मत्तासि आली गिरीरीं, । फिरला चक्राचियापरी । पृथिवी तळीं पडला. ॥ ९० ॥ गजु गतप्राण जालेयावरि । महाबळु आला भूमीवरि, । कोपें अधरोष्ठ निपे अनसरीं । शूळदंतीं छेदिले. ॥ ९१ ॥ शूळ साहितु ऊर्ध्व हस्तें. । म्हणे 'घे, घे' शब्दें सुग्रीवातें; । टाकिला, जैसें दवातें । काळें प्रेरिलें. ॥ ९२ ॥ तो शूळु भरता उदरीं । कपींद्र उडाला अंतरीं, । पतन पडता साचके करीं । धरिला इक्षुदंडु जैसा. ॥ ९३ ॥ तो शूळु फर्ळाण वज्रप्राय । काष्ठ ऐसा केला भागद्वय. । तेणेंचि गदावातें हृदय । फोडिलें महाबळाचें. ॥ ९४ ॥ महाबळाचें अंग-

लग । सैन्य होतें चतुरंग; । तें आणि शाखामृग । परस्परें संघट्टले. ॥ ९५ ॥ 'हा हा!' 'हे हे!' 'घे घे!' शब्दें । प्रहार हाणिती दीर्घ द्वंद्वें. । आवेशें उचलिती पदें । पवनापरीस पुढें. ॥ ९६ ॥ ऐसें माजलें परम युद्ध, । भूमी पडत आंगींचें अशुद्ध, । एकएकाचे हाते कबंध । होऊनि पडले भूमीवरि. ॥ ९७ ॥ इति श्रीरामायणकथासागरु, । तरिसतेया भवार्णवींचें तारू, । वदला वाल्मीकि ऋषीश्वरु । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ९८ ॥

---

## प्रसंग पन्नासावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । ऐसा संग्रामु बहु माजला । वीरें वीरु रणा आला. । हें देखोनि विरूपाक्षु बोलिला । सारथियाप्रति. ॥ १ ॥ म्हणे, "घोरविक्रमें शाखामृगीं । नैर्ऋत्य रिघिले रणरंगीं. । तयांतें घालूनि पृष्ठिमार्गीं । पुढें रथु नेईं वेगीं." ॥ २ ॥ ऐसा विरूपाक्षु बोलों सरे । तव सारथियें सोडिले वागदोरे । साठ वारवां देऊनि त्वरें । चालविले पुढें. ॥ ३ ॥ राक्षसदळा घालूनि मागें । रथु लोंपावला वातवेगें. । पुढें सुग्रीवाप्रति प्रसंग । संग्रामु माडला. ॥ ४ ॥ रचना प्रथमचि संग्रामीं । विरूपाक्षु राहिला मध्यगुल्मीं. । त्यासि प्रतिमल्लु रणभूमीं । सुग्रीव राहिला होता. ॥ ५ ॥ तरि काकतालीयन्यायें जाला, । तोचि विरूपाक्षु युद्धा आला. । देखोनि सुग्रीवु म्हणे, "भला । सांपडलासि आजि! ॥ ६ ॥ बहुता संग्रामा शेवटीं, । विरूपाक्षा, रणभूतळवटीं । तुज मज जाली भेटी, । जैसी सर्पा सुपर्णा. ॥ ७ ॥ आतां जीविताची आशा । सांड, रे कुबुद्धि राक्षसा, । व्याघ्राचिये दृष्टी वृषभु जैसा । पडे आया यतकाळीं." ॥ ८ ॥ ऐसीं सुग्रीवाचीं वचनें । विरूपाक्षाचि आगळीं अति मानें. । म्हणे, "बोलिलासि जें जें वदनें । तें साच करीं वहिला. ॥ ९ ॥ तू कुगसी आपुलेनि बळें । नृपापुढे मासा गळें; । परि कुंभकर्णाचेनि कक्षामळें । मळला असती. ॥ १० ॥ प्रथमचि लंकेचा गोपुरीं । लंकेशें ताडिलें स्वाप्रहारीं. । इंद्रजितें बाणीं पृथ्वीवरि ।

मृतपशुप्राय पाडिलें. ॥ ११ ॥ तुझिया वधूतें तुजलागीं । बहुत विटंबना केली त्यांगीं. । भयें पळोनि वसशी शृंगीं । मातंगगिरीचा. ॥ १२ ॥ पत्नी तुझी, पाळेखादरा, । नाम आइकों तियेचें तारा, । तियेचें प्रथमयौवन त्वरा । भोगिलें वाळीनें. ॥ १३ ॥ परपुरुषार्थे मिळाली । ते स्त्रतारचर्या तुज प्राप्त जाली, । जैसी जीर्णांगीं समर्पे साउली । तें निर्माल्य टाइला ॥ १४ ॥ मरण पावलेया तुझा बधु, । रमा नाम तयाची वधू, । ते तुवांही सेविली, विधिनिषेधु । तुम्हा मर्कटांसि नाहीं " ॥ १५ ॥ ऐसें विरूपाक्षाचेनि बोलें । सुग्रीवाचें हृदय भगलें. । दशन ओष्ठीं रोवूनि, उपटिलें । चंड, विशाळ तरुतें. ॥ १६ ॥ स्यारूढ महारथी विरूपाक्षु । सुग्रीवें साडिला तयावरि वृक्षु, । तंव तत्क्षणीं नैर्ऋत्यदक्षु । सधान करिता जाला. ॥ १७ ॥ व्योमचुंबित तो विशाळु । शाखांकित पल्लवाळु । छेदूनि साडिला तरुगता वेळु, । अनर्ने श्रमु जना. ॥ १८ ॥ वानरेंद्रे सवेंचि तियेकाळीं । शिळा गिरिचिरी करतळीं, । देऊनि नीन चारोळी । ' घे घे ' म्हणोनि टाकिली ॥ १९ ॥ ते चटशिळा चंद्राकार । भ्रमत आली पैं समोर. । देखोनि विरूपाक्षें शर । सोडिले शतानुग. ॥ २० ॥ तेंही बाणीं ते शिळा चूर्ण जनरीं केली शतखंड, । तयेंच शिरेंनि उदंड । वीर व्यथा पावले. ॥ २१ ॥ सवेंचि विरूपाक्षें सायकें । सुग्रीवावर बळाधिकें । शर सोडिले महातरुकें । अमित्रदमन, मरले ॥ २२ ॥ तें सधान नव्हेनि मग । कपींद्रें उपटिलें शैलशृंग, । जैसें यथार्थ अर्धांग । भंगरावळ्याचें ॥ २३ ॥ तें भ्रमवोनि घुमावळें । विरूपाक्षु रक्षिला शोणितळें । उठोनि टाकिलें स्वताळें । सिंहनादशब्दें. ॥ २४ ॥ देखोनि राक्षस सधान करी, । तंव गिरिवर नलें स्यावरि । स्यसहित स्यामीतरीं । विरूपाक्षु निमाला. ॥ २५ ॥ ऐसें देखोनि लंकेश्वर । सवेंचि धरिला विचार । म्हणे, " दुःख मी कोणकोणाचें करूं ? । कोण आता वांचेल येथें ? ॥ २६ ॥ विनाशकाळाचें वळ गाटें, । आरंभलें कठीण एकटें. । एक जाती एकापुढें । देवाचें दर्पहरण " ॥ २७ ॥ ऐसें रावणें मावूनि रणरंगीं । मनेंचि मारिलें दरखेयाजागीं । पुढें युगंमत्तु होता दक्षिणभागीं । तयाकडे पाहिलें ॥ २८ ॥ " युवोन्मत्ता गा, ये समयीं । म्या सभारा धरिली तुझा ठायीं । जय वैरि वधूनि देईं । उत्तम सुखातें. " ॥ २९ ॥ ऐसें बोलिलेया लंकेशें ।

युधोन्मत्तु उचंबळला आवेशें । म्हणे, " स्वामी, तुम्हीं मज बहुवसें । समयालागीं पाळिलें. ॥ ३० ॥ तरि तो समयो आला आजि; । आतां प्राण चीन स्वामिकाजीं. । येथ अंतरेन तरि निरयामाजी । पडेन पूर्वजांसहित." ॥ ३१ ॥ ऐसे युधोन्मत्ताचेनि बोलें । रावणा सुख वाटलें; । जैसें घांयटातें प्राप्त जालें । उदक सुशीतळ. ॥ ३२ ॥ कां वणवेंचि आहाळला याळु । तयावरि ढळला मळयानिळु; । नदीपुरीं बुडे त्यासि सांगाळू । गंडियेंचा बोभाइला; ॥ ३३ ॥ कां असाध्य रोगियाकारणें । वैद्यु बरवें करीन म्हणे, । तैसें रावणा वाटलें बोलणें । युधोन्मत्ताचें तिये काळीं. ॥ ३४ ॥ पाहतसे नैर्ऋत्यनाथु । बोलत बोलत पुरुषार्थु । युधोन्मत्तें नेला रथु । सैन्यमुखमंडळीं. ॥ ३५ ॥ हस्तु श्मश्रूनरि घातला, । सर्वेचि भुजु आफळिला, । सिंहनादें सुग्रीवु हाकिला । शर घाऊनि माथां. ॥ ३६ ॥ म्हणे, " मर्के, रे कपि, घेतली गेळ; । विरूपाक्षुवधें चढलासि बहुसाळ; । आतां तुज दिधली सेल । संग्राम इच्छा करीं. " ॥ ३७ ॥ ऐसें ऐकोनि वानरेश्वरें । युद्धालागीं होइजे पुढारें. । म्हणे, " वरळतां तुम्ही निशाचरें । मरणकाळीं ऐसीचि. ॥ ३८ ॥ वंध्यापल्लींचीं सुमनें । तैसीं निर्फळ तुमचीं वचनें. । वृथा पाळिलीं दशाननें । आजन्म शरीरें तुमचीं. ॥ ३९ ॥ रणदेवतांचा रणांगणीं । मांसभक्षका दिधली धणी. । तुम्हां राक्षसपशूंची खंडणी । रावणपर्यंत मांडली. " ॥ ४० ॥ ऐसें सुग्रीव बोलोनि राहे; । तंव युधोन्मत्तु म्हणे, " सरिसा पाहें. । पृष्ठी देवों नको, संधान साहें, । शर सुटले माझे. " ॥ ४१ ॥ ऐसें बोलौनि युधोन्मत्तें । सोडिलीं तीक्ष्ण शरांचीं शतें; । जियें लागत क्षणीं पर्वतांतें । चाळणी करूं शकती. ॥ ४२ ॥ अतिवेग, संधान, सुंसाटघोषें । ऊर्ध्व धाविन्नले आकाशें; । तें सुग्रीवावरि पडलें, जैसें । गृध्राचें अधोनख. ॥ ४३ ॥ लागलीं शल्यशरांचीं मुखें, । साहिलीं सुग्रीवें वीरश्रिया सुखें; । जैसी विवेकियें संसारदुःखें । प्राप्त जालें-यावरी. ॥ ४४ ॥ कां तारुण्यदशेमध्यें ब्रह्मचारी, । लागती कामशर परि हृदयीं न धरी; । नाना सर्पपाश पडले मन्हाददारीरीं । न बाधींचि चित्त. ॥ ४५ ॥ ऐसा कपि वीरवाडु । शर साहोनि फोपटा बहु; । जैसा कुंजरावरि उठिला सिंहु । विदारावयाकारणें. ॥ ४६ ॥ भुभु:कार केला अति कर्कश, । तेणें परारलें आकाश; । दचकले सर्वे राक्षस । रोमांच उभे

राहिले. ॥ ४७ ॥ पुढें शाद्दु दिधला भूमंडळा, । दोर्दंडें तुळिली प्रचंड शिळा, । युधोन्मत्तासि लक्षूनि डोळां । सोडिली चक्रचाली. ॥ ४८ ॥ शिळा येत युधोन्मत्तासमोर, । जैसें चंद्रावरि चालिलें राहूचें शिर; । कां शैलशिखरावरि कठोर । वज्र सुटलें जैसें. ॥ ४९ ॥ कां महागणितियावरि विघ्न, । कां तपस्वियावरि मदन, । नाना अंजनीचें गर्भरत्न । बाळपणीं सूर्या उडे. ॥ ५० ॥ असो. सुग्रीवें शिळा ऐसियापरी । सोडिली, जात अंबरीं; । जंववरि पडे तंव शतशरीं । भेदिली राक्षसवीरें. ॥ ५१ ॥ टाकिले शल्यमुख बाण । तेणें अंतरिक्षीं शिळा जाली चूर्ण; । बहुभाग पडली. तेणें विखुरणें रण । बहुसाल दुखविलें. ॥ ५२ ॥ वानरेशें शिळा-युध टाकिलें, । तें युधोन्मत्तें निर्फळ केलें; । जैसें गगनीं अभ्र निबिड ओळलें, । तें विदारिलें चंडवातें. ॥ ५३ ॥ उपरी सर्वेचि युद्धमार्जें । दुसरी शिळा घेतली कपिराजें. । अतिविक्रमें ऊर्ध्वभुजें । राक्षसावरि टाकिली. ॥ ५४ ॥ तेही भ्रमत गगनीं । येतां युधोन्मत्तें देखिली नयनीं, । जैसें आकाशीहूनि मेदिनी । काळचक्र पडे. ॥ ५५ ॥ सिद्ध पहिलेंचि असे शूर, । योजिले होते बाण कठोर, । ते सोडिले चत्वार । दशकसंख्या. ॥ ५६ ॥ वज्रमुख बाण अंबरीं । आदळले तिये शिळेवरि. । पुढें प्रहाराचा टणत्कारीं । शतचूर्ण भूमी पडली. ॥ ५७ ॥ भंगिलें दुसरिये शिळेतें, । अधिक दाखविलें युधोन्मत्तें. । सिंहनादें करूनि आपुलां दळातें । आनंदु दिधला. ॥ ५८ ॥ रावणा तियेकाळीं कांहीं एक । झळंबली सुखाची झुळुक । जैसा गतकाम रोगिया नावेक । उष्मा आला. ॥ ५९ ॥ दोन्ही शिळा जाल्या व्यर्था । तेणें न्यूनत्व आलें कपिनाथा; । मग गदा घेतली, जेणें माथा । मेरूचा चूर्ण होय ऐसी. ॥ ६० ॥ क्रोधें उचंबळतु बळें । पुच्छ फिरवूनि आफळिलें, । गदेसि ऊर्ध्वहस्तें झाडिलें, । सिंहनादु केला. ॥ ६१ ॥ धांविन्नला जैसा प्रळयवातु । उड्डाण करूनि दिधला गदाघात. । अश्वयुग सारथी, युधोन्मत्तु । हतुकेयासि लागला. ॥ ६२ ॥ तुरंगमांचा संहार जाला, । रथु भंगोनि विघडला, । सारथी उडथोनि पडला । अवनीतळावरि ॥ ६३ ॥ युधोन्मत्ता मूर्छना आली, । इतुकी कपींद्रें ख्याति केली. । वानरवाहिनी आनंदली । हरुषें थोर. ॥ ६४ ॥ ऐसें वर्तलेयाउपरी । युधोन्मत्तु होता पृथ्वी-

वीर, । तो मूर्च्छना गेलिया वज्रशरीरी । पुनरपि क्षोभला. ॥ ६५ ॥ पद-लत्ता ताडिला व्यालु, । कीं काठिया टोंचिला शार्दूलु । नाना घृतें सिंपिला वडवानळु । धडाडिला बहुत. ॥ ६६ ॥ ऐसियापरी युधोन्मत्तु । क्रोधें बहुत उच्चंबळतु, । सुग्रीव धैर्याचा पर्वतु । तयावरि धांविन्नला. ॥ ६७ ॥ जेणें शैल होती खंड खंड । ऐसी कौमोदकी करीं प्रचंड । 'हा हा!' शब्दें उठिला, तेणें तोंड । पसरलें विशाळ. ॥ ६८ ॥ लोटला जैसा गजावरि गजु । तैसा संघट्टला सुग्रीवा उजू । वज्रतुल्य उचलूनि भुजु । गदाप्रहार दिधला. ॥ ६९ ॥ तो घातु पडतां आंगावरि, । सवेंचि कपींदु कैसें करी! । निजहस्तीं सिद्ध गदा तियेवरि । झेलिला घावो. ॥ ७० ॥ समानबळिये ते वीर दोघेही, । अलोट रणांगणाचां ठायीं; । भिडों लागले गदाघायीं । निर्वाणसंग्रामीं. ॥ ७१ ॥ घायासरिसें घायें वेगें । निगुती हाणिती वर्मोंगें. । मातले वीरश्रियेचेनि रंगें । ताडणाची व्यथा नाहीं. ॥ ७२ ॥ गदे गदेचां खणखणाटीं । भूमी वैश्वानर करी वृष्टि; । ऐसे घाये होलितां शेवटीं । भंगलिया दोहींचां गदा. ॥ ७३ ॥ पुढें दोही वीरीं तात्काळ । गदा टाकौनि घेतले शूळ. । दोघे गर्जिन्नले तेणें उभयदळ । भयचकित जालें. ॥ ७४ ॥ दोहींसि घोरयुद्ध मांडलें, । जैसें पूर्वी शक्रा वृत्रासि जालें; । शूळा शूळाचां संघट्टणीं फुलें । गळती वैश्वानराचीं. ॥ ७५ ॥ परस्परें दोघे जण । घाये घेती, देती निर्वाण. । पुढें दोघीं दोन्ही शूळ चूर्ण । आसुडौनि केले. ॥ ७६ ॥ उपरी दोघे आले तरका । घेसरोनि दिधलि थडका. । सवेंचि झगटौनि एकमेकां । मुष्टिप्रहार हाणिती. ॥ ७७ ॥ घाये लागती चळें वर्मीं । अति आवेशु, दोघे त्यपकामी. । दोहींच्या देहापासाव भूमी । अशुद्ध धांवतसे. ॥ ७८ ॥ ऐसें युद्ध होतां घोर । दोघे जाले अति जर्जर; । पुढें सुग्रीवें क्रोधें कठोर । वज्रमुष्टि वळिली. ॥ ७९ ॥ उड्डाण करूनि अंबरीं । दिधली युधोन्मत्ता हृदयावरि. । पर्वतशिखर पडे पाठारीं । ऐसा शब्दु उठिला. ॥ ८० ॥ तया मुष्टिघातासरिसें । अशुद्ध वमिलें राक्षसें. । पृथ्वीवरि पडला जैसें । उन्मळलें तरुखंड. ॥ ८१ ॥ बीभत्स वपु पृथ्वीवरि पडली, । जीवनकळा निघोनि गेली; । जैसी मर्यादीत मालवली । प्रकाशज्योति. ॥ ८२ ॥ ऐसा युधोन्मत्तु रणा आला । वानरेंशा

जय प्राप्त जाला. । "मनुष्येष्वरें" दुःखें दाटला, । आंगें टाकिलें
रथावरि. ॥ ८३ ॥ म्हणे, "आतां जयाशा काइसी? । मीरें वीर
जाला रणासि." । एकु मत्तु उरला, यासि । हाचि मार्गु आहे. ॥ ८४ ॥
ऐसें भावूनि हृदयाभीतरीं । दुःखें पडतु रथावरि; । तंव मत्तें हाक दिधली,
एकसरीं । काळघोपासारिखी. ॥ ८५ ॥ खटाटोपें दाखवूनि पुरुषार्था ।
बाणसज्ज धनुष्य वाइलें माथां. । ठवूनि प्रेतांच्या चळथा । रथारूढ
शोभावला. ॥ ८६ ॥ रथु रत्नखचित, तेजःपुंजु, । पीत पताका, जै-
सिया विजू, । मिरवत असे चंड ध्वजु । शार्दूलवदनु; ॥ ८७ ॥
रथीं घोडे चारि जुतिले, । जैसे अजनोदकें धुतले, । निमिषा अळं-
कारीं शृंगारिले । प्रभंजनवेगी; ॥ ८८ ॥ धुरे सारथी बुद्धिवंतु ।
बैसला अग्राणी गुप्तु. । स्वामीचेनि मतें वागवितु । विशाळ रथु पैं.
॥ ८९ ॥ ऐसा राक्षसु मत्तनामा । अति उतावेळ संग्रामा. । तयासि
देखौनि साउमा । शीघ्र अंगदु उठिला. ॥ ९० ॥ तव मत्तें तिये
समयीं । सिंहनादु केला रणाचां ठायीं. । तेणें वोपें सत्रळां हृदयीं ।
धडक लागली. ॥ ९१ ॥ अंगदासि देखौनि समोर । मत्तें सोडिले
पांच शर. । ते वज्रापरीस कठोर । कंकपिच्छ, सरळे. ॥ ९२ ॥
गगन आक्रमित सुसात । जैसे धांवती मृत्याचे दूत, । अंगदाचां
देहीं अकस्मात् । येऊनि कडतरले. ॥ ९३ ॥ जैसा कामिकु सुंदरा-
दर्शनें । शरपंचकीं ताडिला मदनें, । कां अपमानाचीं पंच वचनें ।
भेदलीं चतुरा हृदयीं, ॥ ९४ ॥ ऐसी मत्ताचेनि शरघातें । मूर्च्छा
आली अंगदातें. । हें देखौनि जांबुवंतें । मत्तु वृक्षें ताडिला. ॥ ९५ ॥
राक्षसु सबळु, असाधारण, । पडतेया द्रुमाचें केलें खंडण. । गुणीं लावूनि
तीनि बाण । सवेंचि सधान केलें. ॥ ९६ ॥ ते गर्जत नभोमंडळीं, ।
जैशा विद्युल्लतांच्या वोळी, । येऊनि बैसले वक्षस्थळीं । जांबुवंताचिये.
॥ ९७ ॥ तेणें व्यथा पावला ऋक्षराजु, । तंव तेथें उभा होता गजपु
सहजु, । तो पाषाण घेऊनि मत्ता उजू । धांविन्नला अतित्वरा. ॥ ९८ ॥
आवांकूनि ऊर्ध्व हस्तें । बळें टाकिलें पाषाणातें. । त्यासि येतां देखौनि
मत्तें । फोडिलें परिच्यावरि. ॥ ९९ ॥ सवेंचि सज्जूनि सोडिला बाणु ।
ज्योतिर्मुख, तीक्ष्ण, कठिणु; । निगाला जैसा काळगणु । कृतांतवेगें.

॥ १०० ॥ गर्जत गगनाचां पोटीं, । कपि भयातुर देखौनि दृष्टी; । तों अकस्मात् गवाक्षाचां ललाटीं । येऊनि भेदला. ॥ १ ॥ पर्वतशृंगीं जैसी विजू पडली । तैसी कपाळीं भेदली माळी; । तेणें गवाक्षा मूर्च्छा आली, । पडत पडत बैसला. ॥ २ ॥ ऐसें करूनियां मत्तु । अधिकपणें भीम गर्जतु; । तंव तारातनयो वाळीसुतु । सावध जाला. ॥ ३ ॥ मत्ताचें वैभव देखौनि डोळां । युद्धासि जाला उतावेळा. । अकस्मात् उठौनि तिये वेळां । परिघु शतघ्नी घेतला. ॥ ४ ॥ दिधली कल्पांतआरोळी । तेणें दिग्गजां कर्णी बैसली टाळी; । मत्ताचेया रथाजवळि । आला पवनवेगें. ॥ ५ ॥ पुढें परिघु उचलूनि अंबरीं । टाकिला बळें मत्तावरि, । जैसा पुरंदरु पर्वतशिखरीं । निजायुध हाणे. ॥ ६ ॥ तेणें परिघघातें तत्काळ । चूर्ण जालें मत्ताचें शिसाळ; । जैसें पाषाणप्रहारें नारिकेळ । चूर्ण होऊनि जाय. ॥ ७ ॥ निर्वाण जालें मत्ततें; । पुनरपि वेगें वाळीसुतें । दुसरेनि परिघघातें । अश्वसारथी वधिले. ॥ ८ ॥ ऐसा मत्ताचा जाला वधु, । रणमंडळीं जो प्रसिद्ध. । गर्जिन्नला वानरसिंधु, । ध्वनी भरिलिया दाही दिशा. ॥ ९ ॥ चौघे अतिपराक्रमी, । जेहीं जिंतिले सुर संग्रामीं, । ते कपिकरें पडले रणभूमी । रावणा देखतां. ॥ ११० ॥ चौघांचा वधु देखौनि लोचनीं । लंकेशु विचारी मनीं. । आता कोणी नाहीं मेदिनी । युद्धालागीं राक्षसांतु ॥ ११ ॥ पहा हो कैसें जालें! । राज्य लंकेचें बुडालें!! । राक्षससमुद्रातें आटविलें । वनचरीं विक्रमें!!! ॥ १२ ॥ असो. होणार जें बळवंत । तें अनायासें होंचि लागत. । ऐसें विचारूनि चित्त । रावणें ठायीं ठेविलें. ॥ १३ ॥ म्हणे, "हाचि आतां पुरुषधर्मु: । देहो पडे तंव करूं संग्रामु. । भिडों मी आणि रामु । शस्त्रास्त्रीं स्वइच्छा. ॥ १४ ॥ विचारितां हा एक रामु । सकळांचा मूळद्रुमु, । याचेया विस्ताराचा क्रमु । ऐसा असे. ॥ १५ ॥ लक्ष्मणु तयाचें हेम पुष्प, । फळ सीतेचें स्वरूप, । शाखाढ्य निकोप । ते सुग्रीव, हनुमंतु, ॥ १६ ॥ वरकड ऋक्षवानर समस्त । पत्रें याचीं असंख्यात, । कीर्ति मज यादत । मकरंदु आंगींचा. ॥ १७ ॥ त्या मूळद्रुमाचें केलेया खंडण । सरिसें सर्वांसि मरण." । ऐसें म्हणौनि धनुष्यबाण । घेतलें हातीं. ॥ १८ ॥ सारथियासि म्हणे, लंकानाथु. । "रामा सन्मुख

मोलवी रघु. । वानरपुरप्रवाही व्यर्थ । वाहवूं नको आतां." ॥ १९ ॥ ऐसें बोलिला राक्षसराज. । येरें नेला रथ राघवा उजू; । जैसा सिंहा सन्मुख गजु । वळे थाला मरणा. ॥ १२० ॥ आतां युद्ध होईल रामा रावणा, । शक्ति लागेल लक्ष्मणा; । ऐसें असे पुढील जाणा । कथेचें अनुसंधान. ॥ २१ ॥ इति श्रीऋषिनिर्मित रामायण, । युद्धकांड, दीर्घदोषखंडण; । परिसतां सुधासिंधु, विचक्षण, । कृष्णदास मुद्गलु म्हणे. ॥ १२२ ॥

---

## प्रसंग एकावन्नावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । रामा सन्मुख समरंगणीं रुद्रावेशें । शरीं सजिलीं दहाही धनुष्यें; । विक्रमें खटाटोपें नैर्ऋत्याधीशें । संधान आरंभिलें. ॥ १ ॥ ऐसें देखौनि नर-वीरोत्तमें, । गुणसमुद्रें श्रीरामें । वज्रठाण मांडिलें, विक्रमें । शरासन टण-त्कारिलें. ॥ २ ॥ उदेला झणत्कारशब्दु, । चापाग्रघंटेनें केला नादु, । तयास्तव गळाला मदु । दशमुखांगींचा. ॥ ३ ॥ मेढा बाऊनि मुष्टी । रण-रंगधीर पाहत दृष्टी, । तव येवों सरली शरसुटी । अमित्राची आकाशीं. ॥ ४ ॥ बाण घुंघाट येती तेजाळ, । गगनीं भरले जैसे व्याळ; । सरिसेंचि सधान तात्काळ । रघुपति करिता जाला. ॥ ५ ॥ धैर्यें ठाण मांडिलें अभंग, । पुढें दिधलें निघुतें वामांग । धनुष्य बोढिलें सुरंग । आकर्णपर्यंत. ॥ ६ ॥ तूणीगर्भ तेजाळे । बाण गुणीं लाविले सरळे, । ज्यांचिया भालींवरि खेळे । दु पावकाचें. ॥ ७ ॥ अरिशर येत होते अंबरीं । तंव श्रीरामें सोडिले सौरि. । ते अंतरिक्ष गगनोदरीं । एकमेकांसि लागले. ॥ ८ ॥ बाणां बा-जैसा झुंबी मिठी, । जैसे गीध बैसले गिधांचां कंठीं. । खंडण पावोनि ॥ ९७ ॥ । रावणबाण पडिले. ॥ ९ ॥ जैसीं मुर्खांचीं उत्तरें । कुराळें सहजु, । तो चतुरें, । कां मार्तंडाचेनि तीव्र करें । मंगळे सोमकरं, आवांकूनि ऊर्ध्वगामीचिया ज्वाळा । झाडखंडीं जाती उदेल्या बंबाळा, । मत्तें । फोडिलें थरिरें । जैसा करिती. ॥ ११ ॥ ऐसी रामाचां तीक्ष्ण ज्योतिर्मुख, तीक्ष्ण, कांबंडणी. । उपरी महाक्रोधें तियेचि क्षणीं । नैर्ऋत्येशें

ऐसें केलें. ॥ १२ ॥ प्रळयमेघु जैसा गडगडी । गर्जन केलें ऐसिया प्रौढी. । दश कार्मुकें आकर्ण ओढी । वाऊनि संधान केलें. ॥ १३ ॥ ते बाण हाटकपुंख, । भिन्न भिन्न कुसरींचें मुख, । जेहीं पूर्वी देवदळासि दुःख । बहुत वेळ दिधलें; ॥ १४ ॥ ऐसिया बाणाचिया कोडी । सुटल्या जैसी प्रळयमेघवांकुडी. । सरिसी सर्वेचि ताडातोडी । रघुराजें मांडिली. ॥ १५ ॥ त्या बाणमाळी तेजें ळखळखीत, । तूर्णीतूनि ओढितां ब्रह्मांड भीत, । ते लघुलाघवियें संख्येरहित । सोडिले गगनोदरीं ॥ १६ ॥ ऐसी रामरावणाचां शरीं । निरवकाशता केली अंबरीं । एकएकाचा मुखधारीं । खंडण पावोनि पडती. ॥ १७ ॥ एकएकाहूनि अधिक । दाखविती संधानकौतुक; । अति आश्चर्यें उभय कटक । भयातुर पाहतसे. ॥ १८ ॥ त्यां दोघांही वीरनायकां । लघुलाघव ऐसें आइका. । शर सोडितां झळकती मुद्रिका । काळचक्रें जैसीं. ॥ १९ ॥ दशग्रीवें शरसंधान केलें । तेणें दिग्मंडळ भरलें. । तितुकेंही निजबाणीं खंडिलें । रामें रणरंगधीरें. ॥ २० ॥ ऐसें देखोनि लंकाधिपु । घाली आसुरास्त्राचा संकल्पु । आवृत्ति करूनि जपु । प्रेरिलें परमावेशें. ॥ २१ ॥ होत क्षणीं आसुरास्त्राची सुटी । उसळल्या चक्रांचिया कोटि. । भ्रमत भ्रमत गगनाचां पोटीं । कपिसेनेवरि आलीं. ॥ २२ ॥ चक्रमय वाढिलें कैसें ! । अंतकें अद्भुत मांडिलें तैसें. । उभेयां वानरांचीं शिसें । थटथटां छेदती जालीं. ॥ २३ ॥ ऐसें देखिलें रामें नरशक्रें । गंधर्वास्त्र योजिलें अलताक्रें, । तें बाणमय प्रसवलें; तेणें चक्रें । खंडिलीं, नव्हतींचि जैसीं. ॥ २४ ॥ ऐसें दशकंधरें देखिलें डोळां । कोपारूढ जाला आगळा. । रौद्रास्त्राचा पढिताळा । बीजाक्षरीं केला. ॥ २५ ॥ प्रेरिलें परमघोर तात्काळ । तेणें कांपिलें गंधर्वास्त्रसमूळ. । प्रसवलें गदा, शूळ । आणि लोहमुसळें. ॥ २६ ॥ तेणें गगनोदरीं भरण भरलें, । सर्वेचि कपींवरि येवों सरलें; । तंव रामें आर्षीचि योजिलें । माहेश्वर दृष्टदारें ॥ २७ ॥ तियें गुह्याक्षरें नरराजें । आवर्तिलें गुह्यबीजें, । जियें उपदेशिलीं आत्मकाजें । यागरक्षणीं विश्वामित्रें. ॥ २८ ॥ तें अस्त्र सोडिलें सर्वांतक । ज्यासि भीती सुरासुरादिक; । कडकडिलें, तेणें उभय कटक । मोहें पारुलें. ॥ २९ ॥ त्या मंत्रराजापासूनि आकाशीं ।

खड्ग सुटलीं वज्रां ऐशीं; । तेंहीं तोडिलें शूळां, मुसळासि । आणि गदासिहीं. ॥ ३० ॥ ऐसें रौद्रास्त्र माहेश्वरें निवारिलें, । जेसें पृथ्वीसि उदकें बुडविलें, । कां निवृत्तिशास्त्रें संहारिलें । प्रवृत्तिशास्त्रातें, ॥ ३१ ॥ का विवेकें सानुरागें । उदेल्या क्रोधासि बैसविजे उगें; । का मोहाचे पाश वैराग्यें । ताडातोडी केली. ॥ ३२ ॥ शस्त्रास्त्रविद्यावळ नचले रामापुढें, । जैसें झंझवाताप्रति मेढुढें; । उपरी रावणें कर्म गाढें । केलें तिये समयीं. ॥ ३३ ॥ धनुर्व्यां सज्जिले पाच बाण, । जैसे कृतांताचे पचप्राण; । कां निजरूपें जैसे निर्वाण । पचाग्निचि तिये. ॥ ३४ ॥ अति निगुती ब्युत्पत्तिरें । सधान केलें दशग्रीवें । निवारण योजिलें राघवें । तव वर्मांगीं बैसले. ॥ ३५ ॥ वपु भेदूनि पैलीकडे । शरपचक भूमीवरि पडे. । रावणु गर्जिन्नला, गडगडे । जैसें प्रळयीं मेघोदर. ॥ ३६ ॥ भेदूनि गेले पचबाण, । परि न ढळेचि वज्रठाण; । जैसा योगी न भगे, समर्पण । जालेया पचबाणाचें. ॥ ३७ ॥ पुढें सारिसेंचि नराधिपें । चापीं सप्तशर सज्जिले कोपें. । ते पाम तेजाळे, जैसीं तपें । सप्तर्षींचीं ॥ ३८ ॥ का सप्तपाताळींचा शक्ति, । तैशा बाणमाळी दिसती. । फाडकाठिया नेणों होती । सप्तसिंधूचीं वीर्यें. ॥ ३९ ॥ कोदंड ओढूनि आकर्णे । शीघ्र सोडिले सप्तबाण; । जैसे मनोवेगी निजगण । अवश्य कार्यकर्ते. ॥ ४० ॥ सुटता चापापासौनि । धुधाटघोषें भरले गगनीं, । येत दशाननें देखिले नयनीं । वन्हीचे ओघ जैसे ॥ ४१ ॥ त्यासि निवारण जव करी, । तव येवों सरले वरि. । वर्मांग फोडूनि पृथ्वीवरि । पैलीकडे रुतले. ॥ ४२ ॥ त्या सप्तशरांचा घायीं । रावणु दुःखें दाटला हृदयीं. । ऐसें देखौनि तियेसमयीं । सौमित्रु आवेशला. ॥ ४३ ॥ रघुनाथें वर्मांग आधीं भेदिलें, । दैवबळेंचि चाप होतें सज्जिलें. । अग्रजासि मागां वाळूनि सोडिलें । उर्ध्व चद्राकार बाणातें. ॥ ४४ ॥ बाणु निगाला गगनीं गर्जतु । काळरूप तो मूर्तिमतु. । करी बैसला अकस्मातु । रावणाचे सारथियाचा. ॥ ४५ ॥ सकुडळ शिरकमळ । शरें खडूनि नेलें तात्काळ; । जैसें उसळलें नारिकेळ । गगनपोकळीमध्यें. ॥ ४६ ॥ ऊर्ध्वपथें येता तें शिर । सोमसूर्य झाले भयातुर. । म्हणे नव्हे की साचार । येतो आम्हां समुरा ! ॥ ४७ ॥ ऐसा सारथी मारिलियावरि । सवेंचि लक्ष्मणु संधान

करी. । धनुष्यें होतीं रावणा करीं । तितुकीं छेदूनि सांडिलीं. ॥ ४८ ॥ ऐसें विचित्र केलें लक्ष्मणें, । तंव मेढा चोढिला विभीषणें; । बाण नव सोडिले, तेणें । गिरि चूर्ण होऊं शकती. ॥ ४९ ॥ नवही बाण कैसे निगाले? । जैसे नवग्रह क्रोधें धांविन्नले. । जाऊनि नवां ठायीं बैसले । संपूर्ण सपिच्छ. ॥ ५० ॥ रावणरथीं आठ वाजी । आठ शर भेदले त्यांचां उदरांमाजी, । एकु बैसला रथध्वजीं, । वज्र जैसें पर्वतीं. ॥ ५१ ॥ अष्ट तुरंगम अष्टवाणीं । निर्जीव पाडिले धरणीं; । एकें रथध्वजाची खंडणी । करूनि सांडिली. ॥ ५२ ॥ सारथी, चाप छेदिलें लक्ष्मणें, । घोडे, ध्वज तोडिला बिभीषणें. । हें डोळां देखिलें रावणें, । मग अन्य रथीं बैसला. ॥ ५३ ॥ अति दुःखित अंतर्यामीं, । लोटती चिंतार्णवीं कोपऊर्मी. । ब्रह्मेन शक्ति दिधली, ते ब्राह्मी । ऐसें नाम तियेचें. ॥ ५४ ॥ ते टाकिली बिभीषणावरि. । कडकडत चालिली अंबरीं. । लक्ष्मणें देखौनि तिये अवसरीं । अरिबंधु घातला मागां. ॥ ५५ ॥ जैसें शस्त्र येतां वैरियाचें । पुढें शस्त्र होय करींचें, । तैसें बिभीषणापुढें सौमित्राचें । वज्रठाण ठाकलें. ॥ ५६ ॥ सूर्यमंडळमुख तीनि शर, । काळदंडाहूनि अति कठोर, । ते सोडिले शक्तीसमोर । रामानुजें वीरें. ॥ ५७ ॥ शक्ति येत जैसी विजू सुटली, । तंव आदळलिया बाणत्रयमाळी; । तेंहीं तात्काळ तोडिली । गगनीं भागत्रय. ॥ ५८ ॥ आणिकही सोडिले बहु बाण, । केले तिहीं भागांचें शतचूर्ण. । विखुरले जैसे वन्हीचे कण । ते पडले परदळावरि. ॥ ५९ ॥ शक्तीचें बहुखंडण । आणि लक्ष्मणाचें शरसंधान, । त्यास्तव राक्षसदळीं पीडन । कितीं एकासि जालें. ॥ ६० ॥ जैसा ज्याचिये चेष्टेचा अग्नि । प्रहगती लागला त्याचेया घरालागौनि, । तैसी रावणाची शक्ति परतौनि । राक्षसदळ पाडिलें. ॥ ६१ ॥ बिभीषणावरि शक्ति टाकिली । ते लक्ष्मणें पिटूनि पिष्ट केली. । ऐसें देखौनि रावणें साडिली । क्रोधाची उल्का. ॥ ६२ ॥ जेथें आहे लक्ष्मणु, । तेथेंचि उभा बिभीषणु. । त्याप्रति क्रोधें रावणु । बोलता जाला. ॥ ६३ ॥ म्हणे, " तू मोठा, रे, वीर्यवंतु. । जालासि मनुष्यांचा शरणागतु. । लक्ष्मणा आडौनि भीतभीतु । संग्राम करिसी. ॥ ६४ ॥ अभिमान सांडूनि कुळाचा । भृत्य जालासि वैरि-

यांचा. । दीनमुखें बोलोनि वाचा । रक्षिला आपुला देहो. ॥ ६५ ॥ जें जिणें पुरुषार्थेवीण । तें सिद्धचि होय मरण. । पुरुषार्थु करितां मरिजे जाण । तो चिरंजीवि जगीं." ॥ ६६ ॥ प्रतापाचें ऐसें जिणें, । चक्रीं पडती ब्रह्मादिक जेणें; । विष्णूसि लागती भोगणें । अवतारकष्ट. ॥ ६७ ॥ आत्मख्यातिरूढ तो उत्तमु, । पितृख्यातिरूढ तो मध्यमु; । परि तूं यांहींवेगळा परमाधमु । वैरियां वश जालासि. ॥ ६८ ॥ तुज ऐसेयासि, रे, जन्मवरि । पाळिलें म्यां आपुलां घरीं; । देवां दुर्लभ सुखें नानापरी । भोगिलीं माझेनि प्रसादें. ॥ ६९ ॥ आपुले कटिप्रदेशीं शस्त्र पाळिलें, । तें आपुलेचि उदरीं प्रवेशलें; । तैसें आम्हांसि यथार्थ जालें. । तुझें पाळिग्रहण केलेया. ॥ ७० ॥ वारणनिदारणांची माउली । जवुका येका प्रसवली, । तैसी परी यथार्थ जाली । अंशुमाळीआत्मजेसि. ॥ ७१ ॥ तुजसीं बोलिजे आतां किमर्थ? । वाचेसि शीण उपजे व्यर्थ. । अरण्यरुदनवत् यथार्थ । मज वाटतसे." ॥ ७२ ॥ ऐसें बोले तो रावणु । क्रोधें व्याप्त परिपूर्णु. । तयाप्रति बिभीषणु । प्रत्युत्तर देता जाला. ॥ ७३ ॥ परियेसीं, पूर्वजा, प्रस्तुत. । तूं मजसीं कठिण बोलसी, हें नव्हे उचित. । मरणकाळीं ज्यासि होय सन्निपात । त्याप्रति किमर्थ विवादु? ॥ ७४ ॥ अरे, म्यां तरि समस्तांचें हित । पूर्वींचि शिकविलें बहुत; । परि नाइकाचि तुम्ही उन्मत्त, । होणारासारिखें. ॥ ७५ ॥ जें जें म्यां भविष्य केलें, । तुम्हां तितुकेंही प्राप्त जालें. । कुळक्षयो होऊनि बुडालें । राज्य केव्हडें तुमचें. ॥ ७६ ॥ आतां उरलासि तूं एकु. । तुजही वधील रघुनायकु. । जव्हीं सांडूनि पळसी त्रैलोकु । तव्हीं वांचसीना कदा. ॥ ७७ ॥ मी रघुनाथास शरण गेलों, । या प्रळयावेगळा जालों. । सुखें कल्पांतवरि राहिलों । ध्रुवा ऐसा. ॥ ७८ ॥ तुज राखावया कोणी । सर्वथा नाहीं समरंगणीं. । आतां श्रीरामाचां बाणीं । देहो नासैल तुझा." ॥ ७९ ॥ ऐसें बोलिला बिभीषणु, । तंव क्रोधें खवळला रावणु. । "अरे, तुज रक्षितो लक्ष्मणु । त्याचें भस्म करीन आतां. ॥ ८० ॥ माझा इंद्रजितु एकला । या त्रैलोक्यासि आगळा जाला. । तो येणें लक्ष्मणें मारिला । उमाचि निकुरळेसि. ॥ ८१ ॥ माझा अतिकाया सुत । वीर्यसिंधु, जैसा पर्वत; । तो येणें लक्ष्मणें सुव्रातु । काळाचेया घातला. ॥ ८२ ॥ तरि या लक्ष्मणाचें द्वये फाळीं ।

तचूर्ण करीन भूतळीं. । म्हणौनि शक्ति काढिली तेजाळी । धगधगा-
यान. ॥ ८३ ॥ तिये शक्तीची काढितां गवसणी । दिग्मंडळ दाटलें
रणीं. । सहस्रार्कतुल्य प्रकाश धरणी । अकस्मात् पडला. ॥ ८४ ॥
शक्ति काळदंष्ट्रा केवळ, । कीं ते काळसर्पाची गरळ, । कीं ते
ळाग्नीची कराळ । ज्वाळा जैसी, ॥ ८५ ॥ कीं ते विजू प्रळयमे-
घीची, । कीं ते अंतरवृत्ति अंतकाची, । नाना ते सकळां विघ्नांची ।
कल्पिणी असे. ॥ ८६ ॥ तियेचें नाम मयाशक्ति । पूर्वी मयदैत्या-
जवळि होती. । पुढें रावणा दिधली उचिती । मंदोदरीचां दानांतीं.
॥ ८७ ॥ मयासुर मंदोदरीचा पिता । प्रीतीनें आला उचिता; । म्हणौनि
शमीवा जामाता । ते शक्ति समर्पिली. ॥ ८८ ॥ ते शक्ति कोणे
ाळीं बाहेरि । काढूनि टाकिली नाहीं कोणावरि. । रावणें योजिली तिये
अवसरीं । लक्ष्मणाकारणें ॥ ८९ ॥ शक्तिमंत्राचीं बीजाक्षरें । बोलिली
तेणें प्रकारें; । जप करूनि दृढशरीरें । सोडिली लक्ष्मणावरि. ॥ ९० ॥
कडकडीत उठली चंड । तेणें तडतडिलें ब्रह्मांड. । कंपायमान नव-
खंड । पृथ्वीतळ जालें. ॥ ९१ ॥ तुंबळलें असंभाव्य तेज, । व्यांग
टाकूं पाहती दिग्गज, । जळचर, वनचर, अंडज । किती एक गतप्राण
जाले. ॥ ९२ ॥ तीव्र, कठोर, महाघोर । देखौनि देव जाले भयातुर. ।
म्हणती, "शक्ति हे अनिवार । कोणावरि पडैल आता ? ॥ ९३ ॥
अतिभय वर्तलें तिये काळीं । आट भ्रमत वानरदळीं; । तव शक्ति येवों
सरली भूतळीं, । लक्ष्मणावरि. ॥ ९४ ॥ लक्ष्मणें मांडिलें वज्रठाण, ।
कार्मुकीं योजिले होते बाण, । करावेया शक्तीचें खंडण । आकर्ण ओढीत
होता; ॥ ९५ ॥ तंव बैसली हृदयावरि, । जैसा वज्रघात शैलशि-
खरीं. । कां महाविजु तरुवरी । अकस्मात् पडिली. ॥ ९६ ॥
शक्तीनें भेदिला लक्ष्मणु; । म्हणौनि बोभाइला बिभीषणु; । आइकौनि
सुग्रीव आणि सीतारमणु । जवळि आले. ॥ ९७ ॥ नळु, नीळु,
अंगदु, जांबुवंतु, सुषेणु, । दधिमुख, मैंद्र, हेमकूट पावकलो-
चनु, । प्रभंजनु सनंदनु, । सुमुखु, दुर्मुखु; ॥ ९८ ॥ ऐसे
वानरगण थोर थोर, । मुख्य नायक महावीर, । लक्ष्मणापाशीं वेगवत्तर ।
पावले परम व्यग्र. ॥ ९९ ॥ हडबडिला वानरमेळा, । पडला लक्ष्मणा

वेष्टित पाळा, । रघुनाथ पाहों लागला डोळां । निकट बैसोनि; ॥ १०० ॥ तंव शक्तीनें हृदय विदारिलें, । जैसें पक्व फळ चूर्ण जालें. । पृथ्वीचेनि द्वारें असे मुरलें । रुधिर चहूंकडे. ॥ १ ॥ स्थानींहूनि तेज सांडिलें नेत्रीं, । निश्चेष्टित असिजे गात्रीं, । श्वासोच्छ्वास पाहतां वक्त्रीं । उरलेशु नाहीं. ॥ २ ॥ धनुष्य धरिलें वामुष्टी, । शर सजिले दक्षिणकरपुटीं, । तैसाचि वीर मूर्च्छवटीं । कानाडीं वेढूनि पडलासे. ॥ ३ ॥ पाहतां प्राणाशा कोठेंही । लक्ष्मणासि दिसत नाहीं. । तिये काळीं हृदय पिटूनि, मही । आंग टाकिलें रघूत्तमें. ॥ ४ ॥ वानरमुखीं हाहाकारु । वर्तला, आक्रांतु थोरु; । तंव बिभीषणु म्हणे, "स्थिरु, स्थिरु. । रघुपति, ऐसें काय? ॥ ५ ॥ जेणें पाडिला लक्ष्मणु । तो पैल उभा रावणु. । बैसोनि विलापु करितां, हा कोणु । क्षात्र धर्मु इये काळीं? ॥ ६ ॥ वैरी उभा सन्मुख रंगीं । त्यासि लावावें एके मार्गीं; । मग, स्वामि, तेचि प्रसंगीं । सौमित्रा उपचारु, देखा. ॥ ७ ॥ रणकर्कशा, राजीवनेत्रा, । काळत्रयीं भय नाहीं सौमित्रा. । शरवारीं त्रासीं दशवक्त्रा." । म्हणौनि धनुष्य दिधलें करीं. ॥ ८ ॥ उठौनि उभा राहिला नरेंद्रु, । क्षोभला जैसा प्रळयरुद्रु. । चाप टणत्कारिलें तेणें समुद्रु । आदळला आकाशीं. ॥ ९ ॥ थरारिलें दिग्मंडळ, । तडाडिले कुळाचळ, । भूतगण, सिंह, शार्दूळ । मूर्च्छित भूमी पडले. ॥ ११० ॥ रघूत्तमाचेय हृदयाभीतरीं । क्रोधार्णव हेलावा करी, । जैसा गिरितुल्य सागरीं । लहरा धांवती. ॥ ११ ॥ उष्ण श्वासु सांडी वेळोवेळां । जैसा वन्हीच्या ज्वाळा; । पुढें वज्रठाण मांडिलें, जें काळा । देखवेना लोचनीं. ॥ १२ ॥ मग तिये काळीं रावणाप्रति । वदे वीरराज रघुपति. । म्हणे, "लक्ष्मणावरि टाकिली शक्ति, । आतां मजसीं युद्ध करीं. ॥ १३ ॥ धैर्य धरीं रणमंडळीं, । साले माझे शर सांभाळीं. । पळसी स्वर्गीं या पाताळीं तरी मारीन तुज." ॥ १४ ॥ ऐसें रघुनाथु बोलिला, । आवेशें युद्ध प्रवर्तला. । पुढील प्रसंगु कैसा वर्तला, । जो बोलिजैल आतां. ॥ १५ ॥ इति श्रीरामायण ऋषिनिर्मित, । युद्धकांडकाव्यकथामृत, । तें पुढें परिसोत कां सुचित्त । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ११६ ॥

## प्रसंग चावल्लांचा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः, । श्रीगुरुकादिराजाय नमः ।
देखौनि रामाचा आवेशु । संग्रामीं सिद्ध जाला नैर्ऋत्येशु, । जैसा मत्त कुंजरेशु । मृगेंद्रावरि. ॥ १ ॥ तंव वीरें जामदग्न्यजितें । सोडिलीं तीक्ष्ण शरांचीं शतें, । जियें वटवीजप्राय पर्वतांतें । लागतां भेद करूं शकती. ॥ २ ॥ तियें शक्रजितजनकावरि । आलीं गर्जत अंबरीं. । तियें रावणें देखौनि निजशरीं । शीघ्र संधान केलें. ॥ ३ ॥ येकसरें दश धनुष्यें । वाइलीं रावणें रुद्रावेशें. । अमित शर सोडिले आकाशें । अरिसन्मुख. ॥ ४ ॥ गेले गर्जत शरांवरि शर । जैसे गृध्रांवरि गृध्रांचे भार; । कां घोररूप खेचरांवरि खेचर । वैरसंवर्धे; ॥ ५ ॥ तैसें गगनोदरीं बाणांसि बाणीं । आक्रमूनि केली खंडणी. । खंडले व्याळ तयापरी धरणी । पडले शर उभयांचे. ॥ ६ ॥ रामु काळात्मा, काळरूपी । शरवृष्टि करी पुनरपि. । जे सीतें होतीं रावणाचीं चापीं । तितुकेंहीं तोडिलीं. ॥ ७ ॥ सोडिला बाणांचा महापूरु, । जैसा धारा मोकली जळधरु. । असंभाव्य देखौनि दशाशिरु । भग्न जाला तिये काळीं. ॥ ८ ॥ तत्वता न कळे, वहु भुलला, । संग्राम करूं विसरला, । सर्वत्र देखता जाला । रामचि घोररूपी. ॥ ९ ॥ धनुष्या हात घाऊं पाहे । तव रामुचि दिसत आहे, । अति भयें दचकला, राहे, । शस्त्र घेवों जाये मग. ॥ १० ॥ तंव तें शस्त्र दिसे कैसें? । रामचि सिद्ध होय तैसें. । मग हात आंवरी, जैसें । कच्छप मुख लपवी. ॥ ११ ॥ कैसें वर्तलें तिये अवसरीं? । रावणु पाहे निजरथावरि, । तंव राम उभे चहूं पारीं । शर सज्जूनि माथां. ॥ १२ ॥ दचकौनि रथाखालीं । भय घेऊनि उडी घाली; । तंव भूमीवरि देखिलीं । रूपें रामाचीं. ॥ १३ ॥ तेथौनियां भयास्तव । आणिके रथीं वैसे दशग्रीव; । तंव तेथेंही असे राघव । ऐसें देखिलें डोळां. ॥ १४ ॥ च्यार उभे चहूं पताकीं, । एकु ध्वजाचे मस्तकीं, । शर सज्जूनि कार्मुकीं । आठ आठां अश्वांवरि. ॥ १५ ॥ दृष्टी पडे जितुकें । तें राममय भासे असिकें. । रामाचां रूपीं दोन्ही कटकें । असंभाव्यें. ॥ १६ ॥ आपणाकडे जंव पाहे । तंव रामचि दिसत आहे. । अतिभयें

दचकला, राहे, । नेत्रां झांपडी पडली. ॥ १७ ॥ सबाह्य रामें व्यापिलें । म्हणौनि भयें बुबुळें झांकिलीं; । तंव अभ्यंतरींही देखिलीं । स्वरूपें रामाचीं. ॥ १८ ॥ उदकीं दिधलिया बुडी । तो निर्बुजला मुख काढाडी, । तैसा रावणु भयें उघडी । शीघ्र पुनरपि डोळे. ॥ १९ ॥ स्वामी कोणें एकें शस्त्रधरें चोरें । आंगेसीं मिडिजे एकसरें, । तिये अवस्थेमाजी थोरे । प्राणी पीडिजतु ठाठिला. ॥ २० ॥ तंव सत्यचि उठिलेयावरि । घर भरलें असे चोरीं; । रावणा जाली तैसीचि परि । सबाह्य रामें व्यापिलें. ॥ २१ ॥ कां, कोणी एक वनांतरीं । व्याघ्र थाविन्नला तयावरि, । तो भयास्तव विवरीं । येके प्रवेशला; ॥ २२ ॥ तंव तेथही गुरगुरितु विशाळु । वैसला देखिला शार्दूळु । जैसा तयासि वर्ते काळु । तैसें रावणा मांडलें. ॥ २३ ॥ दृष्टी पडतसे जितुकें । राममय भासतसे तितुकें. । रामरूपें दोन्ही कटकें । सादृश दिसती. ॥ २४ ॥ कैसें पहा हो रावणासि जालें! । रामाचें अनुसंधान फळासि आलें. । मरणकाळीं रामें व्यापिलें । सबाह्याभ्यंतर. ॥ २५ ॥ याकारणें निरंतर । देहीं वसे ज्याचें विहार, । तेंचि होईल साचार । भृंगीकीटकन्यायें. ॥ २६ ॥ भयें, वैरें, अथवा प्रीती । अच्युत वसे ज्याचां चित्तीं । ते देवाचें सायुज्य पावती, । येथें संदेह नाहीं. ॥ २७ ॥ असो. ऐसें भय वरूनि । रावणें सांडिली रणमेदिनी. । कांहीं न पाहत नयनीं । मुरडला लंके रजा. ॥ २८ ॥ रानभय वरूनि पव्हाळा, । पळत न सांभाळीत मुळ्ला. । पिशाचप्राय प्रवेशला । लंका उत्तरद्वारें. ॥ २९ ॥ सेना सांडूनि मागें । आपण वहिले लंकामार्गें; । राम धांवती पाठीमागें, । म्हणौनि शीघ्र गेला. ॥ ३० ॥ धांस संपूर्ण जालें उदर. । चळचळां कांपती चरणकर, । जिव्हा जाळिया कठोर, । मुखें कोरडीं पडलीं. ॥ ३१ ॥ युद्ध करितां रानाचां बाणीं । जाउंसि आंगाचीं चाळ्णीं; । तेथौनि रुधिर धरणी । स्रवत, झरे जैसे. ॥ ३२ ॥ पुरी वोढितां, घडी ठाकिली, । कां जळतें गृहीं निगी जाली, । नाना तस्करें मारितां चुकली । काळवेळा जैसी; ॥ ३३ ॥ ऐसियापरी तिये समयीं । रामेसीं करितां रणाचां ठायीं, । रावणु वांचला, हृदयीं । भय हेलावतसे. ॥ ३४ ॥ अति पीडिलासे तिये काळीं । दुःखेंकरूनि मुखें जाली निळीं. । आला निजगृहाजवळि. ।

बोलाविली मंदोदरी. ॥ ३५ ॥ तियेसि समीप बैसविलें. । म्हणे "काते, आजि कठीण जालें. । युद्ध करितां देह वेंचलें । प्रथम महाबळाचें. ॥ ३६ ॥ विरूपाक्षें त्याउपरी । युद्ध केलें सुग्रीवासमोरि, । तोही पडिला, वो, प्रेतसागरीं । कपिश्रेष्ठकरें. ॥ ३७ ॥ महायोद्धा युधोन्मत्तु । तेणें संग्रामु केला बहुतु, । तोही पडिला, वो, मत्तु । तयाचिमार्गें. ॥ ३८ ॥ येहीं चौघीं जणीं दिशा चारि । जिंकिल्या होत्या, वो सुंदरी, । ते चौघे वधिले वानरीं । संग्रामाच्या ठायीं. ॥ ३९ ॥ एकएकाचेया भुजांसीं । तुळितां त्रैलोक्य नये तुळणेसि. । ते सुरदर्पहरण वाधन रणासि । अमित्रीं आणिले, काते. ॥ ४० ॥ सर्वांचा शेवटीं मी । प्रवर्तलों दुःखित संग्रामीं. । युद्ध करिता रणभूमी । बिभीषणु सापडला. ॥ ४१ ॥ तेणें दिधले शब्दशर, । तेंहीं खोंचलें जिव्हार, । त्यासि वधावें, तव कैवार । केला लक्ष्मणें त्याचा. ॥ ४२ ॥ पाठीसि घातला बिभीषणु, । पुढा युद्धा आला लक्ष्मणु । तयासि देखौनि संपूर्णु । शक्तिभेदु केला क्रोधें. ॥ ४३ ॥ इंद्रजितु वधिला, वो, जेणें । त्याचें घ्यावेया उसिणें, । मयाशक्ति टाकिली, प्राणें । निःशेष घेतला. ॥ ४४ ॥ लक्ष्मणु रणीं पाडिला, । पुढें रामु युद्धा प्रवर्तला. । तेणें संग्रामु अद्भुत केला । मज त्रासिलें बहु. ॥ ४५ ॥ लागता रामाचे बाण । वेचों पाहती पंचप्राण. । भय उदेलें संपूर्ण, । भ्रांत जालों रणांगणीं. ॥ ४६ ॥ तिये काळीं न कळे काय जालें. । असंभाव्य राममय उदेलें. । अत्यंत भय आरंभलें, । मग रणीं पृष्ठ दिधली. ॥ ४७ ॥ भयें भरलें माझें सर्वांग । आता, काते, काय करूं? सांग. । तूं शिकवीत होतीसि, परि तो प्रसंग । नाइकेंचि मूर्ख मी ॥ ४८ ॥ तुवां बहु सांगितलें हित । परि नेघेचि माझें चित्त । होणार तितुकें बळवंत. । कोणाचें काय चाले? ॥ ४९ ॥ नाना उपदेश बोलिजती, । परि होणाराची असे भिन्न गति! । दुसरेया शब्द ठेविजती । किमर्थ, शुभानने? ॥ ५० ॥ जें जिये काळीं असे निर्माण । त्यासि विपरीत करील कोण? । विधाता जाला आपण, । परि तोही नेणे काळचक्र. ॥ ५१ ॥ जननीचा गर्भजठरीं । कोण घडणार, सांग, सुंदरी । कपींद्रु निर्माण होय कोणे कुसरी, । तें काय मातें अधीन? ॥ ५२ ॥ पुत्राची कन्या, कीं कन्येचा पुत्र, । हें काय जननीअधीन सूत्र. । हें वेगळेंचि असे, वो, सूत्र. ।

कर्ता कोण निर्मिता ? ॥ ५३ ॥ प्रिये, बाळदशेनंतरें । वपु होतांचि यौवन-भरें; । हा प्रयत्न साचोकारें । काय त्याचा तो कर्ता ? ॥ ५४ ॥ पुढें तारुण्याति देखोनि मिठी । आपुलेनि मेळें वार्धक्य उठी; । ऐशा त्रय दशांचिया गांठी । कवण सोडी, बांधी ? ॥ ५५ ॥ कठिण नारिकेळाचां गर्भी पाणी । प्रवेशे, हे कोणाची करणी ? । कपित्थ फळ गिळिलेया मोनाची धुनी । काय बुजरु कर्ता ? ॥ ५६ ॥ म्हणौनि होणार, जाणार या दोन्ही कळा; । यांचा कर्ता, काळ, वेगळा. । या अमोघा काळा माळा । गुफौनि राहिला. ॥ ५७ ॥ आम्हीं काय केलें आपणातें, । हें विचारीं, प्रिये, मारांतमतें. । इये करणिचा दोषु कोणातें । ठेवावा कवणें ? ॥ ५८ ॥ आणि म्यां, वो, हरिली जानकी, । -यासत्व करणी जाली इतुकी; । हें मिथ्या निय बोलिजत लौकिकीं । मद्बुद्धी-करूनि." ॥ ५९ ॥ ऐसीं सगर्भे उत्तरें । मंदोदरीप्रति दशशिरें । बोलिलियावरि, आदरें । पुनरपि बोलतु. ॥ ६० ॥ म्हणे, "कुरंगनयने, आइक. । मज आठवलें असे एक. । त्याचे करणीउपरी सकळिक । दोषु नाशातें पावती. ॥ ६१ ॥ पूर्वी प्रसन्नकाळीं चंद्रचूडें । मज सांगितलें स्नेहें वाडें. । म्हणे, "तुज माडेल सांकडें । तैं हा जपहोम करीं. ॥ ६२ ॥ उपदेशिल्या मंत्रमाळा, । सांगितल्या करणीकळा; । म्हणे, 'होमु सिद्धी गेलेया, आगळा । देवत्रयाहूनि होसी.' ॥ ६३ ॥ तरि, प्रिये, आतां हाचि नेमु. । करीन शिवदत्त जपहोमु. । रघु निर्गेळ, सागरि वैसोनि रामु । जिंकीन युद्धीं. ॥ ६४ ॥ करीन मृत्युंजयाचा जपु, । हवैन हुताशनु प्रदीपु." । म्हणोनि धरिला संकल्पु । उठता जाला. ॥ ६५ ॥ तव तो उठतिये काळीं । मंदोदरीनें करकमळीं । धरूनि मतोर मूमंडळीं । पुनरपि वैसविला. ॥ ६६ ॥ म्हणे, " परियेसीं, गा लंकानाथा. । जपु, होमु करणें हें वृथा. । इयें हीनां द्विजांचीं कृत्यें, समर्था, । तुम्हां योग्य कर्म नव्हे. ॥ ६७ ॥ कैसीं नेसाल चिरें तांवडीं ? । कैशी घाला शिरें उघडीं ? । कैशा सुवा घेऊनि परवडी । आहुती टाकाल ? ॥ ६८ ॥ महाधूम्रें कडुवटें । भरतील डुबुळें, नासपुटें. । ज्वाळा उमटती, तेणें गोमटें । सर्वांग आ-हळेल. ॥ ६९ ॥ तुजे होमु करितां, प्राणपति, । वैरी विघ्न करावया

येती. । मेघनादा जाली जे गति । तेचि तव दिसती आहे. ॥ ७० ॥ ऐसाचि होमु मांडिला पुत्रें तेणें । तंव निकुंबळेसि वैरी धाळणें । धाळुनि, मारिला लक्ष्मणें । पुत्र इंद्रजितु माझा. ॥ ७१ ॥ तैसेंचि कां आरंभिलें तुम्हीं ? । निर्धारें विघ्न वर्तेल होमीं. । आतां सत्व धरूनि रणभूमी । युद्ध मागुतें करावें. ॥ ७२ ॥ भविष्य तंव कळलें आम्हां. । सर्वथा आरमार्थेना होमा. । रणरंगीं मिळावें संग्रामा, । दुसरा विचारु नाहीं. ॥ ७३ ॥ पुनरपि रिघावें सन्मुखें । तरि रामेंसीं सख्य तें कोणे सुखें ? । सर्व संहार जाला, दुःखें । ब्रह्मांड भरलें आहे. ॥ ७४ ॥ प्रथमचि बिभीषणें, । म्यां आणि कुंभकर्णें । हित सांगितलें, परि कोणें । घेतलें नाहीं हृदयीं. ॥ ७५ ॥ प्रथमचि नाइका शब्दु, । आतां कायिसा मिथ्या वादु ? । तुटला सर्वां सेनांचा मूळकंदु, । राज्य बुडौनि गेलें. ॥ ७६ ॥ आतां संग्रामासि जावें, । होईल तें पुढें पाहावें." । ऐसें मंदोदरी बोले, तें दशग्रीवें । असह्य मानिलें ॥ ७७ ॥ म्हणे, "कांते, बोलिलीसि बरवें, । परि पुरुषें प्रयत्नासि कैसें सांडावें ? । पाहें पां भगीरथें कोणे धमवें । भागीरथीसि आणिलें. ॥ ७८ ॥ निरसावया मातेचें सांकडें । अमृत आणिलें गरुडें, । सापत्नकुळें पुढें । संहारिलीं तेणें. ॥ ७९ ॥ तैसाचि मी प्रयत्नपूर्वक । होमकर्म करीन, आईक । सिद्दी गेलेया सकळिक । शत्रु संहारीन, सत्य. ॥ ८० ॥ प्रस्तुत या कर्मावेगळा । उपायो दिसत नाहीं डोळां. । आतां तूं संपत्ति भोगीं सकळा । मी जाईन होमासि. ॥ ८१ ॥ ऐसा रावणु बैसलिये ठायीं । बोलतचि उठिला ते समयीं. । पुढें मंदोदरीचां हृदयीं । दुःखाचा कल्लोळु लागला. ॥ ८२ ॥ तेचि काळीं, ऐका, रावणें, । कार्य सूचिलें अंतःकरणें. । म्हणे, "लक्ष्मणु पडला त्याकारणें । औषधि आणितील. ॥ ८३ ॥ द्रोणाद्रि आणावयालागीं । जाईल हनुमंतु मनोवेगीं; । तरि तो गुंतौनि राहे मार्गीं, । ऐसा प्रयत्नु देखावा. ॥ ८४ ॥ ऐसें विचारूनि अंतर्यामीं, । राक्षसु बोलाविला काळनेमी. । त्यासि प्रार्थी. म्हणे, "तुम्हीं । एक कृत्य करावें. ॥ ८५ ॥ लक्ष्मणु म्यां भेदिला शक्तीं, । तो मूर्च्छा पावला क्षितीं; । त्यासि उठवावया मारुती । द्रोणाद्रि आणों जाईल. ॥ ८६ ॥ रात्रीमध्यें आणील औषधि । तरिच

लक्ष्मणु उपचारील निशुद्धी. । सूर्योदय जाहल्या, अवधी । पुरेल लक्ष्मणाची. ॥ ८७ ॥ तरि हनुमंतु मनोवेगें । जाईल, गा, उत्तरमार्गें, । तरि तुम्ही त्याचेनि पाठिमागें । त्याहीपुढें जावें. ॥ ८८ ॥ जेणें प्रकारें तो वानर व्यसनीं पडे, होय मेहार, । ऐसें करीं, जाय उदिम । नव्हे, रे, काळ नेमी." ॥ ८९ ॥ ऐसें सांगितलें दशकंधरें । 'हो, जी.' म्हणौनि उत्तर दिधलें येरें. । नमस्कार करूनि उत्तरे । मनोवेगें निगाला. ॥ ९० ॥ इतुकें वर्तल्यावरि । सूर्य उपिला अस्तगिरि. । प्रवर्तली शार्वरी, । तमें दिग्मडळ भरलें. ॥ ९१ ॥ तेचि काळीं निशाचराधीशें । सामुग्री घेतली होमोद्देशें; । गुहा होती पश्चिमदिशे । तेथ जाता जाला. ॥ ९२ ॥ रात्रिंचर अगळग, । जे काळदूतप्राय जैसे नाग, । ते गुहाद्वारीं अभग । रक्षण ठेविले. ॥ ९३ ॥ रावणु प्रवेशला भीतरीं, । चडौशळा वानिली गुहाद्वारीं. । पुढें एकाकी विस्युक्तप्रकारीं । जपहोमु आरंभिला. ॥ ९४ ॥ असो. ऐसी इकडील कथा, । वानरदळांतु बहुत व्यथा. । सौमित्रा शक्ति लागली, रघुनाथा । शोकार्णवीं वस्ती जाली. ॥ ९५ ॥ आतां अमृत-वल्लींचा पर्वतु । आणावया जाईल हनुमंतु, । ते पुढील निवचना ऋषि-पंडितु । बोलिला असे. ॥ ९६ ॥ इति श्री कथा रामायणी । गंगाचि केवळ जगतारिणी. । धन्य वाल्मीकिऋषींची वाणी, । उगवली तेथौनि. ॥ ९७ ॥ ऐसें श्रोतीं परिसलें. । समयीं सहजचि आक्षेपिलें । म्हणे, "वक्त्यानें उपमान दिधलें । कथेसि गौतमीचें!" ॥ ९८ ॥ तव 'हो, जी;' म्हणे वक्ता. । श्रोतयां सन्मुख जाला बोलता. । म्हणे "कथेसि गोदावरीची समता. । घडे, परियेसा कैसी. ॥ ९९ ॥ गंगेसि प्रकट करिता त्र्यंबकु, । तैसा आद्यकवि ऋषि वाल्मीकु । उगमिता जाला पुण्यश्लोकु । रामकथेलागीं. ॥ १०० ॥ चालिला गंगेचा जळओघु, । तरि कथेचा चाले विचित्रमार्गु. । शोधिता सुधा काव्यींची, स्वर्गु । तृणासमान वाटे. ॥ १ ॥ गोदावरींमध्यें जळचर, । अपार मीन मिनले क्रूर, । तरि कथापथगर्भीं ऋक्षवानर । आणि दुर्मति राक्षसें. ॥ २ ॥ गंगा सर्वकाळ सेवन । करिती धर्माभिमे मुनिजन; । तरि कथाही ते सज्जन । परिसताति प्रीती. ॥ ३ ॥ 'गंगा तारक' गाती पुराणें; । तरि भवबंध तुटे कथा-

१. अ. शत्रूचा मयत्न जाईल सिद्धी.

श्रवणें. । गंगेहूनि बहुतें गुणें । हे आगळी विचारितां. ॥ ४ ॥ गंगे गेलेयां गंगा पाविजे, । आणिके स्थळीं कैंची आहिजे ? । कथा रामाची श्रवण कीजे । इच्छा जेथ तेथें. ॥ ५ ॥ सप्तमुखें गोदावरी । मिळाली पूर्वसागरीं. । तरि रामकथा त्रैलोक्या साजिरी । सप्त कांडें तियेचीं." ॥ ६ ॥ असो हा पाल्हाळ. प्रस्तुत । लक्ष्मणु पडला व्यथाभूत. । पुढील चरित्र परिसेसा सुचित्त, । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १०७ ॥

---

## प्रसंग त्रेपन्नावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । रावणाचिये शक्तीकरूनि । लक्ष्मणु निचेष्टित पडला मेदिनी; । तयातें परिवेष्टूनि । वीरचक्र बैसलें. ॥ १ ॥ कटक सकळ चिंतातुर । स्थळोस्थळीं; परस्पर । म्हणती, "लक्ष्मणु पडला, थोर । अनर्थु जाला." ॥ २ ॥ वीरचक्रांतु जो अग्रगणु । तो विकळ पडला लक्ष्मणु; । त्याचेनि दुःखें सीतारमणु । अत्यंत शोक करी. ॥ ३ ॥ "विघ्न उदैलें केन्हडें, । कार्य नासलें दिसे पुढें. । इंद्रजितु वधिला त्याचे ओढें । काढिलें काय रावणें ? ॥ ४ ॥ तरि आतां शीघ्र वधु कीजे रावणाचा । आणि उठवावा सौमित्रु आमुचा. । इतुकेनि कार्यसिद्धि असे." हे वाचा । वदती वीरगण. ॥ ५ ॥ निकट रघुनाथु तिये काळीं । बैसलासे लक्ष्मणाजवळि. । विलाप करितो, निडळीं । कर ठेवूनि, कैसा ? ॥ ६ ॥ म्हणे. "वा, रे, वत्सा वेल्हाळा, । अनुजा, माझेया लघु बाळा, । नेत्र उघडूनि स्नेहाळा, । कां मजसीं बोलसिना ? ॥ ७ ॥ अटव्यें घोरें क्रविलीं दारुणें, । सांसेसा श्रमलासि मजकारणें, । अगणित तुजेनि करें मरणें । प्राप्त जालीं नैर्ऋतांतें. ॥ ८ ॥ जो भुवनत्रयासि अजिंकु, । देवदर्पहरण, कंटकु, । आम्हा सकळां नांकळे एकु, । तो तुवां वधिला रावणि. ॥ ९ ॥ ऐसें तुझें वीर्यवैभव, । ज्यासि नित्य कल्याण चिंतितो देव. । तें आजि कां ठेवूनि निर्जीव । रणरंगणीं शयन केलें ? ॥ १० ॥ तुज ऐशी दशा भूतळवटीं, । आतां काइसी सीतेची भेटी ? । भरलें तप केलें शेवटीं ।

महिमा. । आणिकही जाण, मनोत्तमा. । शचिपतिप्रसंगें भोगित कर्मी
ते अहल्या उद्धरली. ॥ २२ ॥ ऐसे रघुपतीचे चरण, । जे आश्र
ब्रह्मादिकांसि जाण, । अविनाश, नित्यानंद संपूर्ण, । जेथें रमती योगी.
॥ २३ ॥ ऐसें वदोनियां हनुमंतें । स्वस्थ केलें आपुलिया मनातें. । म
रामपायीं ठेविलें, धनवंतें । प्रिय ठेवणें जैसें. ॥ २४ ॥ नीरजकोशांत
षट्पदु, । का गगनमंडळीं निरे नादु, । नाना चतुराचां हृदयीं शब्दु । प्रवे
शोनि बैसला. ॥ २५ ॥ घटनाभीत पडला स्फुलिंगअणु, । का जळराशी
आंतु लवणपरमाणु, । नाना दुग्धार्णवामध्यें अंबुकणु । सर्वांहूनि आट
॥ २६ ॥ ऐसें हनुमताचें तिये समयीं । मन मिळालें श्रीरामपायीं. । म
भावना केली हृदयीं । मनोवेगिनी सिद्धीची. ॥ २७ ॥ सिद्धि अष्ट
मुख्य असती, । मध्यमा दहा बोलिजती, । क्षुद्रा पंच वाखाणिती । प्रयां
तरीं पैं हो. ॥ २८ ॥ सर्वां साधकां साधनीं नेमें । मुख्य अष्टमा, त्याचं
नामें । बोलिलीं असती; अनुक्रमें । परियेसा, जी. ॥ २९ ॥ पहिले सिद्ध
नाम अणिमा, । दुसरीचें जाणा महिमा, । तिसरीयें सिद्धीचें लघिमा,
चतुर्थीचें प्राप्ति ऐसें; ॥ ३० ॥ प्रकाश नाम पंचमीचें, । ईशित
षष्ठीचें जाणा साचें; । वशिता हें सप्तमीचें, । अष्टमीचें सर्वकाम्य
॥ ३१ ॥ ऐसी अष्टमा सिद्धींची नामावळी । या ईश्वराचां ठायीं सद
काळीं; । जैशा कळा सूर्यमंडळीं । निरंतर असती. ॥ ३२
केवळ रुद्ररूपा अष्टमहासिद्धि । सकळ मनोरथातें देती; । त्या हनुमतां
वश असती, । हा केवळ रुद्रावतार. ॥ ३३ ॥ मध्यमा दहा त्यांतील सिद्धि
ते हनुमंतें भाविली बुद्धि; । मनोवेगीं क्षीराब्धी । पावता जाला. ॥ ३४
सहज कपि तो सहज बळें । शीघ्र सिद्धीनें शीघ्र काळें । बहुवस क्रमिल
जैसा रविमंडळें । अपार नभोमार्गु. ॥ ३५ ॥ षट् समुद्रातें लंघिलें, । स
द्विगुण भूमंडळ क्रमिलें. । पुढें क्षीरार्णवासि देखिलें, । असंभाव्य कैसें
॥ ३६ ॥ अंतरें तटाकींहूनि तटाक । लक्षद्वय आणि त्रीणिदशक, । इतु
गणनेचें कौतुक । भूगोलीं बोलिलें पैं. ॥ ३७ ॥ त्या क्षीराब्धीचा दक्षिण
पारीं । विशाळ असे त्रिकूटगिरि; । शोणाचळ सीमासेजारी । स्वर्गोपम सान्निर

बहुत वेगु.' । हा प्रस्तुत असों दे प्रसंगु. । तुझेनि समागमें मार्गु । मन क्रमिला नवचे. ॥ ४ ॥ मार्गी तूं सरिसें अससी । जें जें देखणें घडैल चक्षुरिंद्रियासि, । तेथें तेथें तूं प्रवेशसी, । पद्मिनी भ्रमरु जैसा. ॥ ५ ॥ सर्वथा इंद्रियांचेनि द्वारें । तूं गुंतसी निजगुणविकारें; । तेथें व्यसनें बलात्कारें । पुढें ठाकूनि येतील. ॥ ६ ॥ मनाचेनि विकारसंगें । इंद्राचें वपूसि पडलीं भगें, । विरिंचीसि व्यसन वडलें उगें । गिरिजेचां विवाहीं. ॥ ७ ॥ मनासि उठिला विकारु । तें भिल्ली भुलविला शंकरु, । चंद्रासि लागिला कळंक थोरु । गुरुतल्पग म्हणौनि. ॥ ८ ॥ वसिष्ठाविश्वामित्रां ऐसे । मनाच्या संकल्पासरिसे । उर्वशिया केले पिसे । किती एक काळवरि. ॥ ९ ॥ असो. ऐसेया अनुवादा । करितां लागेल दीर्घ निंदा; । म्हणौनि, रे मना, सर्वदा । संकल्पु करिसी. ॥ १० ॥ मना, तूं संसारबंधनाचें मूळ, । मना, तूं मुक्तीचें द्वार केवळ, । मना, तूं परब्रह्म निर्मळ, । मना तूं प्रपंचु अवघा. ॥ ११ ॥ मना, तूं सर्व सुगुण, । मना, तूं शून्य पैं निर्गुण, । मना तूं सर्वार्थी परिपूर्ण, । मना, तूं पिपासाक्रांत. ॥ १२ ॥ मना, तूं विषाचें आलय, । मना, तूं अमृताचें माधुर्य, । मना, तूं सत्वाचें धैर्य । अधिक अतिमानें. ॥ १३ ॥ मना, तूं स्नेहकमळांचें सरोवर, । मना, तूं विरोधसर्पाचें विवर, । मना, तूं धर्माचें भांडार, । जनकु पातकांचा. ॥ १४ ॥ असो बहु अनुवादु. मना, । तूंचि कारण मोक्षबंधनां. । आतां परिसें विज्ञापना । करितु असें तुजप्रति. ॥ १५ ॥ लक्ष्मणु निचेष्टितु असे धरणी, । त्याकारणें मी द्रोणादि आणीं, । तंव तूं श्रीरामाचे चरणीं । राहें अचंचळ. ॥ १६ ॥ अरे, ईश्वरीं असतां मन । सर्व सिद्धि राहती कर जोडून, । जैसें रायासि सेवितां, सर्व जन । न सांगतां भजती; ॥ १७ ॥ त्या रामाचेनि पादारविंदवळें । होईजे भवदुःखावेगळें. । वक्रदृष्टी विश्वभक्षकें काळें । कदा पाहों न शकिजे. ॥ १८ ॥ ज्या रामचरणींची गंगा । पवित्र करीतसे जगा, । सागरासि आली उपयोगा । भागीरथी, मार्गें. ॥ १९ ॥ तेचि गोदावरी भरतखंडीं । स्पर्शे ब्रह्महत्यांसि हिरोनि सांडी; । सेवितां मरणानंतरें मांडी । पुढें मुक्तीचें फळ. ॥ २० ॥ दोन्ही गंगा त्या एकरूप; । शिवजटागर्भीचें तप; । सेवनेंकरूनि संसारपाप । सर्वथा भस्म करिती.' ॥ २१ ॥ ऐसा पादारविंद-

महिमा. । आणिकही जाण, मनोरमा. । शचिपतिप्रसंगें भोगित कर्मा । ते अहल्या उद्धरली. ॥ २२ ॥ ऐसे रघुपतीचे चरण, । जे आश्रयो ब्रह्मादिकांसि जाण, । अविनाश, नित्यानंद संपूर्ण, । जेथें रमती योगी." ॥ २३ ॥ ऐसें वदोनियां हनुमंतें । स्मरण केलें आपुलिया मनातें. । मग, रामपायीं ठेविलें, धनवंतें । प्रिय ठेवणें जैसें. ॥ २४ ॥ वारिजकोशांतरीं पद्पदु, । कां खमंडळीं विरे नादु, । नाना चतुराचां हृदयीं शब्दु । प्रवेशौनि बैसला. ॥ २५ ॥ वडवाग्नींत पडला स्फुलिंगअणु, । कां जळराशींआंतु लवणपरमाणु, । नाना दुग्धार्णवामध्यें अंबुकणु । मेघींहूनि आला. ॥ २६ ॥ ऐसें हनुमंताचें तिये समयीं । मन मिळालें श्रीरामपायीं. । मग भावना केली हृदयीं । मनोवेगिनी सिद्धीची. ॥ २७ ॥ सिद्धि अष्टमा मुख्य असती, । मध्यमा दहा बोलिजती, । क्षुद्रा पंच वाखाणिती । ग्रंथांतरीं पैं हो. ॥ २८ ॥ सर्वा साधकां साधनीं नेमें । मुख्य अष्टमा, त्यांचीं नामें । बोलिलीं असती; अनुक्रमें । परियसा, जी. ॥ २९ ॥ पहिले सिद्धी नाम अणिमा, । दुसरीचें जाणा महिमा, । तिसरीयें सिद्धीचें लघिमा, । चतुर्थीचें प्राप्ति ऐसें; ॥ ३० ॥ प्रकाश नाम पंचमीचें, । ईशित्व षष्ठीचें जाणा साचें; । वशिता हें सप्तमीचें, । अष्टमीचें सर्वकाम्या. ॥ ३१ ॥ ऐसी अष्टमा सिद्धींची नामावळी । या ईश्वराचां ठायीं सदा काळीं; । जैशा कळा सूर्यमंडळीं । निरंतर असती. ॥ ३२ ॥ केवळ रुद्ररूपा अष्टमहासिद्धि । सकळ मनोरथातें देती; । त्या हनुमंतातें वश असती, । हा केवळ रुद्रावतार. ॥ ३३ ॥ मध्यमा दहा त्यांतील सिद्धि । ते हनुमंतें भाविली बुद्धि; । मनोवेगीं क्षीराब्धी । पावता जाला. ॥ ३४ ॥ सहज कपि तो सहज बळें । शीघ्र सिद्धीनें शीघ्र काळें । बहुवस क्रमिला, जैसा रविमंडळें । अपार नभोमार्गु. ॥ ३५ ॥ पट् समुद्रांतें लंघिलें, । त्यां द्विगुण भूमंडळ क्रमिलें, । पुढें क्षीरार्णवासि देखिलें, । असंभाव्य कैसें ! ॥ ३६ ॥ अंतरें तटाकींहूनि तटाक । लक्षद्वय आणि त्रीणिदशक, । इतुकें गणनेचें कौतुक । भूगोलीं बोलिलें पैं. ॥ ३७ ॥ त्या क्षीराब्धीचां दक्षिणपारीं । विशाळ असे चंद्रगिरि; । द्रोणाचळु सीमासेजारी । स्वर्गोपम साजिरा. ॥ ३८ ॥ हनुमंतु येईल औषधीकारणें । म्हणौनि प्रथमचि पैं रावणें । काळनेमी पाठविला; तेणें । अपूर्व माया निर्मिली. ॥ ३९ ॥ अयत अपूर्व

तो चंद्राचळु; । चंद्रा ऐसा सुशीतळु; । सुरमनोहरु, धवळु, । जैसा कैलास गिरि. ॥ ४० ॥ त्या चंद्राचळासि नवचे वर्णिलें; । वाटे चंद्राचें तप प्रकटलें, । कीं क्षीरसागराचें यश उरलें । पर्वतरूपें; ॥ ४१ ॥ कीं तें पृथ्वीकरींचें कमळ । कीं तें विराटवृक्षाचें गळित फळ, । नाना वल्लीकळांचें मंडळ । महारमणीय. ॥ ४२ ॥ कीं गोठलेया सुधारसाचा गोळु, । कीं ब्रह्मांडदेवतेचा बाळु, । नाना आश्रित जीवधर्मांचा विशाळु । पर्वतरूपें. ॥ ४३ ॥ असो चंद्राचळप्रदेशभूमी । दक्षिणभागीं वहु निविड दुर्मीं; । तेथें तो राक्षसु काळनेमी । कापट्यबुद्धी राहिला. ॥ ४४ ॥ घेतला मुनींचा वेषु, । दिसे जैसा पुण्यपुरुषु; । बहुशिष्यवेष्टित, घोषु । वेदशास्त्रांचा कारित. ॥ ४५ ॥ आश्रमु तो अति रमणीय, । जैसें स्वर्गीचें आलय; । वापीकूपींचें पूर्ण तोय । सुखमर्यादा उचंबळे. ॥ ४६ ॥ दिव्य वल्ली, दिव्य द्रुमु । वाढिन्नले भेदित व्योमु; । फळीं, पुष्पीं उत्तमोत्तमु । लवौनि जाले असती. ॥ ४७ ॥ अपूर्व आश्रमाची रचना; । सादृश्य चित्ररथवना; । होमशाळा, पठणशाळा गहना, । विस्तीर्ण, मनोहरा. ॥ ४८ ॥ शमीपिप्पलांच्या समिधा, । दर्भजुडिया दशविधा । करूनियां ठेविलीया सिद्धा । वेदीकुंडापाशीं. ॥ ४९ ॥ चहूंकडे तुळशीवनें, । निर्मळें केलीं समार्जनें, । अभ्यागतासि उदकें, अन्नें । सिद्ध करूनि ठेविलीं. ॥ ५० ॥ ऐसा काळनेमी निशाचरु । कपट करूनि राहिला मायकरु; । जैसा विप्रवेषी तस्करु । मार्गी छायेसि राहिला. ॥ ५१ ॥ कां बकु बैसला गंगातीरीं । ध्यानस्थ योगियाचियापरी, । तो अकस्मात मत्स्यातें उदरीं । चंचुपुटीं धरूनि घाली. ॥ ५२ ॥ ऐसा राक्षसु धरूनि क्षमा । वज्रचित्त, पापकर्मा । बैसला असे; तंव आश्रमा- । समीप हनुमंतु आला. ॥ ५३ ॥ जैसा तपोनिधि स्वर्गाप्रति । जातां, मार्गी लागे यमावती; । तैसा तो आश्रमु पावला मारुति । द्रोणाचळा जातां. ॥ ५४ ॥ कां परमवस्तूचें करितां साधन । आडवें राहे एखादें विघ्न, । नाना वैराग्यमूळ उगवतां ज्ञान । प्रारब्धु पुढां ठाके. ॥ ५५ ॥ हनुमंतु मनोवेगें जातां । मुनिआश्रमासि जाला देखता । अपूर्व सुरु वाटलें चित्ता, । मग तटस्थ जाला. ॥ ५६ ॥ म्हणे, "कैसा आश्रमु मनोहरु ! । अतिरमणीय, संपत्तिसागरु, । सुरालय महामेरु उपरूनि यासि वोवाळिजे. ॥ ५७ ॥ कैसी रचना अपूर्व ! । स्वर्गोपम प्रकारा

सर्व, । केवढें ऋषींचें पुण्यवैभव, । वास्तव्य सुखें करी." ॥ ५८ ॥ ऐसा तेथें आला हनुमंतु । निमिषार्ध तटस्थ तृषाक्रांतु; । तंव मुनि बोभाइला अकस्मातु । ' या, हो; या, हो मार्गस्थहो.' ॥ ५९ ॥ जैशी वदे अशरीरिणी, । तैसी ऐकिली मुनीची वाणी. । हनुमंतु विचारी अंतःकरणीं मैत्री घेऊं या महंताची.' ॥ ६० ॥ हनुमंतु येऊनि उभा राहिला, जैसा अतिथि आंगणासि आला; । कीं मूर्तिमंतु उतरला । अंतकु या काशीहूनि. ॥ ६१ ॥ पुढें हनुमंतासि देखोनि । वेषधारी बोले सुवचनीं. म्हणे, बहु श्रमलासि, आसनीं । बैस, पूजा करूं." ॥ ६२ ॥ तंव हनुमंतु म्हणे द्विजा, । " विपरीत बोलतां, मुनिराजा. । आम्हींचि करावी तुमची पूजा । परि कार्यार्थी असों. ॥ ६३ ॥ आतां आतिथ्य पावलें सकळ. । दे, गा, उदक सुशीतळ. । तृषेनें शोषिलें तुंबळ । हृदय माझें ॥ ६४ ॥ मावकरु बोले मधुरा गिरा. । म्हणे, " आसनीं बैस; ग कपीश्वरा. । उभेयाचि उदक चतुरा । कैसा प्राशन करिशी ? ॥ ६५ ॥ देखतोसि प्रभु, पंडितु । मार्गीं श्रमलासि, गा, बहुतु. । आमुचेनि मार्गें अतीतु । आलासि या स्थाना. ॥ ६६ ॥ तरि, आतां कृपा करीं, । स्थिर राहें घटिका चारि, । स्वेच्छा तृप्ति स्वीकारीं मिष्टान्नें, शीतलोदकें. ॥ ६७ ॥ याहीवरि इच्छेवेगळें । भक्षीं दिव्य द्रुमांचीं दिव्य फळें; । पुढें चिरकाळें अथवा शीघ्रकाळें । राहावें, जावें, महावीरा." ॥ ६८ ॥ ऐसा कपटी मावकरु । बोले बहुसाल आदरु; । जैसा गुप्तपाश तस्करु । सदय सेवा दाखवी. ॥ ६९ ॥ कां महाविष नागकोंडी । गुळगुळी लागे त्या चाविल्यां तोंडीं । उदरांतु गेलेया मुरकुंडी । पाडी क्षणमात्रें. ॥ ७० ॥ ऐसे वेषधारियाचे बोल । हनुमंता रुचले बहुसाल; । परि बैसों नल्हाये, उगवैल । आदित्य म्हणौनि. ॥ ७१ ॥ उगवतांचि पूर्वे आदित्यु । तैसाचि लक्ष्मणासि मृत्यु, । म्हणौनि व्यग्र राममृत्यु । ऋषि-आदरें न बैसे. ॥ ७२ ॥ जैसें वरांगनेचेनि विलासें । विवेकिया नळगे कामपिसें. । नाना स्वरूपसाधका सिद्धीसारिसें । गुंतणें न घडे. ॥ ७३ ॥ अनामिकगृहींचा सोहळा । राजकरणीहूनि आगळा; । तो उत्तमें देखौनि डोळां । काय प्रवेशौनि पाहिजे ? ॥ ७४ ॥ ऐसियापरी हनुमंतें । सांडिलें त्याचेया आदरातें; । उभा असतांचि मारुतें । उदक मागितलें. ॥ ७५ ॥

हनुमंतु म्हणे, "जी, मुनि, तुम्हां । देखिलें, सर्व पावलें आम्हां; । आतांच नलगे, आश्रमा । येऊं येकाधे काळीं. ॥ ७६ ॥ घेऊन तुमचें शीतोदक । तेणें तोप नर पावती अनेक; । प्रीतीचें बोलणें अधिक । साच सुधारसाहूनि." ॥ ७७ ॥ ऐसें वदे वीर सुभटु । तेणें कालनेमीनें मानिला वीटु; । मग शिष्यांसि म्हणे "या रे, घटु । उदकाचा वानरातें." ॥ ७८ ॥ हनुमंतु म्हणे, "महापुरुषा, । येणें घटोदकें न वोळे तृषा; । अगस्ती आणि वडवानळा पिपासा, । तैशी मज लागली आहे." ॥ ७९ ॥ मग तो शिष्यांसि जाला सांगता. । म्हणे, "शीघ्र न्या, रे, हनुमंता; । सरोवर दाखवा; मागुता । उदक न मागे कोण्हासि कहीं." ॥ ८० ॥ मग विद्यार्थी हनुमंतासि । सरोवर दाखविला, जेथें विवशी; । जिया उदक घेतां बहुतांसि भक्षिलें असे. ॥ ८१ ॥ पुढें हनुमंतु जाऊनि तिये काळीं । बैसला सरोवराचिये पाळी । प्राशन करावया अंजळी । उदक घेता जाला. ॥ ८२ ॥ तें सरोवर जळपूर्ण भरलें, । अक्षोभ्य समुद्रेंशीं तुळिलें, । शुद्ध जळप्रवाहासि जाणवलें; । मग उसळली थरि. ॥ ८३ ॥ उदक खळखळलें तेणें घोषें; । कितीएक गेलें आकाशें. । मुख पसरूनि एक सारिसें । हनुमतु धरिला चरणीं. ॥ ८४ ॥ पायीं बैसली वज्रमिठी, । जैसी अजगरें ताळासि घातली आंठी; । ऐसें देखौनि कपिवीरजेठी । कैसें करिता जाला? ॥ ८५ ॥ वामकरें कंठीं धरिली, । वोढूनि बाहीरि काढिली, । जैसी कुंजरें कमळिणी तोडिली । केतुलेनि प्रयासें. ॥ ८६ ॥ तियेचें पर्वतासमान शरीर, । वज्रा ऐसें अंग कठोर, । हनुमतें दिधली पांपर । निगुती वर्मांगाचां ठायीं. ॥ ८७ ॥ पक्वफळा ऐसी चूर्ण जाली, । मेदमांसें पृथ्वी धाली, । तंव तियेचां देहापासूनि निघाली । दिव्य देवांगना. ॥ ८८ ॥ उभी राहौनि बद्धांजुळी । हनुमंतु स्तविला तिये काळीं. । म्हणे, "गा, महाबळी, । सांगैन तें सत्य मानीं. ॥ ८९ ॥ हा नव्हे, गा, शुद्ध ऋषीश्वरु; । कपटी, राक्षसु, मायकरु; । तुज विघ्न करावया निर्धारु । करूनि राहिलासे. ॥ ९० ॥ हा आश्रमु दिसे मनोहर; । वाटिका, उपवनें, तरु गंभीर; । हें याचें मायाडंबर । दिसे तितुकें मिथ्या. ॥ ९१ ॥ यासि विश्वासों नको आतां; । यासि वधें, गा बळवंता. । मग कार्यसिद्धी, श्रीमंता, । शीघ्र येथूनि जावें. ॥ ९२ ॥ तुझेनि

प्रसादें इये काळीं । जाहिर्ये मी शापाविगळी. । आतां आज्ञा देईं, महाबळी; । जाईन निजलोका." ॥ ९३ ॥ तियेचीं परिसौनि वचनें । आश्चर्य मानिलें वायुनंदनें. । म्हणे, "तूं कोण? कोणें व्यसनें, । किती काळ येथें होतींसि?" ॥ ९४ ॥ ऐसा हनुमंताचा आक्षेपीं, । बोले अप्सरा पुनरपि. । म्हणे, "परिस उपकारिया कपि; । पूर्वविवंचना ऐसी. ॥ ९५ ॥ माझेनि स्वरूपें, यौवनें । देवांसि पिसें केलें मदनें. । मज देखौनि लपविती वदनें । अष्टनायका. ॥ ९६ ॥ माझिये भ्रवे वळणखंडीं । पडती तपियांच्या मुरकुंडी; । विरिंचिआदिकरूनि सांडी । वासनापाश मजवरि. ॥ ९७ ॥ ऱ्यां आपुलेनि सौंदर्यपणें । त्रैलोक्य केलें ठेंगणें. । एके काळीं तपोधनाकारणें । उन्मत्तत्वें ढकलिलें. ॥ ९८ ॥ ते साक्षात् ईश्वरु, तपोवळी. । शापु दिधला तेचि काळीं. । म्हणे, "उन्मत्त, मत्री होईं जळीं । मृत्युलोकीं बहुकाळ." ॥ ९९ ॥ मग मी जालें भयचकित. । केला नमस्कारु, दंडवत. । प्रार्थना करूनि बहुत । उःशापु मागितला. ॥ १०० ॥ मग तेणें कृपाळुवें वचन बोलिलें बरवें. । म्हणे, "शापाविगळी स्वभावें । होसी तिये समयीं. ॥ १ ॥ हनुमंतु रामावतारीं । महत्कार्या जातां तम्हीं. सरोवरीं । उदक घेईल, तं निर्धारीं । उद्धार करील तूझा." ॥ २ ॥ ऐसें ऋषि बोलत क्षणीं । देहो माझा पडला धरणी. । महोमरूप मी पापिणी । ये सरोवरीं प्रवेशलिये. ॥ ३ ॥ येथें असतां चिरकाळ । प्राणी भक्षिले ब्यांतें बहु बळ. । पापरूप माझें केवळ । होतें हा काळवरि. ॥ ४ ॥ ऐसी अवधी पूर्ण जाली, । एकादश सहस्र वर्षें भरलीं. । आजि धन्य दिवसु! देखिलीं । पाउलें तुझीं डोळां." ॥ ५ ॥ ऐसा अप्सरा वृत्तांतु । सांगितला. आश्चर्य करी हनुमंतु. । पुढें सव्यें घातला वायुसुतु; । ऊर्ध्वमार्गें निवाली. ॥ ६ ॥ जैसी विद्युल्लता लवौनि गेली, । तैसी ते अप्रत्यक्ष जाली; । ऐसें देखौनि बुद्धि योजिली । काळनेमिनें कैसी? ॥ ७ ॥ महाघोर, कराळ, उंच । शरीर धरिलें योजनें पांच. । अट्टाहास केला तेणें संकोच । सिंहशार्दूलां ठेला. ॥ ८ ॥ ऐसें हनुमंतें देखिलें, । म्हणे, "अप्सरा यथार्थ कथिलें. । आतां यासि वधूं," म्हणौनि धरिलें । शरीर शतयोजनें. ॥ ९ ॥ मग हनुमंतें चरणतळीं । राक्षसु ताडिला महाबळी. । भूमी पडतां तात्काळीं । शरीर शतचूर्ण जालें.

। ११० ॥ ताडिला, पाडिला, तया ध्वनी । पडिसादु उठिला गगनीं; । त्रीचां भरीं मध्यमानीं । तो गंधर्वी आइकिला. ॥ ११ ॥ क्रोधें धांवोनि येथें आले, । कपीसि देखौनि खवळले. । शस्त्रास्त्रें वर्षते जाले । मेघवृष्टि जैसी. ॥ १२ ॥ मनीं विचारी कपिवीर. । म्हणे, " यांसि न लावावा उशीर. " । मग करिता झाला संहार, । करचरणीं ताडिले. ॥ १३ ॥ जैसें पुढिल्या पांपरा । कुंजरें ताडिलें मार्जारा, । तैसें हनुमंतें निशाचरां । चरणतळीं चूर्ण केले. ॥ १४ ॥ मग हनुमंतें तेचि काळीं । पुच्छ पसरिलें गगनपोकळी. । मध्यें गंधर्व घालूनि मोळी । बांधी समस्तांची. ॥ १५ ॥ भारा फिरविला गगनीं, । मग आहटिला मेदिनी, । निःशेष गेले चूर्ण होऊनि । चतुर्दश सहस्र. ॥ १६ ॥ एक पुच्छापासूनि चुकले, । ते दिग्गजां आड पळौनि गेले; । किती एक करचरणप्रहारें पडले । गंधर्व पृथ्वीवरि. ॥ १७ ॥ ऐसें शार्वरीचां मध्यमानीं । न भरता घटिका दोन्ही । अहो, काळनेमि वधूनि । हनुमंतु जयो पावला. ॥ १८ ॥ महावायूनें मेघासि विध्वंसिलें, । कां सुपर्णे सर्पा विदारिलें, । नाना विवेकें तडातोडी केलें । ससारसंकल्पातें. ॥ १९ ॥ ऐसें करूनि वायुतनुजु । त्वरा निघाला द्रोणाचळा उजू; । शक्तीनें भेदिला रामानुजु । त्याची चिंता हृदयीं वाहतु. ॥ १२० ॥ इति श्रीरामायण ऋषिनिर्मित, । युद्धकांडकाव्यकथामृत । तें परिसोतु श्रोते पंडित । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ १२१ ॥

---

## प्रसंग पंचावन्नावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । पुढें हनुमंतु मनोवेगें । निघाला चंद्राचळु घालूनि मागें, । तव समीपचि ईशान्य-मार्गे । द्रोणाद्रि देखिला. ॥ १ ॥ मेरूसारखा तो पिंवळा, । मंदराचळा ऐसा वाटोळा । कैलासासमान सरळा, । गगनचुंबित. ॥ २ ॥ याचें वर्णन बोलावें बहुत । तरि पूर्वींचि जालें असे किंचित्; । आतां लक्ष्मणु असे व्यथाभूत, । पाल्हाळीं पडतां नये. ॥ ३ ॥ वायुपुत्र क्षीराब्धितटीं । येऊनि उभा ठाकला द्रोणाद्रितळवटीं । जैसा मृत्यु आसन्नानेहटीं । गतायुष्याचेया.

॥ ४ ॥ मृगेंद्रु देखिला वारणें, । कां शार्दूळु देखिला हरिणें, । तैसा हनुमंतु देखिला द्रोणें । निजांगानेहटीं. ॥ ५ ॥ . महावातें हेलावे सागरु, । तैं डोले वरि फिरतां तारूं, । कां राहोसूर्वी आलेया शीतकरु । थरारिजे व्योमीं. ॥ ६ ॥ द्रोणाचळु ऐसेयापरी । कंपायमान पृथ्वीवरी. । म्हणे, " हा वानरु लागला वैरी, । न्यावेया आला मागुता. ॥ ७ ॥ कैसें कर्म माझ उदैलें, । कैचें सीतेसि राक्षसीं हरिलें, । कां महायुद्ध मांडलें । रामा रावणासि ? ॥ ८ ॥ जैसें देवां दैत्यांचिये तृष्णेकरूनि । मंदराचळु पडला व्यसनीं. । वासुकीचें उदर खंडौनि । विष बाहेरि निगालें. ॥ ९ ॥ शक्रा तारकाचेनि वैरें । मच्छेचि कामु जाळिला शंकरें; । तेणें तरि चेष्टा केली, मी निर्धारें । निरपराधी. ॥ १० ॥ म्यां कोण्हाचा अपराधु नाहीं केला. । एक वेळ हा कपि घेऊनि गेला. । पुनरपि न्यावया आला । बळात्कारें-करूनि. ॥ ११ ॥ कैंच्या अमृतवल्ली मजवरि । बहुता लागलिया पाठारीं, । भूषण तें दूषण चतुरीं । भविष्य बोलिलें आहे. ॥ १२ ॥ मजवरि वल्ली-भारु नसता, । तरि हा कपि कां न्यावया येता ? । मातळेचि आणिका पर्वता, । येथेंचि मागुता आला. ॥ १३ ॥ जें भूषण जयाकारणें । पुढें घातु मांडे तेणेंचि गुणें; । जैसें शुकसारिकें बोलाकारणें । बंधनातें पाविजे. ॥ १४ ॥ मृगाचिये नाभीं कस्तूरी । म्हणोनि शस्त्रें रिगती त्याचे उदरीं; । परिमळु आंगीं म्हणौनि । कांडोरीं करिती चंदनाची. ॥ १५ ॥ रत्नें होतीं क्षीरसागरीं । म्हणौनि मंथिला सुरासुरीं. । धनवंता विघ्न नाना-परी । बोलिलें आहे. ॥ १६ ॥ कुरंगासि कांचनदेह जालें । तेणेंचि त्यासि मरण आलें. । अति सौंदर्य म्हणौनि चोरिलें । सीतेसि रावणें. ॥ १७ ॥ गंगेचे अंगीं पवित्रपण नसतें । तरि शिवशिरीं असतां विघ्न कां होतें ? । म्हणौनि गुणभूषण जयातें । तेणेंचि त्यासि घातु. ॥ १८ ॥ मज औखधींचेनि प्रसंगें, । केव्हडें व्यसन मांरिलें रागें. " । ऐसें द्रोणाद्रि चिंतीं, तंव वेगें । केलें हनुमंतें अरिष्ट. ॥ १९ ॥ पुच्छ माढविलें शंख-चूड जेव्हडा; । त्या द्रोणाद्रीभोंवता घातला वेढा; । जैसें प्रळयीं महायरु-डुडा. । भेटाळिजे घेरें. ॥ २० ॥ वासुकीनें मंदराचळु वेढिला, । हा दृष्टांतु असे एक वेळ गेला; । जैं हनुमंतें द्रोणाद्रि नेला । सर्वाकारणें. ॥ २१ ॥ जे अर्थी जो दृष्टांतु बोलिजे, । तेचि अर्थी तो मागुता दीजे; ।

हें परिसौनि पंडितीं सांडिजे, । वमन जैसें. ॥ २२ ॥ परि एक वमन असे घेतलें । जें वनमक्षिकामुखींहूनि गळे; । कां आपस्तंबा उपयोगा आलें । अध्ययन वेदाचें जैसें. ॥ २३ ॥ उच्छिष्ट सर्वत्र वर्जिलें । परि एक असे घेतलें; । विष्णूसि नैवेद्यासि समर्पिलें, । तें उच्छिष्ट म्हणों नये. ॥ २४ ॥ यागीं हवितां जो पुरोडाशु उरला, । तो अवश्य पाहिजे घेतला. । जे अगाध वेदु बोलिला, । अंगीकरिता सर्व. ॥ २५ ॥ वेदमंत्र, शास्त्र, हरिकथा, । हे एकाचे मुखींचे एकीं घेइंजे सर्वथा; । उच्छिष्ट न बोलिजे, समर्था । ईश्वराची आज्ञा असे. ॥ २६ ॥ असो. या गति आहेति भिन्ना; । काव्यफळेची वेगळी विवंचना; । यांचे भाव जाणणें, हें गहना । चातुर्याचें वैभव. ॥ २७ ॥ कैसे वर्ते प्रसवतीचां अंगीं । तें अनुभूत नाहीं वंध्येलागीं. । विवाहिते वर्मं सुरतप्रसंगीं, । तें अभुक्त नेणे. ॥ २८ ॥ असो हें. कृतांतें पसरोनि दोर्दंड । लीळा कवटाळिजे त्रयंड, । तैसा हनुमंतें पुच्छ पसरोनि चंड । द्रोणाद्रि वेढिला. ॥ २९ ॥ बहुतशृंगी द्रोणागिरि । पुच्छें बांधौनि धरिला शिरीं. । हनुमंतु झेंपावतु अंबरीं । जाये गरुड ऐसा. ॥ ३० ॥ औषधि दिसती जैशा ज्वाळा, । तेजें लोपल्या नक्षत्रमाळा. । दिशा जालिया उज्वळा, । पिंगटला खमंडपु. ॥ ३१ ॥ असंभाव्य देखौनि ऐसें । मोहो पावलीं खेचरांचीं मानसें. । म्हणती, "पहा, हो, अद्भुत कैसें । आकाशामध्यें!" ॥ ३२ ॥ वायुपुत्र ऐसियापरी । अंतरिक्ष नेत असे द्रोणागिरि; । तंव नंदिग्रामीं तेचि अवसरीं । स्वप्नु भरतें देखिला. ॥ ३३ ॥ कोणी एक काळपुरुष आला, । तेणें दक्षिण भुजु गिळिला; । भरतु आंसुडोनि जागा जाला, । 'राम, राम' म्हणौनि. ॥ ३४ ॥ भरतें सूचिलें हें अरिष्टमूळ; । मग वसिष्ठा बोलाविलें तात्काळ. । म्हणे, "दुष्ट स्वप्न देखिला, कोण वेळ । वडली असेल रामलक्ष्मणां? ॥ ३५ ॥ म्हणे, "श्रीगुरु, सर्वोत्तमा, । हे स्वप्नारिष्ट बाधक नहो आम्हां; । आणि कल्याण असो, जी, रामा, । सीते सौमित्रासहित. ॥ ३६ ॥ या स्वप्नारिष्टाचे समयीं । घोर चिंता बैसली माझां हृदयीं. । आतां शांति करुनि, आशीर्वाद देईं । रघुनाथासि." ॥ ३७ ॥ ऐसा शब्दार्थु भरताचा । परिसौनि, पुरोहित वाचा । बोले. म्हणे, "तूं साधु, सत्वाचा । कां पां स्वप्न देखिला ऐसा? ॥ ३८ ॥ तापु उद्भवला चंद्रमंडळा, । अंधत्व आलें

दिनकराचा डोळां, । शैत्यवातु वडवानळा । बाधूं लागला पैं हा. ॥ ३९ ॥ कल्पद्रुमा अर्कीफळ आलें, । तैसें भरता तुवां दुष्ट स्वप्न देखिलें; । आतां असो आश्चर्य. शीघ्र केलें । पाहिजे शांतिकर्म. ॥ ४० ॥ ऐसें महर्षि बोलोनि प्रसिद्ध । शांति आरंभिली यथाविध; । होमद्रव्य करोनि सिद्ध, । तात्काळ हवन मांडिलें. ॥ ४१ ॥ वसिष्ठासारिखा सांगता, । भरता ऐसा कुशल कर्ता, । आहुती समर्पिल्या बहुता । अग्निपुरुषाच्या मुखीं. ॥ ४२ ॥ मुहूर्तांचेनि चतुर्थ मार्गें । होमु संपादित वेगें, । तंव हनुमंतु आला खमार्गें । निगुता अयोध्येवरि. ॥ ४३ ॥ जैसा सहस्रकिरणीं माध्यान्हीं । निगुता शीरसूत्रें दिसे गगनीं, । तैसा द्रोणाद्रि माथां घेऊनि । मारुति येवों सरला. ॥ ४४ ॥ वर्ळीचेनि तेजें द्रोणाचळ । दिसे जैसा अग्निकल्लोळ । महाअसंमान्य, विशाळ; । तेज हेलावे चहूं पारीं. ॥ ४५ ॥ निगुता आला मस्तकावरि । प्रकाशु पडला अयोध्येवरि । भरतें पाहिलें अंबरीं, । अद्भुत देखिलें. ॥ ४६ ॥ अग्निमय हा विशाळ, । तेजें हेलावे वर्तुळ, । पडतांचि हा भूगोळ । दग्ध करील नेणों. ॥ ४७ ॥ अकस्मात देखिला भरतें । मग म्हणे, "पैल पहा, जी, वरुतें; । हें आरिष्ट अयोध्येवरि निगुतें । पडावया आलें. ॥ ४८ ॥ म्यां जो आतां स्वप्नु देखिला । काळपुरुषें भुजु गिळिला, । तोचि हे दुष्ट माडला । घातु अयोध्येवरि. ॥ ४९ ॥ आतां करा शीघ्र शांतिसंपादणी. । मी धनुष्य सज्जूनि बाणीं, । हें आरिष्ट भेदूनि धरणी । पाडीन परतें. ॥ ५० ॥ ऐसें बोलोनि भरतु उठिला. । वसिष्ठ अति भयातुर जाला । म्हणे, "रक्षीं, रक्षीं, वीरा, वहिला, । आरिष्ट पडों पाहे वरि." ॥ ५१ ॥ भरतु सूर्यवंशी वीरु, । राया राघवाचा सहोदरु. । म्हणे, "श्रीगुरु, स्वामी, धरा धीरु; । आरिष्ट निवारीन मी. ॥ ५२ ॥ पर्वतु फोडिजे वज्रप्रहारें । तेसें हें आरिष्ट छेदीन निजशरें. । तुम्हीं पूर्णाहुती वेगें थोरें । समर्पूनि उठिजे." ॥ ५३ ॥ ऐसें बोलोनि कैकेयीकुमरें । बाणु गुणीं लाविला घळसागरें, । ज्याचिये माळीवरि बीजाक्षरें । रामनामाचीं मिरवतीं. ॥ ५४ ॥ इंद्र अधिष्ठात्री देवता, । शिळीमुख, रुक्मपुंखें पुरता, । माळीवरि तेज खेळे, विद्युल्लता । जैशा मेघमंडळीं. ॥ ५५ ॥ ऐसा तो शरासनीं । सज्जूनि योद्धां लाविली कर्णीं. । निगुता हनुमंत मध्यगगनीं । येतांचि सोडिला कैसा? ॥ ५६ ॥ बाणु सुटला तेणें

चोपें । पडिशब्दु केला आकाशीं. । पक्षियां प्रळयो जाला, मनुष्यें । गजवीं पडलीं. ॥ ५७ ॥ शरु गर्जतु मनोवेगें । गेला ऊर्ध्व गगनमार्गें. । निगुती हनुमंताचीं अंगें । भेदूनि पर्वतुही भेदिला. ॥ ५८ ॥ हनुमंताचा वाहो भाली । येऊनि द्रोणाद्रि खिळणी केली. । ऐसें अकस्मात जालें, पडली । मुरकुंडी मुमीवरी. ॥ ५९ ॥ पुच्छें गुंडिला माथां पर्वतु । दिव्यवल्लीनें लखलखीतु, । त्यासहित भूमी हनुमंतु । पडला, "राम" म्हणोनि. ॥ ६० ॥ च्यवला रथेंसीं सप्तमुख घोडा, । कीं कोसळला मेरूचा कडा, । नाना अकस्मात स्वर्गींचा हुडा । भूमंडळासि आला, ॥ ६१ ॥ कीं ऐरावती इच्छा आवडी । मर्दें पृथ्वीवरि टाकिली उडी, । कीं प्रळयमेघांतूनि कडकडी । विद्युल्लतापातु जाला. ॥ ६२ ॥ द्रोणाचळेंसीं ऐसियेपरी । कपि पडला पृथ्वीवरी. । 'राम, राम' म्हणे. तिये अवसरीं । भरतें परिसिलें. ॥ ६३ ॥ तेथें धांवोनि कैकेयीचा बाळु । आला, तंव देखे वानर विशाळु. । माथां अग्नीचा कल्लोळु । ऐसा पर्वतुही पडला. ॥ ६४ ॥ मग भरत म्हणे, "तू कोण? कोणाचा? । कोठूनि कोठें जातु होतासि? कैंचा? । अत्यंत सखा वाटसी, वाचा । जपतोसि रामनाम." ॥ ६५ ॥ तंव कपि म्हणे, "अहा कटा कटा! । कैसा समयो घडला वोखटा! । आतां लक्ष्मणु लागला वाटा । मृत्यूचिया सर्वथा." ॥ ६६ ॥ ऐसें हनुमंतु बोलिला. । तंव भरतु कंठीं सद्गदितु जाला. । म्हणे "कपींद्रा, सांग वहिला । कोण लक्ष्मणु, कोणाचा?" ॥ ६७ ॥ येरू म्हणे, "तू कोण, रे, चांडाळु? । कीं मजला भेटलासि मूर्तिमंतु काळु; । पाहतां तरि दिससी बाळु, । सादृश्य श्रीरामाचें. ॥ ६८ ॥ जैसी धनुर्विद्या रामलक्ष्मणें । साधिली, तैसेंचि तुझें करणें; । मज पर्वतेंसीं ऐसें ऐके बाणें । भेदूनि भूमी पाडिलें. ॥ ६९ ॥ महा अकार्य तुवा केलें. । नांव सांग, गा, तू आपुलें." । तंव येरू म्हणे, "असैल आइकिलें, । भरतु भक्तु राघवाचा. ॥ ७० ॥ रामलक्ष्मण माझे सहोदर, । राया दशरथाचे कुमर, । कैकेयीप्रसादें रामासि वनांतर । भोगणें पडलें. ॥ ७१ ॥ समागमें असिजे लक्ष्मणें, । जानकी भार्या, ऐसीं तिघें जणें. । चतुर्दश वरुषें जालीं, त्याकारणें । मी तप करितों नंदिग्रामीं." ॥ ७२ ॥ ऐसें भरतु बोलिलेयावरी । कपि अधिक कटकटा करी, । म्हणे, "तू कैसा वधु? वधूसि

वैरी । जाल्यासि रावणाहूनि. ॥ ७३ ॥ एकोदरें मृत्सु मत्स्यें गिळिला, । एके जाळीचिनि वशें वंधु जाळिलों, । कां एकपिंडहस्तें हस्तु खंडिला, । तैसें यथार्थ जालें." ॥ ७४ ॥ ऐसें बोलौनि हनुमंतें । मग संक्षेपेंचि मागुतें । सागों आदरिली भरतातें । विवंचना राघवाची. ॥ ७५ ॥ म्हणे, "श्रीरामु असतां घोर वनीं, । पंचवटिकेसि जनस्थानीं, । रावणें तेथौनि जनकनंदिनी । चोरूनि नेली लंकेसि. ॥ ७६ ॥ सीतेची पदवी रामलक्ष्मण । शोधित निघाले दोघे जण. । अरण्या लंघौनि कठीण । किष्किंधेसि आले. ॥ ७७ ॥ हिंडता श्रमु जाला मार्गी, । मग वृक्षातळीं उभयवर्गीं । बैसका केली; तंव त्यांलागीं । सुग्रीवें देखिलें. ॥ ७८ ॥ म्यां जनोनि अभिप्रावो घेतला, । सुग्रीवा रामा मैत्रियोगु जाला; । साह्य त्याचें केलें, वाळी वधिला; । तारा, राज्य सुग्रीवा दिधलें. ॥ ७९ ॥ पुढें सुग्रीवें मैत्री वाढविली, । असंख्यात कपिदळें मेळविलीं, । सीताशुद्धि झालेया, चालि केली । रामें रावणावरि. ॥ ८० ॥ रावणाचा वधु बिभीषणु भेटला, । त्यासि लंका देऊनि चिरंजीवि केला. । पुढें शिळीं समुद्र वाधिला, । उतरौनि लंका वेढिली. ॥ ८१ ॥ युद्ध जाले तेथें बहुत, । राक्षस मारिले असंख्यात, । रावणाचे सुत, सहोदर समस्त । संग्रामीं रणा आले. ॥ ८२ ॥ आतां वधावें जंव रावणा । तंव शक्ति लागली लक्ष्मणा; । मग साडूनि धनुष्यबाणा । शोकु मांडिला रावणें. ॥ ८३ ॥ लक्ष्मणाचिया उपचाराकारणें । औषधि सांगितलिया सुषेणें । त्या रात्रीमध्यें घेऊनि जाणें, । जव न पडतां रविरस्मी. ॥ ८४ ॥ त्या औषधि म्हणाल जवळि, । तरि क्षीराब्धिपारीं द्रोणाचळीं. । रात्रीमध्यें कोण वळी, । जो जाऊनि आणील.' ॥ ८५ ॥ रात्रीचि औषधि आणीत लके । तरीच लक्ष्मणाचें मरण चुके, । नाहीं तरि सूर्योदयीं टाके । अनर्थु सामित्र अगी. ॥ ८६ ॥ ऐसें मांडलें संकटव्यसन; । नाहीं काळाचें व्यवधान; । मग रामें बोलिलें वचन । तत्समयीं मज-प्रति. ॥ ८७ ॥ म्हणे, 'अगा ये हनुमंता, । होईं लक्ष्मणाचा प्राणदाता. । रात्रीमध्यें तत्वता । आणीं आपधीसि.' ॥ ८८ ॥ ऐसी आज्ञा दे सीतापति । तैसाचि मी गेलों मनोगती; । औषधि ज्याच्या तप पर्वतीं । त्या गुन जाळिया. ॥ ८९ ॥ मग क्षीराब्धितटींचा विशाळु ।

उपडूनि घेतला द्रोणाचळु; । दिव्य वल्लींचेनि तेजें गोळु । दिसे जैसा अग्नीचा. ॥ ९० ॥ कोणा न कळतां गगनमार्गें । गिरीस नेत होतों अति वेगें; । तव तुवां विघ्न केलें, शरघातें अंगें । भेदूनि भूमी पाडिलें. ॥ ९१ ॥ आतां कार्य नासलें बहुसाल । माझेनि तरि न ढळवे पाउल, । कोण या द्रोणाचळा घेऊनि जाईल । लंकेसि रात्रीमध्यें ! ॥ ९२ ॥ पाहतां अर्धरात्री उरली; । माझी जाती वेळा टळली; । आतां अति चिंता-र्णवीं पडली । असेल कपिवाहिनी. ॥ ९३ ॥ म्यां शब्दु दिधला रघुनाथा। जे त्रितीय प्रहरीं येईन सर्वथा, । तो समयो टळला; अवस्था । जाकळित असेल त्यातें. ॥ ९४ ॥ वाट पाहता भागती डोळे । परि मी न जायेंचि चिंतिलिये वेळे. । सूर्योदयीं काय करील तें न कळे । सौमित्रासरिसा रामु.' ॥ ९५ ॥ मज विघ्न करूनि पाडिलें भरतें, । ऐसें तंव नकळेचि तयातें. । पहा, हो, कर्म बळवंतें । कैसें होणार केलें.'' ॥ ९६ ॥ ऐसें बोलिला हनुमंतु. । परिसोनि उत्तर दे भरतु. । म्हणे, मज न कळतां घडला घातु । दुष्ट समस्तव. ॥ ९७ ॥ आता, 'लक्ष्मणा लागली शक्ति, औषधि न्यावया नुगवता गभस्ति, । नाहीं तरि अनर्थु,' ऐसें मजप्रति । सांगतोसि, कपिवीरा. ॥ ९८ ॥ हा, गा, तू ईश्वर केवळ होसी रात्रीमध्यें क्षीराब्धीसि गेलासि. । महापर्वतु घेऊनि आलासि । बहु संख्या योजनें. ॥ ९९ ॥ 'न भूतो न भविष्यति' हे अपूर्वता. । आता उशीर होईल बहु बोलतां. । तूं तरि व्यथाभूत, हनुमता; । पादमात्र न चळवे. ॥ १०० ॥ तरि आतां तूं आणि द्रोणाचळु । लंकेसि पावाल न भरता पळु, । ऐसें करीन तरिच बाळु । राया दशरथाचा. ॥ १ ॥ हें जरि न करवे माझेनि । तरि वि-ऊनि वध्या जाली जननी; । लज्जा सूर्यवंशालागूनि; । रामदास्य वृथा मेलें. ॥ २ ॥ कपि, सर्वथा चिंता न करीं. । पर्वतासहित वेगें बाणावरी. । कार्मुकीं योडूनि लंकेशेजारीं । निमिषार्धे ठेवीन तुज. ॥ ३ ॥ तेथें पाठवि-लेया, वानरवीरा, । पुढें कर्तव्य तें करा, । बरवियापरी उपचारा । लक्ष्मणालागीं. ॥ ४ ॥ रघुनाथासि माझा नमस्कारु । सांगा. म्हणावें, ' भरतु तुमचा किंकरु । वाट पाहतसे, जैसा चकोरु । चंद्रोदयाची. ॥ ५ ॥ कर्तव्य

आदिकल्पनि । स्मरण करितों तुमचें. ॥ १५ ॥ चंद्र चकोरातें आळवी, । मेघु चातका बोलावी, । सूर्य चक्रवाकातें भावी, । हें श्रुत ना दृष्ट, स्वामी. ॥ १६ ॥ जेथें बैसला क्षुधाक्रांतु । तेथें कल्पतरु गेला मीतु, मीतु । राजा सेवकाचा भृत्यु, । हेंही श्रुत ना दृष्ट, स्वामी. ॥१७॥ म्हणोनि ऐसें वाटतें, कर्पूरगौरा, । तुम्ही ईश्वर चराचरा । असोनि आणिकाचें चिंतन करा, । हें अति आश्चर्य वाटे. ॥ १८ ॥ तरि छंदु लागला कवणाचा, । हें सांगा, स्वामी, मनाचा, " । ऐसा प्रश्न आइकोनि गौरीचा । शिवें हास्यवदन केलें. ॥ १९ ॥ म्हणे, " भली भली, हो शुभानने, । बरवें पुशिलेंसि अंगने, । सुचिचें परिस, भवाने, । उपदेश करूं तुज. ॥ २० ॥ जें अति गुह्य आमुचें, । सार सकळ शास्त्रांचें, । बीज यया चराचराचें । उत्तमोत्तम जाण. ॥ २१ ॥ विरिंचीचें जन्ममूळ, । परमसुखाचें सुख केवळ, । शुद्धसायुज्यतामुक्तीचें फळ, । तारक भवार्णवीचें; ॥ २२ ॥ तें मी जपतसें जाण. । कोण म्हणसी तरि 'राम राम.' । हें तूंही जप; जेणें परम । सुखानुभव पावसी. ॥ २३ ॥ त्याचें राम नाम, तो जाण एकु । सूर्यवंशीं दशरथकुळटिळकु. । लीलावतारधारी, व्यापकु, । सुरसंकटाकारणें. ॥ २४ ॥ विचारितां, प्रिये, पाहीं, । या रामासि जन्मकर्म नाहीं. । चरित्र अवघें दिसे, हेंही । मिथ्या, मायाभ्रम. ॥ २५ ॥ मज आणि त्यासि वेगळीक । नाहीं, जैसें मेदिलें कनक.। अभिमानी भेदवादी लोक । मिथ्याचि आटी पडले." ॥ २६ ॥ असो. ऐसें शंकरें बोलिलें, । तें पार्वतीसि अनुभवा आलें. । तिपाही 'राम'मंत्रासि अगिकारिलें; । दीक्षा चंद्रचूडाची. ॥ २७ ॥ आतां असो वहु पाल्हाळ. । परिसा राहिलें कथेचें मूळ. । हनमतु द्रोणादि नेतु, जैसें फळ । पक्षी चंचुवा धरूनि. ॥ २८ ॥ भरला रात्रीचा तिर्तीय प्रहरु । वानरदळेंसी खुर्गीरु । वाट पाहे; म्हणत "दशारु । बहुसाव जाला." ॥ २९ ॥ बोले सुग्रीवा बिभीषणाप्रति, । " कां पां नयेचि मारुति ? " । कोण आटी असेल गति । तें ईश्वर जाणे ! ॥ ३० ॥ आम्ही वाट पाहतसों येथें, । न कळे वर्तमान हनुमंतु जेथें. । काय श्रम पावला गगनपंथें । जाला, येना पडला भूमी ! ॥ ३१ ॥ कीं पर्वतु पाहतां वोडे आलें । असोनि मध्येंचि टाकिलें, । कीं जातांचि विघ्न केलें । बळवंत

१. म. दिचित.

खेचरी, ॥ ३२ ॥ कीं रात्रीं निद्रेनें जांकाळिला, । भूतळीं उतरूनि निजेला, । कीं पर्वतु नसेल हाता आला, । कीं औषधि पळालिया? ॥ ३३ ॥ म्हणों गोंविला एकाधिया नारी । तरि तो ठायींचा ब्रह्मचारी; । कां क्षुधा पीडिला म्हणोनि क्षीरसागरीं । क्षीरपान करितु ठेला; ॥ ३४ ॥ कीं पडला गंधर्वांचां पाशीं, । गुंतोनि खिळिला आकाशीं; । कीं दिग्मोह जाला डोळेयांसि, । मार्गु ठायीं नपडेचि? ॥ ३५ ॥ आतां हनुमंताची करणें आशा । या कोणा साक्षीचा भरंवसा? । भागत्रय क्रमूनि गेली निशा, । प्रातःकाळु जाला दिसे. ॥ ३६ ॥ जानकीनखाग्रीं रंगु जैसा । तैसी दिसत असे पूर्व दिशा; । धवळता ठाकली आकाशा; । वायु सुशीतळु सूटला. ॥ ३७ ॥ मजवियोगें सीतामुखकमळ, । तैसें जालें दिसे इंदुमंडळ. । सुरगुरुप्रति दावीत बळ । भृगुनंदन उदेला. ॥ ३८ ॥ भाग्यभोगाचिये ओहटीं । मांडली हळूहळू संपत्तीसि तुटी, । तैसिया गगनाचां पोटीं । तारा लोपों लागलिया. ॥ ३९ ॥ सरला खेचरांचा खेळु, । विघडला योगिनींचा मेळु, । उलूकांसि सुटला पळु, । काककुळ चेइरें जालें. ॥ ४० ॥ कुमुदिनींवरि होते षट्पद । तयांची इच्छा जाली मंद, । राहिले मुखींचे झुंकारशब्द । गुंडिले कुमोदपत्रीं. ॥ ४१ ॥ विश्वासि जागें केलें सावध, । शमलें दंपत्याचें सुरतयुद्ध, । उचित कर्म अनुष्ठितें जाले सुबुद्ध । अधिकारपरत्वें. ॥ ४२ ॥ चक्रवाकींसि जाली तुटी, । रात्रीं धोभातां जाली हिंपुटी । तियें परस्परें चालिलीं भेटी । दुथडींहूनि जळामध्यें. ॥ ४३ ॥ असो. ऐसा प्रभातसमयो । दिसे, जाला अरुणोदयो. । नयेचि कीं वायुतनयो, । काय करणें आता? ॥ ४४ ॥ या काळाउपरि शीघ्र रविरथु । उदयाचळारूढ जालेया अनर्थु. । ऐसें बोलतसे रघुनाथु । कपिवीरमेळीं. ॥ ४५ ॥ ऐसें बोले सीतारमणु. । त्यासि उत्तर दे बिभीषणु. । म्हणे, "देवा, उदेला अरुणु? । निशा प्रहर एकी आहे. ॥ ४६ ॥ जेणें लग्नें उदयो होईल अर्का । त्यासि व्यवधान असे आठ घटिका. । अद्यापि स्थानें कृत्तिका । पावल्या नाहींति, स्वामी. ॥ ४७ ॥ किमर्थ हनुमंताची चिंता । करणें, जी जनकजामाता? । समयो जालासे येता, । ऐसा मनोदयो माझा. ॥ ४८ ॥ सर्वेशा, तुम्ही आपुलां मनीं । विपरीत करितां चिंतवणी, । जे, हनुमंतु पडला व्यसनीं । म्हणोनि अझूनि

१. धं. व फ. अलन.न.

नयेचि. ॥ ४९ ॥ तरि ऊर्णनाभीचा तंतीं । गुंतेल केसा ऐरावती? । अहे, मशकाची पंगती । वायासि कोंडी काय? ॥ ५० ॥ तरि चाळला पिपीलिकाचें कटक । रगडेल काय मेरूचें मस्तक? । खद्योताचेनि तेजें सिंधूदक । काय शोषोनि जाईल? ॥ ५१ ॥ ऐसेंही होईल, भुवनपति, । परि व्यसनीं न पडेल मारुति. । आता तत्काळ येईल हे वदती । वदली आकाशीं." ॥ ५२ ॥ ऐसें बिभीषणु रामाजवळि । बोलतु, तंव तेचि काळीं । अकस्मात सितें पिवळी,[1] । प्रभा पडली लंकेवरि. ॥ ५३ ॥ समस्तही पाहती उत्तरे. । पुढें निमिषार्ध न भरे, । अति समीप ऐसिये त्वरें । पर्वतेंसीं कपि आला. ॥ ५४ ॥ सहस्रावधि पाजळिल्या प्रदीपिका, । तेणें तेजें भरली भूमिका, । तैसा लंकाप्रदेशु असिका । वह्निदीप्ती उजळला. ॥ ५५ ॥ ऐसा समयो वर्तला. । अंगदु उत्तरे पुढें जाला, । तंव हनुमंतें येणें सरला । भूमंडळावरि ॥ ५६ ॥ अमृताचा घट भरूनि । सुपर्ण आला स्वर्गाहूनि, । तैसा द्रोणाचळासि घेवोनि । पवनात्मजु आला. ॥ ५७ ॥ वानर हनुमंतासि देखते जाले, । एक रामासि सांगों गेले, । एक आनंदें गर्जिनले । 'जय जय राम,' म्हणौनि. ॥ ५८ ॥ परिसवें हनुमंतु आला, । सर्वांसहित रामु आनंदला । सुषेणु वैद्य पुढें जाउ । पर्वतु पहावेया ॥ ५९ ॥ उत्तर सेनाप्रदेशीं हनुमंतें । उतरोनि ठेविलें द्रोणातें, । उंची पाच योजनें ज्यातें, । वर्तुळ दश योजनें. ॥ ६० ॥ अति अपूर्व म्हणावा द्रोणागिरि । दिव्य औषधि ज्यावरि, । खाणी रत्नाचिया पाठारीं, । सरोवरीं अमृतोदकें. ॥ ६१ ॥ याचि पर्वतासि पहिलें । हनुमंतें होतें आणिलें, । तिये प्रसंगीं वर्णन असे केलें । स्थळ निवाडेयासारिखें. ॥ ६२ ॥ असो. ऐसा देखोनि गिरि । सुषेणु अति आश्चर्य करि. । मग आरूढला त्यावरि, । चंद्रु जैसा उदयाचळीं. ॥ ६३ ॥ दिव्य औषधि देखिल्या डोळा । सुषेणु जाला चितवेगळा. । दुरूनि दिसती अग्नीच्या ज्वाळा । परि निजांगें ऐसा असती. ॥ ६४ ॥ आंगें त्यांचीं असती पवळें, । पर्णे अत्यंत शीतळें, । निळीं बहुत वर्तुळ फळें, । पुष्पें ताम्रवर्णें ॥ ६५ ॥ त्या सुधामय वल्ली, । ईश्वरें त्यांचा ठायीं सामर्थ्यें ठेविलीं, । पूर्वीही कपिसेना उपचारिली । त्यांचेनि राघवातें. ॥ ६६ ॥ परमेश्वराचिये इच्छेस्तव ।

---

[1] प. छाया पिवळी पडली.

इतुका ठायीं गुणवैभव, । प्रसंगोपात्त बोलावे भाव । प्रश्निकाचिया प्रीती. ॥ ६७ ॥ एक पा वल्लीवृक्षासि गुणसामर्थ्य, । पापासाय सफळ होती मनोरथ, । आणि दुसरें पाषाणीं यथार्थ । असाधारण गुण. ॥ ६८ ॥ पैक पाषाण उदकीं बुडविजे, । तें उदक उदरीं घेइजे, । तेणें सर्पदष्ट जाळेया जीजे । आताचिये वर्तमानीं. ॥ ६९ ॥ परिसु पाषाण होये साचें, । सुवर्ण करितसे लोहाचें, । चिंतामणि चिंतिलें चित्तींचें । सर्वथा सिद्धी नेतु. ॥ ७० ॥ आणि मंत्राचा ठायीं सामर्थ्य गहन । उच्चारण, मोहन, आकर्षण, । खिळण, स्तंभन, विध्वंसन, वशीकरण, । साधन मंत्राचेनि बळें ॥ ७१ ॥ मंत्रें व्याधि भस्म होती, । मंत्रें निधानें हाता येती, । मंत्रें भूतपिशाच पळती, । मंत्रें असाध्य साधे. ॥ ७२ ॥ मंत्रें देवता वश होती, । मंत्रें युद्धीं शस्त्रास्त्रें जयो देती, । मंत्रें शुभाशुभें पावती । इच्छिले मनोरथ ॥ ७३ ॥ असो आता बहु बोलणें । या तिहीं ठायीं सामर्थ्य नारायणें । ठेविलें आहे गुणठेवणें । लोकोपकाराकारणें ॥ ७४ ॥ पुढें सुषेण सुग्रीवाचा श्वशुरु । त्या औषधींसि करूनि नमस्कारु । प्रार्थिता जाला पदरु । पसरूनि तळवटीं ॥ ७५ ॥ सपुष्पें, सफला, सपत्रीं । चतुरें घेतलिया करपात्रीं । त्या कोण नामाच्या तरि वक्त्रीं । प्रथम कथिल्या होत्या. ॥ ७६ ॥ आता सांगों मागुतेनि । एकि संजीवनी, दुसरी संधानी, । तिसरी सुवर्णकारिणी, । चौथी विशल्या ॥ ७७ ॥ ऐसिया चत्वारि औषधि । सुषेणु घेता जाला आल्हादीं । चहू पात्रीं येगळा-लिया सिद्धि । रसचिया करूनि उतरला. ॥ ७८ ॥ मग लक्ष्मणाजवळि जाला । संजीवनीचा रसु मुखीं घातला, । तेणें सौमित्रु सजीव जाहला, । उघडिले लोचन ॥ ७९ ॥ शक्तिघातें वक्षस्थळ चूर्ण जालें । तेथ विशल्येचेया रसासि घातलें, । तेणें अस्थिसलाचें उदक केलें, । जैसें अग्नि घृत विघरे. ॥ ८० ॥ त्याउपरी घावो मुखपर्यंत । चोतिलें संधानीचें रसागृत, । तेणें वक्षस्थळ त्रिभाग समस्त । सांधिलें ठायींचे ठायीं ॥ ८१ ॥ क्षत त्वचेसि विशाळ पडलें । तेणें सौंदर्य होतें हरितलें, । मग त्यावरि जळ चर्चिलें । सुवर्णकारिणीचें, ॥ ८२ ॥ तेणें देह पावला दिव्य शोभा. । तात्काळ लक्ष्मणु राहिला उभा, । जैसी ग्रहणमोक्षीं सूर्यबिंबप्रभा, । तैसें तेजउट चढलें. ॥ ८३ ॥ ऐसा उठताचि लक्ष्मणु, । करचापीं शीघ्र लाविला बाणु. ।

पुढें धांविन्नला, "रावणु । कोठें?" म्हणोनियां. ॥ ८४ ॥ रावणेंसीं युद्ध करितां करितां । शक्तीनें भेदिला अवचिता; । तोचि संस्कार हृदयीं होता । तेणें गुणें ऐसें केलें. ॥ ८५ ॥ जैसें कांहीं कृत्य करितां निद्रा आली, । पुढें जागृति वृत्ति उदेली, । तैसें लक्ष्मणासि जालें; हांव आगळी । युद्धाची पुनरपि. ॥ ८६ ॥ तंव आड बिभीषणु जाला. । म्हणे, "रावणु लंकेसि पळोनि गेला; । यावरि आज्ञानला ठेला । सौमित्रु रणांगणीं. ॥ ८७ ॥ सुग्रीवु म्हणे सौमित्रातें, । "कष्ट जाले, जी, बहु तुमतें. । " "या रे वत्सा" म्हणोनि सीताकांतें । आलिंगन दिधलें. ॥ ८८ ॥ मग थोपण मस्तकावरि । कुरवाळी कृपामृतकरीं. । म्हणे, "वा रे, श्रमलासि; वैरी । शक्ति टाकिली होती. ॥ ८९ ॥ तरि शक्ति टाकिली निशाचरें । त्याचीं आजि छेदीन शिरें. । वैसणी घालीन निर्धारें । रणगिधाकारणें." ॥ ९० ॥ ऐसें बोलिलें सीतारमणें. । परम सुख मानिलें लक्ष्मणें. । कपिदळ आनंदोनि गर्जे, तेणें । दिग्मंडळ सपूर्ण जाहलें. ॥ ९१ ॥ लक्ष्मणालागीं द्रोणाद्रि आणिला, । आणिकांही घायाळां उपचारु जाला, । जैसा गौतमाचेनि प्रसादें तरला । आणिकही दोषी जनु. ॥ ९२ ॥ कां नवरियाचेनि लग्नमोगें । मिष्टान्नें जेविजती जगें; । नाना शिष्यीचेनि सत्संगें । प्रामस्था कैवल्यपद ॥ ९३ ॥ असो. ऐसा द्रोणागिरि । सौमित्रु उपचारिलेयावरि, । पुनरपि हनुमंतें घेऊनि करीं । नेतों आरंभिला. ॥ ९४ ॥ घटिका पांच शर्वरी । उरली तियेचि अवसरीं. । पर्वतासहित अंबरीं । मारुती उड्डाण केलें. ॥ ९५ ॥ जात उत्तरे गगन कवळितु, । अंगवायो झडझडा वाजतु, । जैसा प्रळयीं क्षोमला वातु । भूगोळु फोडावेया. ॥ ९६ ॥ ऐसें देखोनि गुप्त दूतीं । वार्ता कथिली रावणाप्रति. । "लक्ष्मणु उपचारुनि, मारुति । पुनरपि पर्वतु नेतो." ॥ ९७ ॥ ऐसें परिसोनि दशशिरें । हनुमंतावरि कोपें

[illegible], । महावक्र असे तिसरा । चौथा महोदरु. ॥ १ ॥ उल्कामुख पंचम निशाचरु, । षष्ठमासि नाम महावीरु. । सप्तमासि नाम निर्धारु । चतुर्वक्र ऐसें. ॥ २ ॥ हस्तकर्ण नाम अष्टमाचें, । शंखकर्ण नाम नवमाचें, । मेघचित्र ऐसें दशमाचें । जन्मादारभ्य नाम. ॥ ३ ॥ ऐसे दश राक्षस पुरुषार्थी । क्रोधें भूळत्तासि पाडोनि ग्रंथी । धांविन्नले गगनपंथीं, । हनुमंतापाठीं लागले. ॥ ४ ॥ हांकीत टाकीत महात्वरें । पृष्ठीसि संघट्टले येकसरें. । हाणिती, म्हणती " सांडीं, वानरा रे, । द्रोणाचळ हातींचा. " ॥ ५ ॥ ऐसें गर्जना करीत गाढे । वळें आडवे आले पुढें, । जैशीं पंडितासन्मुख मूढें । वाद करूं आलीं. ॥ ६ ॥ राक्षस दहा जण एके वेळें । हनुमंतासि संघट्टले वळें. । गदा, खट्वांगें लोहमुसळें । हाणिते जाले. ॥ ७ ॥ वाहटुळी तृणकाडी उडाली । ते पर्वतावरि पडली; । तैसी तियें सर्वें लागलीं । हनुमंता आंगीं. ॥ ८ ॥ मग मारुति वातचक्राचियेपरी । भ्रमों लागला अंबरीं, । वामकरें ताडोनि पृथ्वीवरि । राक्षस दहाही पाडिले. ॥ ९ ॥ अंतरिक्ष गरूडें सर्प खंडिले । तैसें हनुमंतें काळरूप ताडिले, । आपेंआप चूर्ण जाले, । पडले भूमंडळीं. ॥ ११० ॥ ऐसी मध्येंचि करूनि ख्याति, । पुढें हनुमंतु मनोगती । क्षीरसिंधू पावला, जंव गभस्ति । उगवों पाहतु. ॥ ११ ॥ दुग्धार्णवपारीं होता जेथें, । पकरूळा ऐसा ठेविला तेथें, । मग पुनरपि दक्षिणपंथें । मुरडला हनमंतु. ॥ १२ ॥ जैसा सूर्य अस्ताचळाहूनि । पूर्वपथें मुरडे मागुतेनि, । तैसा हनुमंतु मुरडला गगनीं । भवंडीत पुच्छ. ॥ १३ ॥ लंघिलीं द्वीपांतरांचीं पट्टें, । लंघिलीं पंचसागरांची तटाकें, । लंघिलीं पर्वतांचीं मस्तकें । मेरुवरूनि आला. ॥ १४ ॥ उंच सूर्यमंडळासरी । लोपावतु अंबरीं, । येऊनि त्रिकूटाचळावरी । निजदळांतु उतरला. ॥ १५ ॥ वैकुंठींहूनि विनतात्मजु । सीताविपारीं खगराजु । उतरे, तैसा वायोतनुजु । लंकेसि आला पैं हो. ॥ १६ ॥ आला, हो हनुमंत आला, । म्हणोनि वानरीं घोष हरुषें केला, । अंगद वहुतां कपींसी पुढें आला । हनुमंतासि भेटावया. ॥ १७ ॥ हनुमंतें सर्वांसि मुख देऊनि । रघुनाथ, लक्ष्मण जेथे स्थानीं, । तथ सन्मुख येऊनि । नमस्कार घातला. ॥ १८ ॥ रघूत्तमें हनुमंतासि देखिलें । आनंद आसनींहूनि धांवि पाडले । पुढें येऊनि उचलिलें, । आलिंगन

दिधलें प्रेमें. ॥ १९ ॥ विचारितां ते येकचि दोनें जण । चतुरास कळलें असेल खूण, । अवतरले कार्याकारण । स्वामिसेवकपणें. ॥ १२० ॥ असो. भेद का नमनें हे बोली, । तरि आणिक युक्ति असे स्फुरली, । पंचभूतें काय वेगळीं । आहेति देहपरत्वें ? ॥ २१ ॥ आत्मा बोलिजे वेगळा, । तरि ज्ञाते हांसती या बोला, । भिन्नपणाचा भ्रमु नाथिला, । जव स्वरूपीं बुद्धि नाहीं. ॥ २२ ॥ सकळ 'एकमेव' ये अर्थी । प्रकरणें असती अभेदमयीं; । श्रुतिवाक्येंही वेदपथीं । अद्वैत प्रतिप दिती. ॥ २३ ॥ ऐसा हृनमतु आलिंगिलियावरि । रघुनाथें धरिला करीं. । बैसवूनि आसनाशेजारीं । स्तुति बोलता जाला. ॥ २४ ॥ "हृनुमंतानें जो उपकार केला । तो माझे आगीं संक्रमला. । माझेनि प्रतिउपकार नवजे बोलिला" । म्हणे पुनः पुन्हा श्रीरामु. ॥ २५ ॥ या शब्दाचा भाव ज्ञाकला. । चतुरासि असेल कळला. । परि प्रकटही पाहिजे बोलिला, । जेणें श्रोते सुखी होती. ॥ २६ ॥ याचा भाव ऐसा वाटेः । उपकारें परोपकार फिटे. । संक्रमण कैसें तुटे । पुटा ऋणानुबंधे. ॥ २७ ॥ ऐसा असे कर्ममार्गु[1] । ऋणानुबंधे घडे सगु, । पुत्र, कलत्र, पशु, भोगु । ऋणानुबंधें. ॥ २७ ॥ म्हणोनि हनुमताचे उपकारा ऋणी । असें हें श्रीरामा अत:करणीं; । कीं जे अवतारीं मिळणी । ऐशीच असावी. ॥ २८ ॥ असो. ऐसा अवनिजापति । बोले हनुमनासि प्रेमप्रीती, । जैसा नृसिंह दैत्यघातीं । प्रल्हादाजवळि बोले. ॥ २९ ॥ परिसोनि श्रीस्वामीचीं वचनें, । जे देवी अमृताहूनि गहनें. । त्यासि प्रतिवचनें वायुनंदनें । दिजेताति ऐसीं. ॥ १३० ॥ "देवा, तुमचे शब्द उफराटे. । तुम्हींच, जी, उपकार केले मोठे. । आम्ही कृतघ्नपणें अव्हाटे । कित्येक काळ होतों. ॥ ३१ ॥ स्वामी, तुज ऐसा कोण उपकारी ? । आम्हासि जननीचे उदरीं । रक्षिलें कोणें, कोणे परी । तें तुझें तूं जाणसी. ॥ ३२ ॥ उपधानित मासाचा गोळा । त्यासि जीवनउपाय, दयाळा, । अभिनव निर्मिली दुग्धकळा । मातेच्या वक्षस्थळीं. ॥ ३३ ॥ हें शरीर रक्षिलें समर्थी, । आतां लाविलें आपुले सोई, । मन हिरोनि तुम्हीं आपुले पायीं । ठेविलें चरणरेणु ऐसें ॥ ३४ ॥ थोर उपकार केला, देवा, । जेव्हा देही दिधला निगान ठेवा; । येणेंकरूनि

१. क. वसट.

तुमची सेना । काहीं एक घडे. ॥ ३६ ॥ जें घ्यानीं चंद्रमौळी, । तें तुझें स्वरूप येहीं डोळीं, । येणें शरीरें आहळींबाहळीं । आम्ही पाहत असों. तुम्हासि बोलावया श्रुति । स्तवनें मैरवडी करिती, । परि मूकत्व तयाप्रति । आम्हां बोलता, जी, वहू. ॥ ३७ ॥ जें सुख मोक्षपदीं नाहीं, । तें सुख दिधलें आम्हा येचि देहीं. । आता विचारूनि, स्वामी, पाहीं, । कोण उपकारी जाले?" ॥ ३८ ॥ ऐसें हनुमंत बोलत क्षणीं । अत्यंत संतोषला चापपाणि. । पुढें सर्वेचि उचित वाणी । वानरेंद्र वदे ॥ ३९ ॥ "असाधारण हनुमंताचें बळ, । हा ईश्वरपुरुष केवळ, । याचेनि अनंतारें कपिकुळ । धन्य जालें जगीं. ॥ १४० ॥ हनुमंताचेनि पुरुषार्थपणें । आम्ही डवरलों भूषणें, । जैसें भार्गवत्ताचे एकाटपणें । समर्थता मिरविजे. ॥ ४१ ॥ विहंगमकुळीं वैनतासुत,[१] कुंजरकुळीं ऐरावत, । सर्पकुळीं तो अनंत । जन्मला जैसा, ॥ ४२ ॥ तैसा हनुमंत वानरकुळीं । अवतरला बळियाहूनि बळी. । द्रोणाद्रि धरूनिया करतळीं । आणिला केव्हडा. ॥ ४३ ॥ रात्रीमध्यें हा एकला । दोनि वेळां आला, गेला । मार्ग गणना करिता जाला. । असंभाव्य, असंख्यात. ॥ ४४ ॥ भूगोलाचेनि अनुमानें । जालीं आठ कोटि योजनें । वाल्मीकऋषींचीं वचनें । ऐशींच आहेति" ॥४५॥ वक्ता श्रोतयासि प्रसंगासरिसें । म्हणे, जी, हनुमननाटकीं ऐसें असे, । तें सुमानसें । परिसा तुम्हीं. ॥ ४६ ॥ द्रोणाद्रि क्षीराब्धीचे तळवटीं, । लंकेहूनि योजनें चारि कोटि, । तरि त्याचे चतुर्गुणित या रात्रीचे पोटीं । हनुमंतें क्रमिलीं" ॥४७॥ असो. ऐसा वानरपति । बोले हनुमंताची स्तुति. । पुनरपि रघुनाथ बोले, "मारुति । लक्ष्मणाचा प्राणदाता. ॥ ४८ ॥ सूर्यवायोपरीस वीर्य गाढें । केलें हें समस्तांपुढें. । यश घेतलें मरूयेवढें । जीवविलें लक्ष्मणातें. ॥ ४९ ॥ लक्ष्मणाहीण सीतेची काय चाड? । काय रावणवधाची होड? । अयोध्ये ज्याऊं, हें कोड । कोणें मनीं धरिलें? ॥ १५० ॥ तरि वरवें जालें बहुसाल। आतां मनरूप मातें सिद्धी जाईल. । आणि रावणासि वधिजेल । ऐसा मनोदय होतो माता." ॥ ५१ ॥ याउपरी सौमित्र म्हणे, "स्वामी, । सत्यप्रतिज्ञ तुम्ही, । तरि मरण कैचें? आम्ही । मृत्यु गिळोनि ठेलों." ॥ ५२ ॥

---

१. ष वानरत्र.

तंव बिभीषण म्हणे, "देवा, । बोलिला बोल सिद्धी न्यावा; । आणि दशं- ग्रीव वधावा । जंववरि अस्तमान नव्हे." ॥ ९३ ॥ तंव "हो, जी" म्हणे सीतारमणु । "दिवस असतांचि वधीन रावणु, । हा माझा प्रतिज्ञापणु । दव देखती डोळां." ॥ ९४ ॥ आतां रघुनाथ बोलिला ऐसें. । संतोषली सकळांचीं मानसें । इतुकी गतकथा जाहिया, कैसें । वर्तलें तें बोलिजेल. ॥ ९५ ॥ कथासमुद्र, हे वाग्देवी । कवित्वलक्षण तारूं चाळवी, । ते चाटीची अपूर्वता पहावी । चतुरीं डोळां. ॥ ९६ ॥ काव्य तरि मोक्तियां- कारणें । भरिलें अपूर्वशब्दरत्नकणें; । गुणग्राहकीं घेऊनि भूषणें । कर्णी घालूनि मिरविजे. ॥ ९७ ॥ इति श्रीरामायणीवाक्यार्थ, । रघुनाथचरित्र असंभावित । सज्जन सदा सेवित । तरणोत्तरें उपाव म्हणौनि. ॥ ९८ ॥ तचि प्रमेय आपुले युक्ती, । महाराष्ट्रभाषा, आपुले मनीं । बोलिलें परी- सावें श्रोतीं; । कृष्णदास मुद्गलु म्हणे. ॥ १५९ ॥

---

## प्रसंग सत्तावन्नावा.

ॐ नमो श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । वीर- मंडळीं विराजमानु । रामचंद्र राजीवलोचन, । तयाप्रति सुमित्रानंदनु । सारांश बोलता जाला. ॥ १ ॥ "परिसा, हो सर्वज्ञचूडामणि, । चत्वारि चिंता चौघांचीं अंतःकरणीं । त्या शीघ्रकाळें, शरासनपाणि, । निरसाव्या. ॥ २ ॥ इंद्र इंद्रपदापासूनि । चिरकाळ पडला व्यसनीं, । तो, कृपण जैसा धनालागूनि, । तैसा स्वर्ग इच्छित असे. ॥ ३ ॥ वैरियांचे वाटिके मैथिली । तुमचिया वियोगास्तव तळमळी, । जैसी ते जीवना वेगळी । जळचरी पीडत असे. ॥ ४ ॥ भरत, कैकेयीकुमर, । तुमचेनि भेटी आर्त घोर, । जैसा अमावास्येसि चकोर । चंद्रोदयाकारणें. ॥ ५ ॥ बहु बिभीषण हृदयाभीतरीं । लंकाप्राप्तीचा आर्त करी, । जैसा द्वितीय संबंधें प्राप्त जालियावरि । वर मनीं वाहे. ॥ ६ ॥ त्या चौघांची चिंता, रघुपति, । जाईल रावणवधांतीं;" म्हणोनि आतां विज्ञप्ति, । शीघ्र पौलस्ती

१. क. तरणोपाय.

बधावा. ॥ ७ ॥ कपींद्रा राज्य प्राप्त जालें, । न भोगितां सर्वांचे आणिलें, । जैसें क्षुधार्थियासि उठविलें । मिष्टान्नावरूनि. ॥ ८ ॥ हे समस्तही कपिवीर । नित्य युद्ध करितां कष्टले थोर । त्यांचे पुत्रकलत्र चिंतातुर, । त्यांसिही आज्ञा पाहिजे." ॥ ९ ॥ ऐसा सौमित्र आदरें उपक्रम करी. । बोलतां संतोषले ऋक्ष, हरि; । जैसें मेघगर्जनीं चातकमयूरी । आनंदें उचंबळिजे. ॥ १० ॥ तंव तेचि प्रसंगीं विभीषण बोले. । "हो जी, कल्पवृक्षा तळीं बैसले । ते राहती क्षुधेले । हें कैसें घडेल, जी ? ॥ ११ ॥ जें कर्तव्य असेल मनीं । तेंचि सौमित्र वदला वचनीं." । विभीषणाचे बोल परिसौनि । करुणार्णव बोलिला. ॥ १२ ॥ "दशग्रीव कालिचे दिवशीं । युद्ध करितां आम्हांसि । रणभ्रष्ट जाला. मागुतें त्यासि । देखिलें नाहीं." ॥ १३ ॥ तंव विभीषण म्हणे "बलाब्धि, । रावण त्रासला कालिचे युद्धीं; । मग तेणें ऐसी बुद्धि । योजिली अंतःकरणीं. ॥ १४ ॥ शुक्राचार्यासि जाऊनि शरण । मंत्र मागितला अतिनिर्वाण. । याचें विधान घडलिया संपूर्ण । त्रिपुरध्वंसापासूनि जयो. ॥ १५ ॥ पूर्वी अपर्णावर, चंद्रमौळी । रावणासि प्रसन्न जाला, ते काळीं । अतिनिर्वाणमंत्रावळी । उपदेशिली आहे. ॥ १६ ॥ तो मंत्र स्मरोनि हृदयीं । होम करिते असे ये समयीं । रात्रीपासूनियां कठिण ठायीं । अभिचारिका मांडिले. ॥ १७ ॥ लंके दक्षिणभागीं दुर्ग हुडे, । ते आंतवटी पर्वतळे कडे, । तेथें गुहा विशाळ; माजी न पडे । कदा सूर्यप्रकाशु. ॥ १८ ॥ ते गुहेचे मुखमंडळीं । रक्षण राक्षस ठेविले आतुर्बळी; । जैसी रुद्रभूमीसि भूतावळी । साडेतीन कोटि. ॥ १९ ॥ एकाग्र गुहेभीतरीं । अग्नीतें मंत्रोपचारीं । रावण हवीतसे, अंबरीं । धूम दाटला दिसे. ॥ २० ॥ ऐसियासि विघ्न करूनि शीघ्रकाळ, । उठवूनि आणावा युद्धा खळ. । मग क्षेत्रिचें समरंगणीं घननीळें । सर्वथा मोक्ष देइजे. ॥ २१ ॥ अनळ, संपाति प्रधान आपुले । गुप्तचारें लंकेसि होते गेले, । ते ऐसी वार्ता घेऊनि आले । मुहूर्तामध्यें." ॥ २२ ॥ ऐसा दशग्रीवानुजें अनुवादु । करूनि सांगितला भेदु. । परिसोनि सीतावीरानंदु । कपींद्राकडे पाहे. ॥ २३ ॥ तेणेंचि सुग्रीवही वीरमंडळी । आज्ञानंतरें त्यांवेळीं. । देखोनि उठिले अतुर्बळी । दशक दश सहस्रेंसी. ॥ २४ ॥ ते कोण, तरि सुषेण, अंगद, हनुमंत, । गवय,

शरभु, महाबळी माल्यवतु, । गंधमादन, नळ, नीळ, जांबुवतु । ऐसे मुख्य दाही जण. ॥ २५ ॥ आणिक त्यांचिये समागमें । सहस्र दहा, त्यांचीं नामें पृथक पृथक सांगतां रघुरामें । माध्यान्ह कीजेल. ॥ २६ ॥ जाती वारिय तुल्य वेगें, । दहा सहस्र सेना मागें. ॥ ते कृतांतासि म्हणती उगें, । गर्जे चाटत असती ॥ २७ ॥ ऐसे लंकेसि दक्षिणमार्गें । गेले येक येकामागें. मग सप्तही गगनमार्गें । उडाले पक्षी जैसे. ॥ २८ ॥ पक्षियांची उपम म्हणाल हस्व, । तरि पक्षी येका येक महाविशाळ, । जसे मैनाक, मंदरा चळु । येव्हडे स्थूलदेही. ॥ २९ ॥ हें म्हणाल नव्हे साचार । तरी जटायु, संपाति येकोदर, । येहीं उडोनि आक्रमिलें अंबर । सूर्यमंडल पर्यंत. ॥ ३० ॥ पुढे संपाति सूर्याचे किरणीं । पक्ष जळोनि पडट धरणी, । तेणें सीताशुद्धि सांगितली, हें कर्णी । पूर्वी परिसिलें असेल ॥ ३१ ॥ पक्षी गरुड व्यग्रधारा, । त्याचा पक्ष येक येक योजनें चारा; । जेणें अमृतहरणीं वज्रधरा । तृणवत् मानिलें. ॥ ३२ ॥ आपुलेनि सामर्थ्यबळें । खादलीं सत्तावीस सर्पांचीं कुळें, । वर मागोनि वैकुंठपाळें । निजवाहन केलें ॥ ३३ ॥ भग पक्षी जैसा मंदरगिरि, । त्यासि आयुष्य महाकल्पवरि. । हंस विरिंचीचें वाहन, वास करी । जो सर्वदा सत्यलोकीं ॥ ३४ ॥ याकारणें पक्षी, सर्प, मासा, । जैसा बोलिजे असे तैसा, । हा परिहार दिधला ऐसा । उपमे निमित्य जाणा. ॥ ३५ ॥ हा दृष्टांत येकाग्र बोलिजेत, । हा मार्ग बुझती बहुश्रुत. । असो आतां पान्हाळ समस्त । कथाखंडण जालें. ॥ ३६ ॥ पुढें वानर लंकादुर्गी उडोनि । रावण होम करीत ते स्थानीं । उतरले अकस्मात मेदिनी । छतांतगण जैसे ॥ ३७ ॥ तें होमस्थान परम कठिण, । वायोसि नाहीं संचरण. । राक्षस राहिले असती रक्षण । चंड महायोद्धे. ॥ ३८ ॥ गदा, मुसळें, मुद्गल, । परिघ, पट्टीश, असिलता बहुसाळ, । ढाल खेटकें धरूनि महामळ । कट बांधोनि निकरें. ॥ ३९ ॥ वानरीं त्यांतें देखोनि । हाकिले छळिले मुखध्वनी. । " राक्षस, कोठें, रे, कोठें ? " म्हणोनि, । तडित मिळाले. ॥ ४० ॥ राक्षसही अतिपराक्रमी । सवदले सन्मागले समामी. । ' घे घे ' म्हणोनि वानरांसि वर्मी । प्रहार हाणिते जाले. ॥ ४१ ॥ खवळले, धांवले द्रुमपाणि । राक्षसांसि झोडून पाडिती धरणीं. । मल्लयुद्ध

माडलें, सर्पद्वर्णी । सरतीना माघारे ॥ ४२ ॥ काठिण्य आरंभिलें महाघोर, । सुग्रीवाचे वाहों लागलें रुधिर । बहुत राक्षस, काहीं वानर, । प्रेतें होऊनि पडले. ॥ ४३ ॥ वधु जाला रक्षोपाळा, । पुढें गेळा वानरमेळा, । तव गुहामुखीं आविर्ली शिळा । जे वज्रा अभेद्य ॥ ४४ ॥ अंगदें, शरभें, हनुमतें, । गवयगंधमादनजांबुवतें, । निधसिलें समस्त राक्षसांतें, । जैसें कुंजरें कदलीवन ॥ ४५ ॥ मग अंगदें ऐसें केलें, । मुष्टिघातें शिळेतें फोडिलें, । जैसें वज्रें खंडिलें । पर्वताचें शृंग ॥ ४६ ॥ गुहाद्वारींची फोडिली शिळा, । पुढें मार्ग केला मोकळा । गुहामुखीं वानर जाले गोळा, । प्रवेशतां शंका वाटे ॥ ४७ ॥ सकळांपुढें हनुमंतु, । त्यासरिसा वाळीसुतु, । त्यामागें शरभु, जांबुवंतु । आणिकही अनुक्रमें ॥ ४८ ॥ ऐसे प्रवेशले सकळ, । तंव भीतरीं महा मोठें स्थळ । विविध रचना बहुसाळ, । येक शिवालय तेथें ॥ ४९ ॥ त्या शिवालयाचे उत्तरमेदिनी । तेथें महाकुंडीं धगधगा वन्हि । ज्वाळा पंचवर्ण गगनीं । लागल्या, धूम्रमय जाले ॥ ५० ॥ रावण पद्मासन घालूनि बैसला, । आम्र वस्त्र असे नेसला । हस्तीं स्रुवा टाकितो पहिला । अंगदानें अग्नी मध्यें ॥ ५१ ॥ शिवा शुक्राचार्यांचें दत्त । महा मंत्र जपे विनियुक्त । नेत्र झांकूनि समर्पित । द्रव्याच्या आहुती. ॥ ५२ ॥ ऐसें रावणें मांडिलें होमकार्य । देखोनि कपि करिती आश्चर्य । म्हणती याचें केवढें पुरुषधैर्य । जयाशा धरिली आहे ॥ ५३ ॥ गेला कुंभकर्ण वधु, । गेला पुत्र इंद्रजित वीर्यसिंधु, । समस्ता सुहृदांचा वधु । येणें देखिला डोळां ॥ ५४ ॥ सर्वही झाला दुर्लक्षयो, । याचा आतां मरणसमयो, । परि अद्यापि इच्छित असे जया । केसें कर्म अनुष्ठित " ॥ ५५ ॥ ऐसें एक बोलती यावर, । त्यासि दुसरे देती प्रतिउत्तर । म्हणती सामर्थ्य याचें थोर, । पुरुषप्रयत्न न सोडी ॥ ५६ ॥ हें पुरुषाचें पुरुषलक्षण । जोंवरि शरीरामध्यें असे प्राण, । तंवरि न सांडी आगमन । आपुलिया अभिमानाची. ॥ ५७ ॥ पुरुषधर्म हाचि बोलिजे, । मी चिरंजीव येथें युद्धीं उदिम किजे, । मज आतां मरण, येणें बुद्धी नेदिजे । सर्वस्व आपुलें ॥ ५८ ॥ भलतासा विषमकाळ आला, । परि अभिमान हा सांडावा आपुला, । जैसा सिंह काळें पीडिला । तृण सोडी

न धरी. ॥ ५९ ॥ म्हणोनि परमपुरुषार्थी रावणु, । त्याचा का पा नेघावा गुणु ? । याच्या वधाकारणें नारायणु । साक्षात अवतरला." ॥ ६० ॥ ऐसें वानर परस्परें । बोलती, तव वायुकुमरें । रावण ताडिला तत्वरें समीप होऊनिया. ॥ ६१ ॥ तेणें लोपिले मसती डोळे, । अंतर्दृष्टि जाला, बाहेरि कांहीं न कळे. । वज्रासनीं, बैसला, न ढळे । पर्वत जैसा पैं. ॥ ६२ ॥ तेणें प्रहारें मुठीच रावणु, । मग हनुमंत घेतला पाषाणु. । जेथें असे दक्षिण कर्णु । तेणें वर्मी ताडिला. ॥ ६३ ॥ तेणेंही चेतना नये रावणातें, । . मग कापोनिया हनुमंतें । धावोनि वक्षस्थळीं निगुतें । वज्रप्रहारें ताडिला ॥ ६४ ॥ जांबुवंत म्हणे हनुमंतातें, । "हळूच प्रयत्नें उठवा यातें. । वर्मांगीं मारू नका निघातें, । शब्द श्रीरामाचा लागेल." ॥ ६५ ॥ हनुमंतें दिधलें प्रतिउत्तर. । "तुम्ही वडील बोलता साचार. । आम्हां कोणहाचेनि हा न मरे, शर । मारिती रघुनाथाचे." ॥ ६६ ॥ ऐसें बोलोनि वायोसुतें मसगीं । बहु ठायीं ताडिलें रावणालागीं, । परि तो नमनीं, जैसें गजा आगीं । शुष्क तृण लागता. ॥ ६७ ॥ मग अंगदें हस्तींच्या घेतल्या स्रुवा, । मस्तकीं ताडिले टळुवा ग्रीवा । परिधानचिर फेडिलें, नागिवा । शर्में केला कैसा. ॥ ६८ ॥ येकदाही मुखमटळी । घेवोनि टाकिती मुळी । येक शख करिती कर्णीं निळीं । 'उठी, उठीं ' म्हणौनि. ॥ ६९ ॥ ऐसे अन्योन्य उठविती, । परि तो न चळे जैसी पाषाणमूर्ति. । पाठपरी अंगद शीघ्रगति । अंतःपुर प्रवेशला. ॥ ७० ॥ रावणाच्या बहुत नारी, । सुरांगनापरीस सुंदरी, । विद्याधरगंधर्वांच्या कुमरी । त्याचें दास्यत्व करिती. ॥ ७१ ॥ त्या त्या नारींच्या नयनकटाक्षें । भगती योगियाचीं लक्षें । त्याच्या दर्शनें परोक्षें । व्यर्थ सरितादिकांनि. ॥ ७२ ॥ असता रावणाचा गृहीं । नाना सुखें भोगिती तिही । हा काळपर्यंत कांहीं । वार्ता नेणती चिंतेची. ॥ ७३ ॥ काळ प्रवेशों न शके त्याचे मंदिरीं, । त्यामध्यें मुख्य मंदोदरी, । ते अंगदें धरोनि करीं । ओढिली बाहेर अकस्मात. ॥ ७४ ॥ त्यानें घेतु धरिली गोंवणी, । कीं व्याघ्रें बोचियातून पक्षिणी, । नाना कुंजरें ते कमळिणी । सोंड घालूनि धरिली. ॥ ७५ ॥ ऐसियापरी वाळीसुतें सुंदरें मंदोदरीतें । धरोनियां कराग्रहस्तें । वाहे आसुडिली ॥ ७६ ॥ तियेचीं

त्यांवरें, दिव्य भूषणें । उचलिता चूर्ण झालीं कंकणें. । 'हा हा' बोभों-यिली, तत्क्षणें । अंगद घेऊनि उडाला. ॥ ७७ ॥ ऱ्हदींहूनि मीनपत्नी । गृध्र घेऊनि निघे गगनीं, । तैसी अंगदें मयनंदिनी । धरोनि रावणाजवळी आणिली. ॥७८॥ "जानकी जगाची माउली, । तुवा ऐसीच रें, आणिली. । तें उसणें घे" म्हणोनि लोटिली । रावणावरि मंदोदरी. ॥ ७९ ॥ मंदोदरीचे कचरीभारें । मृणालापरीस सुकुमार, । ते धरोनियां निष्ठुर । वानर आसुडिती निर्वादें. ॥ ८० ॥ न वदवे विनाशकाळ मंदोदरीचा । चिर कचुकीस ठाव कैंचा? । मग ते बोभाइली दीर्घनाचा । "अहो नाथा, पाहता काय?" ॥ ८१ ॥ नेत्रीं सुटलिया अश्रुधारा, । रुदन करित बोले सुंदरा । "उठा उठा स्वामी सर्वेश्वरा, । वानरीं विटंबिलें बहू. ॥ ८२ ॥ जैसी गजपायांतळीं । सांपडली असे कर्दळी । तैसी मी कठोर कपिमेळीं । आसुडित आंदोलित असें. ॥ ८३ ॥ अहो पौलस्त्या, दशमुखा, । मज नाथ असतां तुजसारिखा । वनचरें विटंबिती, कर्मरेखा । केवढी कठीण मज्जी! ॥ ८४ ॥ राक्षस तुझ्या बळें असतां । धरूनि आणिती सुरकन्या, कांता, । त्यांचीं कारुण्या मानिता मजदेखतां । तात्काळ सोडवीं मी. ॥ ८५ ॥ ते मी देवी मंदोदरी । तुज स्वामी देखता ये अवसरीं । गांजिजे विक्राळ वानरीं, । अनाथ दीन जैसी. ॥ ८६ ॥ आजि इंद्रजित पुत्र असता । तरी वाराही लागों नेदिता, । अथवा कुंभकर्ण जिता, । तरिहीं ऐसें न होतें. ॥ ८७ ॥ उठीं, उठीं, कायसें तप? । भोग देतसे संचिलें पाप । या त्रैलोक्याचें शाप । फळले ये वेळेसी. ॥ ८८ ॥ आतां किमर्थ हें कर्म मांडिलें । मज न व्हावें तितुकें जालें । यापरीस तुज मरण भलें, । जैसे पुत्र, बंधु पावले." ॥ ८९ ॥ ऐसेपरी मंदोदरी करुणावचनीं । बोले, रुदन करी दीर्घध्वनीं, । परी रावण आसनाहूनी । न उठी, बैसलें प्रेत जेवि. ॥ ९० ॥ मग हनुमंतें धरूनि करीं । उड्डाण केलें अंबरीं, । तंव ते अधिक रुदन करी । "नाथा, धांव धांव" बाहत. ॥ ९१ ॥ "महापुरीं उमळोनि वटी । बुडत जातसे खळाळीं, । तैसी मी तुझी स्त्री ये काळीं । वानर घेऊनि जातो." ॥ ९२ ॥ ऐसी मंदोदरी बोभात गगनीं । ऐकतां कंपित जाली मेदिनी, । तंव रावण भंगला ध्यानीं । भवतें पाहों लागला ॥ ९३ ॥ ऐकिला मंदोदरीचा विलापु, । चढला, भडका जपु, । सोडिया मारुनी, सत्वरु, । हनुमंतें

होम विध्वंसिला. ॥ ९४ ॥ पुढें देखोनि अंगद ताडिला, । जांबुवंतु थापें हाणितला, । मुष्टी करोनि वन्हिसुत पाडिला, । इतुके मूर्छित केले. ॥ ९५ ॥ सुषेणगवयगंधमादनांसी । लोटूनि आपटिलें भूमीसी । वरकड कपि भयातुर मानसीं । दुरीच्या दुरी पळाले. ॥ ९६ ॥ ऊर्ध्व पाहे, तंव हनुमंतु । मंदोदरी धरूनि नेतु । तैसाचि उडोनि मुष्टिघातु । हाणितला मारुती. ॥ ९७ ॥ तेणें हनुमंतासि आली गिरिगिरी । उताणा पडला पृथ्वीवरी. । रावणें तात्काळ मंदोदरी । कपीपासूनि सोडविली. ॥ ९८ ॥ तस्करापासूनि पुरुषार्थें । धन सोडविजे समर्थें, । तैसी निजांगना नैर्ऋत्यनाथें । कपीपासूनि सोडविली. ॥ ९९ ॥ आनळली वस्तु महापुरीं । बुडतां उडी टाकूनि काढिजे बाहेरी, । तैसी रावणें मंदोदरी । कपीपासूनि सोडविली. ॥ १०० ॥ निद्रिस्त असतां शार्दूल । जंबुक आपासूनि ने कवळ, । तो जागृत होउनि धांवे सबळ । तात्काळ सोडवी. ॥ १ ॥ कीं अमित्रासि युद्धीं जयप्राप्ती । जालिया खेद वाटे चित्तीं; । सर्वेचि युद्ध करूनि पुढती । जयो येऊनि येइजे. ॥ २ ॥ तैसी रावणें जाया मंदोदरी । सोडवुनि ते अवसरीं, । प्रीतीनें धरूनि हृदयाकारीं । आलिंगन दिधलें. ॥ ३ ॥ मुख चुंबून पाहिलें, । तंव कपिकरीं वोरखडलें; । जैसें कर्दळीखंड चिरिलें । बदरीकंटकानें. ॥ ४ ॥ म्हणे, " वहू श्रमलीस कांते, । दीनें, तूं आजि गुणसरिते, । मी ध्यानस्थ होतों, येरव्हीं गांजिते । कैसेनि ते मर्कट ? ॥ ५ ॥ मन ल्यां पावलें सुषुप्तीभीतरीं । तें देहाभिमान कैंचा शरीरीं ? । जरी सर्प चालती अंगावरी । परी शुद्धि सर्वथा नाहीं. ॥ ६ ॥ कांते, निजेलियावरी । जैसा घर फोडी खानोरी, । आजि तैसेपरी वानरीं । मी ध्यानस्थ असतां केलें. ॥ ७ ॥ दुःख जालें तुझां देहीं । म्हणोनि कांते, शिणों नको कांहीं । हा कोणी येक भोग पाहीं । उत्तमांसिच आहे. ॥ ८ ॥ कर्मे रेणुकेनि काय केलें ? । पोटींचेनि पुत्रें शिर छेदिलें; । पुरंदरें डागवीरे घेतलें । तारामतीने प्राणनाथें. ॥ ९ ॥ अहल्या ब्रह्मयाची बाळा, । ती कर्मेंकरूनि जाली शिळा; । अनरण्या आली नळा । तें दमयंती कायें जाळे ? ॥ ११० ॥ जीचे स्वयंभू निकट माळी, । अमृत असे करतळीं, । ते पतीनें सांजिली दुष्काळीं, । पुढें परगृहीं दासी जाली. ॥ ११ ॥ जालंधराची वृंदा ।

तीसि भिक्षुकें केली आपदा, । भृगूची स्त्री पतिव्रता सदा, । तीस ऐक काय जालें. ॥ १२ ॥ 'तीसि दैत्यें गगनासि नेलें, । पुनरपि पृथ्वीवरि टाकिलें, । गर्भपात जाला, पुढें जीवविलें । भृगूनें पुनरपि. ॥ १३ ॥ रामांगना जनकदुहिता । आमुचे बंदीं पडिली सीता; । ऐसे रीतीं सांगतां । पुढें बहुत आहे. ॥ १४ ॥ आतां, कांते प्राणप्रिये, । श्रमलीस तूं निजगृहासि जायें, । नाना भोग भोगीत हृदय । चिंतारहित करावें. ॥ १५ ॥ जाईन मी युद्धाचागीं, । वैरी वधीन रणरंगीं, । जें होणार तें आजिचे प्रसंगीं । आताच हो लागे. ॥ १६ ॥ संबोखूनि इतुके उत्तरीं । गृहा पाठविली मंदोदरी; । आपण आरूढला रथावरी । युद्धाकारणें निघाला.' ॥ १७ ॥ शेष सैन्य जितुकें होतें, । तें परिवेष्टित चालिलें सांगातें, । रणवाद्यीं भरिलें गगनातें, । उत्तरद्वारें चालिले. ॥ १८ ॥ लंकेबाहेरी निघतां । अपशकुन जाला पुढें पाहतां । तो अवश्य दे मृत्यूतें, जरि राखिता । महेश्वर जाला. ॥ १९ ॥ अपशकुन देखोनि रावणाचें चित्त । खेदातें पावलें त्वरित; । परी परतेल कैसा? काळदूत । ओढूनि नेवाती. ॥ १२० ॥ ऐसा रावण रणभूमीस आला, । तंव तो वानरमेळ पहिलें गेला, । तेहीं रघुनाथासि वृत्तांत सांगितला, । युद्धासि आला दशग्रीव. ॥ २१ ॥ हें ऐकोनि सुख जालें सीतावल्लभा । तात्काळ विसर्जिली सभा, । धनुष्यबाण घेऊनि उभा । राहिला, कृतांत जैसा. ॥ २२ ॥ आतां रामा रावणा परस्परें । युद्ध होईल शस्त्रास्त्रें; । त्यासि उपमा द्यावया साचारें । असेचिना पूर्वी पुढें. ॥ २३ ॥ इति श्रीरामायण ऋषिनिर्मित । युद्धकांडकथामृत । ऐका दाशरथी रामाचें चरित्र । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १२४ ॥

---

## प्रसंग अठ्ठावन्नावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । रावणें राक्षसाधिपें । रण आक्रमिलें सटाटोपें, । रघुनाथासन्मुख प्रतापें । शरसज्जित जाला. ॥ १ ॥ पुढें होता वानरभारू, । ते टाकिते जाले शिळा तरुवरू, । जैसा पर्वतावरी जळधरू । अति वृष्टि करी. ॥ २ ॥ ऐसें रावणें देखोनी तये क्षणीं, । शिळावृष्टि निवारिली बाणीं, । जैशी वायो-धुळीची भंगणी । पर्जन्य करी. ॥ ३ ॥ बहु शर सोडिले पुनरपि । तेणें त्रासिले पळाले कपी, । ऐसें देखोनियां काळरूपी । कांचनरथ पुढें जाहला. ॥ ४ ॥ धनुष्य टणत्कारिलें गर्णी, । झणत्कारिल्या लघु किंकिणी, । तेणें दिग्गजाच्या कर्णी । बधिरत्व जालें. ॥ ५ ॥ राम रावण समदृष्ट जाले । शरासन सोडूनी सरसावले । दोघेही क्रोधें उचंबळले, । खवळले समुद्र जैसे ॥ ६ ॥ रामें कैसा देखिला रावणू ? । शार्दूलें जयापरी हरिणू, । नाना केसरीनें वनांत, जाणा । महामदोन्मत्त गज देखिला. ॥७॥ रावणें राम समरंगणीं, । देखिला जैसा हिमालयो वज्रपाणी, । कीं अधकारें तरणी उदयाचळावरी. ॥ ८ ॥ मैंचि देखिला स्वामी कार्तिकू, । कीं अंधकासुरें त्र्यंबकू, । नाना सहस्रार्जुनें कुलतिलकू । ऋषिनंदनाचा. ॥ ९ ॥ ऐसा रावणें देखिला रामु । दर्पें भंगिला परी धरिला विक्रमू, । मग आरंभिला संग्रामू, । गडगर्जना केली. ॥ १० ॥ दशहस्तें दहा धनुष्यें, । तेंथ बाण योजिले ज्याचे मुखीं विषें । ते सोडिले रुद्रावेशें । वेगवान् रामावरी. ॥ ११ ॥ ते शर येता रघुत्तमें गर्णी, । शरासन सज्जुनी बाणीं, । सवेग केलें तत्क्षणीं. । आरिशर तोडिले. ॥ १२ ॥ ऐसें देखोनि राक्षसराजें । शतबाण प्रेरिले वीसभुजें; । ज्या बाणाचे वदनी तेजें । विद्युल्लतासारखीं. ॥ १३ ॥ ते सुवर्णपुख धुवाट धांवे । ऊर्ध्व धरिजले आकाशें । तें देखोनि रावणें रणकर्कशें । शरीं शर छेदिले ॥ १४ ॥ मागुता रावण चापीं शर धरी । तव दाशरथीनेंही पुरी । बहु बाण सोडिले दावरी । समासमेची आपुली. ॥ १५ ॥ तें बाणजाळ येता देखिलें दशग्रीवें । निजशरधारी वैभवें । छेदूनि साडिलें रावणें । ऐसें रामें देखिलें डोळां. ॥ १६ ॥ सर्वेचि काण्डदरत । विक्रमश्रावें पचशत । सोडिले वेग गर्जत ।

निघाले वेगें रावणावरी. ॥ १७ ॥ इतुकियावरी रावणेंही । शर सोडिले जैसे अहीं । ते परस्परें लागोनी महीं । पडिले खडोनिया ॥ १८ ॥ यापरी दोघे-जण । क्रोधा चढले रामरावण । मग अमित शरीं संपूर्ण । आकाश करिते जाले. ॥ १९ ॥ आता असाधारण दोघांची शरसुटी । मोकळिल्या बाणांच्या कोटी । अवकाश नभाच्या पोटीं । यासी इतुका नाहीं. ॥ २० ॥ सधान लघुलाघवी । येकापुढें येक दाखवी । जैसा बृहस्पति आणि कवी । निधासुरासुरयुद्धीं ॥ २१ ॥ येणें वेगें सधानगती । शर काढूनिया सोडिती । करांगुळींच्या मुद्रिका झळकती । उल्कांचक्रें जैशीं. ॥ २२ ॥ चाप चक्राचिया परी । भ्रमती दोघांच्या दोर्दंडावरी । इतुके बाण कैंचे तरी । अमोघ तूणीर देती. ॥ २३ ॥ मुखातुनी शब्द निघती अपार । तैसे तूणींतुनी प्रसवती शर । नाना धारा मोकलती जलधर । तयाचीं सारिखे. ॥ २४ ॥ रामरावणाचे बाण गगनीं । येकयेकाचे मुख छेदुनी । शर पडती मेदिनीं । मृत्युरग जैसे. ॥ २५ ॥ बाणबाणाच्या झगटणीं । पावकाच्या ज्वाळा पडती धरणीं । खडभाळीच्या उसळणीं । इंद्रतरणी बुचकळोनि गेला. ॥ २६ ॥ बाणबाणाच्या घसरीं । रागिटा तिडकिया धावती अवरीं । तेणें तारा आहाळोनि भूमीवरी । पडों लागल्या बहूत. ॥ २७ ॥ खेचरासी आरभला प्रळयो । कळाहीन कांपती चंद्रसूर्यो । अंगिरासुत आणि भृगुतनयो । चिंताचक्रीं पडले. ॥ २८ ॥ पाहा पा केतु आणि राहो । त्यासी माडला प्राणसदेहो । बुध मंगळ पावले मोहो । शनी म्हणे गेलोंरे गेलों. ॥ २९ ॥ ग्रहासी ग्रहगती आली थोर । विमानें साडोनी सुरासुर । आकांत पावले दिशाकुंजर । गयें भूमि धरिलीया. ॥ ३० ॥ बाणांच्या तीक्षण भाळीं । पोटें समुद्राचीं तापलीं । तेणें जळचरें मेलीं । मच्छकच्छपादिक. ॥ ३१ ॥ श्वापदाचा पहिलेंचि अत पुरला । सर्पा बहु जीवसंहार जाला । ऐसा अत्यत प्रलयो माडिला । अवनीं आकाशामध्यें ॥ ३२ ॥ कपी निशाचर दोहींकडे । थरथरा कांपती बळियाढे । रामरावणाची शरवाकुडी पडे । कैसी दिग्मडळा व्यापुनी. ॥ ३३ ॥ ऐसें दोघां वीराचें शरसंधानें । कोण्हाचें अधिक ना उणें । अष्टदिशा पृथ्वी गगनें । संपूर्ण जालीं. ॥ ३४ ॥ ऐसें असभाव्य पडलें बाणजाळ । जैसें प्रळयमेघाचें घनपटळ । शारंग

रामरावण केवळ । परस्परें भटसेले. ॥ ३५ ॥ निकट मांडलें शरयुद्ध । अवघें बाणमय अधऊर्ध्व । ऐसें देखोनि जाले स्तब्ध । क्षणएक राम रावण. ॥ ३६ ॥ उमपतां राहिला संधानसाक्षेपु । पुढें होता जो बाणमंडपु । तो पातळला आपेंआपु । मेघमंडप जैसा. ॥ ३७ ॥ बाणें बाण तुटोनि गेले । सप्तसागरीं सप्तहि पडले । जैसे मुनि अवस्थेनें नासले । शरा संकल्प. ॥ ३८ ॥ उपरी रावणें ऐसें केलें । पन्नगशस्त्र योजिलें । तें अभिमंत्रुन सोडिलें । ते वेळीं रघुनाथावरी. ॥ ३९ ॥ हो तत्क्षणीं पन्नगास्त्रसुटी । असंभाव्य गगनाच्या पोटीं । उठल्या सर्पांच्या कोटी । बहुवर्णी बहुफणी. ॥ ४० ॥ उठला धुधुकार झडझडा । जिव्हा लल्लीत धडधडा । विषगरळा वमित तेणें सडा । पृथ्वीवरी जाला. ॥ ४१ ॥ कोस कोसद्वय येक योजन । येवढे सर्प लंबायमान । पडले जैसें धडपलें गगन । कपिकटकामध्यें. ॥ ४२ ॥ आजानुबाहो पर्वतरूपी । उभे होते जितुके कपी । तितुके वेंटाळुनि घेतले सर्पीं । चंदनवृक्षां जैसें. ॥ ४३ ॥ ऐसे असंभाव्य असंख्यात । सर्प पडले असंख्यात । वानर गजबजिले समस्त । सर्प देखोनियां. ॥ ४४ ॥ पाहतां कितेक चहूंकडे । तंव सर्पी सर्वांगा घातले वेढे । मग धांवती धोंभाती वळियाढे । सर्पवृष्टि जाली जाली. ॥ ४५ ॥ काढावे तोडावे कैसे किती । जिकडुनि तिकडुनि सर्प येती । उमाळली फणिमंडळी दिसती । गंधर्वनगरें जैसीं. ॥ ४६ ॥ धुधुकारती वेळोवेळां । वमिती विषमुखें गरळा । अत्यंत पीडा वानरदळा । करूं आरंभिली तिहीं. ॥ ४७ ॥ ऐसे सर्प रावणें टाकिले । ते रघुनाथें डोळां देखिले । मग त्यासि निवारणा योजिलें । शीघ्र गरुडास्त्र. ॥ ४८ ॥ धनुष्यीं शर सज्ज केला । ऐसा गरुडास्त्रबाणा मंत्रिला । तो सर्पावरी सोडिला । भूतावरी काळ जैसा. ॥ ४९ ॥ बाणशस्त्रशर आकाशें । सुटलें गरुडकुळ तयाचिसें सरिसें । उदेलें आलें जैसें । ब्रह्मांड फोडुनियां. ॥ ५० ॥ तेव्हां पृथ्वीवरी घातल्या झेंपा । तडतडा तोडुनि भक्षिले सर्पां । जैसें विष्णुच्या सहस्रनामें अमूपा । दोषांसि संहार होतु. ॥ ५१ ॥ सर्पबाधीं वानर पाडिले । ते तात्काळ वेगळे जाले । जैसे सूर्यउदयास्तव वहिलें । तमांतून सुटती लोक. ॥ ५२ ॥ सर्प संहारूनी अंतर्धामा । गरुड गेले जी

आश्रमा। तैसें रावण देखे उग्रकर्मा। पुढें गंधर्वास्त्र सोडिलें. ॥ ५३ ॥ तें शस्त्र सुटतांचि सरिसें। गंधर्वशस्त्र चालिलें कैसें?। पृथ्वीवरी पाय गगनीं सिसें। पाश टाकिती सैरा. ॥ ५४ ॥ हांका देती कराळ वदनें। कपींवरी चालिले अति मानें। ऐसें देखोनी रघुनंदनें। गंधर्वशस्त्र प्रेरिलें. ॥ ५५ ॥ हेंही असंभाव्य अद्भुत। गंधर्वशस्त्र अमित। पुढें दोन्हीं चक्रें होतां मिश्रित। तात्काळ अदृष्ट जालें. ॥ ५६ ॥ जैसीं स्वप्नींचीं दोन्हीं कटकें। हारपलीं जागृती कौतुकें। तैसीं गंधर्वचक्रें निमिषार्धे एकें। निमोनि गेलीं. ॥ ५७ ॥ ऐसें रावणें देखिलें डोळां। मग कृतांतकाळ जैसा कोपला। तेथुनी शस्त्रविषयो सोडिता जाला। तेणें दिग्मंडळ संपूर्ण केलें. ॥ ५८ ॥ ते बाण म्हणाल कैसे?। सिंह गज व्याघ्र सर्प जैसे। प्रलयमेघ वरुषती तैसे। कपिकटकावरी येती. ॥ ५९ ॥ हें देखे राम रणरंगधीर। मग त्यासि योजिला प्रतिकार। मंत्रराज जपोनियां शर। सोडिला बहुतां मुखांवरी. ॥ ६० ॥ त्या मंत्रराजापासून अपार। खड्गें सुटलीं जैसें वज्र। तिहीं जितुके बहुमुख थोर। ते ताडिले अर्धक्षणें. ॥ ६१ ॥ मग अति कोपा चढला रावण। भातींहुन सुटला सूर्यमुख बाण। तो चापीं सज्जिला सहस्रकीर्ण। जैसा उदयाचळीं बिंबें. ॥ ६२ ॥ तो बाण आकर्ण ओढी। रावणें सोडिला प्रौढीं। काळदंडाऐसा निघाला मेढीं। भेदिली नेणों वीरांची. ॥ ६३ ॥ चतुर पक्षीं झडाडितु। कीं प्रलयीं वीज उपतु। तो तेजोराशी ऐसा अकस्मातु। काकुत्स्थावरी आला ॥ ६४ ॥ तो राजीवनेत्रें देखतां क्षणीं। संधान केलें बहुबाणीं। परि तो न भेदतांचि आला रणीं। बैसला चक्र जैसें. ॥ ६५ ॥ बाण बैसला रामाच्या पायीं। ऐसें रावण देखे ते समयीं। गर्जना करी आपुल्या ठायीं। प्रलयमेघासारिखी. ॥६६॥ रावणें मोगिली श्लाघ्यता। मग घोष करून गर्जता। अंबरीं न माय पूर्ण भरिता। संतोषची मनातें. ॥६७॥ उपरी पुनरपि दशशिर। सोडी बाणांचा पूर। जैसा गर्जत जळधर। महावृष्टि करी. ॥ ६८ ॥ रथारूढ लिशाचरपती। वरुषे जैसा पर्वतावरी जीमूती। राम सिंह उभा क्षितीं। ऐसें देखता झाला. ॥ ६९ ॥ ऊर्ध्व विमानारूढ निराळीं। सहस्राक्ष सुरदेव गुरूजवळी। ह्मणे रावण रथारूढ भूमंडळीं। रामचंद्र उभा असे. ॥ ७० ॥ रावणरथ रणपथीं। इच्छेनें

घागर्दी सारथी । आणि चरणचाली दाशरथी । ठाण ठाई मांडिले. ॥७१॥ घाणे हो आदिनारायणें । अवतार धरिला आह्मांकारणें । जे आमुचा अधिकार आह्मासि देणें । हा रावण वधूनियां. ॥ ७२ ॥ दाशरथी कैकेईच्या प्रसादेंकरूनि । वसता जाला वनस्थानीं । सीता रावणें नेली चोरोनी । हें निमित्त पुढें केलें. ॥ ७३ ॥ सुर साधू धरणी । योच्या सर क्षणा चक्रपाणी । अवतार धरिलो पुराणीं । इच्छेनी विचरे गति ॥ ७४ । तरी आह्मांकारणें चक्रपाणी नरेंद्र । रावणासी युद्ध कीलो रामचंद्र आतां यासी रथ पाहिजे इंद्र । बोलता झाला. ॥ ७५ ॥ ऐसें शक्रमुखींचें उत्तर । ऐकती ऋषि गधर्व सुरवर । आनंदले ह्मणती साचार । रामासि रथ पाहिजे. ॥ ७६ ॥ मग शक्रें तें समई ते काळीं । सारथी आपुला मातुली । त्यासि ह्मणे रामाजवळी । क्षणमात्रें रथ नेई. ॥ ७७ ॥ धनुष्य माझें तूणीर शरसाधित । बहुबाण शस्त्र पाशुपत । रथीं जुंफिले वाजी बलिवंत । ऐसें सामुग्रीसीं जावें. ॥ ७८ ॥ रघुनाथाचे मनोवृत्ती । रथु वाजिविजे शीघ्रगति । हें आपुलेंचि कार्य चित्तीं । ऐसें इंद्र बोलिला. ॥ ७९ ऐसी आज्ञा अमरनाथें । दिधली आपुलिया सारथीयातें । मातुली निघाला त्वरितें । सर्वेचि भुवन प्रवेशला. ॥ ८० ॥ पाशुपत चाप बाण । तूणीर घेऊन । रथ सज्जिला तत्क्षण । निमिषार्धमात्रें ॥ ८१ ॥ पं क्रमुनि आला भूमंडळांतु । रावणासि युद्ध करितो रघुनाथु । त सन्मुख उभा केला रथु । क्षणमात्रामध्यें, ॥ ८२ ॥ तें वानर देख जाले डोळां । आश्चर्य वाटलें सकळां । म्हणती " दिव्यरथेंसि वीर्यागळा हा दिव्यदेही कोण आला ? ॥ ८३ ॥ अनुपम सौंदर्य स्यंदना । कै खणोखणीं रचना । रावणाचे रथ देखिले नाना । परी ऐसा नव्हे ॥ ८४ ॥ तुरंगमसौंदर्य कैसें ? । निळेंचि रंग ऐसें । त्यांचीं अंगकां दिसे । निळें चांदिणें पडिलें. ॥ ८५ ॥ ऐसा दिव्य रथ अकस्मात घेउनी आमुच्या कटकांत । हा स्वयें कोणाचा पुत । किमर्थ आला कळे. ॥ ८६ ॥ तारू ऐसा समुद्रोदकीं । तैसा हा दिसे आम कटकीं । आतां काय करितो कैसें कीं, । कौतुक पाहों हो याचें." ॥ ८७ ऐसें कपि बोलती आपुले ठाई, । तंव मातली रथातळीं ते समई । उतरे श्रीरामाच्या पाई । मस्तक ठेविता जाला. ॥ ८८ ॥ पुढें धूमसेतें गु

समुद्रें, । तूं कोण पुसिलें रामचंद्रें । तंव मातुळी म्हणे "स्वामी इंद्रें । तुम्हासि रथ पाठविला. ॥ ८९ ॥ मी सारथी इंद्राचा मातुळी । तुम्ही युद्ध कराल तों ही भूमंडळीं । सारथी असेन तुम्हाजवळी । स्वामीनें रथारूढ व्हावें. ॥९०॥ रथीं शस्त्रास्त्रसामग्री असे सिद्ध । पाशुपत धनुष्यबाण बहुविध । हें अंगीकारूनि रावणेंसीं युद्ध । स्वेच्छा कीजे." ॥ ९१ ॥ ऐसें मातुळीचें वचन । परिसोनि रघुनंदन । "भले गा सहस्रनयन । समयीं उचित केलें. ॥ ९२ ॥ हा तरावया संग्रामसागरू । हा सल्लक्षण जोडला तारू" । ऐसें हास्यमुखें वदला रघुवीरू । मातुळी प्रत्युत्तर बोले. ॥ ९३ ॥ म्हणे "स्वामी, तुझेनि चरणप्रसादें । देव भोगिताती स्वर्गपदें । त्यांचिया कार्याकारणें द्वंद्वें । घेतोसि असुरांसीं. ॥ ९४ ॥ म्हणतां शक्रें समयीं उचित केलें । अति आश्चर्य वाटे येणें बोलें । कल्पतरूसी पूगीफळ समर्पिलें । हे केवढी श्लाघ्यता हो. ॥ ९५ ॥ जेणें परमेश्वरप्रसादें । अन्नें भक्षिजेती सुस्वादें । त्यासी किंचित् समर्पिलें नैवेद्यें । मिथ्या दातृत्व भोगिजे. ॥ ९६ ॥ म्हणोनि देवाधिदेवा, तूं समर्थु । तुमचा स्थापित अमरनाथु । तेणें समयीं पाठविला रथु । हें अपूर्व नव्हे जी. ॥ ९७ ॥ परी तू भक्ताचागीं दयाळू । तुज भावें अर्पिजे कांहीं तीळू । तें तूं घेऊनि कनकाचळू, । एवढें मानिसी. ॥ ९८ ॥ ऐसें मातुळीनें बोलिलें । मन रामचें सतापलें । तैसेंचि प्रदक्षिणा करूनि केलें । आरोहण रथावरी. ॥ ९९ ॥ रामु रथीं शोभला कैसा ? । उदयाद्रीवरी सूर्य जैसा । कां गरुडारूढ श्रीधरू तैसा । समस्तांसि भासला. ॥ १०० ॥ रामु महारथी झाला । मातुळी सारथी बैसला । हें देखोनि आनंदला । कपींद्रु कपिचक्रेंसीं. ॥ १ ॥ लक्ष्मणबिभीषणांसी । परम सुख जालें मानसीं । देव विमानारूढ आकाशीं । तेही देखोनि आनंदले. ॥ २ ॥ ऐसें इतुकें इकडे वर्तलें, । तें रावणें डोळां देखिलें । तें न साहेची उळलें । हृदय दुःखें परम. ॥ ३ ॥ शत्रूचेनि अधिकपणें । नव्हती हानि मानिजे अंतःकरणें । जैसें पूर्वजार्जित धन ठेवणें । तें दुःख इतुकें न वाटे. ॥ ४ ॥ म्हणोनि तैसा रामासी रथु । प्राप्त झाला देखे लंकानाथु । मग देहीं दग्ध होऊनि सनर्थु । बहु मानिला मनीं. ॥ ५ ॥ पुढें कोपा चढला अधिकाधिकु । जैसा वेदांतावरी तर्कु । कां सुपर्णा उजु तक्षकु । जैं कुळक्षय

जाला. ॥ ६ ॥ रघुनाथुही रावणावरी, । कोपला जैसा गजावरी केसरी । का वोधु बहुतेपरी । भवसंकल्पावरी. ॥ ७ ॥ ऐसें परस्परें रामरावण । प्रती कोपा चढले दोघेजण । युद्ध आरंभिलें निर्वाण । जें झालें ना होईल पुढें. ॥ ८ ॥ इये प्रसंगीं रावणा मुक्ति । रामासि होईल जयप्राप्ति । पुढें युद्धाची समाप्ति । वैरसंबंधु खंडेल. ॥ ९ ॥ इति श्रीरामायणकथारसु । वाल्मीकाचा वाचाविलासु । पुढें परिसा हो श्रोते सुरसु । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ११० ॥

---

## प्रसंग एकूणसाठावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकृपाधिराजाय नमः । दशबाणीं दशशरासनें । सक्रोधें सजिलीं दशाननें । मग राघवाप्रती वचनें । ऐसीं बोलता जाला. ॥ १ ॥ म्हणे रे रामा, मृगीं शशांकीं । जवुकासि दिधलीं नाइकी । परी काय त्याचेनि गजमस्तकीं । बैसोनि मुक्ताफळें काढवतीं. ॥ २ ॥ नदीसी साह्य जाले मेघ । उगमीं वरुाले अमोघ । परी तियेचेनि काय परिघ । पृथ्वीसी करवेल ? ॥ ३ ॥ आकाशमरी उडुगणें । परिवारू चंद्राकारणें । परी त्याचेनि काय सूर्यकिरणें । ग्रासिलीं जातीं. ॥ ४ ॥ तैसा सुरांसहित सुरनाथु । तुज सहाय होउनि दिधला रथु । परी काय तू माझा शरपंथु । लंघूनि जमो पावसी ? ॥ ५ ॥ ऐरावताचिये दंतझडें । तुटले हिमाचळाचे कडे । त्या झडा लागतां मज वांकुडें । रोमाग्र जालें नाहीं. ॥ ६ ॥ माझें वक्षःस्थळ अति कठोर । जैसें वज्रगिरीचें पाठार । आंगीं काहीं सले सार । पाताळकूर्मपृष्ठी. ॥ ७ ॥ ऐसें माझें, सर्वांग कठीण । तेथें तुझे दुर्मतुल्य बाण । येउनि लागती जैसें तृण । कुंजरपृष्ठीवरी. ॥ ८ ॥ आरे माझे शर आणि शक्ती । जैसिया कल्पांतविजा कडकडती । काली तुझा बधु पाडिला क्षितीं । तें तरी देखिलें डोळां. ॥ ९ ॥ तैसेंचि तुज आजिचे समार्मीं । दग्धपतंगप्राय पाडीन भूमीं । हें जरी न करीं तरी जाण मी । प्रेतवत पृथ्वीवरी. ॥ १० ॥ ऐसीं रावण, वदे वचनें । तियें परिसोनि रघुनंदनें । प्रत्युत्तरें आरंभिलीं गहनें । दश-

ग्रीवा दुःख देती. ॥ ११ ॥ म्हणे "रे रावणा, तूं प्रसिद्ध । भला सुरू वीर्यसिंधु । विश्वश्रवेयाचा पुत्र बधु । कुबेरासी होसी. ॥ १२ ॥ मंदोदरी ऐसी भोग्यांगना । राक्षसांसारखी परिवारसेना । निजधानी तरि दशानना । सिंधुपारिच पुरी लंका. ॥ १३ ॥ आराध्य दैवत चंद्रमौळी । शक्ति सुरांहूनी आगळी । बुद्धि असाधारण वेगळी । वेदांचीं खंडें केलीं. ॥ १४ ॥ ऐसा तूं बहुप्रकारें थोरू । सतती संपत्तीचा सागरू । परी तूं परम अन्यायी परस्त्रीचोरू । जालासी जगामध्यें. ॥ १५ ॥ जैसा पुरुष असे सुलक्षणू । कुळवंतू लावण्यसंपूर्णु । परि त्यासी कपाळीं शुभ्रवर्णू । टिळका उठिला. ॥ १६ ॥ तैसें लांछन रावणा तुतें । लागलें चोरिलीया सीतेतें । इंद्रपदाऐसें राज्य होतें । त्यासी मूर्खा क्षयो केला. ॥ १७ ॥ जैसें एका विषधराचेनि गुणें । बहुता विरुळेया जाली मरणें । तैसें तुवां केलें रावणें । जानकी चोरूनीयां. ॥ १८ ॥ ते समयीं मी गुंफेसि असतों । तरी तेंचि तुज मृत्युमार्गीं लावितों । परी तूं पळालासी पाहातों । तया काळापासेनि तुज. ॥ १९ ॥ जैसा अन्यायी जंबूकाकारणें । मृगेंद्र शोधीं अर्पटणें । तैसा मी पाहात आलों अरण्यें । तव तुज देखिलें येथें ॥ २० ॥ एथोनि ब्रह्मांडाबाहेरी पळसी । तरी तुज मारीन निमेर्षी । लंका दिधली बिभीषणासी । तूं परलोकीं राहें. ॥ २१ ॥ ऐसें रामाचे या अनुवादा । परिसोनि रावणु प्रवर्तला द्वंद्वा । उदरी क्रोधाग्निमर्यादा । सोडिली तिये समयीं. ॥ २२ ॥ दाढा रगडिल्या करकरांटें । धूम्र वमित नासापुटें । भोंवरी ताविली तावटें । चक्रें डोळयांतील. ॥ २३ ॥ धनुर्ष्यीं लावुनियां बाण । शूळमुख हेमपुंख तीक्ष्ण । ओढी काढूनियां आकर्णे । सोडिले रामावरी. ॥ २४ ॥ ते गर्जती गगनपोकळीं । लग्नलग्नीत जैसा विद्युच्या वोळी । रामु देखोनि वारी तव माळी । पगति बैसली. ॥ २५ ॥ दरियाने शरीं स्पर्शु केला । क्रोधु तत्काळ द्विगुणित झाला । दाही बाणीं रामें बिंधिला । दशग्रीव दशभाळीं. ॥ २६ ॥ सपाळें भेदिलीं कमळलधपणी । मग रावणु विचारी अंतःकरणीं । पोळला सर्पु जैसा चरणीं । ताडिलियावरी. ॥ २७ ॥ अधरोष्ठ दंती घेऊनि पुनरपि । बहु बाण लाविले दाही चापी । मघान करीताचि रामरूपी । भरले धुधाट घोरें. ॥ २८ ॥ ते राजीवनेत्रें देखोनि । क्षिती-

एक सांडिले छेदूनि । कितीएक अकस्मात येऊनि । बैसले अंगावरी. ॥ २९ ॥ ऐसें देखोनि दशाननें । अट्टहासें भरिलीं दिशावदनें । पुनरपि शरघातें अश्वरत्नें । रामरथींचीं पोळिलीं. ॥ ३० ॥ सर्वांची वधु-यादरें । वीरवाढीविचेनि वैभवें । ध्वजु छेदुनी दशग्रीवें । मातुळींही भिधिला. ॥ ३१ ॥ ऐसें रावणाचें अधिक । रावन दिसो दिधलें काहीक । तंव ऋषि आणि अमरादिक । साशंक जाले. ॥ ३२ ॥ पर्वतासमान जे वानर । ते अति जाले भयातुर । म्हणती समयो कठीण थोर । रावणें जिंकिलें असे. ॥ ३३ ॥ ऐसें देखोनि तिये काळीं । गुरु अगस्ती रामाजवळी । येऊनि उपदेशिलें कर्णमूळीं । आदित्यहृदय. ॥ ३४ ॥ मग तसाचि हृदयीं रघुपति । करी जपाचिया आवृत्ति । तंव प्रत्यक्ष येऊनि गभस्ती । साह्य सखा जैसा. ॥ ३५ ॥ मग रामासी म्हणे किरणु । स्वामी संग्रामु करीं दारुणु । आता वधिसील रावणु । येथें संशय नाहीं. ॥ ३६ ॥ रावणु दाखवितो प्रतापु । परी यासी काळू आला समीपु । जैसा निर्वातिये समयीं दीपु । प्रकाशे बहुतु ॥ ३७ ॥ ऐसें सांगोनि दिननाथें । कुळाभिमानाचेनि स्वार्थें । उपदेशिलें ब्रह्मविद्या सामर्थ्यें सर्वांज मूळमंत्रेंसीं. ॥ ३८ ॥ मग तैसेंची रघुनंदनें । अव्यग्रता अव्य-यवानें । शर चापीं सज्जिले ज्याचीं वदनें । शिवशूळवत. ॥ ३९ ॥ ओढी काढूनि कर्णापर्यंत । शर पंच सोडिले धगधगीत । ते रावणा-वरी अकस्मात । येवों सरले. ॥ ४० ॥ चारी चहु तुरगाच्या कपाळीं । मारिलिया भालीं सकळीं । एकें ध्वजु छेदुनी भूमंडळीं । पाडिला तालु जैसा. ॥ ४१ ॥ सर्वांचि रामें रणरंगधीरें । सारथी रावणाचा एकें शरें । भिधिला घेतलें आदरें । उरलें मातुळींचें. ॥ ४२ ॥ मागुतेनि रामें हाटकपुंख । बाण सोडिले अरिमुख । तेही रावणभाळीं बैसोनि । सुख सुरवरांसी दीधलें. ॥ ४३ ॥ ऐसी रामाची देखोनि धनुर्विद्या । गर्जिन्नल्या वानराधिपा माया । आनंदपुरें चित्तलक्षणनया । अमर्याद उचंबळलिया. ॥ ४४ ॥ रावणाचें राक्षसदळ । भयातुर अतिचंचळ । जैसें क्षरानातें तडागजळ । खादोळिदोळ होये ॥ ४५ ॥ ऐसें रावणें देखोनि डोळा । दर्भू उगळा कोपाग्निज्वाळा । जैसा सिंधुमथनीं विषगरळा । वासुकी टाकी. ॥ ४६ ॥ मग योजुनि तिये काळीं ।

शक्तिवंतु शूळु होता जवळी । तो अभिमंत्रुनि करउसाळीं । रामावरी टाकिला. ॥ ४७ ॥ तो शूळु निघाला धगधगीतु । जैसा प्रळयींचा अग्निकेतु । कीं कृतांतें प्रेरिला दूतु । काळदंड जैसा. ॥ ४८ ॥ कीं काळपुरुषाचा जिव्हालोळू । कीं तो कल्पांतविजूचा कल्लोळु । ना तो सिंदूरवर्ण व्याळु । दूतु दक्षिणपतीचा. ॥ ४९ ॥ ऐसा शूळु येतु गगनीं । वन्ही वृष्टि करी मेदिनीं । वानर देखती लोचनीं । म्हणति विघ्न मोठें. ॥ ५० ॥ धांवोनि बिभीषणु रामाप्रति । सांगे म्हणे आटी आली शूळशक्ति । हे बहु बाणीं भेदुनि निगुती । टाकी सेनेपलीकडे. ॥ ५१ ॥ बिभीषणाचे या शब्दासरिसे । रामें शर सोडिले सूर्यकर जैसे । ते शूळीं स्पर्शतांचि काकसे । होउनि पडले. ॥ ५२ ॥ बाण जाले दग्ध काष्ठवत । ऐसें देखोनि राघवें पाशुपत । प्रेरिलें जें शिवनिर्मित । दत्त सुरेश्वराचें. ॥ ५३ ॥ तें निघालें तेजें संपूर्ण । वरी पडताचि शूळशक्ति चूर्ण । करूनि पाडिली जीर्ण । लोहकीट विखुरे जैसें. ॥ ५४ ॥ सवेंचि अयोध्याधीशें । बहु बाण सोडिले रणकर्कशें । ते रावणावरी चतुर्निमिषें । वज्रघात जैसे. ॥ ५५ ॥ तेही रागीट शूळ गगनीं । दशकंदरदेहाची चाळणी । करूनि पैलीकडे धरणीं । प्रवेशोनि विशाले. ॥ ५६ ॥ राघवें माहांउपरी । सोडिल्या शरधारांच्या थरी । जैसा सिंधु लहरींमागें लहरी । साडी वेगवत्तर. ॥ ५७ ॥ ऐसे रावणावरि बाण पडत । जैसे असंख्यात उल्कापात । तेणें दशाननु बहुत । खिळिला रथावरी. ॥ ५८ ॥ तैसे सूर्यमंडळीं सहस्रकर । अधोंअर्ध भ्रमती खडतर । तैसे रावणशरीरीं शर । रुतले राघवाचे. ॥ ५९ ॥ कां धनगर्जनीं मयूराचे । पिंजारती शरीरीं शरकुंचे । तैसें रावणाअंगीं रामाचे । सपिच्छ बाण मिरवले. ॥ ६० ॥ तिये समयीं रावणासी काळु । कठिण वर्तला पाहीं बळु । मूर्च्छना आली विकळु । पडला बहुमाळ. ॥ ६१ ॥ ऐसें दुरूनि देखे रामु । मग शर हाणींचिना धीरोत्तमु । मनीं सुचवी क्षात्रधर्मु । तटस्थ निजस्थानीं जाला. ॥ ६२ ॥ ऐसा तो समयो देखोनी । वानरीं केला सुखध्वनी । देव गंधर्व ऋषि विमानीं । अत्यंत आल्हादले. ॥ ६३ ॥ जैसें जेणें पीडिलें असे बहुत, । त्याचें व्यसन घडलें अकस्मात । तिये काळीं सुख मानिजे अत्यंत । सकळही जनीं. ॥ ६४ ॥ ऐसा सुरनरी

कपीश्वरीं । संतोष मानिला आणि वानरीं । परि रावणसेना भयसागरीं । बुचकळों लागली. ॥ ६५ ॥ यापरी रावणाचा सारथी । स्वामीसि पडले देखे अनर्थी । मग शीघ्र रथु पुरीपंथीं । फिरविला तेणें. ॥ ६६ ॥ कैसे वळःक्ष रथींचे घोडे, । शरधारीं खोंचले असती उघडे । परी स्वामीची वासना तिकडे । फीरती पवनवेगें. ॥ ६७ ॥ विकळ स्वामी शत्रुसन्मुख होता । तो काढूनि नेला परता । जैसा अग्नि गृहीं लागलिया स्वस्थ पिता । पुत्र घेउनी पळे. ॥ ६८ ॥ ऐसा सारथियें काढिला रथु । अश्वीं धरिला पुरीचा पंथु । तंव सावधान जाला लंकानाथु । रणीं म्हळों देखे. ॥ ६९ ॥ मग अतिकोपु आला दशशिरा । म्हणे "रे सारथिया भयातुरा । सेनामुखींहुनि एकसरा । किमर्थ रथु काढिला! ॥ ७० ॥ समांगणीं प्रहार लागती वर्मी, । तेणें मज येताति मूर्च्छनाघूर्मी । जैशा अंबुनिधीमध्यें ऊर्मी । लोटताती वेळोवेळां. ॥ ७१ ॥ तरी एकाएकी रथु काढणें । येणें न मेडला माझा वेसे उणें । आतां शीघ्र रथु युद्धाकारणें । निजदळमुखा नेई." ॥ ७२ ॥ ऐसें वादिजे दशकंधरें, । तंव सारथि बोले प्रत्युत्तरें । म्हणे "स्वामी म्यां दृढ विचारें, । रथु काढिला असे. ॥ ७३ ॥ तुम्हांवरी पडिले बहु शर, । तेणें मूर्च्छित जालेती थोर । आणि सावधान वैरी समोर, । महामारा पेटलासे. ॥ ७४ ॥ ऐसा परम कठिण समयो, । आपणाकडे न दिसे जयो । तुमच्याविषयीं चिंताउदयो । मज बहु जाला. ॥ ७५ ॥ ऐसे ये वोखटीये प्रसंगीं, । पुढें स्वामी, तुमचे हितालागीं । म्यां रथु काढूनि मार्गीं । लाविला लंकेचिये. ॥ ७६ ॥ कां जे तुम्ही व्हाल सावधान । अश्व करितील जळप्राशन । येणें माझेंही स्वस्थेल मन । पुनरपि रथु मुरडळ ॥ ७७ ॥ स्वामी पडिला अनर्थी । जाणोनि रथू न काढी सारथी । तरी तोचि स्वामिहत्यारा एतदर्थी । संशयो नाहीं." ॥७८॥ ऐसा सारथी अनुवदला । परिसोनि रावणू संतोषला । मग उचित समर्पिता जाला । दिव्य कंकण करींचें. ॥ ७९ ॥ स्वामीचें उचित आ[illegible] दाता । तें अधिकाधिक अमूल्येंसीं तुष्टिपता । मग सारथियें तैसाचि मागुता । रथु मुरडूं आरंभिला. ॥ ८० ॥ वामाश्वाचा वाग्दोर ओढिला । दक्षिण तुरगमा मार्ग दिधला । सव तत्काळ रथु फिरला । कलालचक्र जैसें. ॥ ८१ ॥ तिथें समामभूमीचा मार्ग कैसा ? । प्रेताचा समुद्र जैसा ।

तेथ अशुद्धा मेदमांसा । मर्यादा कोणें करावी ? ॥ ८२ ॥ तुरंगम चालिताती वेगें । बुडती प्रेतमांसीं अर्धांगें । चरचराटें चक्रें मार्गें । गर्जती रथ्यातळींचीं. ॥ ८३ ॥ पडलेया प्रेतांचे ढीग । थडथड उडती तुरंग । सारथियामुखींचे शब्दांग । होत "बाप, बाप" म्हणोनी. ॥ ८४ ॥ ऐसा क्षणमात्रें प्रेतपंथु । क्रमूनि सारथियें रथु । नेला जेथें रघुनाथु । रथारूढ सिंह जैसा. ॥ ८५ ॥ देखोनि रावणु म्हणे रामा, । तूं मर्कटमित्रु स्त्रीनामा । मृत्युंजय लंघवेना सीमा । तेथें तूं मनुष्य किती ! ॥ ८६ ॥ रामा, तूं मजसन्मुख माझेया डोळां । दीससी जैसा नवनीतगोळा । आजि मज राहोमुखीं इंदुमंडळा । सांपडलासी निगुत्ता. ॥ ८७ ॥ ऐसा रावण बोलता जाला । परिसोनि रामु म्हणे भला रे भला । तुज मरणकाळ आला । त्रिदोषु यहुत. ॥ ८८ ॥ या शब्दाची शिक्षा लाऊं तुज । तरी तुझा वधु होईलचि सहज । कां जें सिद्धी जावया काज । त्रय प्रकारींचें. ॥ ८९ ॥ अरे तस्कररूप परम अन्यायी । तो वधिजे ठायीं ठायीं । त्यासी हीणचि यथार्थ तिये समई । ऐसाचि दंडुकू बोलावा. ॥ ९० ॥ म्हणोनि तैसा तूं रे दशशिरू, । कुबोल बोलसी स्त्रीचोरू । तरि तुझा शीघ्र वध करूं । हाचि दंडुकू बोलावा. ॥ ९१ ॥ ऐसें बोलोनी रणरंगधीरें । शरयुद्ध मांडलें निकरें । तंव एरीकडे दशकंधरें । बाणजाळ मोकलिलें. ॥ ९२ ॥ दोघे संधाना प्रवर्तले कैसे ! । प्रळयकाळीं कृतांत जैसे । शर सोडूनि हाकीतसे । एक एका घोरघोषें. ॥ ९३ ॥ आतां एका जयो एका क्षयो । जैसा मासांतीं सोम सूर्यो । एकु अस्त पावे एकासी उदयो । पौर्णिमा दिनरात्रिसंधी. ॥ ९४ ॥ तैसेचि आतां इये प्रसंगीं । रामासि जयो मृत्यु रावणालागीं । हा रसभंगु सज्जनभृंगीं । भोगावा ऋषिवाग्वाटिकेचा. ॥ ९५ ॥ इति श्रीऋषिवाग्पुष्पवाटिकेचा परिमळु । त्याचा श्रोतयांसी सेव्यसुकाळु । करी कृष्णदासु मुद्गलु । देउनी बुद्धिवायु. ॥ ९६ ॥ प्रसंग ९९ ॥

---

## प्रसंग साठावा.

ॐ: श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । रामरावणांचा परम कोपु । रामरावणांचा परम प्रतापु । रामरावणांचा संग्रामसंकल्पु । न भूतो न भविष्यति. ॥ १ ॥ नाहीं उपमा हालाहलविषा । नाहीं उपमा काळपुरुषा । नाहीं उपमा पाताळशेषा । जेणें पृथिवी धारियेली. ॥ २ ॥ नाहीं उपमा रविमंडळा । नाहीं उपमा वडवानळा । नाहीं उपमा सुवर्णाचळा । ज्याचें नाम मेरु. ॥ ३ ॥ नाहीं उपमा मेघवृष्टी । नाहीं उपमा अवतारकूर्मपृष्ठी । नाहीं उपमा वज्रायुधाचे मुष्टी । मिरवे इंद्राचिये. ॥ ४ ॥ नाहीं हो समुद्रासी उपमा । आणि उपमा नाहीं व्योमा । रामरावणांचिया संग्रामा । उपमाचि नाहीं. ॥ ५ ॥ पूर्वी युद्धें बहुतांसीं जालीं । परी हे रचना नाहीं वर्तली । ज्यासी उपमाचि नाहीं कुठली । वाचा वदती. ॥ ६ ॥ युद्ध जालें इंद्रा आणि वृत्रा । युद्ध जालें अंधकासुरा त्रिनेत्रा । युद्ध जालें जमदग्निपुत्रा । आणि सहस्रार्जुनासी. ॥ ७ ॥ युद्ध जालें विष्णु मधुकैटभा । युद्ध जालें स्कंदा तारका । युद्ध जालें बहु आइका । शुंभनिशुंभा शक्तीशीं. ॥ ८ ॥ ऐशीं परम युद्धें केलीं जिहीं । तीं युद्धें सांगावीं आणिकेंही । परि रामरावणांचिया ऐसें नाहीं । कोण्हासी कोणे काळीं. ॥ ९ ॥ असो आतां रामरावण । युद्ध करिताती निर्वाण । विचावैभवें सोडिले बाण । तेणें दिग्मंडळ भरलें. ॥ १० ॥ रावणु रणनोवरा केवळा । मुक्ती परणावया निघाला । म्हणोनि बाणीं मंडपु घातला । अवघें आकाश छोपलें. ॥ ११ ॥ कुंभकर्णादिक भले भले । समस्त वऱ्हाडी पुढें गेले । रावणा परिवेष्टित उरले । किंचित कोटी असती. ॥ १२ ॥ स्वामीनें मुक्ति परणूं आरंभिली । मंदोदरी रुवती हृदाळें आइकली । तरिसी न जायेचि हसोनि राहिली । सर्वा राणियांसहित. ॥ १३ ॥ समस्त सुहृदांसीं रावणु । निघाला मुक्तिकन्या परणूं । मागें लंकेसी बिभीषणु । रक्षणार्थ राहिला. ॥ १४ ॥ रावणु जातो मिरवत रणरंगीं । कपाळें शोभतीं बाणांच्या बासिंगीं । रक्तस्रोतें गळती सर्वांगीं । त्याची आरक्त

पुष्पमाळा. ॥ १५ ॥ समारंभीं प्रयाणकाळीं । पाहिजे बळिदान भूतळीं । तरी देहाचें सांडणें भूमंडळीं । सोडील आतां. ॥ १६ ॥ रावणु शिवभक्तु होय । आणि रामु शिवाचें सत्यहृदय । ऐसें जाणूनि पूजनार्थ काय । प्राणपंचरत्नें पाहिजे. ॥ १७ ॥ असो हें बहुत बोलणें । महायुद्ध करिजेल रामरावणें । शरशस्त्रांशीं दारुणें । सोडिताती परस्परें. ॥ १८ ॥ दोघां मुखीं उमटती सिंहनादु । जैसे प्रळयीं मेघाचे शब्दु । लघुलाघवी काळदंडु । वर्मभेद लक्ष करिती. ॥ १९ ॥ घे घे साहें साहें म्हणोनी । शस्त्रें टाकिती उसळोनी । सर्वेचि शरांचे पूर गगनीं । मोकलिती सैरा, असिलता निघु जैशा. ॥ २० ॥ इतुकीं आयुधें चक्रभ्रमवेगें । रावणु रामावरी टाकी लागवेगें । रघुनाथु बाणमार्गें । चूर्ण करितु आहे. ॥ २१ ॥ दोघांचे कठोर कोदंड । वज्राचेची दोघांचे दोर्दंड । अमोघ वज्रबाणीं ब्रह्मांड । भरलें तेंही मागुतें. ॥ २२ ॥ तेणें त्रैलोक्य जालें भयातुर । विमानें सांडूनि पळाले सुर । ऋषिगण गंधर्व किन्नर । म्हणती मांडला प्रळयो. ॥ २३ ॥ ब्रह्मांड व्यापिलें बाणीं । तेथें कैंचा तारापती तरणी । वायुचक्र फिरोन धरणी । नक्षत्रें पडती बहुतें. ॥ २४ ॥ उत्पात अत्यंत मांडले । रक्तधारीं मेघ वर्षले । सोमार्क भयातुर जाले । अद्भुत तिये समयीं. ॥ २५ ॥ अति कांपों लागलें भूमंडळ । चक्रवत् भ्रमे दिग्मंडळ । हालवलें सप्तपाताळ । म्हणती ब्रह्मकल्पु जाला. ॥ २६ ॥ शेष कूर्म आणि वराहो । भ्रमित जाले पावले मोहो । म्हणती एवढें अरिष्ट काय हो । मांडलें पृथ्वीवरी. ॥ २७ ॥ रामरावणदळींचे वीर । पर्वतप्राय राक्षस वानर । ते कंपायमान भयातुर । कौतुक पाहती दोघांचें. ॥ २८ ॥ दोघे योद्धे रणकर्कश । कृतांतवत दोहींचे आवेश । दोघे क्रोधें करूनि आकाश । ग्रासूं म्हणती. ॥ २९ ॥ वर्में भेदिलीं शरधारीं । तेणें बहु पोळले अंतरीं । मग दोघांचे शर दोघांवरी । लोटले काळतृष्णेनें. ॥ ३० ॥ दोहींचे रथ विशाळ । जाज्वल्यमान महातेजाळ । शृंगभाळीं सुवर्णाचळ । तैसे दिसों लागले. ॥ ३१ ॥ ऐसें परम युद्ध होत होतें । दोघांचे रथ उदाळत उदाळत । सारथी सिंहनाद केले बहुत । सोट रिघाले तुरंगमां. ॥ ३२ ॥ घोडे वध पावी पडले साटांचे घायीं । उफाळले पुढिलां पायीं । मग रथेंसीं रथु एके ठायीं । दाटले गगनीं. ॥ ३३ ॥

रथेंसीं रथुमंडळी । एकवटले तिये काळीं । अति कोल्हाळु जाला दोहीं दळीं । वीरांनीं युगांत मांडले. ॥ ३४ ॥ रथरथांच्या संघट्टनीं । अश्व टमे राहिले दुचरणीं । धुरा उचळल्या मागिलवाणी । उलथीं पाहातीं. ॥ ३५ ॥ कुशळ सारथी वैसले धुरे । तिहीं तुरंगांचे वाग्दोरे । ओढूनि रथ माघारे । केले ठायींचे ठाईं. ॥ ३६ ॥ ते रथ जैसीं गंधर्वनगरें । कीं रणसागरींचीं तारें । नाना भूतळींचीं सुंदरें । विमानें काय. ॥ ३७ ॥ ते रथ वोढिलेया मार्गें । पुढें रामरावण लागले वेगें । शर सोडितांतीं तेणें सर्वांगें । दोघींचीं खोंचलीं. ॥ ३८ ॥ शर शक्ति शस्त्रास्त्रें । सोडितां जालीं सप्त अहोरात्रें । परी विसांवा रामें दशवक्त्रें । निमिषार्ध घेतला नाहीं. ॥ ३९ ॥ रामु वीर चक्रचूडामणी । युद्ध करित करितां चैत्राणी । रावणाचे वाजी विंधोनी धरणीं । मृतप्राय पाडिले. ॥ ४० ॥ रथु पवनापासि वेगें । भ्रमत होता तुरंगांमागें । त्या तुरंगांचीं अधींगें । शरघातें छेदिलीं. ॥ ४१ ॥ मृत्यु अश्वरथांची गति । कुंठविला लंकापति । जैसा दग्ध पक्षी संपाति । अडोनी राहिला. ॥ ४२ ॥ ऐसें देखोनि भंगलग । रावणाचे रथीं तुरंग । तत्काळ पुनरपि श्वेतांग । योजिले तिहीं. ॥ ४३ ॥ यानंतरें रामचंद्रु । सर्वबळला क्रोधसमुद्रु । तूणींगतुनी अर्धचंद्रु । बाणु वोढूनि घेतला. ॥ ४४ ॥ तो बाणु योजिला गुणीं । वोढोनि लाविला दक्षिणे कर्णीं । वामांग देउनी निज ठाणीं । सोडिला नयनलक्षें. ॥ ४५ ॥ तो निघाला गगन गर्जितु । जैसा कृतांताचा मुख्य दूतु । रावणावरी अकस्मातु । कंठपंक्ती बैसला. ॥ ४६ ॥ लागतांची अर्धचंद्र शरें । छेदिलीं रावणाचीं शिरें । पृथ्वीवरी पाडिलीं थोरें । गिरिशिखरें जैसीं. ॥ ४७ ॥ परी कैसी अपूर्वता जाली । शिरें जेथूनि पडलीं । तेथेंची पुनरपी निघालीं । पूर्वीलाचिसारिखीं. ॥ ४८ ॥ ऐसें देखोनि रघुनंदनें । अतिआश्चर्य मानिलें मनें । म्हणे "छेदिलीं छेदोनि आननें । तेथेंचि मागुती निघालीं." ॥ ४९ ॥ रामु विचारी पुनरपी । सांत टणत्काहूनी चापीं । बाणु लाविला काळदंडरूपी । रविचक्रवदनु. ॥ ५० ॥ तो बाणु अति गहनु । धारामी देवतासहस्रनयनु । सो रावणावरी रघुनंदनु । प्रेरिता जाला. ॥ ५१ ॥ तो सुटला ऊर्ध्व व्योममार्गें । गेला मनोवृत्तिऐसा वेगें ।

दशकंठाचीं उत्तमागें । छेदूनि भूमीं पाडिलीं. ॥ ९२ ॥ परी शिरें निघालीं पुनरपीं । जैसिया घटांतुनी फडा काढिल्या सर्पी । नाना लपविली मुखें कच्छपीं । उचलिजेति जेवीं. ॥ ९३ ॥ ऐसें अरिशिरांप्रती अपूर्व । देखोनि चिंतातुर देवगंधर्व । जाले आणीकही वीर सर्व । वानरदळांमध्यें. ॥ ९४ ॥ म्हणती जे बाण वज्राहूनी तीक्ष्ण । मंत्रास्त्र शरसंपूर्ण । त्यांचेनि घातें शतचूर्ण । मेरुमंदिर होऊं शके. ॥ ९५ ॥ धनुष्मंत चक्रचूडामणी । संधान करित ते बाणीं । शिरें छेदुनी पडती धरणीं । परी पुनरपि निघताती. ॥ ९६ ॥ ऐसें खेचर भूचर बोलती । आणि आश्चर्य करी रघुपति । म्हणे "कैसेनी पाहों पौलस्ती । वधिला जाईल आतां. ॥ ९७ ॥ करिता याचा शिरच्छेदु । पुनरपि निघालीं हा विनोदु । तरी दशग्रीव अमरकंटु । सर्वथा असेल. ॥ ९८ ॥ जिहीं बाणीं मारिला विरोधु । खर त्रिशिरा दूषण कबंधु । मारीचकपटमृगाचा वधु । केला गोदातटीं. ॥ ९९ ॥ तिहीं बाणीं करूनि बळें । छेदिलीं रावणाचीं कंठनाळें । पृथ्वीवरी पाडिलीं विशाळें । गिरिशिखरें जैसीं. ॥ ६० ॥ छेदिलीं तेथेंचि अविलंबें । उद्भवती पूर्वीलाऐसीं स्वयंभें । जैसीं मागुती सोमार्कबिंबें । उदयाचळीं उगवती." ॥ ६१ ॥ ऐसा अनुवादु रघुपतीचा । परिसोनि सुरेशसारथि याचा । वदे जैसा अग्रजु गरुडाचा । सहस्र मरीचींचा पती. ॥ ६२ ॥ म्हणे "अहो जी सर्वेशा तुम्हीं । जग व्यापिलें चराचरांतर्यामी । जैसें अनंत घट मठ भूमी । ते एकें व्योमीं व्यापिले. ॥ ६३ ॥ व्यापिली अक्षरांतरीं । सरिसा अकारु त्याच्या आंगीं । तैसा तू एक व्यापकु जगीं । देवाधिदेव. ॥ ६४ ॥ जें जिये स्थानीं आहे जितुकें । तें तुवांचि केलें तुजचि ठाउकें । नेणपण धरिलें कोटाकौतुकें । इच्छा नांदसी रंगें. ॥ ६५ ॥ आतां असो परिसा रघुपति । याचीं शिरें छेदिलीं मागुती । निघतीना देरियासी युक्ती । एकी असे प्रस्तुत. ॥ ६६ ॥ याचेया हृदयाभीतरी आइका । आहे अमृतकूपिका । ते ब्रह्मास्त्रें छेदीं नसतांपण ! । तेणें खुंटेल शिरोत्पत्ति." ॥ ६७ ॥ ऐसें रघुनाथें परिसोनी । मातुली गौरविला अमृतवचनीं । बाणु काढिला विचारूनी । जो अगस्तीनें दिधला होता. ॥ ६८ ॥ त्या बाणाचें मेरूचें गुरुत्व । शेष कूर्माचें असे सत्व । महार्णवाचें महत्व । तें अमोघ असाधारण. ॥ ६९ ॥

मुखीं वसती वन्हि सूर्यों । पुच्छीं राहिला प्रळयवायो । पचकांडीं देवता जयो । घरूनि अचचळ असती. ॥ ७० ॥ यम वरुण तिसरा कुबेरु । ईशान्य चौथा, पंचमू सुरेश्वरू । असा देवपचकाचा अधिकारू । खरें पचकाडया गा. ॥ ७१ ॥ ऐसा तो बाणु समर्थु । पूर्ण कर्ता मनोरथु । त्याच्या मुखीं ब्रह्मास्त्र रघुनाथु । स्थापिता झाला मूळमंत्र. ॥ ७२ ॥ तो बाणु चापीं योजिला कैसा । गगनचापावरी धूमकेतु जैसा । नाना काळदंतु काळासारिखा । रमारिला महाप्रळयीं. ॥ ७३ ॥ ऐसिया बाणासी रणकर्कशें । आकर्णवरी ओढिलें सीतावरेसें । तेणें बाणें अहा आवेशें । कार्या कारण मागा केलें. ॥ ७४ ॥ अहो रघुनाथाचा दक्षिण कर्णू । तेथें एकांतीं बोसरला बाणू । किमर्थ त्वरीं पुसे रावणु । वधू म्हणोनी ? ॥ ७५ ॥ असो कोटितेतिसमर्यां एकसरा । वाजिन्नला कार्मुक रा रा । तेणें मूर्छी च्यारिया तारा । सीमा समुद्रें साडिली. ॥ ७६ ॥ रावणाच्या वक्षसपुटीं । रामु लक्ष करूनि दृष्टी । बाणु सोडिला सर्व सृष्टी । कपायमान झाली. ॥ ७७ ॥ बाणब्रह्मास्त्रें कटोलु । जैसा विद्युल्लताचा मेळु । त्याचेनि तेजें भूगोळू । उजळलेला जाला. ॥ ७८ ॥ बाणु ऊर्ध्व गगनें जातु । पिच्छीं प्रळयवायु वाजतु । दोन्ही दळें मोह पावलीं अकस्मातु । आला रावणावरी. ॥ ७९ ॥ लागताचि चूर्ण केलें वक्ष स्थळ । परीकडे निघोनि भूमडळ । भेदिलें मग तत्काळ । रामाजवळी आला. ॥ ८० ॥ जैसें पैं दूतें अतरंगें । स्वामिशब्दप्रसंगें । कार्यसिद्धी करूनि वेगें । येउनी पुनरपि. ॥ ८१ ॥ उपरी तैसेंचि तेचि क्षणीं । रामचें चमत्कनबाणीं । रावणाचीं तीन शिरें धरणीं । छेदूनि पाडिलीं. ॥ ८२ ॥ आणिकें शिरें छेदावया बाणु । रामु काढी तंव प्रार्थी लक्ष्मणु । "स्वामि, आतां पुरे युद्ध रावणु । अति श्रमला असे. ॥ ८३ ॥ प्रेतदशा रावणा आली । आतां स्पर्शे ना तुम्हिया माली । याचीं शिरें जितुकीं छेदलीं । तितुकींचि असावीं. ॥ ८४ ॥ आम्हा समस्ताच्या मनीं । शिरें वरचरणेंसी रणमेदिनीं । पडला रावणु लोचनीं । देखावयाची इच्छा." ॥ ८५ ॥ ऐसें बोलणें लक्ष्मणाचें । परिसोनि रामें करीचें । बाण कोदंड ठेविले म्हणे "आमचें । अवतारकृत्य जालें." ॥ ८६ ॥ ऐसा रामें रावणु वधिला । तों देवीं गंधर्वी ऋषी देखला । तेहींचि पुष्पवृष्टि केली भली ।

नभू जयजयकारें. ॥ ८७ ॥ दिव्य वाद्यें वाजविती किन्नर । आळविती विद्याधर । गायन करिती नारद तुंबर । विणे वाहुनी आनंदें. ॥ ८८ ॥ अष्टनायका नृत्य करिती । सनकादिक स्तोत्रीं स्तविती । अगाध महिमा कीर्ति गाती । हाहाहुहु गंधर्व. ॥ ८९ ॥ इतुकें वर्तलें अंतरिक्षविमानीं । आणी जे वानर ऋक्ष मेदिनीं । ते आनंदले, सर्वां मनीं । पीयूषाचे पूर वाहाती. ॥ ९० ॥ परम आल्हाद्रु लक्ष्मणासी । सुखार्णव हेलावे सुग्रीवासी । त्रैलोक्य आनंदलें रावणासी । रघुनाथें वधिलें. ॥ ९१ ॥ रावणु कैसा पडला रणमंडळीं । जैसा द्रुमु उन्मूळला समूळीं । कर पाद पसरले वक्षःस्थळीं । बाणगर्ता पडली. ॥ ९२ ॥ तेथोनि सुटलिया रुधिरधारा । पृथ्वीवरी धांवती सैरा । वींभसता आली शरीरा । डोळां देखवेना ऐसी. ॥ ९३ ॥ पाहा हो रावणाचीं शिरें । शिवलिंगीं शोभलीं जैसीं फुलारें । तिथें रणमंडळीं म्यासुरें । रुळत पडलीं. ॥ ९४ ॥ ज्या रावणाचिया ललाटावरी । टिळे रेखिले कुंकुमकेसरी । तेथें रघुनाथाच्या शरीं । बाणगर्ता पडलिया. ॥ ९५ ॥ जियें रावणाचीं मुखकमळें । मिरवलीं कर्पूरतांबूळें । त्यांमध्यें दंतद्वारीं अनिळें । मृत्तिका घातलिया. ॥ ९६ ॥ ज्या रावणाचेया मस्तकावरी । रत्नमुकुट मिरविले हारीं । तेथें गीध बैसोनि नेत्रांभीतरीं । चचुवा हाणिती. ॥ ९७ ॥ जे रावणाचे कबरीभार । चंपककेतकीदळीं निरंतर । मदित होते त्यावरी पवनें धूळि धूसर । बहुसाल घातली. ॥ ९८ ॥ जो रावणु हसतुळिकेवरी । मचकीं पुष्पांच्या आहारीं । पहुडे तो आजि प्रेतांभीतरीं । पृथ्वीतळीं पडला. ॥ ९९ ॥ ऐसी उत्तरदशा दशमुखा । जाली भरिन्नली कर्मरेखा । येणें त्रैलोक्य आनंदलें परी दुःखा । बिभीषणु पात्र जाला. ॥ १०० ॥ रणीं पडला ज्येष्ठ बंधु । म्हणोनी उचंबळला शोकसिंधु । संसारमायामोहसबंधु । झळंबला तिये काळीं. ॥ १ ॥ बिभीषणें देह भूमीवरी टाकिलें । म्हणे "आहा थोरटें जालें । आजी विश्व शून्य पडलें । या लंकेश्वराविण. ॥ २ ॥ प्रतापपर्वत मावळला । धैर्याचा मेरु ग्रचळला । बळाचा समुद्र आटला । आजी रणमंडळीं. ॥ ३ ॥ गेला गेला महाकोपी । गेला गेला महाप्रतापी । गेला गेला महातपी । गेला धीर उदार. ॥ ४ ॥ गेला कर्मनिष्ठ चाचरिता । गेला सतती सपादि भोक्ता । गेला वेदरूपकर्ता । गेला देवर्षु-

हाणु. ॥ ५ ॥ गेला परम पुरुषार्थी । गेला असाधारण अर्थी । गेला ज्या-कारणें दाशरथी । सर्वेशु अवतरला. ॥ ६ ॥ रामवज्रें हा पर्वतु फोडिला । रामनेघें हा रावणाग्नि विझविला । रामसिंहें निदारिला । हा रावणकुंजर " ॥ ७ ॥ ऐसा बिभीषणु रावणाचा । शोकु करित बोले वाचा । दोहीं नेत्रीं अश्रुधाराचा । पूर पडतसे. ॥ ८ ॥ रुदन करितु भूमीं लोळे । केस सुटले मोकळे । ऐसें समस्त देखती परि ये वेळे । राघवें संबोधिलें. ॥ ९ ॥ श्री-रामु ह्मणे "गा बिभीषणा, । तू तरी जाणता शाहाणा । गतशोकु करिता कोणकोणा । साध्य जालें सांगतें सांग. ॥ ११० ॥ पडतां शोकाच्या आटीं । न्हे सर्वथा अमृताची भेटी । आहा शब्द करिता शेवटीं । श्रमचि उरतु असे. ॥ ११ ॥ तूं ह्मणसी रावणा जालें मरण । परी हा सर्वथा जीवंतु आहे जाण । कीर्ति याची असाधारण । भुवनत्रयामध्यें. ॥ १२ ॥ कीर्ति करूनि मरिजे तेंचि जिणें । अकीर्ति करूनी जिणें तें मरणें । परम पुरु-षार्थु केला रावणें । हा मृतचि जितु आहे. ॥ १३ ॥ रावणाचें नश्वर देह गेलें । परि शाश्वत कीर्तिशरीर उरलें । माझे या अवताराचरित्रा रूप जालें । याचेनि वैरसबंधें ॥ १४ ॥ सुग्रीव आदिकरूनि वानर । त्यांचें बळ यश रूढलें थोर । तुज आम्हा मैत्री अपार । या सर्वांसी कारण हा. ॥ १५ ॥ शूरक्षत्री जो जितुका आहे । युद्धीं मरेल कीं मारिल पाहें । आता तू शोकु साडी उगा राहें । विवेकेंकरूनी." ॥ १६ ॥ ऐसें राघवाचें बोलणें । परिसोनि शोकु बिभीषणें । टाकिला जैसा रेणुका-रमणें । हृदयातील क्रोधु. ॥ १७ ॥ पुढें बिभीषणु एकु घटिका । अधो-मुखें पाहे भूमिका । मग विचारुनी रघुनायका । विनविलें ऐसें. ॥ १८ ॥ ह्मणे "स्वामि, आज्ञा तुमचे । होय उत्तरकार्य रावणाचें । करीन ज्येष्ठ बंधूचें । नेउनि चिताभूमीसी." ॥ १९ ॥ ऐसें बिभीषणु ते अवसरीं । बोले म्लानमुख दीनाच्या परी । तव रामु ह्मणे "अवश्य करीं । उत्तरकार्य याचें. ॥ १२० ॥ आमचें कृत्य सिद्धी गेलें । आतां काहीं नाहीं उरलें । रावणवधासरिसें मावळलें । वैराचें तंत्र त्रिव. ॥ २१ ॥ जैसा दग्ध काष्ठासरिसा । वह्नि विझोनि जाय आपैसा । वैरिवधांती तैसा । वैरसंबंधु कुठे." ॥ २२ ॥ ऐसें रघुनाथु बोलिला । तेताचि बिभी-षणु उठिला । प्रधानांसी आज्ञा देता जाला । राजांगना पाचारावा.

॥ २३ ॥ आतां पुढें कथा ऐसी । मंदोदरी आणि त्या राक्षसी । पडले देखोनि प्राणनाथासी । महा शोकु करिती. ॥ २४ ॥ बिभीषणु सर्वांचें सांत्वन । करूनि रावणाचें दहन । पुढें बिभीषणासी भद्रासन । लक्ष्मणु जाउनी देईल. ॥ २५ ॥ मग अरिविघहर्षु जानकीतें । रामआज्ञेनें सांगिजेल हनुमंतें । सर्वे मंगळरूप स्वामीतें । सीता भेटों आणितील. ॥ २६ ॥ पुढें जानकीचें दिव्य होईल । पृथक् पृथक् देव स्तुती करितील । इंद्रु अमृताचा पर्जन्य पाडील । उठतील मृतकपि. ॥ २७ ॥ देव जाती आज्ञा मागोनी । तैसेंचि समस्तेंसीं पुष्पकविमानीं । रामु आरूढैल भरतालागोनी । भेटी अयोध्ये जाईल. ॥ २८ ॥ इति श्रीरामायण ऋषिनिर्मित । इतुकेनी युद्धकांडकथा समाप्त । परि हेंचि सविस्तरें श्रोते परिसोत । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ १२९ ॥

---

## प्रसंग एकसष्ठावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । आतां दशाननाकारणें । अतिकाळु जाला अग्नि देणें । ऐसें विचारूनी बिभीषणें, । प्रधानांप्रती बोलिलें. ॥ १ ॥ म्हणे अहो अनळा संपाती । तुम्हीं लंके प्रवेशावें शीघ्रगती । बोलावा हो आहेती । राजांगना जितुकिया. ॥ २ ॥ आणि उपवर्ग हो आइका । बोलावा मंदोदरी मुख्य नायिका । भगिनी आणि कन्यका, । सखिया सहोदरी. ॥ ३ ॥ एथवरी पाचारा सकळा । देहो रायाचा पाहती डोळां । यानंतरें ज्येष्ठासी अनळा । घालू चितेमध्यें. ॥ ४ ॥ नृपतीसी हेचि आतां भेटी । असेचिना पुढें पडली तुटी । याकारणें प्रेत तरी पाहाती दृष्टी । जव न पडे अग्निमध्यें. ॥ ५ ॥ न पाचारिता इये समयीं । असोसी राहेल त्याचा हृदयीं । म्हणोनि शीघ्र पाचारा येथें ठायीं । येथेंचि दहन कीजेल. ॥ ६ ॥ ऐसें अश्रुबिंदु येत नयनीं । बिभीषणें आज्ञा केली प्रधानीं । ते तैसेचि शीघ्र रावणभुवनीं । पुरी प्रवेशोनि गेले. ॥ ७ ॥ तव त्या राजांगना सकळा, । चित्रशाळांगणीं जालिया गोळा । प्राणनाथासी युद्धीं कोण वेळा, । घडेल म्हणोनि चिंतातुरा. ॥ ८ ॥ एकी बैसलिया अधो-

मुखा । भूमीवरी काढिती रेखा । एकी एकीपुढें संयोगसुखा, । आ-ठवुनी अश्रु टाकिती. ॥ ९ ॥ एकी पाळव लाविले तोंडीं । एकी कव-ळिलें भुजदंडीं । एकी टाकिलिया मुरकुंडी । केवळ भूमीवरी. ॥ १० ॥ एकी गुडघेयांवरी कोंपर । ठेउनि माथां ठेविले कर । एकी गंडां-देउनी पाणितळीं स्थोर । जालिया काष्ठवत. ॥ ११ ॥ एकी एकीच्या कंठीं । मारुनी राहिलिया मिठी । एकीचिया सुटलिया निरगुंठी । पृष्ठीं स्तंभ घांसतां. ॥ १२ ॥ अजा सर्प देखिला डोळां । तैशिया एकी तटस्था निश्चळा । एकी ठायीं ठायीं वेळोवेळां । उठती बैसती. ॥ १३ ॥ एकी प्रगल्भा नारी । विष बांधिलें असे पदरीं । स्वामीसी विपरीत जालेयावरी । भक्षण करावया. ॥ १४ ॥ एकीं सुरिया सिद्ध केलिया । एकीं पाश सडका करूनि ठेविलिया । एकी निश्चयेंसीं राहिलिया । काष्टें भक्षावया. ॥ १५ ॥ कैसें घडलें असेल प्राणनाथा । म्हणोनि मंदोदरीसी बहुत व्यथा । मच-कार्गी ठेउनी माथा । विषम-बैसली भूमीं. ॥ १६ ॥ समस्तीं भूषणें त्यजिलीं सकळें । वर्जिलीं अन्नोदकें निर्मळें । सर्वांचीं म्लानें मुखकमळें । पाहार सुटले डोळियां. ॥ १७ ॥ ऐसिया राजांगना सुंदरा । समस्ता परम चिंतातुरा । कैसें कैसें जालें असेल लंकेश्वरा । ते वार्तेची वाट पाहती. ॥ १८ ॥ असो तिये समयीं तत्काळ । बिभीषणमंत्री संघाती आनळ । त्यापुढें उभे राहिले केवळ । काळदूत जैसे. ॥ १९ ॥ त्यांसी देखोनि सर्व जाया । काय बोलती म्हणोनि दचकलिया । एकी भूमी उलंडलिया । एकी कांपती थरथरा. ॥ २० ॥ त्यांपुढें उभे राहिले । क्षण एक अधो-मुख ठाकले । मग ते ऐसें बोलते जाले । साशंक होवोनी. ॥ २१ ॥ म्हणती "आजि समाप्ति जाली संग्रामा । जय आला तया रामा । राजा अति-क्रमला तुम्हां । बिभीषणें पाचारिलें." ॥ २२ ॥ ऐसें वचन आइकतां क्षणीं । वदनें घेती थयथिया जणीं । तुंबळ रुदना करिती राक्षसिणी । ललाटें हाणिती भूमी. ॥ २३ ॥ मुख्य मंदोदरी वेळोवेळां । वक्षःस्थळा मुखकमळा । पिटी पाणितळें भूमंडळा । लाग टाकुनी. ॥ २४ ॥ कोल्हाळ करिती थोर । तुटले सुटले अलंकार । मोकळे जाले कबरीभार । कोणी कोणा न सांभाळी. ॥ २५ ॥ ऐसा अतिशोक करिती सकळा । अश्रुधारा सुटलिया डोळां । रुदन करित रणमंडळा । आलिया नायकेतापासीं.

॥ २६ ॥ रावणु पडला रणमेदिनीं । बीभत्स दशा देखोनी, लोचनीं । तुंबळ रुदना आक्रांत निजांगनीं । केला तत्समयीं. ॥ २७ ॥ लोटें हाणिती भूमंडळीं । घेउनी मुखीं घालिती धुळी । एकी केश तोडिती उर स्थळीं । पिटिती पाणिप्रहार ॥ २८ ॥ ऐशिया प्रेता परिवेष्टिता । रुदन करिती समस्ता । देवी मंदोदरी पतिव्रता । अति शोकु मांडिला. ॥ २९ ॥ म्हणे " अहो हो प्राणपति । ऐसी तुम्हासी जाली गती । प्रेत होऊनी पडलेति क्षितीं । शत्रुचक्रा देखता. ॥ ३० ॥ चोरिली रामाची युवती । ते मजहुनी सुलक्षण नव्हती । तियेसी सोडा सोडा म्हणोनि बहुते रीतीं । उपदेशु केला ॥ ३१ ॥ परि आइकाचिना स्वामि । अतिगर्व धरुनी तुम्हीं । युद्ध केलें शेवटीं रणभूमीं । पडलेति प्रेत होउनी. ॥ ३२ ॥ म्या तुमचेनी समागमें । अलौकिकें सुखें भोगिलीं उत्तमें । परि अद्यापि माझेनि कामें । तृप्ती मानिली नाहीं. ॥ ३३ ॥ तुमचेनि प्रसंगें सरला वेळु । ससार गेला जैसा पळु । आता वियोगें हा दुर्घट काळु । कोणेपरी निस्तरों ? ॥ ३४ ॥ अहा हो प्राणनाथा । अहंकारें गेलें वृथा । अपकीर्ति घेउनी माथा । मरण पावलेती ॥ ३५ ॥ आम्हा अनाथ करुनि एकलें । दीर्घ प्रयाण तुम्हीं केलें । अहा कटकटा वोढवलें । कैसें बळवंत कर्म !" ॥ ३६ ॥ ऐसी करटाळुनी रावणवपु । करी मंदोदरी विलापु । हें देखोनि अयोध्यानृपु । बिभीषणाप्रति बोले ॥ ३७ ॥ म्हणे "गा बिभीषणा, काय पाहतोसी । सांत्वन करीं समस्तांसी । मयकन्ये मंदोदरीसी । शोकु करूं नेदीं. ॥ ३८ ॥ याचें मुखोंलीं दुःख हरावें । सरिसी यानें देउनी पाठवावें । पुढें प्रतिपाळन करावें । मातेचिया ऐसें " ॥ ३९ ॥ ऐसें रामु बोलिलियानंतरीं । येरू उठिला तिये अवसरीं । मग त्यां समस्ता परोपरी । शब्दीं सबोखिलें. ॥ ४० ॥ मंदोदरीसी म्हणे "माते । उठीं उभी राहें वो गुणसरिते । विचार धरीं बुद्धियुते । गतशोकु न करीं " ॥ ४१ ॥ बिभीषणु म्हणे "मंदोदरी । किमर्थ वाहवसी मोहपुरीं । हाहा शब्दें शब्दाची भरोवरी । न करीं तूं वृथा ॥ ४२ ॥ सांडीं विलापु शोकु । धरीं हृदयीं विवेकु । हा नश्वर आहे सकळ लोकु । हें तरी देखसी डोळा. ॥ ४३ ॥ विचारीं आपुलाचि देहीं । जें होतें तेंचि नाहीं । जन्मारभ्य वो पाहीं । पालटलें कैसें ? ॥ ४४ ॥ आपुलें बाल्य आपणापासीं । असतांचि पालटु जाला त्यासी । पुढें तारुण्य

देखिलें जैसी । स्वप्नींची राज्यलक्ष्मी. ॥ ४५ ॥ तारुण्य खडतर तपे ।
तें वार्धक्य आलेया हरपे । जैसें संधेचिये वोपे । दिनमान रिगे. ॥ ४६ ॥
ऐसी या देहाची गति जाण । हें भूतपंचकाचें मळवण । काळक्षुधेकारणें
निर्माण । होत कर्मपंथें. ॥ ४७ ॥ हा देहो आपुला चोळती । तरी न
वर्ते कां जैशी इच्छा चित्तीं । अकस्मात मरणप्राप्ती । होउनि नासे.
॥ ४८ ॥ उदकीं तरंग उमटत । तैसा गर्भी देहो निर्माण होत । पुनरपि
नाशु पावत । बुद्बुदापरिस. ॥ ४९ ॥ ऋणानुबंधें जीवांचीं शरीरें । एके
ठायीं वसती सुखें थोरें । महामोहो परस्परें । प्रीति प्राणांहुनी आगळी.
॥ ५० ॥ परी हें मिथ्या घे सकळ । ईश्वरमायेचे खेळ । मी माझें ऐसें
पाल्हाळ । लटिकेंचि वदलें. ॥ ५१ ॥ नदीपुराचेनि पाटें । काष्ठें होती
एकवाटें । खळाळीं पडलेया लोटें । पुनरपि विघडती. ॥ ५२ ॥ पुण्य-
काळाचेनि योगें । जनु तीर्थी मिळे प्रसंगें । तो पुनरपि जात आलेनि
मार्गें । पर्वणी गेलिया. ॥ ५३ ॥ अस्तमानीं एके वृक्षीं । येउनी बैसती
नाना पक्षी । ते प्रभातें उडोनि जाती साक्षी । देहीं परिस वो. ॥ ५४ ॥
तैसी जन्मोनी संसारीं । ऋणानुबंधें होती सोइरीं । तियें आपुलालेनि कर्में
दुरी । जाति मरण पावोनि. ॥ ५५ ॥ मंदोदरि, वो याकारणें । शोकु
कीजे कोणालागीं कोणें । शाश्वत नाहीं मरणें । समस्तांसी आहे. ॥ ५६ ॥
प्रपंचु रचिलेयापासोनी । अमित जीव जन्मले दिनीं । तिनुकेही नातळे
वदनी । विश्वकाळाचिये पाहें. ॥ ५७ ॥ आतां सर्वथा तूं उगी
राहीं । जालें तें विपरीत नव्हे पाहीं । शोकाचा हेतु वो कांहीं । स्पर्शों
नेदीं मानसीं. ॥ ५८ ॥ आता इये काळीं चातुर्यें । दुःख सांडुनी धरणें
धैर्य । निजगृहासीं जावें उत्तरकार्य । मज करणें असे रायाचें. ॥ ५९ ॥
ऐसा बिभीषणाच्या बोलीं । मंदोदरी तटस्थ जाली । जैसी चित्रींची
बाहुली । मौनमुद्रारूढ. ॥ ६० ॥ राहोनें पूर्ण चंद्रबिंब ग्रासिलें ।
पाहातां गगनीं जैसें उरलें । तैसें मुखकमळ शून्य जालें । मंदोदरीचें.
॥ ६१ ॥ आलेयामगुनी वेळीं । उपटुनि तेथेंचि मुकली । तैसी सर्वांगीं
वोसावली । दुःखानळकल्लोळी. ॥ ६२ ॥ कंठीं कर्णी शिरीं पायीं ।
रत्नालंकार होते ते तन्मयी । गळोनि गेले ठायीं ठायीं । प्रथमाचि कैसे !
॥ ६३ ॥ मोकळे कर कर्ण कबरीभार । सौंदर्यशून्य जालें शरीर ।

दुःखाचेनि कर्वतें उदर । विदारत आहे. ॥ ६४ ॥ टपटपां आसुवें नयनीं सांडी । दीर्घश्वास भरती तोंडीं । एकी आंवरती भुजादंडीं । वृद्धा धरिल्या जालिया. ॥ ६५ ॥ मग उठउनी मंदोदरीलागीं । निघालिया निजग्राममार्गी । त्यानंतरें बिभीषणु तत्प्रसंगीं । रावणाजवळी गेला. ॥ ६६ ॥ पुढें विभीषणासी देखोनि उभें । वचन बोलिलें जानकीवल्लभें । "बंधूचें कार्य लोभें । शीघ्र करीं नैऋतेशा" ॥ ६७ ॥ तंव बोले बिभीषणु समयोचित । म्हणे "स्वामि, तुमची आज्ञा शास्त्रोक्त । रावणासी दहन युक्त । माझेनि मतें न दिसे. ॥ ६८ ॥ हें त्रैलोक्य दग्ध केलें येणें । तरी कैसा अग्नि दाहील याकारणें ? । महापापी अपवित्र कवणें । यासी स्पर्श करावा ? ॥ ६९ ॥ येणें मज दिधला दुःखसागरु । मी न प्रवर्ते याचा बंधु कुबेरु । तो याचें उत्तरकार्य करू । जें कर्तव्य इये काळीं." ॥ ७० ॥ ऐसीं बिभीषणाचीं वचनें । आइकोनि राजीवनयनें । म्हणे "गा वैराभिमानें । किमर्थ अद्यापि असती ? ॥ ७१ ॥ अगा वैराभिमानु तंवचिवरी । जव जयो नाहीं आपुलां करीं । जयो आलेया दिगंतरीं । वैरसंबंधु गेला. ॥ ७२ ॥ तूं मन धरूनी आमचें । वैरपैशुन्य बोलसी बंधूचें । तरी इयें वचनें नव्हती साचें । अयुक्तें वाटती इये काळीं. ॥ ७३ ॥ ऐसा आमचा अभिप्रावो । वैरी गेलिया वैरासी नाहीं ठावो । जैसा वृक्ष छेदिलेया उपावो । फळाचा नाहीं. ॥ ७४ ॥ अगा चतुरा बिभीषणा । तूं रावणातें निंदिसी क्षणक्षणा । परि आत्महिताचा देखणा । यापैसा कोणी नाहीं. ॥ ७५ ॥ त्रैलोक्याचा वैरी जाला । परी आपुलें हित करूनि गेला । त्याचा गुह्य भावो असे कळला । चतुरा जनातें. ॥ ७६ ॥ आणिक बिभीषणा आईक । जेणें भला भला म्हणती साधु लोक । जरी वैरियांचें हित अधिक । मरणकाळीं कीजे. ॥ ७७ ॥ असो हें एकीकडे । गहनार्थें तरी कांहींच न घडे । वैर आणि मित्रत्व जोडे । कोणाचें कोणालागीं. ॥ ७८ ॥ वैरामैत्रीचा करितो अनुवादु । एथें उपजो पाहे भेदु । याकारणें हा मायाप्रवादु । ऐलिची कडिलु. ॥ ७९ ॥ परापरतें सारांश पाहीं । बोलावया दुसरें नाहीं । जैसें जळ एके डोहीं । तैसेंचि तें आहे. ॥ ८० ॥ अत्तां असो परतिया गुणा । समयो सपादे बिभीषणा । अति स्फाळु जाला रावणा । करणें तें शिघ्र करीं." ॥ ८१ ॥ ऐने

रामाचेनि बोलें । बिभीषणें जाणोनि तेंचि-जाणितलें । मग तेणेंचि जाटनी . रचिलें । चितेसी चंदनकाष्ठें. ॥ ८२ ॥ स्नानें करुनी वृद्धीं । सहस्रें बिभीषणें बुद्धीं । रावणा अग्नि दिधला विधीं । सकळही संपादिल्या. ॥ ८३ ॥ ऐसें जाळियाउपरी । शुद्ध स्नानें केलीं सागरीं । मग बिभीषणु जोडला करीं । रामापुढें उभा ठेला. ॥ ८४ ॥ सलज्ज अधोवदनें । एकदृष्टी असे मौनें । ऐसें देखोनि रघुनंदनें । राज्यकार्य सुचिलें. ॥ ८५ ॥ मग म्हणे सौमित्रा सुग्रीवादिकांनीं । "बिभीषणासी तुम्हीं जाउनि घेउनी । राज्याभिषेकु करा महासनीं । बैसवा वडिलापरी. ॥ ८६ ॥ हा आम्हांवरी स्नेहें बुद्धी । शरीरें बहु कष्टला युद्धीं । याचेनि प्रसंगें जयसिद्धि । आम्हां प्राप्त जाली. ॥ ८७ ॥ नव्हिजे उत्तीर्ण उपकारु याचा । हा पंचम बंधु आमचा." । ऐसें कृपार्णव वदे वाचा । वीरमंडळामध्यें. ॥ ८८ ॥ मग तेचि समयीं वानरेश्वरु । उचित बोले सभाचतुरु । म्हणे "बिभीषणाऐसा भाग्यसागरु । भुवनत्रयीं न देखों. ॥ ८९ ॥ याचेनि महाकार्यें सिद्धी गेलीं । एक देवाधिदेवासी मैत्री जोडली । दुसरें साधुत्वाची कीर्ति उरली । तिसरें राज्य आलें हातां." ॥ ९० ॥ ऐसें सुग्रीवाचें बोलणें । आइकोनि उत्तर बिभीषणें । दिधलें अतियुक्त जेणें । सकळां संतोषु वाटे. ॥ ९१ ॥ म्हणे "इच्छा येणें राजीवनेत्रें । मायाप्रसंगचरित्रें । मंडपीं मांडिलीं कर्मसूत्रें । बाहुलीं नाचती. ॥ ९२ ॥ वायु जिये दिशे उठु खेळे । तिकडेचि रज उधळे । पुनरपि वायु फिरे तरी वळे । रजही तेणें पंथें. ॥ ९३ ॥ राजा जातु जेणें मार्गें । तैसाचि परिवारु चाले पाठिलागें । राजा मुरडलेया तेही वेगें । तैसेची मुरडती. ॥ ९४ ॥ जे पुरीं नौकेवरी बैसती । ते कैसेनि इच्छें धावती । याकारणें ईश्वरइच्छाचक्रीं भ्रमती । जीवमात्र. ॥ ९५ ॥ म्हणोनि जें जें ज्यासी प्राप्त । तें तें स्वपत्तीचें उचित दत्त । याचेनि उपाक्ष्याक्षें होत । चिंतिलेयाहूनि वेगळें. ॥ ९६ ॥ जैसें जननीयेलागीं वेढेनि बाळकें । न मागिजे इच्छेचें मातुकें । परी ते कृपाळू लोभें कौतुकें । आणोनि हस्तावरी वाढी. ॥ ९७ ॥ तैसें मज राक्षसातें कृपार्णवें । अंगीकारिलें स्वपर्वें । जैसें दैत्यपुत्रालागीं देवें । नरसिंहरूपें. ॥ ९८ ॥ आता श्रीरामरायाची सुमनकळा । तो सर्वथा माझिये मुकुटीचा टिळा" । ऐसें बोलतां तया वीरमंडळा । विशेषें सुख वाटलें.

॥ ९९ ॥ हास्यमुख केलें पद्मनेत्रें । भला भला म्हतीतलें सौमित्रें । धन्य धन्य ऐसें वायुपुत्र । विशेषण दिधलें. ॥ १०० ॥ मग रामाज्ञेनें सुग्रीव लक्ष्मणु । उठिले करीं धरिला बिभीषणु । तेणें नमस्कार करूनी सीतारमणु । सर्व्वे घालुनी निघाला. ॥ १ ॥ चौघे प्रधान सम्यक । कितीएक कपींचें कटक । पहावया निघालें कौतुक । राज्याभिषेकाचें. ॥ २ ॥ भार चालिला अतिगजरें । सुग्रीव सौमित्र समभारें । बिभीषणा परिवेष्टित उत्तरद्वारें । लंका प्रवेशले. ॥ ३ ॥ जैसा जळार्णवीं नदीपूरू । तैसा पुरीं प्रवेशला भारू । सभामंडपा आले जेथें मेरू । राज्यभद्रासनाचा. ॥ ४ ॥ नगरींचे लोक वृद्ध वृद्ध सकळ । आले मिळाले राजभृत्य तात्काळ । तेहीं क्षणमात्रें सभास्थळ । सुशोभित केलें. ॥ ५ ॥ लागले लक्षावधि कामारी । तेहीं संमार्जनें केलीं चहुंपरी । हाटहाट वटिया चौबारीं । निरज केलीं कैसीं ? ॥ ६ ॥ उभिलीं गुढिया तोरणें मखरें । वाद्यें वाजिन्नलीं सुगंभीरें । नभचुंबिता पताका चामरें । महामंगळिकें. ॥ ७ ॥ राजमंदिरें धुपिलीं । चांदवे बांधिले कापडीलीं । ऐसी अत्यंत रचना जाली । विशेष सभामंडपीं. ॥ ८ ॥ सुग्रीवें सौमित्रें स्वकरीं । बिभीषणु बैसविला राज्यासनावरी । विध्युक्त मंत्रोपचारीं । पट्टाभिषेकु जाला. ॥ ९ ॥ वृष्टी पुष्पवृष्टी केलिया । निजांगना मंगळदीप ओंवाळूं आलिया । तिये काळीं दानकोटि जालिया । नानाविधा याचकातें. ॥ १० ॥ राज्य लंकेचें जालें बिभीषणा । घावो पडला निशाणा । ऐसा आनंदु विमानीं सुरगणां । निष्कंटक त्रैलोक्य जालें. ॥ ११ ॥ वानरीं सर्व लंका पाहिली निवाडें । पुरलें डोळेयांचें कोडें । येथें वर्णन बोलावें तरी पुढें । अयोध्यावर्णन असे. ॥ १२ ॥ ऐसें राज्यकार्य संपादुनी । सुग्रीव सौमित्र तेथोनी । रामचरण स्मरून मनीं । निजभोरेसीं उठिले. ॥ १३ ॥ बिभीषणासीं बोलिले प्रियवादु । येरू म्हणे तुमचा पादचरणु । मग लक्ष्मण चालिला इंदु । नक्षत्रेसीं जैसा. ॥ १४ ॥ शीघ्र आले स्वामीजवळीं । नमस्कार केले बद्धांजळीं । म्हणती जी स्वामी सुमुहूर्तकाळीं । बिभीषणु राज्यीं बैसविला. ॥ १५ ॥ असो आतां इतुकी कथा । जानकी भेटवावी रघुनाथा । म्हणोनि पाल्हाळीं सर्वथा । पडणें न घडे. ॥ १६ ॥ इति श्रीयुद्धकांड रामायणीं । कथा त्रैलोक्यतारिणी । इचा अभिप्रावो पहाहो अंतःकरणीं । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ १७ ॥

---

## प्रसंग बासष्टावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ खंडला इतुका गतकथामार्गु । बहुत दिवस सीतारामांचा वियोगु । आता आरंभला प्रसगु । भेटावया दोघां. ॥ १ ॥ जे हो जानकीकारणें । बहु कष्ट केले रामें लक्ष्मणें । बहु चरित्र जालें, मरणें । बहुत गेले. ॥ २ ॥ त्रैलोक्यामध्यें अति वैभव । ज्याचिये वंदीशाळे पडले देव । तो राज्यसहित दशग्रीव । आटौनि गेला. ॥ ३ ॥ असो, ऐसीये सीतेलागीं । रामु स्मरता जाला मनरंगीं । मग हनुमंताप्रति तेचि प्रसंगीं । बोलता जाला ऐसें, ॥ ४ ॥ म्हणे "परिस गा वायुसुता । जेथें बैसली असे सीता । तेथें तूंचि जाऊनी चित्ता । संतोषवीं तियेचे. ॥ ५ ॥ सांग वैरी वधिला रावणु । क्षेमें समस्त सुग्रीव लक्ष्मणु । राज्यीं स्थापिला बिभीषणु । इतुकें कृत्य जालें. ॥ ६ ॥ कपिश्रेष्ठा महाबुद्धि । तू प्रथम तरौनि तोयनिधि । केली जानकीची शुद्धि । वरवियापरी. ॥ ७ ॥ येंटागौनि तुज ते सीता । जाणत आहे हनुमंता । तिये तुझाचि विश्वासु मागुता । म्हणौनि तूंचि जाय. ॥ ८ ॥ शोकानळें ते जाजावली । असेल कृश कोमाइली । तियेधि समकुशळ अमृत बोलीं । सिंचोनि टवटवी करीं." ॥ ९ ॥ होतें हनुमंताचे मनीं । तेंचि रामें सांगितलें वचनीं । जैसें क्षुधाक्रांतालागीनि । भोजनासि उठविजे. ॥ १० ॥ कां पूर्वसंकल्पित ब्राह्मणा । दातयांनी देवविजे दक्षिणा । नाना सुधा दियाळी सणा । माहेरा धाडिजे. ॥ ११ ॥ येणें संतोषें हनुमंतु । उठोनि निघाला त्वरितु । वत्स धेनुवेसि ध्याये तैसा चिंतितु । जानकीतें हृदयीं. ॥ १२ ॥ शीघ्र गेला अशोकवना । तेथें बैसली असे पद्मानना । तें स्थान पावला गुप्त धना । लोभी पावे जैसा. ॥ १३ ॥ पुढें जानकीतें देखौनि ठेला । नमस्कारु घातला मोकळा । जैसा कनकदंडु सरळा । पडे पृथ्वीवरी. ॥ १४ ॥ मग शीघ्र उठोनि मारुतात्मजु । वदे गाढ शब्दें उचलुनि भुजु । म्हणे "जयवंतु क्षेमें रघुराजु । सबांधवें सपरिवार. ॥ १५ ॥ सफळेंसी रावणु वैरी । वधिला जाणा रणचत्वरीं । बिभीषणु राज्याधिकारी । लंकेमध्यें स्थापिला. ॥ १६ ॥ हे

शुभवार्ता घे श्रीरामें । आपुलेनि मुखें सर्वोत्तमें । तुझेनि प्रीतिलाभें प्रेमें । मज सांगों पाठविलें." ॥ १७ ॥ ऐसे हनुमतमुखींचे । शब्द निघाले अमृताचे । तेणें कर्णकुंभ अवनिजेचे । भरते जाले कैसे ! ॥ १८ ॥ परदेशौनि जिवलगाची जेणें । शुभमातु आणिली वुद्धुवाकारणें । तिये काळीं त्या आलेयाचें बोलणें । अमृताधिक. ॥ १९ ॥ नाना कपिमुखेंदु सुधाकण साडी । ते पडती सीताकर्णचकोरातोंडीं । का कपिमेघ गर्जे तव माडी । नृत्य सीतामनमयूर. ॥ २० ॥ जितुका वर्तला वृत्तांतु । तितुका सांगे हनुमंतु । तंव तंव उचंबळतु । सीतेचा सुखसागरु. ॥ २१ ॥ समूळ सांगितलें कपिपुगवें । तें कवीनें कथापर्थी बोलावें, । तरी पुनरुक्त वाढेल राघवें । पाहिली पाहिजे सीता. ॥ २२ ॥ असो ऐसें हनुमंतु बोलिला । श्रवणें सीताशोकु तत्काळ गेला । जैसा दीपु आगताचि हारपला । गृहांधकारु. ॥ २३ ॥ मग सीता म्हणे "बा रे हनुमता । बैस गा सखया आरुता । इये चिंतार्णवीं तुरत बुडता । तुवां आजि काढिलें. ॥ २४ ॥ धन्य गा कपि तुझें बोलणें । जें शुभ बोलिलासि त्याकारणें । उचित त्रैलोक्यीं नाहीं तरी देणें । हेंचि समर्थाचें तुज. ॥ २५ ॥ जववरी चंद्रार्कनक्षत्रें । आणि जववरी रामकथाचरित्रें । तंववरि तूं सुखी सहस्त्रवक्त्रें । आशीर्वचन माझें." ॥ २६ ॥ ऐसें जानकीसि बोलतक्षणीं । येरें माथा ठेविला चरणीं । सवेंचि सीतेनें उचलूनि पाणी । फिरविला मस्तकावरूनि. ॥ २७ ॥ म्हणे "बा रे तू मजकारणें । बहू कष्टलासि देहप्राणें । न फिटे उपकार तुझेनि ऋणें । बांधलिये मी." ॥ २८ ॥ तव कपि म्हणे तियेलागोनी । "माते, तू बोलसी विपरिता वचनीं । बाळकाचेनि उपकारें जननी । कैसी बांधिजैल ! ॥ २९ ॥ वाटसरू उष्णें तापला मार्गी । तो बैसला जवुच्छाये निवाला अंगीं । तरी तेणें काय तिये जवूलागीं । उपकारें बांधिलें. ॥ ३० ॥ म्हणौनि तैसी तू आदिमाते । बोलसी मजप्रति सीते, । तुझेनि अभगें सृष्टि होते जाते । विरिंचिप्रपंचाची. ॥ ३१ ॥ देवादिदेवासरिसी । प्रतिअवतारीं अवतरसी । तुज रावणें हरिलें हें जगासी । मिथ्या दाखविलें. ॥३२॥ माते, दशकधेरें कीटकें । तुज बळें चोरिलें हें अटिकें । भ्रम घालूनी रघुनायकें । देवांचें पारपत्य केलें. ॥ ३३ ॥ ऐसें हनुमंतासी बोलतां । सुख पावली हर्षेली सीता । म्हणे "भला भला गुणवंता । चतुरचक्रश्रेष्ठा!"

॥ ३४ ॥ असो ऐसा सरला रामपवाडु । जैसा नृत्यांतीं थिरे नादु । "सर्वव्यसिद्धी आलेया सादु । समे सावधानाचा. ॥ ३५ ॥ पुनरपि सीता उल्हासें । बोले हनुमंतासी ऐसें । "म्हणे जें जें चिंतिलें होतें मानसें । तें सर्व सिद्धी गेलें. ॥ ३६ ॥ अगा हनुमंता स्नेहाळा । रामचरण मी डोळां । केधवा देखेन उगाविला । मनु जाला माझा. ॥ ३७ ॥ गृध्रमुखींहुनी मासोळी । गळाली ते रिगालया जळीं । आति उत्कोठित तैसी इये काळीं । मी जाहिये कपि." ॥ ३८ ॥ ऐसें कपि पारिसोनि बैसला ठायीं । तैसाची उठोनि माथा सीतेच्या पायीं । ठेऊनि म्हणे "माते इयेचि समयीं । मी पाचारावया येतों." ॥ ३९ ॥ ऐसें हनुमंतु बोले वाचा । तव सद्गदीत कंठू जाला सीतेचा । पुनरपि शब्दें सुख देऊनि वायुचा । पुत्र तेथौनि गेला. ॥ ४० ॥ मन धांवे ऐसिया त्वरा । राघवापासीं आला एकसरा । नमस्कार करूनि मनोहरा । मातु सीतेचिया वदला. ॥ ४१ ॥ अमृताचीं फळें । ऐसीं वचनें रसाळें । हनुमंतें बोलिलेया आगळें । सुख रामासी वाटलें. ॥ ४२ ॥ जिये सीतेनिमित्त रघुनंदनें । घोरें पाहिलीं अरण्यवनें । प्रेमेंकरूनि आलिंगनें । पादपाशीं दीधलीं. ॥ ४३ ॥ साह्य केलें कपि ऋक्षगण । समुद्रीं तारिले पाषाण । वधिले रावण कुंभकर्ण । त्रैलोक्यपीडक जे. ॥ ४४ ॥ ऐसी ते सीता निरंतर । अवनीचें गर्भरत्न साचार । ते सर्वेशें मनाचें मंदिर । करूनि बैसविली. ॥ ४५ ॥ तियेचे अतरींचा अभिप्रावो । दूतमुखें जाणौनि भावो । हनुमंतासी देवाधिदेवो । सांगता जाला. ॥ ४६ ॥ म्हणे "आइक गा वायुनंदना । गुणालया बुद्धिसंपन्ना । शीघ्र जावें अशोकवना । जानकी आणावया. ॥ ४७ ॥ प्रथम बिभीषणासी भेटावें । मागिये आम्हांसी निवेदावें । सीतेकरूनि करवावें । मंगळस्नाना याचीं. ॥ ४८ ॥ दिव्याचिरें अलंकार । दिव्य सुगंधमनोहर । दिव्यरूप तियेचें सुंदर । इहीं मंडित कीजे. ॥ ४९ ॥ ऐसा सज्जनभयभंगु । मेदिनीगर्भरत्नरंगु । सीता आणविली तो प्रसंगु । सुरवरीं पाहिला. ॥ ५० ॥ रामासीते होईल भेटी । तो समारंभु पाहावया दृष्टी । मिळोनि उतरले सृष्टी । लंकाप्रदेशीं ते. ॥ ५१ ॥ इंद्रादिक वसूचे अष्टक । एकादश रुद्र द्वादशार्क । साध्य विश्वदेव सकळीक । मरुद्गण पितृगण. ॥ ५२ ॥ हाहा हूहू गंधर्वादिक । कुबेर मुख्य यक्ष सकळिक । किन्नर की पुरुष

आणिक । विद्याधर पैं. ॥ ५३ ॥ अष्टनृत्यका रंभादिकरूनि । शिवपुरी सत्यलोकापासूनी । समभारें उतरले मेदिनी । चारित्र पहावया. ॥ ५४ ॥ आरूढ कोण कोणा वाहनीं । काहींएक सांगों श्रोतयालागीनि । थोर थोर वदों वचनीं । जितुकें ठाउक. ॥ ५५ ॥ पूर्वदिशाधीश सहस्रनयनु । हाटकवर्ण तयाची तनु । पीतरंग वज्र करीं धरूनु । ऐरावतारूढ आला. ॥ ५६ ॥ आग्नेय दिशेचा अधिकारी । हुताशनु रक्तवर्ण शरीरीं । शुभ शक्ति घरूनि करीं । मेषा वळघौनि आला. ॥ ५७ ॥ दक्षिण दिशेचा राजा यमु । मेघवर्ण उत्तमोत्तमु । प्रजा दंडितो हस्तीं दंडु श्यामु । महिषारूढ आला. ॥ ५८ ॥ नैऋत्यदिशेचा स्वामी राक्षसपति । धूम्रवर्ण तयाची अंगकांति । व्योमवर्ण खड्ग हस्तीं । नरारूढ आला. ॥ ५९ ॥ पश्चिम दिशेचा जो ईशु । वरुण कांती जैसा शुभ्रांशु । जळपति विद्युवर्ण करीं पाशु । मकरावरी बैसला. ॥ ६० ॥ वायव्यदिशेचा पवनु । नीळवर्ण जयाची तनु । रक्तरंग अंकुश हस्तीं मृगवाहनु । प्राणाधिपति आला. ॥ ६१ ॥ उत्तरदिशेचा स्वामी शशांकु । जो अमृतशरीरीं शस्त्र अधिकु । गदा नीळवर्ण करीं तारानायकु । अश्वारूढ आला. ॥ ६२ ॥ ईशान्यदिशेचा राजा ईशान । कर्पूरगौर त्रिलोचन । अग्निवर्ण शूळ हस्तीं वळघौन । वृषभावरी आला. ॥ ६३ ॥ सारिसाचीं गणाचा मध्यभारीं । गणेशु जैसा सिंदुराचा गिरी । फरशू पाशांकुश कमळकरीं । मूषकारूढ आला. ॥ ६४ ॥ बृहस्पति देवगुरु गौरवर्ण । शुक्राचा स्पर्धी विद्यापूर्ण । वळसिंधु अश्व श्यामकर्ण । रथावरी बैसौनि आला. ॥ ६५ ॥ अंगिरा रूढ विमानीं । सर्वांपुढें उतरला मेदिनीं । सूर्य आला रथारूढ होऊनी । तेजोराशी. ॥ ६६ ॥ सत्यलोकींहूनि ब्रह्मा । सृष्टिकर्ता ज्याचा थोर महिमा । आरूढौनि हंसोत्तमा । तोही आला. ॥ ६७ ॥ असो, ऐशा सुरवरांच्या कोटी । उतरलिया भूतळवटीं । समीप श्रीरामु देखिला दृष्टीं । कोणें कैसा कैसा भाइका. ॥ ६८ ॥ इंद्रादिकांसी यथार्थ मानलें । हा सपूर्णहृदय आपुलें । ब्रह्मयासी ऐसें गमलें । हा जनकु आपुला. ॥ ६९ ॥ सुरांसी ऐसा भासला । हा पूर्ण कैवारी आपुला । सुरांगनीं देखिला । केवळ मदनमूर्ति. ॥ ७० ॥ मुनि भाविती आराध्य तो हा एकु । सूर्यासी दिसे कुळबाळकु । आणिक समस्त जितुका त्रैलोकु । त्यांसी वाटे आत्मा आमुचा. ॥ ७१ ॥ ऐसा तमालनीळ सावळा ।

॥ ३४ ॥ असो ऐसा सरला उभयवादु । जैसा नृत्याती गिरे नादु । कौलग्रसिद्धी आलेया सादु । समे सावधानाचा ॥ ३५ ॥ पुनरपि सीता उल्हासे । बोले हनुमंतासी ऐसें । 'म्हणे जें जें चिंतिलें होतें मानसें । तें सर्व सिद्धी गेलें. ॥ ३६ ॥ अगा हनुमंता स्नेहाळा । रामचरण मी डोळा । कैधवा देखेन उतावेळा । मनु जाला माझा. ॥ ३७ ॥ रघुप्रमुखींहूनी मासोळी । गळाली ते रिगावया जळीं । अति उत्कंठित तैसी इये काळीं । मी जालियें कपि." ॥ ३८ ॥ ऐसें कपि परिसौनि वैसला ठायीं । तेसाची उठोनि माथा सीतेच्या पायीं । ठेऊनि म्हणे "माते इयेचि समयीं । मी पाचारावया येतों." ॥ ३९ ॥ ऐसें हनुमंतु बोलिले वाचा । तव सद्‌दीत कंठू जाला सीतेचा । पुनरपि शब्दें सुख देऊनि वायुचा । पुत्र ते गौनि गेला ॥४०॥ मन धावे ऐसिया त्वरा । राघवापासीं आला एकसरा । नमस्कार करूनि मनोहरा । मातु सीतेचिया वदला ॥ ४१ ॥ अमृताचीं फळें । ऐसीं वचनें रसाळें । हनुमंतें बोलिलेया आगळें । सुख रामासी वाटलें ॥ ४२ ॥ जिये सीतेनिमित्त रघुनंदनें । घोरें पाहिलीं अरण्यवनें । भ्रमें करूनि आलिंगनें । पादपासीं दीधलीं ॥ ४३ ॥ साह्य केलें कपि ऋक्षगण । समुद्रीं तारिले पाषाण । वधिले रावण कुंभकर्ण, । त्रैलोक्यपीडक जे. ॥ ४४ ॥ ऐसी ते सीता निरंतर । अवनीचें गर्भरत्न साचार । ते सर्वेश मनाचें मंदिर । करूनि वैसविलें. ॥ ४५ ॥ तियेचे अंतरींचा आभिप्रावो । दूतमुखें जाणौनि मावो । हनुमंतासी देवाधिदेवो । सांगता जाला ॥ ४६ ॥ म्हणे "आइक गा वायुनंदना, । गुणालया बुद्धिसंपन्ना । शीघ्र जावें अशोकवना । जानकी आणावया ॥ ४७ ॥ प्रथम बिभीषणासी भेटावें । मातिनें आज्ञासी निवेदावें । सीतेसि करूनि करावें । मंगलस्नाना आधीं. ॥ ४८ ॥ दिव्याभिरें अलंकार । दिव्य सुगंधमनोहर । दिव्यरूप तियेचें सुंदर । इहीं मंडित कीजे ॥ ४९ ॥ ऐसा भक्तजनभवभंगु । मेदिनीगर्भरत्न रंगु । सीता आणविली तो प्रसंगु । सुरवरीं पाहिला. ॥ ५० ॥ रामा सीते होईल भेटी । तो समारंभु पाहावया दृष्टी । मिळौनि उतरले भूतव्यष्टी । लंकाप्रदेशीं ते ॥ ५१ ॥ इंद्रादिक वसूचे अष्टक । एकादश रुद्र द्वादशार्क । साध्य विश्वदेव सकळीक । मरुद्गण पितृगण ॥ ५२ ॥ हाहा हूहू गधर्वादिक । कुबेर मुख्य यक्ष सकळिक । किंनर की पुरु

आणिक । विद्याधर पैं. ॥ ५३ ॥ अप्सरांनृत्यका रंभादिकरांनी । शिवपुरी सत्यलोकापासूनी । समभारें उतरले मेदिनी, । चरित्र पहावया. ॥ ५४ ॥ आरूढ कोण कोणा वाहनीं । काहींएक सांगों श्रोतयांलागीनि । थोर थोर वदों वचनीं । जितुकें ठाउक. ॥ ५५ ॥ पूर्वदिशाधीश सहस्रनयनु । हाटकवर्ण तयाची तनु । पीतरंग वज्र करीं धरूनु । ऐरावतारूढ आला. ॥ ५६ ॥ आग्नेय दिशेचा अधिकारी । हुताशनु रक्तवर्ण शरीरीं । शुभ शक्ति धरूनि करीं । मेषा वळघौनि आला. ॥ ५७ ॥ दक्षिण दिशेचा राजा यमु । मेघवर्ण उत्तमोत्तमु । प्रजा दंडितो हस्तीं दंडु श्यामु । महिषारूढ आला. ॥ ५८ ॥ नैऋत्यदिशेचा स्वामी राक्षसपति । धूम्रवर्ण तयाची अंगकांति । व्योमवर्ण खड्ग हस्तीं । नरारूढ आला. ॥ ५९ ॥ पश्चिम दिशेचा जो ईशु । वरुण कांती जैसा शुभ्रांशु । जळपति विजुवर्ण करीं पाशु । मकरावरी बैसला. ॥ ६० ॥ वायव्यदिशेचा पवनु । नीळवर्ण जयाची तनु । रक्तरंग अंकुश हस्तीं मृगवाहनु । प्राणाधिपति आला. ॥ ६१ ॥ उत्तरदिशेचा स्वामी शशांकु । जो अमृतशरीरीं शुभ्र अधिकु । गदा नीळवर्ण करीं तारानायकु । अश्वारूढ आला. ॥ ६२ ॥ ईशान्यदिशेचा राजा ईशान । कर्पूरगौर त्रिलोचन । अग्निवर्ण शूळ हस्तीं बळवान । वृषभावरी आला. ॥ ६३ ॥ सरिसाची गणांचा मध्यभारीं । गणेशु जैसा सिंदुराचा गिरी । परशू पाशांकुश कमळकरीं । मूषकारूढ आला. ॥ ६४ ॥ बृहस्पति देवगुरु गौरवर्णु । शुक्राचा स्पर्धी विद्यापूर्णु । बळसिंधु अश्व श्यामकर्णु । त्यावरी बैसौनि आला. ॥ ६५ ॥ अंगिरा रूढ विमानीं । सर्वांपुढें उतरला मेदिनीं । सूर्य आला रथारूढ होऊनी । तेजोराशी. ॥ ६६ ॥ सत्यलोकींहूनि ब्रह्मा । सृष्टिकर्ता ज्याचा थोर महिमा । आरूढौनि हंसोत्तमा । तोही आला. ॥ ६७ ॥ असो, ऐसा सुरवरांच्या कोटी । उतरलिया भूतळवटीं । समीप श्रीरामु देखिला दृष्टी । कोणें कैसा कैसा आइका. ॥ ६८ ॥ शंकरासी यथार्थ मानलें । हा सपूर्णहृदय आपुलें । ब्रह्मयासी ऐसें गमलें । हा जनकु आपुला. ॥ ६९ ॥ सुरांसी ऐसा भासला । हा पूर्ण कैवारी आपुला । सुरांगनीं देखिला । केवळ मदनमूर्ति. ॥ ७० ॥ मुनि मानिती आराध्य तो हा एकु । सूर्यासी दिसे कुळबाळकु । आणिक समस्त जितुका त्रैलोकु । त्यासी वाटे आत्मा आमुचा. ॥ ७१ ॥ ऐसा तमाळनीळ सावळा ।

देवीं देखिला डोळां । मग आलिंगनाचा सोहळा । अनुक्रमें आरंभला. ॥ ७२ ॥ सुरवरांच्या भारापुढें । असिजे देवें वृषभारूढें । ज्याचिये मायेनें एव्हडें । ब्रह्मपानें ब्रह्मांड केलें. ॥ ७३ ॥ त्या शिवासी सन्मुख देखौनी । श्रीरामु शीघ्र आसनाहूनी । भेटावया उठिला मनीं । आनंदु उचंबळतु. ॥ ७४ ॥ प्रेमाचेनि पडिभरें वेगें । पदें दहा भूमंडल मार्गे । सांडूनि शिवासन्मुखें सीतारंगें । हास्यमुख एणें केलें. ॥ ७५ ॥ नमस्कार हरासी निगुतां करीं । तंव शिरिं श्रीरामु वरिच्यावरी । धरूनि आलिंगिला तिये अवसरीं । दहा भुजा केलिया. ॥ ७६ ॥ रूप श्रीरामाचें सांवळें । हृदयीं धरिलें पयफेनधवळें । जैसें अमृतमयमंडळें । मृगचिन्ह धरिलें. ॥ ७७ ॥ शोभती दुग्धार्णव आणि वैकुंठ । कां जीमूती आणि धवळपीठ । तैसे रघुनाथु आणि नीळकंठ । आलिंगनीं शोभले. ॥ ७८ ॥ ते दोघे एकचि भिन्नता नाहीं । भिन्नमार्गीं भक्त भाविती भिन्नदेहीं । जे द्वैतनदीचा प्रवाहीं । पडले असती. ॥ ७९ ॥ या दोघां नास्ति भेदु । ऐसी साक्षी वदे वेदु । चिदानंदु ब्रह्म मूळकंदु । तयाचे कोंभ हे. ॥ ८० ॥ हृदय होय एक एकाचें । तेथें वेगळेपण उरेल कैचें? । वदणें ब्रह्मकर्म आघ-मार्चे । काळनेमें उच्चारिजे. ॥ ८१ ॥ कार्ययोगाचेनि कौतुकें । भेदु दाखविजे कारणें एकें । जैसें घटद्वयीं उदकीं शशांकें । बिंबिजे दोहींमध्यें. ॥ ८२ ॥ तैसें एक ब्रह्म विस्तारिलें । मूर्तिद्वय आकारिलें । ते हे हरिहर विश्व बोधिलें । आपुलिया लीळा. ॥ ८३ ॥ ऐसे हे इच्छावतार । एक होत भिन्नशरीर । धरूनि चरित्रें अपार । विश्वासी दाखविती. ॥ ८४ ॥ जैसिया एका तरूचां मुळीं । विस्तारिलिया दोन्ही डाहाळी । परि तो एकुचि वृक्षु भूमंडळीं । भेदु बोलतां नये. ॥ ८५ ॥ नदीजळ वाहे पुरीं पाटीं । तें दों ठायीं जालें गर्भवेटीं । परि तें भिन्न जळ नव्हे शेवटीं । नदी एकीचीं सर्वथा. ॥ ८६ ॥ ऐसे ते दोघे निगराम । देवाधिदेव सर्वोत्तम । परस्परें परम प्रेम । क्षेमालिंगनें जाली. ॥ ८७ ॥ पाउलीं चतुरंगीं । जनकु माता म्हणौनि येणें मार्गे । आलिंगना रिघाला सर्वे । दचकिले बाहू. ॥ ८८ ॥ कमळनाभीं कमळोद्भवातें । आलिंगुनि ठेला स्नेहें बहुतें । विमर्ध तरी पूर्ण रंगातें । स्मरण जालें तिये समयीं. ॥ ८९ ॥ थरारले अपाय भेटे तें आलिंगिलें सोडावें न वटे । पुत्रपुत्रापरिस न

चढे मोटें । जरी जाला असानंदु. ॥ ९० ॥ आपण तोचि पुत्र नाहीं भेदु । आत्मा वै पुत्रनामासि हा वेदु । धर्मशास्त्राचा अर्थवादु । पुत्रकर्में नित्य स्वर्ग. ॥ ९१ ॥ असो ऐसा तो ब्रह्मा । सृष्टी ज्याची करणी महामहिमा । तो आलिंगन देऊनि श्रीरामा । वेगळा जाला. ॥ ९२ ॥ सर्वेंचि त्याचेनि पृष्ठिलगें । असिजे इंद्रें भक्तिरंगें । तेणें नमस्कार प्रसंगें । साष्टांग घातले. ॥ ९३ ॥ दंड्र पृथ्वीवरी पडे कनकाचा । तैसा देहो सुरपतीचा । हें देखौनि श्रीरामु वदे वाचा । "उठीं उठीं त्रिदशेश्वरा." ॥ ९४ ॥ ऐसें परिसतांचि वृत्रारी । उठिला तो राघवें धरिला करीं । आलिंगन दिधलें याउपरी । क्रमेंचि लोकपाळां. ॥ ९५ ॥ ऐसा समस्तां सुरवरां । भेटला अनादि सोइरा । आनंदें ब्रह्मांड भरलें सैरा । कोटी सुरांच्या वसलिया. ॥ ९६ ॥ आतां असो हें इतुकें । हनुमंतासि रघुनायकें । सीता आणूं सांगितली तें कौतुकें । कथन असे पुढें. ॥ ९७ ॥ इति श्रीरामायण ऋषिनिर्मित । युद्धकांड कथामृत । तें पुढें परिसा म्हणोनी विनवित । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ ९८ ॥

---

## प्रसंग त्रेसष्टावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । जानकी आणावयाकारणें । हनुमंतु भास्करवंशभूषणें । पाठविला कार्यें तेणें । श्लाघ्यता पावला. ॥ १ ॥ मार्गी जात वेगें थोरें । सीमा सांडिली सुखसागरें । लंका प्रवेशोनि आदरें । भेटला बिभीषणासी. ॥ २ ॥ ऐसें सन्मान करूनी । हनुमंतु बैसविला सुआसनीं । पुढें कार्यविशेषु मधुरा वचनीं । पुसता जाला. ॥ ३ ॥ म्हणे "अहो हनुमंता येथवरी । आगमन केलें इये अवसरीं । तरी काय आज्ञा ते सांगा शिरीं । मी वंदीन आपुलिये." ॥ ४ ॥ ऐसा बिभीषणबोलाचा आदरू । जाणोनि बोले वानरू । जो बीर्यचातुर्यसागरू । मृगासनसुत. ॥ ५ ॥ म्हणे "परिसा हो लंकेश्वरा । जानकी भेटावयाची रघुवीरा । इच्छा जाली असे त्वरा । न्यावयाची करा तुम्ही. ॥ ६ ॥ जिये हो जानकीकारणें । केवढें रामें केलें करणें । सिंधु

वधन पावला मरणें । वहुसाल गेलें. ॥ ७ ॥ ज्या रावणाचेनि मतें अव्हेरिला-
गोळु । होता तृणापरिस हलु । तो निर्जरेश्वरादि द्वितीय काळु । सकळ
संहारिला. ॥ ८ ॥ कोण गणना करील राक्षसांतें । कोटींच्या कोटी पडिली
प्रेतें । आणि ऋक्ष वानरांचीं शतें । संग्रामीं आटलीं. ॥ ९ ॥ ऐसें बिभी-
षणा झालें विशेष । परी तुज पावलें यश । जें लोकोत्तर निर्दोष । सर्वशा
सुख देतें. ॥ १० ॥ कैलास बांधवसुहृदांचा त्यागु । जाहासी श्रीरामपाद-
पद्मींचा भृंगु । फळला परमपुण्यप्रसंगु । उत्तमोत्तम तुज. ॥ ११ ॥ प्रिय
वस्तूंचें देऊनि बळिदान । साधिजे परम निधान । जैसें केलें ध्रुवान ।
तद्वत राज्यप्राप्ति. ॥ १२ ॥ हें त्रैलोक्य ज्याचिये दंष्ट्रेतळीं । तो मृत्यु
मानसीं वंदी पायधुळी । दुसरा समाप्य तुझिये बोळी । मांडावया न देखें.
॥ १३ ॥ रघुनाथाचा कृपाकटाक्षु । तोचि तुज भेटला कल्पवृक्षु ।
कल्पिलीं फळें भोगीं मोक्षु । मार्गी उणा येणें सुखें. ॥ १४ ॥ रामनाम-
कृपालक्षण वैडूर्य । त्याचें तुझ्या मुकुटीं शोभे सौंदर्य । तेणें दूषणचक्र
नासलें सूर्य । जैसा अंधकार नाशी. ॥ १५ ॥ कीं श्रीरामकृपा हेंचि
तारूं । मृत्यार्णवीं पावलासी तूं लंकेश्वरू । तुझेनि मार्गेंशीं तुळीजा
मेरू । उणा जो सुरालय." ॥ १६ ॥ ऐशी हनुमंताची शब्द-
रचना । परिसोनि बिभीषणाचिया मना । सुख जालें तेणेंसि
न्यूना । तुकितां मुक्ति चतुर्विधा. ॥ १७ ॥ बिभीषणू म्हणे "गा
हनुमंता । महानुभावा गुणवंता । तुझे या शब्दमेघापासूनि सरिता । वाहती
अमृताच्या. ॥ १८ ॥ तूं बोलिलासी जें मजप्रती । तें साचार गा मारुती, ।
परि रघुनाथकृपेची प्राप्ति । होआवया निमित्त. ॥ १९ ॥ तूं जरी होतासी
तैसीं संकटीं । तरी श्रीरामचरणेंसि जाली भेटी । जैसे पायाळाचेनि प्रसंगें
दृष्टि । निधान देखिजे. ॥ २० ॥ कां मुसाफु सागरीं प्रवर्ते । चिंतिलिया
स्थाना निगुतें । तैसें कपिचक्रांतुनि तुवां हनुमंतें । श्रीरामाजवळी नेलें.
॥ २१ ॥ मी श्रीरामाचा दासू निकट । जालों पावलों दुःखसिंधूचा
शेवट । प्राप्त लंकेचा राज्यपट्ट । त्यासि कारण तूंचि. ॥ २२ ॥ तूं जरी
होतासी हनुमंता । तरी लक्ष्मणु जिववितां भागुता । रघुनाथासी भेटेल
सीता । देवांसि स्वर्गप्राप्ति. ॥ २३ ॥ तूं होसी एकादश रुद्र । धैर्य
वीर्याचा समुद्र । तुज संपूर्ण जाणे नरेंद्र । जो देवाधिदेव. ॥ २४ ॥

लोकांमध्यें दिससी वानरू । हा लीलाअवतारू । जैसा मत्स्य कच्छप सुकरू । होये विष्णुइच्छेस्तव. ॥ २५ ॥ कार्याकारणें युगयुगीं । हरिहरें उभयवर्गीं । अवतार धरिजताती जगीं । नानारूपेंकरोनी. ॥ २६ ॥ म्हणोनि गा वानरोत्तमा, । असाधारण तुझा महिमा । तुझें कीर्तन करूं न शके ब्रह्मा । येथें माझी कोण कथा." ॥ २७ ॥ ऐसें बिभीषणोक्त समाधान । परिसोनि प्लवंगमाचें मन । संतोषलें, मग प्रतिवचन । पुनरपि देता जाला. ॥ २८ ॥ म्हणे "पौलस्तिकुलदीपका । तूं वैष्णव तूं परम साधु निका । शास्त्रोक्त बोलसी धार्मिका । महंतमतिमार्गें. ॥ २९ ॥ अगा ये तुझां सुशब्दीं । वाहे सुधारसाची नदी । निमित्त हेंचि जें चित्त चरणारविंदीं । तुवां श्रीरामाचे ठेविलें. ॥ ३० ॥ न घटे उठावें तुजपासोनी । परी मांडलें कार्य मूर्ध्नी । आजि जानकी श्रीराम लोचनीं । पाहतील परस्परें. ॥ ३१ ॥ आज्ञा दिधली तमालनीळें । जें सीतेसी आणावें शीघ्रकाळें । मंगलमयवंत वेगळें । करुनी पूर्वाभरणें. ॥ ३२ ॥ राक्षसेश्वरा साचार । जानकीचें रजमंडित शरीर । जालें आणि कंचुकी चीर । मळलें बहुसाळ. ॥ ३३ ॥ जे त्रिकाळ उत्तमें वस्त्रें । परिधान करी चित्रविचित्रें । ते आणिलेयावरी दशवक्त्रें । पालटू जालाचि नाहीं. ॥ ३४ ॥ जिये नित्यु मंगलाभ्यंगु करितां । तें सुगंधोदक भूमंडळीं वाहतां । समस्तांचिया घ्राणेंद्रियदेवता । तिये काळीं नाचती मोजें. ॥ ३५ ॥ परिस गा ये बिभीषणा । राम विंधों गेला हेमहरिणा । तेथोनि मंगलस्नान त्या सुलक्षणा । अनुभविलें नाहीं. ॥ ३६ ॥ जलरहित सुमनवल्ली । सुकट दिसे संकोचली । तैसी जानकी मळें गादिली । कृश सर्वांग जालें." ॥ ३७ ॥ ऐसें हनुमंताचें बोलणें । परिसिलें मर्कें बिभीषणें । उभे रोमांच राहिले अष्टकोणें । चक्षुद्वय स्रवलें. ॥ ३८ ॥ अति खेदु वाटिला तिये संधीं । मग म्हणे "अहा रावणा दुर्बुद्धि । महा अन्योन्य करुनि युद्धीं । सर्वांशीं बुडलासी." ॥ ३९ ॥ ऐसें बोलोनि बिभीषणें । मग म्हणे भृत्यांकारणें । "घ्या रे पुष्प तैल उटणें । जवादि मृगनाभीचें. ॥ ४० ॥ आणिक सुगंध कुंकुम केशर । अमोल्य कंचुकी अंबर । उत्तमोत्तम अलंकार । ते शीघ्र काढोनि घ्या हो. ॥ ४१ ॥ वृद्धा कुशला राक्षसिणी । आमुच्या मानिलिया बहिणी । सर्वदा ज्यांच्या अंतःकरणीं । कल्याण जानकीचें. ॥ ४२ ॥

तिहीं आपुला हस्तीं । मंगळस्नान वरानिया रीतीं । करोनि पूज्या त्रिगुणवती । जामदग्न्यजितजाया. ॥ ४३ ॥ कंदर्पाची ते कुळदेवी । ऐसी सीता शृंगारावी । या कृत्यासी सत्या लावावी । एका मुहूर्ताची." ॥ ४४ ॥ ऐशी राजाज्ञा होतक्षणीं । धाविन्नले त्वरा वेत्रपाणी । तिहीं मंगळस्नान सामुग्री आणी । अंगना बोलाविलीया. ॥ ४५ ॥ अन्यत आनंदु त्याच्या अंतःकरणीं । घेऊनि निघाल्या सक्षणाणी । जैशा मिळत वन्हाडिणी । वधूमंडपा जाता. ॥ ४६ ॥ पुढें वाजती मंगळतुरें । नाना ध्वनींचीं सुस्वरें । अशोकवाटिके ऐसेनि गजरें । जानकीजवळी आले. ॥ ४७ ॥ मारुती पौलस्ती उभयवर्गी । परस्परें क्रमिले मार्गी । जैसे चालिजे सरिसें स्वर्गी । सुरेश आणि सुरगुरु. ॥ ४८ ॥ आले दोघे जानकीजवळी । पुढें सन्मुख होऊनि भूमंडळीं । हेमदंडवत् नमस्कार वहाजळीं । करोनि उभे राहिले. ॥ ४९ ॥ पुढें जानकी-प्रती जोडोनि पाणी । बोले हनुमंत सुधारसवाणी । म्हणे "परिस माते स्वामिणी । सेवकाची विज्ञापना. ॥ ५० ॥ पुरुषचक्रवैडूर्य । भुवनत्रयीं भिन्ने ज्याचें सौंदर्य । तेणें अंगिकारिलें ब्रह्मचर्य । हेममृगवधा, पासोनी. ॥ ५१ ॥ तरी माते, तुझेनि योगें । बहु खेद केला भक्तमवर्गे । ते अनिर्वाच्य मनोवृत्तिरंगें । परस्परें जाणा तुम्ही. ॥ ५२ ॥ तरी येणें प्रसंगें कार्य जितुकें । सिद्धी नेलें नरनायकें । आतां परमानंदकौतुकें । तुम्हा भेटी बोलाविलें. ॥ ५३ ॥ मन रामाचें अमळ आरिसा । तेथें प्रति-बिंबला तव रूपठसा । तो काहीं न चळे सुवर्णी जैसा । जडिला रमणीय मणि. ॥ ५४ ॥ चकोर सध्याकाळीं शुक्रपक्षी । डोळ्या चंद्र ईक्षी । तैसा तुझा मार्गू रमय चक्षीं । पहात् कृपासिंधु. ॥ ५५ ॥ पार्वतीचा प्राणवल्लभू । जो कैलासराजा शिवशंभू । तो पहावया आला समारंभू । तुमचिये भेटीचा. ॥५६॥ सकळ सुरवर इंद्रादिक । विरंची आणि ऋषी सकळिक । तू श्रीरामा भेटसी हें कौतुक । पहावया आले. ॥५७॥ आम्हां रघुरा-तीची आज्ञा ऐशी । ज शीघ्र आणावें सीतेसी । तरी आतां माये चालिजे, मानसीं संदेहो न धरीं." ॥ ५८ ॥ ऐसें सन्मुख हनुमत् बोले । ऐकोनि सीतेसि सुखाश्रु आले । चित्त आनंदें उचंबळोनि राहिलें । रोमांच उभे अंगीं. ॥ ५९ ॥ तंव तेथे समयीं त्रिभीषणें । उत्तरें ओपिलीं सीतेकारणें ।

म्हणे "माये तुज हरिलें रावणें । हें उत्तमोत्तम जाहलें." ॥ ६० ॥ म्हणे "मासे बोलिलों हा शब्दु । दिसे प्रकट निंदावादु । परि याचा तूं न मानावा खेदु ॥ चतुर ज्ञानगंगे. ॥ ६१ ॥ तुज हरिलें रावणें । हें बोलिलों याचि कारणें । जें बहुतांचें कार्य निमित्तें येणें । सिद्धी गेलें शुभानने. ॥ ६२ ॥ जनस्थानीं गोदातटाकीं । गुंफे होतीसि तूं जानकी । राम मृगवधा गेलिया एकाकीं । रावणें हरण केलें. ॥ ६३ ॥ रावणें तुज आणिलें कपटबुद्धी । हें असत्य वो माये त्रिशुद्धी । किमर्थ म्हणसी तरी सिद्धी । पुरा कृत गेलें पाहिजे. ॥ ६४ ॥ परी ते वो रावणकुंभकर्ण । असुर नव्हती परमेश्वरगण । वैकुंठवासी दोघे जण । जय विजय नामें यांसीं. ॥ ६५ ॥ महाविष्णूचें महाद्वार । तेथें हे दोघे निरंतर । चतुर्भुज वेत्रपाणी अनुकार । देवाचा यांच्या देहीं. ॥ ६६ ॥ कोणे एके अवसरीं । महानुभावी सनत्कुमारी । विष्णुदर्शनार्थ पुरीं । वैकुंठ प्रवेशले. ॥ ६७ ॥ आले महाद्वाराजवळीं । अंतर्गृह प्रवेशतेकाळीं । जय विजय द्वारपाळीं । वेत्र आड घातलें. ॥ ६८ ॥ मुखवचनें चतुर्वर्गा । म्हणती 'प्रवेशों नका स्थिर रहा गा । अनवसरू रमारंगा । आहे इये समयीं.' ॥ ६९ ॥ ऐसें द्वारपाळांचें उत्तर । परिसोनि कोपले सनत्कुमार । शापिते जाले विप्र । साहिती गरळा. ॥ ७० ॥ म्हणती 'रे चांडाळ हो परियेसा । तुम्हांसी वैकुंठीं निवासु कायसा । शीघ्र जावें गर्भवासा । तामस देहें धरा.' ॥ ७१ ॥ ऐसा शापू ऐकतां दोघी जणीं । अति भय धरिलें अंतःकरणीं । अनंतशयन चक्रपाणी । तया शरण गेले. ॥ ७२ ॥ म्हणती 'स्वामी तुझें द्वार । रक्षितसों निरंतर । अपराधेंविण सनत्कुमार । आम्हां शापूनि जाताती.' ॥ ७३ ॥ ऐसें परिसतांची उत्तर । विष्णु येऊनि निरंतर । करीं धरोनि मनोहर । कुमारांचें केलें. ॥ ७४ ॥ कुमारशापासि देऊनि मानू । जयविजयाप्रती जनार्दनू । बोलता जाला प्रीति करोनू । पुत्रासी पिता जैसा. ॥ ७५ ॥ म्हणे 'निजदास हो तुम्ही । मदर्थे प्रवर्ताल सत्कर्मी । तरी शाप संडेल सप्तजन्मीं । पावाल मज. ॥ ७६ ॥ जरी विरोधाल उग्र कर्में । तरी भोगाल तिनीचि जन्में । पुढें माझेनि समागमें । पूर्वस्थिती असाल.' ॥ ७७ ॥ ऐसें सर्वेश्वरू बोले । येर तत्काळ च्यवले । दितीच्या उदरीं जन्मले । ते हिरण्याक्ष हिरण्यकश्यप. ॥ ७८ ॥ बळें त्रैलोक्य

जिंतिलें तिहीं । हिरण्याक्षें चोरिली मही । तो वराहअवतारें दैत्यदेही । वधिला देवें. ॥ ७९ ॥ दुसरा नामें हिरण्यकश्यपु । सुरदर्पघ्न पुत्राचा रिपु । तो वधिला धरोनि नृसिंहवपु । स्तंभीं उद्भवोनी. ॥ ८० ॥ त्याउपरी जानकीये, जाण । दुसरेनि जन्में दोघेजण । तेचि हे रावण कुंभकर्ण । पुत्र विश्रवसेयाचे. ॥ ८१ ॥ तामस तप केलें रावणें । शिरें समर्पिलीं शिवाकारणें । पुढें ईश्वररूपें तंव येणें । त्रैलोक्य तृण केलें. ॥ ८२ ॥ वीर्यें कृतांतासी नाकळे । सकल सुर घातले बंदिशाळे । मग सर्व देवें तियें काळें । सर्वेशा शरण गेले. ॥ ८३ ॥ पुढें कृपार्णव तो सर्वेश्वरू । धरिला सप्रेम रामअवतारू । तो हा जानकीये, तुझा भ्रतारू । सूर्यवंशीं दाशरथी. ॥ ८४ ॥ या येथे राघवाच्या बाणीं । रावण कुंभकर्ण पडले रणीं । हे पुढें होतील भविष्यवाणी । शिशुपाळ दंतवक्र. ॥ ८५ ॥ होईल कृष्णावतार प्रसिद्ध । त्यासी हे करिती विरोध । मग भगवंतु त्यांचा वध । करील असंशयें. ॥ ८६ ॥ मग त्यांचें सुटेल जन्ममरण । वैकुंठीं राहतील दोघे जण । पूर्वींचु द्वारपाळ विष्णुगण । जय विजय होतील. ॥ ८७ ॥ ऐसें त्यांचें चरित्र सीते जाण । यानिमित्त भगवंतावतरण । येणें कारणें पडलें कार्याकारण । भक्तधर्मसंरक्षणा. ॥ ८८ ॥ तूं तरी माये जाणसी एवढें । मी अज्ञान कथितों तुजपुढें । जैसें सारस्वतीप्रती मूढें । उपन्यास करिजे. ॥ ८९ ॥ अंतर्गृहाची ठेवणी । स्वामीची जाणे गृहस्वामिणी । ते महाद्वारींच्या रक्षणीं । सांगिजे किती. ॥ ९० ॥ भूत भविष्य वर्तमान । महानुभावांसी त्रिकाळज्ञान । त्यांचेनि मुखें हें कथासंधान । जाणितलें असे. ॥ ९१ ॥ तुज रावणें आणिलें परमार्थें । येथें विपरीत लौकिक वचनें व्यर्थें । हें अवतारचरित्र कथापर्थे । जग परिसोनि मार्वी. ॥ ९२ ॥ सहस्रवदन भागीरथी । माइल मशकांच्या मुखवर्ती । पद्‌पद्‌ पृथ्वी करोनि पाउथीं । कूर्मतळीं दाटेल. ॥ ९३ ॥ कल्पांतविजूचा मार्गु । विघंतुनि जय पावेल पतंगु । गिरनेत्राग्निग्याळा अनंगु । पूर्वाभिमानें मासील. ॥ ९४ ॥ ऐसेंही जरी घडों शके । परी तुझें हरण न घडे जानके । रावणें सचावलें आणिलें लंके । हें मिथ्या माये. ॥ ९५ ॥ तूं महामाया आदिशक्ति । अनंतब्रह्मांडाची कीर्ति । परमेश्वरलीळे तव व्यक्ती । कार्याकारणदेही. ॥ ९६ ॥ माते, तुझा अपार महिमा ।

धर्णू न शके सर्वादिब्रह्मा । तेथ मी कोण कीटक सीमा । पावेन तव स्तुसंदीची? ॥ ९७ ॥ आदय बोलतों मी अचतुर। होत व्यवधानपसरु। तुज पहावया रघुवीरु। आहे उत्कंठित अति. ॥ ९८ ॥ उशीरु जाला म्हणौनि बहुत । न बोलें परि न पुरे आर्त । जैसें मातेचें कार्य नेणतां अपत्य । बोबड्या बोलीं गोंवी. ॥ ९९ ॥ तैसा मी आजि मैथिलि, युक्तायुक्त बोलतों जवळी । धणी न बाणे माझी वचनवोळी । घालितों तुजपुढें. ॥ १०० ॥ माझेया नेत्रांतील पुतळिका । तुझ्या पायीं जडल्या जैशा पादुका । तुझेनि प्रसादें रघुनायका । म्यां देखिलें डोळां. ॥ १ ॥ दिव्यचक्षीं योगीश्वर । रूप लक्षिती अलक्ष साचार । तें म्यां कोटिकंदर्पसुंदर । देखिलें चर्मचक्षीं. ॥ २ ॥ आणि कांहीं लाभू जाला देवि, । जैं रामें शोभिली तुझी पदवी । जैसें मथन जाहेया क्षीरार्णवीं । कितीएकां रत्नें लाधलीं ॥ ३ ॥ स्वामी श्रीरामु जोडला हनुमंता। राज्य तारा आली सुग्रीवाचे हातां।·संपाती सपक्ष मागुता। जाला शुद्धि सांगता तुझी. ॥४॥ समुद्र तरोनि वानरीं । दृष्टीं देखिली लंकापुरी । जयविजगांचीं जन्में दुसरीं । खंडोनि गेलीं. ॥ ५ ॥ तुटलें त्रिदशाचें बंधन । मी चिरंजीवी पावलों राज्यासन । आनंदें भरलें त्रिभुवन । हा प्रसादु तुझा माते!" ॥ ६ ॥ ऐसें विभीषण बोलतां । आनंदें उचंबळली सीता। मग म्हणे "गा गुणवंता। परमवैष्णवा! ॥ ७ ॥ विभीषणा, तुझिये बुद्धी। सर्व कार्य गेलें सिद्धी । जैसें सुवायुप्रसंगें जळनिधीं । तारूं तरोनि येत. ॥ ८ ॥ मेघवृष्टीचा पुरावा पावे। तरी नदीपूर समुद्रा धांवे। इंद्रें गिरिपक्ष छेदिले अवघे। जैं वज्र हस्तीं होतें. ॥ ९ ॥ म्हणोनि विभीषणा, सर्वथा। देवदर्पहरण मुक्तिपंथा। पाठवोनि जयो जाला रघुनाथा । त्यासी कारण सख्य तुझें. ॥ १०॥ रवु उदयाद्रिवरी आणी अरुणु । तरी तम नाशी सूर्यनारायणू। तैसा तुवां निकुंबळेसि नेला लक्ष्मणू । तरी इंद्रजितु वधिला. ॥ ११ ॥ ऐसे तुझे समर्थ उपकार । रघुनाथासी घडले थोर। ते तव न फिटती साचार। सर्वथा संकल्पिलें. ॥१२॥ तुज रावणाच्या ठायीं रुची। जैशी भृंगाप्रती पत्राची । कां मनोवृत्ति वत्साची। धेनूच्या स्तनागीं. ॥ १३ ॥ सिंधूसी रत्नगर्भ न कळे । परि जाणती मधील मीन विरळे। तैसी तुम्हां भक्तांसि कळे । परमेशाची स्वरूपस्थिति." ॥ १४ ॥ ऐसें बोले

जनकात्मजा । गौरव दिधलें शत्रारिपितृअनुजा । तेणें त्यांनिये मनोदेवांचि गुजा । सहस्रेका निगालिया. ॥ १५ ॥ असो आतां हा शब्दपसरू । जाला कांहींएक सर्वीरू । वाट पहातसे रघुवीरू । यत्नमु वैदेहीचा. ॥ १६ ॥ येणें स्तुतिवादप्रसंगें । कथासंधान अनुसंधिलें मागें । जैसें रंगीं समेचेनि त्यागें । नृत्यकळा थिरावे. ॥ १७ ॥ कां जळक्रीडारंभीं नदीपोटीं । घातल्या वळणाच्या सांघाटी । तेथें जळ तुंबळे उभयतटीं । प्रवाह फुटला पुढें. ॥ १८ ॥ म्हणोनि वाग्जाळमडताळें । कथामार्गी रहित फरशाळें । तें आतां सांवरूं इये वेळे । सत्यार्थाचि वर्दी. ॥ १९ ॥ परि ऐसेंही असे एक । हें अवघें बोलाचेंचि कौतुक । जेणें संतोषती समानायक । तेंही बोलिलें पाहिजे. ॥ २० ॥ न बोलिजे येणें सभा मिटे । कथारसु कडवटोनि तुटे । तरि हेंचि बोलावें जे प्रश्निकां वाटे । वोलों हा पुनः पुन्हा. ॥ २१ ॥ असो इति श्रीरामायणी । कथा वाल्मीकोक्त भवतारिणी । ते पुढें परिसावी विचक्षणीं । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ २२ ॥

---

## प्रसंग चौसष्टावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । परिसा कथा हे गोमटी । रामा सीते झाली भेटी । पाहिली सुरवानरीं दृष्टीं । भरली सृष्टी आनंदें. ॥ १ ॥ विर्माणगु जोडला हस्तीं । बोलता झाला जानकीप्रती । भक्तजनाची मुची युक्ती । तिये सन्मुख कटु जैसा. ॥ २ ॥ म्हणे "मंगळरूपे स्वामिनि । मंगळमूर्तीचिये गृहवासिनि । मंगळाचिये वहिणी । मंगळस्नान करीं आतां ॥ ३ ॥ भोगिला बहु प्रवास । फडत्रीसी बहु दिवस । बहु कठिण गेले निमिष । वर्षाचेनि मानें. ॥ ४ ॥ मूर्ख रावणें तुझी बोली । दासविरया साक्षी धर्मगळा । तें तुज वाटलें तैसी वेळा । न घडी तव वारियानें. ॥ ५ ॥ दुष्टाहि तो जिंकिली । तिये निरसली ज्या जानकि, । जैसी पुष्कळकाकळें पूर्णाचकी । वाहान गेली. ॥ ६ ॥ कां दुष्ट स्वर्गीची मूत्रावळी । अमृती घातली पाताळीं । तैसी रावणघातीं वो मैथिलि, । सर्वांहि गेली. ॥ ७ ॥ आणि अमृताचा दितु । तुज भेटल रघु,

नंदनु । ज्यासी पार्वती, पंचाननु । नित्य स्मरताती. ॥ ८ ॥ खंडला पूर्व भोगप्रसंगु । आतां कीजे मंगळाम्यंगु । घरिलीं कंचुकी, चीर त्यांचा त्यागु । करूनि उत्तम घ्यावें." ॥ ९ ॥ ऐसें बोलिलें बिभीषणें । सीता उत्तर दे त्याकारणें । म्हणे "मंगळस्नान रामलक्ष्मणें । न करितां म्यां कैसें कीजे? ॥ १० ॥ हा नव्हे पतिव्रतांचा धर्मु । पतिरहित उपभोगु उत्तमु । सर्वथा न घडे, आज्ञानेमु । मगों नेदावा हो." ॥ ११ ॥ ऐसें बोलिली मैथिली । परिसोनि कपि तये काळीं । उत्तर दे, म्हणे "जनकाकुळीं । धन्य तूं दुहिता. ॥ १२ ॥ आणिकी पवित्र होइजे गंगाजळें । ते गंगा केवि भरे परविटाळें । कल्पवल्ली दे कल्पिलीं फळें । ते काये याचक होईल? ॥ १३ ॥ सरस्वती वरद होये गाढें । तरी निवृत्तिशास्त्र वाखाणिजे मूढें । ते शारदा मतिमंदापुढें । काये शब्द शिकों बैसेल? ॥ १४ ॥ म्हणौनिया वो जानकी, । तुझेनि वरदें नारी आणिकी । पतिव्रताधर्मे त्रैलोक्यीं । वंद्य जालिया ॥ १५ ॥ परि तूं वो ज्ञानसरिते । कैसेनि विहित धर्मी चळसी सीते? । हे धर्मदीक्षा मार्गे अनंते । तुजपासोनि जाली. ॥ १६ ॥ परिस पतिव्रते पवित्रे । तुझ्या पतीची आज्ञा सुनेत्रे । जाली ऐसी ते इंदुवक्त्रे, । वेगवत्तर जाणावी. ॥ १७ ॥ प्रथम करावें मंगळस्नान । कंचुकी अंबर नूतन । अलंकार महीमोल्यासमान । समर्पुनी श्रृंगारिजे. ॥ १८ ॥ मार्गीं मिरवत समारंभें । कौतुक पाहेल विश्व उभें । उत्तमासनीं बैसवावें ऐसें वल्लभें । तुझेनि आज्ञापिलें आम्हां. ॥ १९ ॥ ज्याचिये आज्ञेचेनि बळें । वेदकर्मे चालती सकळें । महायाग देताती फळें । स्वर्गभोगादिकांचीं. ॥ २० ॥ ज्याचिये आज्ञे सहस्रकरू । चालवावया सृष्टीचा व्यापारू । मध्ये घालूनि मेरू । सर्वदा भ्रमतसे. ॥ २१ ॥ तिथिपरत्वें मुहूर्तें एकें । अंतरें रंदेजे शशांकें । व्योमदातचक्रीं कटकें । उडुगणांचीं चालती. ॥ २२ ॥ पर्वतांऐशा सिंधु लाटा साडी । परी तो मर्यादा नोलांडी । यथाकाळीं मेघ नवखडीं । वर्षावो करित. ॥ २३ ॥ शेषु सहस्रफणी पाताळीं । घालुनि बैसला वेटाळी । पवडी विशाळ महीतळीं । पुष्पप्राय धरित्री. ॥ २४ ॥ विरिंची प्रपंचु हा घडी । काळदंष्ट्रा देउनि मोडी । ऐसी आज्ञेची पवडी । सर्वा शिरीं वर्ते. ॥ २५ ॥ ऐसी आज्ञा ज्याची समर्थ सीते, । तो तुझा वल्लभु वो गुणवंते । आतां त्याची आज्ञा आहे मातें । मंगळस्नान करणें." ॥ २६ ॥

ऐसें मारुतीं समाधान । केलें अमृतोपम अर्थ गहन । तेणें सीतासंतोष सामावया गगन । थोडें झालें. ॥ २७ ॥ पुनरपि बोले सीता । जैसी अमृतफळें साडी अमृतलता । का पुत्रालागीं स्नेहाळ माता । मिष्टान्नें वाढी ताटीं. ॥ २८ ॥ ऐसियापरि ते मैथिली । मारुती पौलस्तीप्रती तिये काळीं । बोलती जाली मुखकमळीं । सुप्रसन्नता बहु. ॥ २९ ॥ म्हणे, "प्रथमचि पवित्र गंगाजळ । त्यात मिळाले सुपरिमळ । ते अमृतोपम सुशीतळ । का नेघेल तृष्णार्थी ? ॥ ३० ॥ दुहिलें कामधेनुचेया क्षीरा । तें प्राप्त जालेया क्षुधातुरा । प्राशनाचें न ये विचारा । हें कैसें घडेल ? ॥ ३१ ॥ म्हणौनि तैसे उभयवर्ग हो । आज्ञा पतीची, वरी तुमचा स्नेहो, । तरी कां न कीजे साहूनी संदेहो । मगळस्नान आता. " ॥ ३१ ॥ ऐसा वैदेहीचा वाग्विलासु । जैसा सुपात्रीं साडे सुधारसु । तेणें दाही दिशांचा मनोल्हासु । मेरूहूनि मोठा जाला. ॥ ३२ ॥ यानतर उभयवर्गीं । परती केली आळिये मार्गीं । जाऊनि सभे बैसले जैसे स्वर्गीं । शक्रादिक. ॥ ३४ ॥ असो सीतेलागीं राक्षसिणी । देऊनि पदुकुळ पडदणी । रत्नपाटीं बैसउनि अक्षवाणी । आशीर्वादिसीं केली. ॥ ३५ ॥ नवरत्नवाटियेभीतरी । सुगंध तैल उचवळे मुखवरी । तें प्रेमेंसें आपुला करीं । भक्तिभावें घतलें. ॥३६॥ दुउरी निनदा पुशळ निकी । तिया पुष्पेंछ घेउनि हस्तकीं । धारा सोडिलिया सुमस्तकीं । शुभाननेच्या. ॥ ३७ ॥ त समयीं वदे शुभ शब्दु । दिधला ऐसा आशीर्वादु । म्हणे "ब्रह्मावधी करा आनंदु । दंपत्यें तुम्ही." ॥ ३८ ॥ सेवा करिता बोलती स्नेहो । म्हणती "बहु कृश जाला दहो । शीतोष्ण वात याचा प्रवाहो । प्रवासी भोगिला मातें ! ॥ ३९ ॥ अयत सुकुमार तुझी तनु । स्पर्शला नाहीं आंगणीचा पवनु । ते तू हरिणरथापासुनि हा दिनु । पर्यंत वनस्थीं ॥ ४० ॥ जैसी वस्तु समर्थाच्या अतर्गेहीं । तेथ सचरों शकेना वायोही । ते चोरें चोरूनि अरण्यमहीं । माजि गुप्त ठेविजे. ॥ ४१ ॥ तैसी तू परमवस्तु जानकें । समर्थांगना पवनु स्पर्शों न शके । ते तू रावणें आणौनि लंके । विशाळ वनी ठेविलें. ॥ ४२ ॥ ऐसें वनवासी तू वैदेही । त्रियायुद्ध होतसी साक्षी सूर्यमही । आतां कष्ट जाले ते नदीप्रवाही । पडौनि सर्वही गेले." ॥ ४३ ॥ तव प्रत्युत्तर दे चतुर नायका । म्हणे "अंधकारीं साम प्रदीपिका । तैसा तुम्ही

साह्य असतां असिका । कंठिला कठीण काळु." ॥ ४४ ॥ ऐसें सीतेचेनि प्रतिशब्दें । श्रमे त्रिजटेचेया हरुषा दोंदें । निगाली पुढें परमानंदें । अंगसेवा जाणविती. ॥ ४५ ॥ मार्जनें मूर्धी निववीला । कबरीभाराचा जुडा बांधिला । तैलसमवेत गंधकाला केला । तेणें सर्वांग उटिलें. ॥ ४६ ॥ मग पूर्वपाटाचा जाला त्यागु । आणीक बैसणें मांडिला चौरंगु । जो चित्रविचित्र अति चांगु । स्वयभु सुवर्णाचा. ॥ ४७ ॥ पाकु करूनि अमृतफळांचा । माजी मेळावा सुगधाचा । तेणें रसें सीतेच्या मस्तकींचा । तैलमळु काढिला. ॥ ४८ ॥ हाटकाचीं पात्रें विशाळें । तियें पूर्ण भरिलीं जळें । तें कनकफळसें करमेळें । मस्तकावरी घालिती. ॥ ४९ ॥ सर्व संतोषकारक जीवन । तेणें होत वपुमळक्षाळन । ऐसें राजोपचारें मंगळस्नान । जालें जनकात्मजेचें. ॥ ५० ॥ उपरी दिव्यांबर शरमाहस्तकीं । धरूनि परिधान करी जानकी । विचित्र दिव्य कचुकी । ते आंगीं सुनेत्रा लेइली. ॥ ५१ ॥ नवरत्नांचीं चित्रविचित्रें । कर्णी घातलीं ताटंकपत्रें । ज्यांसी मुक्तें हिरे जैसीं नक्षत्रें । गुणगर्भी मिरवती. ॥ ५२ ॥ अंगांगींचीं भूषणें जितुकीं । तियें सहजें सौंदर्यें जानकी । लेउनि जियें दुर्लभें त्रैलोक्यीं । शोभविती जाली. ॥ ५३ ॥ सुवर्णाचे सविस्तर । बोलावे वेगळाले अलंकार । तरी हा आरुप वादु चतुर । चमत्कारू न मनिती. ॥ ५४ ॥ म्हणती जियेचेनि पदागुष्ठप्रसादें । रंकें भोगिती राज्यपदें । त्यांचा अंगनापायीं मदनवांदें । गर्जती हेमरत्नांचीं. ॥५५॥ साधारणा लोकांकारणें । जें सदा सुवर्णाचें लेणें । तरि कासयाचीं सुवर्णाचीं भूषणें । जानकीचीं विस्तारावीं ? ॥ ५६ ॥ परि ऐसेंही बोलता एक । आक्षेपिती चतुरादिक । म्हणती धातूंमध्यें उत्तम कनक । दुसरें बोलावया नाहीं. ॥ ५७ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ लोक । त्यांचेया भूषणासी एकचि कनक । तरी त्या उत्तमाचीं लेणीं आणिक । काइसेयांचीं बोलावीं. ॥ ५८ ॥ श्रोतयाचें आक्षेपणें इतुकें । जाणौनि वक्ता वदे कौतुकें । म्हणे त्रिविधा लोकां एकें कनकें । अलंकार हें तव सत्यची. ॥ ५९ ॥ परी परियेसा तुम्ही चतुर । ऐसें वस्तुसी महदंतर । उत्तमता गुणांची ठायीं साचार । सर्वत्र जाणावी. ॥ ६० ॥ पाषाणजाति हे बहुसाळ । एकासी आहे पृथ्वीचें मोल । एकासी मार्गी जातां पाउल । कोण्ही लावित

नाहीं. ॥ ६१ ॥ एकासी आणिली देउनि कोटी । एकासी नेघती कवडेया-साठीं । म्हणोनि अंतर येची परिपाटी । वस्तुवस्तुसी. ॥ ६२ ॥ म्हणोनि अलंकार गृहीं गृहीं । वनिता मिरविती आपुला देहीं । तैसें ऐणें जानकीचें नाहीं । अंतर महदंतर असे. ॥ ६३ ॥ जरी म्हणाल सीतेचीं भूषणें । कोण कनकाचीं घडिलीं कोणें । जडित रत्नविशेषांचें ठेविणें । त्यांची उत्पत्ति कोठोनि ? ॥ ६४ ॥ तरी परिसा सीतेच्या अलंकारांचें । सुवर्ण मेरुजंबुफळरसाचें । नाम आहे प्रसिद्ध त्याचें । जांबुनद ऐसें. ॥ ६५ ॥ रत्नें म्हणाल कोणे ठायींचीं । तरि पाताळसर्पफणिमंडळींचीं । कुसरी कोण घडणार त्यांची । तरी विश्वकर्मा कर्ता. ॥ ६६ ॥ ज्या रत्नांचेनि तेजेंकरूनि । तेजोराशि जाय हारपोनि । तियें रत्नें जांबुनदीं जडूनि । निर्मिले अलंकार. ॥ ६७ ॥ ते अलंकार जनकात्मजा । आंगीं उत्तमांगीं लेई वोजा । नासाग्रमुक्तामणी देखोनि लाजा । अस्ताचळा शुक्र गेला. ॥ ६८ ॥ एकेका रत्नमणीचेनि पाडें । तुळितां क्षीराब्धीचें मोल्य थोडें । पाहतां ज्याचेनि अंग उजियेडें । गगनावरि गेलें. ॥ ६९ ॥ त्या रत्नमणींचा हारू । गुणगर्भमनोहरू । अत्यंत लावण्यसागरू । सीतें घातला कंठीं. ॥ ७० ॥ कृश मृणाळ सकुमार । तैसे मस्तकींचे कबरी-भार । त्यासी धूप सुगंध देउनि नागर । भुजंगाकृती वेणी घातली. ॥ ७१ ॥ कुशळ त्रिजटा आपुलां बोटीं । कस्तुरिका रेखिली ललाटीं । मांडिली जवादी कर्णपुटीं । कंठू चंदनें चर्चिला. ॥ ७२ ॥ गुणवंत आकर्णी कर्ण । त्याप्रती आपुलें थोरपण । सांगो निघाले दोंवे जण । नयन जानकीचे. ॥ ७३ ॥ लावण्यतडागींचें रातोत्पळ । कीं सौंदर्यसमुद्रींचें सुधामंडळ । तैसें सीतेचें श्रीमुख वर्तुळ । शोभत बोलमुक्त. ॥ ७४ ॥ तीं दुर्लभें जातीचीं उत्तमें । मस्तकीं घातलीं कुसुमें । गुंफोनि मदनपद्में । माळ कंठीं घातली. ॥ ७५ ॥ पूजाप्रकारें भक्ति बहुता । काय पुजिली कुळदेवता । तैसी सुप्रसन्न दिसे सीता । मंगळमय सभूषण. ॥ ७६ ॥ सौंदर्य वर्णिजेल सीतेचें । एव्हडें वाचे वैभव कैंचें । परि कविधर्में किंचित् युक्तीचें । प्रसंगें लक्षण दाविजे. ॥ ७७ ॥ आतां सीता श्रीरामासी भेटेल । वियोगत्रासाचें दिव्य होईल । अग्नितुनी शुद्धरूप निवेल । तेंही वर्णिलें पाहिजे. ॥ ७८ ॥ म्हणोनि असो हू प्रसंग थोरू । जाऊ

सीतेसी शृंगारिलें । पुढें वर्तलें कैसें तें कथातारूं । शब्दसुद्रागरी चालऊं. ॥ ७९ ॥ इति श्रीरामायणकथामृत । आदिकाव्यरूपी निर्मित । तें परिसोतु का बहुश्रुत । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ८० ॥

---

## प्रसंग पांसष्टावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः ॥ श्रीगुरुकाशिराजाय नमः । यानंतरी बिभीषणु सुधी । करवी सामग्रीची सिद्धी । जानकी न्यावया कृपानिधी । जेथें बैसला सुरवेष्टित. ॥ १ ॥ रत्नीं विराजमान शिबिका । दिव्याबरोच्या उच्च पताका । चामरें विंजणें छत्रें जियें शशांका । पूर्णिमेच्या परतें म्हणती ॥ २ ॥ नाना ध्वनिचीं मंगळतुरें । दिशा बाणती ज्याचेनि गजरें । तियें हर्षदातीं मनोहरें । पुढें वाजों लागलीं. ॥ ३ ॥ सज्जुनि देखिये सामग्रीतें । गर्जत वेत्रपाणींचीं शतें । त्वरा करिती ऊर्ध्व हस्तें । अशोकवना चालिले. ॥ ४ ॥ सुहृद सुरहारी रामदूतु । सरिसा समीप हनुमंतु । बिभीषणु चालिला परिवेष्टितु । अगण्य लोकेंसीं. ॥ ५ ॥ गंधर्वांसहित गंधर्वनाथु । नंदनवन प्रवेशे चित्ररथु । कां अमरेशु शक्र समर्थु । खांडववनातु जाणा ॥ ६ ॥ तैसा बिभीषणु तिये काळीं । धरूनि मारुतीसी करकमळीं । अशोकवना प्रवेशला मैथिली । जेथें बैसली आहे. ॥ ७ ॥ समस्तांसी ठेऊनि अंतरें । सरिसें छत्र शिबिका चामरें । बिभीषणु हनुमंतु अत्यादरें । जानकीसन्मुख आले. ॥ ८ ॥ अंगिरा आणि वाचस्पती । सर्वदा शचीमंदिरा येती । नाना नमस्कारावया पार्वती । स्कंदु गणेशु आले. ॥ ९ ॥ तैसेचि येऊनि उभयवर्गी । नमस्कारू केले जानकीलागीं । दिव्य फळें तेची प्रसंगीं । समर्पिलीं पुढें. ॥ १० ॥ बिभीषणु म्हणे "सीतादेवि । शकुनार्थ इयें फळें सेवावीं । मग शिबिकारूढ व्हावें गोसावी । वाट पाहात असती." ॥ ११ ॥ ऐसी बिभीषणाची प्रार्थना । देखोनि वदे जनकनंदना । म्हणे "गा तुझिये भक्तीनें मना । तृप्ती संपूर्ण आहे." ॥ १२ ॥

तंव मारुति म्हणे' " माते महिजे । बिभीषणाचे शब्दा मानु दीजे । फळें मक्षुनि बैसिजे । शीघ्र शिबिकेवरी." ॥ १३ ॥ ऐसें बोलिलें वाळपौढें । तें सीतेनें मानिलें सुखारूढें । घरूनि अंगीकारिलें पात्र पुढें । जें होतें पीयूषफळाचें. ॥ १४ ॥ मग तियें फळें निजहस्तें । पच पच बिभीषणा कांपितें । दिधलीं आणि वनितांतें । ज्या प्रथम आलिया होत्या. ॥ १५ ॥ आणिकी प्रीतिपात्र राक्षसिणी । शरमा त्रिजटा दोघी जणी । ज्या रक्षणदियापासुनि सागातिणी । सेवा सख्य करित होत्या. ॥ १६ ॥ त्यासी हस्तीं फळें देतां । ऐसें बोलती जाली सीता । म्हणे " स्नेहो असों देणें आता । जो होता पूर्वरंगीं." ॥ १७॥ ऐसें वैदेही वदे तिये वेळे । दोघींसी गहिंवर उचंबळे । कंठ सद्गदित जाले डोळे । दाटले अश्रुजळें. ॥ १८ ॥ स्नेहो बहु लागला सीतेचा । आता समयो न साहे वियोगाचा । बोलों विसरलिया वाचा । वेदना व्यापिलिया वपु. ॥ १९ ॥ ऐसें देखोनि जानकी । शरमे त्रिजटेसी निजहस्तकीं । करवाळुनि म्हणे " त्रिलोकीं । धन्य तुम्ही दोघी. ॥ २० ॥ मेरूहूनि निर्दोष । सखिया हो तुम्ही घेतलें यश । हरिलें माझें चिंताक्लेश । सामाक्रु संपूर्ण केला. ॥ २१ ॥ तुम्हीं स्नेहाचें करूनि तारू । तारिला हा दुर्घट सागरू । साक्षी सूर्य घ रजीं ईश्वरू । सत्य सत्य त्रिवाचा. ॥ २२ ॥ आता माझिये प्रयाणसमयीं । हर्षमत असा आपुलां ठायीं । पूर्वप्रीतीसारिखी हृदयीं । प्रीती धरूनि राहा." ॥ २३ ॥ याउपरि बिभीषणें । दिव्य खाद्यें रसपूर्णें । समर्पिलीं सीतेकारणें । भोजनार्थसमयीं. ॥ २४ ॥ मग करविलें दधि मंगळ । जें अमृताहूनि रसाळ । उपरि सुगंधप्रक्षाळना जळ । अति उत्तम दिधलें. ॥ २५ ॥ कर्पूरयुक्त त्रयोदशगुणी । तांबूल देउनि मधुरा वाणी । बिभीषणु म्हणे " स्वामिनि । आतां शिबिकारूढ होआवें." ॥ २६ ॥ तैसीची उभी राहोनि जानकी । दिव्यांबरुची घालुनि मस्तकीं । शिबिकासनीं बैसली हस्तकीं । त्रिजटा पाउलें पुसिलीं. ॥ २७ ॥ कुशळांचां स्कधीं शिबिका । वरि छत्र कनकदंडपताका । त्रिजगें चामरें ढळती जितुका । राजमर्यादामार्गु. ॥ २८ ॥ पुढें मंगळवाद्यें एकसरीं । वाजों लागलीं गजरीं । तेणें नादें गगनोदरीं । सर्पूर्णता जाली ॥ २९ ॥ दौंडींचीं गोंडनौंडी दुटाळा । मुजमुदी मृदंग काहाळा । जेंगट पणव गोमुखी

विशाळा । महामेरी शंख शृंगें. ॥ ३० ॥ आणिकेंही नानाध्वनिचीं वाद्यें । वाजती सुरसें एकनादें । तिये आइकतां कर्णीं आनंदें । मर्यादा सोडिली. ॥ ३१ ॥ बिभीषणें हनुमंतें उभयवर्गीं । सीतेच्या आसनासरिसें दोहीं मार्गीं । सैन्य परिवेष्टित मार्गीं । चालिजे अत्यानंदें. ॥ ३२ ॥ सहस्रसंख्या वेत्रपाणी पुढें । ऊर्ध्व वाहोनि गर्जनागाढें । कारित प्रळयमेघाएवढें । क्षणक्षणा कौतुक झालें. ॥ ३३ ॥ ऐसी जानकी समारंभें । मिरवित जातसे मंगळ शुभें । ते अपूर्वता पहावया उभें । विश्व राहिलें दोहीं मार्गीं. ॥ ३४ ॥ सीता अशोकवनांतुनी चाळली । ते मिरवत लंकेबाहेरी आली । जैसी वनदेवता निघाली । वसंतक्रीडा खेळावया. ॥ ३५ ॥ जे रत्नमणीसि जनिती । ते समुद्रा उजु जाये ताम्रवंती । तैसी वैदेही गुणसिंधुप्रती । शिबिकारूढ जातसे. ॥ ३६ ॥ जिये स्थळीं रघुनाथें । सभा केली असे समर्थें । सीतेचें वाहन तेणेंचि पंथें । मिरवत गर्जत चाले. ॥ ३७ ॥ जिये रघुनाथाचिये सभे । कपि कोट्यावधि राहिले उभे । अवसरु कवणा कोणा न लभे । परि तिये काळीं लाभला असे. ॥ ३८ ॥ जिये सभे कैलासपति त्रिलोचनु । जिये सभे ब्रह्मलोकींचा चतुराननु । जिये सभे लोकपाळांसहित स्वर्गेशानु । सुरवरांसहितु. ॥ ३९ ॥ गण, गंधर्व, यक्ष, किन्नर । सिद्ध, चारण, गुह्यक, विद्याधर, । अंगिरा, बृहस्पति थोर । आणिक मुनि महानुभाव. ॥ ४० ॥ ऐसिये सभे रणरंगधीरें । अक्षिजे तेथ सीतावाहन गजरें । आलें जैसें एकसरें । समुद्रांतुनि तारूं तीरा. ॥ ४१ ॥ तंव जानकी पहावया दृष्टीं । लोटल्या कपिंच्या कोटी । तेथें झाली महादाटी । एक एकावरी पडे. ॥ ४२ ॥ तंव राक्षस वेत्रपाणी भुजा । उचलूनि वानरांच्या फौजा । वेत्रवरी ताडिल्या, जनकजा । पाहों नेदिती त्यांतें. ॥ ४३ ॥ पुनरपि कपींच्या चळथा । लोटती पहावयाची अवस्था । तंव वेत्र उडताति माथां । पुढारें होत क्षणीं. ॥ ४४ ॥ निविदता जाली तेथें थोर । सीतेसी पाहोन उल्हासती वानर । खेदखिन्न जाले परि स्थिर । न न्हाती भ्रमताती. ॥४५॥ देसें दुरूनि देखिलें राघवें । मग अंगद प्रेरिला कृपार्णवें । म्हणे “ सांग बिभीषणा वर्जावें । आपुलिया वेत्रधारकां. ॥ ४६ ॥ परते करावें चतुरंगदळा । शिबिकावेष्टित पट्ट काढा वेगळा । पाहों या ऋक्षकपींचा सोहळा ।

प्रकटरूप जानकीचें. ॥ ४७ ॥ जेंहीं इथे जानकीकारणें त्रिशुद्धी । शिळीं वांधिला जळनिधी । परम पुरुषार्थें युद्धीं । प्राण वेंचिले आहेती. ॥ ४८ ॥ ते जानकी आलेयां इथे वेळे । पहावया आर्तले यांचे डोळे । तरी यांसी पाहों नेदणें मिळे । कोणा धर्मामध्यें. ॥ ४९ ॥ ज्या ऋषिजाचेनि वेदनिधी । साग होम्, पावला सिद्धी । त्या ऋषिजांसीं संतुष्ट आवीं । न करणें हा कोण धर्म् ? ॥५०॥ आतां वानरीं ऋक्षीं आणिकींही । डोळां पाहिलेया वैदही । इथे समयीं सीतेसि कांहीं । नलगे अपवादमय. ॥५१॥ आयिका हो स्त्रियेलागीं । निंदा भय नाहीं इतुके प्रसंगीं । संग्रामशेवटीं महायागीं । विवाहीं यात्रापर्वणीसीं. ॥ ५२ ॥ पितृगृहीं श्वशुरगृहीं पतीपाशीं । सुमंगलीं आणि चितामूमिसी । विश्व देखे परी हें स्त्रीनी । सर्वथा निंद्य नव्हे." ॥५३॥ ऐसें श्रीरामाचेनि अनुवादें । सर्वहीं उचवळले आनंदें । मग जाऊनि बिभीषणासि अंगदें । ऐसेंचि मांगितलें. ॥ ५४ ॥ तैसेंचि बिभीषणें वेत्रधारकांतें । आज्ञा करूनी केलें परतें । जैसें झाडियामधुनि मधुमक्षिकांतें । वनचरू परतें करी. ॥५५॥ कीं चंद्रबिंब व्यापुनी । निबिड अभ्र होतें गगनीं । तें झंझामारुतें तोडुनी । निमिषांत नेलें ॥ ५६ ॥ नाना सरोवरापाळी ठोकें । परिवेष्टित होतीं सहस्रकें । तिथें टडविलीं एकें तडकें । विनोदें यंत्रकारें. ॥ ५७ ॥ कीं गुप्तधनाचे स्थळीं । होतीं वेष्टित भूतावळी । तियेंलागीं मंत्रवादी वळी । सडकुनि पळवी. ॥५८॥ असो बिभीषणें ऐसियापरी । शिबिकेपासुनि वेत्रधारी । अरे परते एहीं उत्तरीं । दूरिच्यादूरी दवडिले. ॥ ५९ ॥ शिबिकेवरि पटांबर होतें । तें जवळी होऊनि हनुमंतें । काढुनि साडिलें परतें । सीता प्रगट झाली. ॥ ६० ॥ अंधकारीं प्रदीपिका पाजळली । कीं गगनदेवता भूगोळा आली । ना ते समुद्रांतुनि निघाली । लक्ष्मी जैसी. ॥ ६१ ॥ ऐसी समस्तींहि तिये काळीं । डोळां देखिली मैथिली । जैसी आटी अमृतपुतळी । सोमकळा काढुनि. ॥ ६२ ॥ सर्वां संतोष वाटे करिती अति आश्चर्य । म्हणति कोण या सीतेचें सौंदर्य । इयेचेनि व्यसनें अवतारकार्य । अनुष्ठिलें श्रीरामें. ॥ ६३ ॥ असो; सीतेचें देखोनि रूप । हरले त्रिविध ताप । नयन अमृतें भरले, निष्पाप । सर्वांच्या वपु जालिया. ॥ ६४ ॥ पुढें श्रीरामासन्मुख जवळी । शिबिका नेली-उतिरली मैथिली । जैसें

सैंदेवाचिये दृष्टीतळीं । निधान येउनि राहे. ॥ ६५ ॥ तंव वल्लभ पहावयाचें आर्त । सीतेच्या हृदयीं उचंबळत । पुढें तैसीचि दृष्टी घालुनि चित्त । श्रीराम अवलोकिले. ॥ ६६ ॥ देखतक्षणींची प्राणनाथा । तत्काळ तुटली वियोगव्यथा । जैशी दुष्टस्वप्नींची अवस्था । जागृतिमात्रेंची जाये. ॥ ६७ ॥ अंधकारें झांकोळली वपु । पुढें पाजळला देखतांचि दीपु । तत्काळ फिटे तमलेपु । दोहीं डोळेयांतील. ॥ ६८ ॥ तैसेंचि सीते तये अवसरीं । जालें वल्लभु देखिलेयावरी । तत्काळ दिग्मंडळाबाहेरी । वियोगचिंता गेली. ॥ ६९ ॥ कोटी कंदर्पोहूनि आगळें । स्वरूप श्रीरामाचें सांवळें । तें जानकिया मनीं निश्चळें । मंगलमय पाहिलें. ॥ ७० ॥ बाह्य स्वरूप डोळां देखिलें । तैसेंचि अभ्यंतरा आणिलें । हृदयपद्मासनीं बैसविलें । योगीयाच्या परी. ॥ ७१ ॥ रामध्यानामृतरसें तिये काळीं । बाह्यांतरीं तृप्त मैथिली । सलज्जाकृति मातामंडळीं । दृष्टि देउनि स्तब्ध ठेली. ॥ ७२ ॥ पुढें रघुनाथें तियेचि समयीं । दृष्टि घातली सीतास्वरूपाचे ठायीं । परी दृष्टादृष्ट होतांचि भवई । मुरडूनि अव्हेरिलें. ॥ ७३ ॥ ऐसा देखोनि समयो । समस्तां वाटला विस्मयो । म्हणति "रामहृदयीं उदयो । कां पां विपरीत झाला. ॥ ७४ ॥ वस्तु चोरें चोरिली त्या चोरा । दंडूनि वैभवें आणिली घरा । ते वस्तु देखोनि धणी पाठमोरा । कोणें निमित्त जाला. ॥ ७५ ॥ जिये का जानकीकारणें रात्रिंदिवसु । करित होता बहुत सोसु । तियेसी देखतक्षणीं उदासु । कां पां रामु जाला? ॥ ७६ ॥ सदा मानसीं वसे जियेची मुद्रा । शय्येवरी निजे त्या नये निद्रा । तिये सीतेसि देखोनि रामचंद्रा । कां पां आर्त न घटेची? ॥ ७७ ॥ जियेचेनि वियोगें घटिका । गेली संवत्सरु जितुका । ते येतांक्षणीं निजनायका । कां पां अनादरु जाला? ॥ ७८ ॥ जियेचेनि भ्रमें पादप । रामें आलिंगिले करितां विलाप । ते प्रियांगना आलेया समीप । कंठलग्न केली नाहीं." ॥ ७९ ॥ चंद्रीं रवरा उद्भवला । उष्णकर क्षीराब्धीसि आला । हिमाळ्याचे अंगीं आविर्भवला । खेदबिंद मातेहूनि. ॥ ८० ॥ कृपार्णव श्रीराम. इये काळीं । दृष्टि देखतांचि मैथिली । उदासीन वृत्ति हृदयकमळीं । आविर्भवातें पावली. ॥८१॥ समस्त शंकादिकरुनी । ऐसें आश्चर्य करितां मनीं । परि न बोलत

फांहीं मौन् धर्नीं । धरुनि राहिले. ॥ ८२ ॥ असो, गतकथा जाली इतुकी । रामें दृष्टी देखोनि जानकी । किमर्थ अव्हेरिली तो भावो प्रश्निकीं ? । पुढिले प्रसगीं परिसावा. ॥ ८३ ॥ इति श्रीरामायणी । कथा काव्यरूपी वाणी । तेंचि मन्हाठिया शब्दांचिये मांडणीं । वदे कृष्णदासु मुद्गल. ॥ ८४ ॥

---

## प्रसंग साससष्टावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । समारंभें अशोकवनींतुनी । आणिली जनकनंदिनी । तिये समयीं देखते जाले नयनीं । देव द्विज ऋक्षादिक. ॥ १ ॥ त्यांसि वाटलें अति आश्चर्य । म्हणती असाधारण इयेचें सौंदर्य । सिद्धी जातां इतुकें कार्य । निर्दोष तैथें होती कैसी ? ॥ २ ॥ ऐसा कितीएकांचा चित्तभावो । जाणोनि अवाप्तकाम सकळदेवाधिदेवो । मग चतुर चक्राचा रावो । ऐसें करिता जाला. ॥ ३ ॥ सभामंडपीं विराजमानु । बैसलासे रघुनंदनु । पुढें जानकीप्रति उदासीनु । होऊनि बोलता झाला. ॥ ४ ॥ म्हणे "परिस आतां तें सत्य । एवढें सायास ज्यानिमित्य । तें सिद्धी गेलें सर्व कृत्य । यश कीर्ती जयो जाला. ॥ ५ ॥ कृष्णपक्षीं रोग होतां चंद्रा । वडवानळ नित्य चोखी समुद्रा । हालाहळ आहाळी रुद्रा । गौरीमात्र निव्वी जाली. ॥ ६ ॥ तैसें तुज रावणें नेलें हा शब्दु । त्रैलोक्य बोले अपवादु । याचा मात्रा हृदयीं विषकंदु । बैसला आहे. ॥ ७ ॥ तो आजि निरसोनि गेला । जैसा वर्मींचा बाणु उपडिला । की व्याधीचा

वश्य होऊनि राहें. ॥ १२ ॥ आमच्या ठायीं आशा सोडीं केवळ। जैसें आकाशींचें फळ। आतां आत्मबुद्धी तत्काळ। मनोमार्गें जाय सुखें." ॥ १३ ॥ ऐसें सर्वदेखतां तिये वेळे। शब्द कठीण उदास मोकळे। रघुपति बोलिला उचंबळे। अति गहिंवरे जानकी. ॥ १४ ॥ दीर्घस्वरें करी रुदना। अश्रुधारा वाहती नयना। कृपापात्र ऐसें अननना। करूनि बोलती जाली. ॥ १५ ॥ म्हणे "कर्म माझें अद्यापि गाढें। परमानंदु देखिला डोळ्यांपुढें। परि आड मागुतें मेरुएवढें। दुःख येउनि राहिलें. ॥ १६ ॥ आदरें अमृताचां जेवणीं। प्रीतीं प्रथम प्रासु घेतला क्षणीं। अरुचिनें केली वांवणी। पात्र स्पर्शो नेदीचि. ॥ १७ ॥ पीयूषाचा मेघु वोळला दृष्टी। परि विषधारांची जाली वृष्टी। बैसतांचि कृपार्णवाचां तटीं। क्रोधळता आलिया. ॥ १८ ॥ कामधेनूचे वोसंगा निघतां। रुचीक बिंदु आले हाता। कल्पतरूशीं संलग्न होतां। रिक्त शाखीं तोडिलें. ॥१९॥ बहुत कष्टांच्या शेवटीं। करुणामूर्तीशीं जाली भेटी। आवडीं अंकीं घ्यावें तें उफराटी। छळणा केली बहु. ॥ २० ॥ जैसें जेणें वज्रघातेंकरूनि। पूर्वत पिष्ट होती मेदिनीं। तें आंगणसरोवरींची कमळिनी। तिये-वरी प्रेरिलें. ॥ २१ ॥ गृहींची गौ व्याघ्रीं धरिली। ते धणियानें व्याघ्र वधुनि सोडविली। ते वेरसें घर पावतांचि पावली। पृथ्वीवरी काष्टखंडें. ॥ २२ ॥ कृपापात्र बुडालें डोहीं। तें कृपालुवें काढिलें बाहीं। त्यासि पुनरपि नदीपूरप्रवाहीं। लोटूनि दीधलें. ॥ २३ ॥ तैसेंचि आतां मज जालें। पुरुषार्थे वैरी वधुनि आणिलें। मागुतें निरपराधें अव्हेरिलें। तीक्ष्ण शब्दीं भ्रूभंगें. ॥ २४ ॥ ज्या भ्रूभंगांचां आवर्ती। बुडाल्या काळरूपांच्या पंक्ती। खर, कबंध, विरोध, मरीचि, पौलस्ती, रावण, कुंभकर्णादिक. ॥ २५ ॥ ऐसेया भ्रूभंगांचां वळणखंडीं। पडली माझी मुरकुंडी। आतां दिव्य देईन अग्निकुंडीं। देवा द्विजां दाखवीन. ॥ २६ ॥ अपराध तिळाहुनि धाकुटा। तो मेरुपरीस मोटा। करूनि दिजे देसवटा। हा कोण धर्म धन्याचा ! ॥ २७ ॥ ज्या मजकारणें केला यत्न। जैसें बुद्धीनें रक्षिलें गिवारत्न। राक्षसांचे नाना प्रयत्न। निर्फळ जाले. ॥ २८ ॥ अशोकवनीं शिंशुपातरुतळीं। मी होतें कुळवधूदोषावेगळी। पद्मिनी-पत्र जन्म जळीं। जळांतीत जैसें. ॥ २९ ॥ कां परियाचा गोळा।

जेवें ठेविला लावेगळा । तैसा हा देहो दुष्टकर्ममळा । स्पर्शला नाहीं. ॥ ३० ॥ अंधकारें भरली गुहिका । तियेमध्यें ठेविली प्रदीपिका । तरी तियेच्या अंगीं काय तिळाइतुका । तममळु लागेल? ॥ ३१ ॥ कोपोनि तुह्मीं कृपानिधि । दोषु ठेविला माझिये बुद्धी । तरी आतां दिव्य देईन आधीं । अग्निकुंडीं प्रवेशुनि. ॥ ३२ ॥ या हो त्रैलोक्यदेवता । दाखवीन आपुली शुद्धता । तरिचि गोसावी माझा मागुता । अंगिकारू करणें." ॥ ३३ ॥ ऐसें बोलिलि सीतादेवी । पृथ्वी भिजत असे आंसवीं । नेत्र पुनःपुनः पुसीत पालवीं । गहिंवरें उचंबळे. ॥ ३४ ॥ ऐसी देखोनि सीतेची करुणावाणी । देव ऋषी, ऋक्ष, कपि अंतःकरणीं । दुखवले डोळां आलें पाणी । गहिंवरें दाटले बहु. ॥ ३५ ॥ म्हणति "पहा हो ये अवसरीं । संपूर्ण सुखाच्या सागरीं । लोटल्या विषाच्या लहरी । मर्यादा सांडुनि. ॥ ३६ ॥ जैसा माजला मनोहर रंगु । त्यासी कुवचनीं होय रसभंगु । तैसा जानकीभेटीचा प्रसंगू । अप्रिय होउनि ठेला. ॥ ३७ ॥ देखोनि सीतेचा मुखचंद्रु । उचंबळे रामाचा सुखसमुद्रु । तो आजि झाला कोपें रुद्रु । दृष्टीं देखतक्षणीं." ॥ ३८ ॥ ऐसें आपुलालां ठायीं । मारुनि चिंतातुर हृदयीं । परी मौनमुद्रावंत तिये समयीं । कोणी कोणासी न बोले. ॥ ३९ ॥ तटस्थ पाहिजे ब्रह्मादिकीं । ऐसेयासी जाली घटिका एकी । पुढें सुद्धिवंत जानकी । आवेशा चढली. ॥ ४० ॥ दृढ बांधिला नेटपाटु । जाला गहिंवराचा वोहटु । आला शुद्ध सत्याचा लोटु । ताम्रवर्ण तनु दिसे. ॥ ४१ ॥ निर्धार करुनि अंतःकरणें । आपुले अंतरिचेनि पवित्रपणें । आरंभिलें वन्हिस्नान दिव्य देणें । सर्वदेवतां स्वामीपुढें. ॥ ४२ ॥ मग म्हणे " रे कपि हो समस्त । मजकारणें कष्टलेति बहुत । आतां आज्ञा माझी करा उचित । समयो हा आहे जाणा. ॥ ४३ ॥ येथें विशाळ कुंड करा । मध्यें बहुतकाष्टें भरा । चोहोंपरी वैश्वानरा । लावुनि धडधडीत होऊं द्यावें. " ॥ ४४ ॥ ऐसी वैदेहीची मुखवचनें । वानरीं वंदिलीं जैशीं सुमनें । मग समेसमच्छ अव्यग्रपणें । विस्तीर्ण कुंड केलें. ॥ ४५ ॥ काष्टें आणोनि बहुसाळें । स्वामीतरीं भाण भरिलें । पुढें पावकासी आणुनि लाविलें । चतुष्कोणीं प्रदीप्त. ॥ ४६ ॥ लावितांचि धडधडिला वन्ही । ज्वाळा लागलिया गगनीं । प्रचंड धाकेंड वदनीं । देखा

विस्तारिला. ॥ ४७ ॥ उचित समयासारिखा। वायु वन्हीचा परम सखा। तो साह्य पावला तेणें शिखा। खमंडपू भेदित गेलिया.॥४८॥ असो शाखामृग आणि सुधापाणी। विरंचि शंकरादिकरुनी। परम चिंतातुर झाले मनीं। म्हणती विघ्न उदेलें. ॥ ४९ ॥ हा कराळमुख अग्निपुरुषु। यांतु सीता करील प्रवेशु। न कळे पुढें निर्गमु कीं नाशु। महा कठीण मांडलें. ॥ ५० ॥ अग्नीचा स्वभाव सहजसिद्ध। सर्वत्रभक्षकु न विचारी शुद्ध अशुद्ध। सांपडलें तितुकें करी दग्ध। क्षणमात्रामीतरीं. ॥ ५१ ॥ दयाशून्य परम निष्ठुर। काळरुद्राचा सहोदर। कृतघ्न परी ऐसा थोर। आणीक नाहीं.॥ ५२ ॥ द्रव्याहुनि पुष्ट सघृता। त्या अग्निमुखीं समर्पितां। अवचिता स्पर्श होये हस्ता। तरी स्फोटक येती. ॥ ५३ ॥ म्हणोनि दुष्टस्वभाव जयाचा। तो न पालटे कोण्हे काळीं त्याचा। जेथें बैसे त्यासी छेदी हा वृक्षाचा। सहज स्वभावो. ॥ ५४ ॥ विष जाणतां नेणता पडे उदरीं। तरी देहप्राणातें हरी। स्पर्श होतांचि डंखी कल्हारीं। हा स्वभावो सर्पाचा. ॥ ५५ ॥ स्मराचा शर संचरे आंगीं। तरी तो सर्वथा चिंतातें भंगी। दुर्जन तो पदप्रसंगीं। परघातु करी. ॥ ५६ ॥ ऐसे दुष्ट स्वभाव बहुतांचे। उच्चारितां कष्ट वृथा वाचे। असो दुष्टहि बोलतां पुढिलाचें। पुण्य क्षयातें पावे. ॥ ५७ ॥ अहो जे जयांचा ठायीं गुण। ते वस्तुस्वभावेंचि निर्माण। जैसें साधुदर्शन कारण। तत्काळ पुण्यासी होय. ॥ ५८ ॥ दीप लागे तियेचे काळीं। तम न थारे जवळी। परिसु लागितां तत्काळीं। लोह धातु होतसे. ॥ ५९ ॥ चंद्रीं सर्वदा शीतळपण। जेणें द्रवती सोमकांत पाषाण। फडवटेना कदा, आणि गतप्राण। हे गुण अमृताचे. ॥ ६० ॥ सर्व दोष निरसुनि पुण्य पुढें ठेवी। स्पर्शे गोदा तथा जान्हवी। तटीं देहो सांडितां मध्ये बैसवी। मुक्तिमंदिरासनीं. ॥ ६१ ॥ नाम घेतांचि हरिहरांचें। पाप जात जन्मोजन्मींचें। ऐसें महिमान वस्तुचें। असो अनुवाद बहुत. ॥ ६२ ॥ ऐसा तो सहजें वन्हीं। वाटला असंभाव्य गगनीं। अतिभय उपजलें सर्वां मनीं। म्हणती प्रळयाग्नी पेटला. ॥ ६३ ॥ जंव जंव वायूचें बळ पावे। तंव तंव शिखाचें उठावे। उठती कल्लोळ धावे। गगन ग्रासावया. ॥ ६४ ॥ ऐसें अग्नीतें अद्भुत देखोनि। कपि ब्रह्मादिक आदिकरुनी। परम चिंता-

तुर होऊनि । मुर्छित जाले. ॥ ६५ ॥ म्हणती " राक्षसार्णवांतुनि सीता । आली हा द्वितीय जन्म निगुता । आतां देह काळमुखीं मागुता । वरी टाकू पाहत. ॥ ६६ ॥ या घडाडीत अग्नीचां पोटीं । सीता पुष्पमाळ गोमटी । प्रवेशलेया कार्य शेवटीं । होईल कैसें पाहों ? ॥ ६७ ॥ अग्नि हा प्रळयाग्नीसारिखा । हे सीता जैसी कोमळ दर्भशिखा । माजि प्रवेश करील म्हणे रेखा । भाविनी न कळेचि. ॥ ६८ ॥ ऐसे समस्त आपुलाल्यां चित्तीं । भावना करूनि तटस्थ पाहती । तंव सिद्ध जाली महासती । दिव्य करावयाकारणें. ॥ ६९ ॥ असाधारण अग्निपुरुषु । देखोनि सीतेसि परम संतोषु । वाटला म्हणे " यामाजि धर्मदोषु । निवडेल माझा. " ॥ ७० ॥ ऐसें भाटनि तियें प्रसंगीं । सीते स्फुरण आलें सर्वांगीं । जैसी वीरश्री संग्रामरंगीं । घोपे आकाशीं न माये. ॥ ७१ ॥ पुढें जानकीया ते समयीं । चित्त श्रीरामाचे पायीं । आठउनि मूर्ती आल्हादुनि हृदयीं । आणौनि बैसविली. ॥ ७२ ॥ काढिली कंठींची पुष्पमाळा । घडाडींत निवती ज्वाळा । त्यावरी टाकिला तो गुंडाळा । पूजेचेनि भावें. ॥ ७३ ॥ 'सत्य जय सत्य जय' एहीं बोली । पुनरपि 'जय राम' ऐसें बोलिली । मग त्रैलोक्य देखतां प्रवेशली । त्या महाअग्नीमध्यें. ॥ ७४ ॥ वन्ही प्रवेशवाची मैथिली । कंपु जाला पृथ्वीमंडळीं । शब्दु उमटला निराळीं । कल्पांतविजुहूनि गाढा. ॥ ७५ ॥ पर्वतांमाजीं फुटला तडाडा । भूमीं नक्षत्राचा जाला सडा । सूर्यबिंबीं रगु राहिला तांबडा । कळासी ठावो नाहीं. ॥ ७६ ॥ शून्य धुमात दिग्मंडळीं । बैसली दिग्गजकर्णीं टाळी । ऐसें वर्तलें तिये काळीं । सीता अग्नींत निगतां. ॥ ७७ ॥ ऋक्ष, वानर, सुरनर, । जाले परम भयातुर । करूं लागले हाहाकार । निहाला विन्हु, वन्ही म्हणुनी. ॥ ७८ ॥ ऐसें त्रैलोक्य आवर्तीं पडलें । तव सीतेसी वर्तमान कैसें जालें ? । प्रवेशताचि शीतळ केलें । अग्निपुरुषें आपणातें. ॥ ७९ ॥ स्पर्श होताचि जानकीचा । अग्नि जाला अमृताचा । जैसा चंद्र पूर्णिमेचा । शरदृतूमध्यें. ॥ ८० ॥ कां गंगेचें हृदय निर्मळु । कां जैसा वायु मुशीतळु । नाना जैसा तो हिमाचळु । ऐसा अग्नी जाला. ॥ ८१ ॥ वनेंगीं नंदनवनींची छाया । पां ग्रीष्मीं कामदवनांतील शय्या । त्याहूनि मुखरूप जनकतनया । अग्नीमध्यें मानिती जाली. ॥ ८२ ॥ ऐसा अग्नि

गुहामध्यें जानकी । राहिली घटिका एकी । जैसें अपथ्यें पितयाच्या दक्षिणाकीं । आनदमरित असिजे. ॥ ८३ ॥ अग्नीनें अमृतोदरवोवरा । अयोनिसभव देहधरा । वैसनिली होतीं, जैसी डोल्हारा । मदनाची माता वैसे. ॥ ८४ ॥ ऐसी भरिली घटिका एकी । उपरी अग्निकुंडातुनि जानकी । सालंकृत निगाली मस्तकीं । पुष्पें घमघमती. ॥ ८५ ॥ परिसेसा गुह्य ग्रथातरींचें । जें का शुद्ध स्वरूप जानकीचें । तें अगोचर ठेविलें, रावणा सार्चे । दर्शन जालें नाहीं. ॥ ८६ ॥ हरणाचिये अवसरीं । मायारूप सीता दुसरी । जाली ते रावणें रथावरी । घाउनि नमपथें नेली. ॥ ८७ ॥ ऐसी वोलताची युक्ती । प्रश्निक प्रसगें आक्षेपिती । म्हणती " मायारूप सीता लंकापती । जरी घेऊनि गेला, ॥ ८८ ॥ तरी हरणाचिये समयीं । शुद्ध सीता राहिली कोणे ठायीं । हें तत्वता न कळेचि हृदयीं, । संदेहो संचरला. ॥ ८९ ॥ हरिली मायारूप जानकी । ऐसें वदला नाहीं वाल्मीकी । तरी हे सत्य साक्षी इतुकी । पुराणातरीं पाहिजे. ॥ ९० ॥ अमुकें एकें पुराणीं । बोलिलें तें वक्त्यानें प्रकट वाणीं । वदावें तें आइकौनि क्षणीं । संदेहो निरसैल. " ॥ ९१ ॥ ऐसा आक्षेपु श्रोतेयाचा । देखोनि वक्ता वदे वाचा । म्हणे " जी कर्मेविण फळाचा । उद्भव कैसेनि होये? ॥ ९२ ॥ अभ्रेंविण पर्जन्य पडे । बीजेंवाचुनि अकुर निरूढे । तरी मयीं देखिलें नसतां घडे । बोलणें मत्वतेंची. ॥ ९३ ॥ मायारूप सीता नेली रावणें । ऐसें वदलों वाचाळपणें । हे सर्वथा अग्निपुराणें । साक्षी दिधली असे. ॥ ९४ ॥ मायारूप रावणें नेलेयावरी । शुद्धरूप अग्नीचा उदरीं । राहिलें होतें सागरीं । जैसें रत्नरत्न. ॥ ९५ ॥ त्यानिमित्त अवतारप्रसगु । तो सरला समग्र पूर्वरंगु । निजसीतावियोगाचा सयोगु । होआवया दिव्य रचिलें. ॥ ९६ ॥ राम देवाधिदेवो आघवीं । खेळे, लीळाचरित्र मांडवीं, । एक रुपवी एक दाखवी । वाउगीं मायासूत्रें. ॥ ९७ ॥ दिव्याचेनि मिषें मायामथिली । प्रवेशौनि सीता तिये काळीं । प्रकट जाली पयाब्धीचे पाळीं । लक्ष्मी जैसी. ॥ ९८ ॥ अग्नीमधुनि सीता निगाली । सौंदर्य सृष्टी हेलावली । उजळलिया दिशा फांकली । अगकांति-प्रभा. ॥ ९९ ॥ समस्तीं सीता कैसी देखिली ? । जैसी अमृतहृदींहूनि निगाली । कीं चद्रबिंबातुनि आली । पुतळी पीयूषाचि. ॥ १०० ॥

सौंदर्याची राशी सीता । दिव्यांबर दिव्य भूषणीं भूषिता । दिव्य कंचुकी दिव्यगंधचर्चिता । दिव्य पुष्पीं विराजमान. ॥ १ ॥ मुखावरूनि चंद्रांच्या कोटी । ओंवाळुनि सांडाव्या दिक्चक्राशेवटीं । लावण्याची निधी तनु गोमटी । यौवनसिंधु हेलावत. ॥ २ ॥ ऐसी दिव्यदेही सीता । दिव्य देऊनि दर्मा सत्वसरिता । राहिली त्रैलोक्या देखतां । महा मंगळमय. ॥ ३ ॥ समस्तीं देखोनि तिये काळीं । जयजयकार केला, पिटिली टाळी । वाद्यें वाजिन्नलें पुष्पांजळी । समर्पिल्या शिरीं. ॥ ४ ॥ विरिंचि अंगिरा गुरू । समस्त सुर शक्र शंकरू । आशीर्वाद देती नमस्कारू । कपि ऋक्षीं केला. ॥ ५ ॥ शब्दाचे सुखें अंतःकरणें । सुग्रीवें हनुमंतें बिभीषणें । आणी देवरें लक्ष्मणें । सीता नमस्कारिली. ॥ ६ ॥ पूर्ण प्रीतीं निजहस्तकीं । रघुनाथें धरिली जानकी । केंठलग्न करूनि अंकीं । सर्वांदेखतां वैसविली. ॥ ७ ॥ सीतेसहवर्तमान श्रीरामु । शोभे जैसा कीर्तियुक्त धर्मु । कां आदिनारायणु पुरुषोत्तमु । लक्ष्मीसहित. ॥ ८ ॥ ऐसी रामासीतें जाली भेटी । देवीं केली दिव्य पुष्पवृष्टी । आनंदें पूर्ण भरली सृष्टी । साम्राज्य सर्वी पाहिलें. ॥ ९ ॥ आता शिव शक्र विरिंचि । स्तुति पृथक् श्रीरामाची । करिताति ते कथारुची । अमृताहूनि गोड. ॥ ११० ॥ इति श्रीरामायण ऋषिकृत । ज्यामध्यें नवरसाची नदी वाहात । कृष्णदासु मुद्गल म्हणे सुचित्त । सज्जन हो श्रवण करा. ॥ १११ ॥

---

## प्रसंग सदसद्भावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ याउपरी श्रीरामाची स्तुती । करिता जाला कैलासपती । जो आदि अनादि मूर्ती । अगाध महिमा ज्याचा. ॥ १ ॥ जो महेशानु ईश्वरू । त्रिपुरारि सर्व शंकरू । जो पशुपति गिरीजापति गंगाधरू । तारकारिपिता. ॥ २ ॥ जो त्र्यंबकु त्रिलोचनु । षड्गुणैश्वर्युसंपन्नु । जो पुरातनु पंचाननु । पुरुषादिपुरुषु. ॥ ३ ॥ न कळे जयाचें मूळाग्र । आपणचि कर्ता का-

विता समग्र । स्वरूप मंगळमय आणि उग्र । सर्वदा सर्पभूषित. ॥ ४ ॥ दंतिशार्दूलत्वक्‌वरणु । नरकपाळमाळाभूषणु । असंख्यप्राणहरणु । नंदीवाहनु नीळग्रीव. ॥ ५ ॥ शूळी पिनाकी धूर्जटी रुद्र । महादेव मृत्युंजय कृपासमुद्र । शंभु स्वयंभु भूतेंद्र । भक्तजनभवभंगु. ॥ ६ ॥ तत्त्वतां आगमा न पडे ठायीं । योगी सर्वदा ध्याती हृदयीं । ऐसा शिवराजु तत्समयीं । वदे राघवाप्रती. ॥ ७ ॥ म्हणे "अहो दाशरथी रामा । परमानंद पुरुषोत्तमा । धन्यावतार मनोरमा । जय पुराणमूर्ती. ॥ ८ ॥ तूं या चराचराचें जीवन । शुद्ध सत्वाचें जन्मस्थान । अनंत ब्रह्मांडनाथु पाळण । करिसी कृपाकटाक्षें. ॥ ९ ॥ तूं अनंतु अनंतशयनु । अनंतशक्ती अनंतवदनु । अनंतनामरूप अनंतलोचनु । अनंतचरणपाणी. ॥ १० ॥ धर्मधरा । साधुसंरक्षणालागीं । तूं अवतरसी युगीं युगीं । पुराणें कीर्तन करिती जगीं । हाचि तरणोपाय. ॥ ११ ॥ तूं सत्यात्मक सत्याचें सत्य । तूं आनंदाचा परमानंदु नित्य । तूं सर्वकार्याचें कारणकृत्य । अवतरोनि धन्य केलें. ॥ १२ ॥ टाळिले त्रैलोक्याचे अनर्थ । पुरले बहुतांचे मनोरथ । तुझे चरित्रकथारम्यग्रंथ । त्रिभुवनीं विस्तारले. ॥ १३ ॥ माझ्या मनीं आर्त वेळोवेळां । उद्भवे गा तमालनीळा, । तें आजि पुरलें डोळां । देखिलें तुज रामा. ॥ १४ ॥ कोटिस्मरसौंदर्यआगळी । रामा तनु तुझी सांवळी । ते म्यां निरंतर हृदयकमळीं । बैसविली आहे. ॥ १५ ॥ मज नाहीं आणीक छंदु । सर्वदा तुझा नामानुवादु । करितसें हा नित्यानंदु । पार्वतीसहित. ॥ १६ ॥ रामा, तुझेया नामाची । माझी जिव्हा जाणे रुची । गोडी तुळितां अमृताची । न्यून महदंतरें. ॥ १७ ॥ रामा, तुझें नाम एक । सहस्रनामांपरीस अधिक । हा भवसिंधु तारावया आणीक । दुजें नाहीं लोकांसी. ॥ १८ ॥ आतां सीतेसहित रामा, । राज्य करावें निजधामा । स्नेहें असों दीजे आम्हां । विसरावें ना." ॥ १९ ॥ ऐसें राघवाप्रति शंकरें । अनुवादिलें उपचारें । तंव रघुनाथु प्रत्युत्तरें । हास्यमुखें देता झाला. ॥ २० ॥ म्हणे "परिसा हो पार्वतीपति । तुम्ही स्तुती मजप्रती । करितां हे विपरीत पद्धती । वाटे शब्दाक्षरांची. ॥ २१ ॥ विश्वंभरा विश्वेशा विश्वनाथा । शिव शंभो शिवराजा समर्था । काळात्मा भूतात्मा तूं नाथा । तुझी आज्ञा विरिंची वाहे. ॥ २२ ॥ अपूर्व तुझे या स्वरूपाची कुसरी । विश्व तुझां उदरीं तूं विश्वांतरीं । जेसें सवाग्र-

न्यतरीं । गगन घटीं मठीं. ॥ २३ ॥ प्रळयाग्नितुल्य हाळाहळ । दग्ध करूं लागलें सृष्टी सकळ । तें तुम्हां कंठीं धरिलें वडवानळ । अंबुनिधि जैसा. ॥ २४ ॥ तो नित्य समुद्रजळ । शोखी योजनें द्वादश वडवानळ । आणी विष तुम्हां कंठीं मुक्ताफळ । जैसें हंसाचिया मुखांतु ॥ २५ ॥ ऐसें लोकांत प्रसिद्ध । हाळाहळा कंठीं निर्बाध । धरूनि ठेलासि तूं दग्ध । सृष्टी होईल म्हणौनि. ॥ २६ ॥ ऐसा करुणाब्धी कपर्दी । तुझिये कीर्ती वाहे नदी । ते त्रैलोक्यीं प्रसिद्ध पुराणीं वेदीं । सर्वदा महिमा बोलिजे. ॥ २७ ॥ आणिका समुद्रगामिनी नदी । स्नानें करितां बहुकाळें फळदी । आणि तव कीर्तिलक्षण मुक्तिपदी । श्रवणमात्रें वैसवी. ॥ २८ ॥ ऐसा शिवा सर्वोत्तमा । अगाध अपार तुझा महिमा । माझी स्तुती करितां, काये मी तुम्हां । वेगळा आहें. ॥ २९ ॥ क्षीरार्णवें आपुलियेचि ऊर्मितें । पाडुणेरू माडिला पंचामृतें । कल्पद्रुमें निजशाखेतें । प्रीतिफळें अर्पिली. ॥ ३० ॥ मेरूनें आपुल्याचि करीं । केली कंकणांची हारी । शिवा जाली ऐसी परी । स्तुती वदल्यासी माझी. ॥ ३१ ॥ मज पैं अवतारप्रसंगु । हा तुमचाचि इच्छारंगु । सुरकार्यनिमित्त स्वयोगु । नरवरवेषु घेतिला. ॥ ३२ ॥ आता मज तुम्हीं विसरावें ना । ऐसें बोलों जी विनयना । तरी मेरु कैंचा जैसा गगना, । भिन्न घटें नाहीं." ॥ ३३ ॥ ऐसें श्रीरामाचेनि अनुवादें । हरू परात्पर निजानंदें । डुलतु ठेला सुखातिदोंदें । सुखाचेया निगाळीं. ॥ ३४ ॥ तंव विरिंचिचां चित्तीं आर्त । वदनायाचें उचंबळत । जैसें पौर्णिमे सांद्र म्हणत । मर्यादा सिंधूदक. ॥ ३५ ॥ म्हणे "हे रामकरुणार्णवा । हे राम देवाधिदेवा । हे राम अपारवैभवा । चिदटस्वरूप तूं. ॥ ३६ ॥ हे राम नित्यानंदमूर्ति । हे राम अनंतशक्ति । हे राम ब्रह्मांडपति । पुराण पुरुषोत्तम तूं. ॥ ३७ ॥ हे राम राजीवलोचन । हे राम भुवनपाळक । हे राम जगत्रयजनक । कर्ता कारविता तूं. ॥ ३८ ॥ अगा सर्वेश्वरा समर्था । तुझी आज्ञा रघुनाथा । उर्ध्व धरिली असे माथा । मुकुटमणी जैसा. ॥ ३९ ॥ शिखा धरिली भारद्वाजें । कां शृंगवल्ली म्हैयेआमजें । नाना वासुकिचेनि अग्रजें । धरा फणिमंडळीं. ॥ ४० ॥ आज्ञा तुझी ऐसियापरी । धरोनि अंबुदेव आपुलां शिरीं । करीतसे बहु तुमचे । सृष्टिची रचना. ॥ ४१ ॥ कुलाल पात्रें घडणार ।

तैसा मी दुरीं असें दुसरा । परी तूं सूत्रधारी सर्वेश्वरा । बाहुलीं नाचविसी, ॥ ४२ ॥ तू सकळही सकळांचें मूळ । चिदानंदरूपसार तूं केवळ । व्यापुनि वेगळा तुज्ळ । जैसा दीपु ज्योतिरूपें. ॥४३॥ तुझिये नाभिकमलदळातु । मी शतरूपें होतों भ्रमतु । जैसा वृक्षढोलगर्भी चालतु । माकोडा भ्रोधार्थ पैं. ॥ ४४ ॥ शून्यसम न कळे काहीं, । चिंतार्णवीं बुचकळलों केदेही । दुसरें बोलावया नाहीं । अवलोकन करिता. ॥ ४५ ॥ मग त्याळा तिथे समयीं । इच्छालीळेनें लाविलें सोयीं । आज्ञा सक्रमिली हृदयीं । तेंचि बुद्धी. ॥ ४६ ॥ आणि या अमरातें । पाळिसी कृपाचित्तें । सहारूनि असुरातें । अनंतरीं अनंतरीं. ॥ ४७ ॥ तारे हा तुझा धन्यावतारू । त्रैलोक्यासि आनंदसागरू । रावण कुंभकर्ण वधिले थोरू । उपकारू केला." ॥ ४८ ॥ ऐसे विधातयासि स्तविता । विश्वात्मा जाला बोलता । जैसा प्रीतिपात्राप्रति पिता । निदेशाहूनि आलिया. ॥ ४९ ॥ म्हणे, "गा विरिंचि, आम्ही तुम्ही । एकाचि आतवर्ग आम्हीं, । हें तू सर्व जाणसी अंतर्यामीं, । वयोवृद्ध तपोवृद्ध. ॥ ५० ॥ उत्पत्तिस्थितिलयो इये प्रसंगीं । कार्य संपादणें त्रिमूर्तिलागीं, । एका वृक्षासी शाखात्रय तैसें जगीं । भासों परी भेदु नाहीं. ॥ ५१ ॥ सैंम सुवर्णचि आहे । तें सुवर्णें पूर्ण भरलीं आहे । तैसा हा तुझा प्रपंच पाहें । नाहीं आम्हावेगळा. ॥ ५२ ॥ विचारिता एक पाणी । तें भिन्न घटीं वाहता जाली त्रिवेणी । तयापरि असो वाणी । वदणें हें कोणाप्रति. ॥ ५३ ॥ खूण ठाउकी परस्परचित्तीं । तरी किमर्थ युक्तीची पंगती । मांडावी कोणें कोणाप्रती । उपचारमार्गें. ॥ ५४ ॥ रावणवधकार्याचा शेवटीं । तुम्हासि जाली भेटी, । हेंही बोलता नये उफराटी । वाटे वचनमाळा. ॥ ५५ ॥ मुळींहूनी नाहीं तुटी । तेथ कायिसी जाली म्हणों भेटी, । असो आतां या शब्दाची राहाटी । अधिकारींचि चित्त दीजे." ॥ ५६ ॥ ऐसें वदला विधात्मा, । तेणें नवरसें भरला आत्मा, । तें साचिला परमप्रेमा । इंद्र बोलता जाला. ॥ ५७ ॥ म्हणे 'परमात्मा, परमपुरुषा, । परमानंदा, चिदाकाशा, । विरिंचिजनका, विश्वेशा, । विश्वंभरा, विश्वरूपा, ॥ ५८ ॥ सगुणा, निर्गुणा, सावयवा, । व्यक्ता, अव्यक्ता, एकानेका, । अनंता, अपरिमिता, व्यापका, । मायादीळा अलीळा. ॥ ५९ ॥ उघडूनि ज्ञानाचे डोळे । पाहता रूपनिर्धारू न

कळे, । बहुबहाळें करूनि खेळे । माया तुझी विनोदें. ॥ ६० ॥ कोणासि कांहीं कळे विवेचना । बुद्धी न लक्षवे, नाकळे मना, । लीलेस्तव तूं जगज्जीवना, । अवतार धरिसी. ॥ ६१ ॥ प्रपंचु विस्तारूनि परिपूर्णा । माजि शक्ति दाखविसी विस्तीर्णा । लीला वर्तसी जैसी ऊर्णा । गर्भतंतवरी खेळे. ॥६२॥ करूनि मृत्तिकेचें कटक । खेळे बाळ क्रीडाकौतुक । तैसें विश्व, सर्जूनि अनेक । तूं लीला खेळसी. ॥ ६३ ॥ सुर, साधु, धर्मधरा, । यांचिया संरक्षणालागीं ईश्वरा, । कृपा करूनि दयासागरा । पुनःपुनः अवतरसि. ॥ ६४ ॥ पक्षिणी गगनीं भ्रमत । परी पिलेयांचिये पाशीं असे चित्त । तैसा तूं वैकुंठीं वसोनि बहुत । समयीं सांभाळु करिसी." ॥६५॥ इंद्रु वदत असे ऐसें, । तंव लोकपाळही सरिसे । स्तविते जाले जैसें । वृंद वेताळाचें. ॥ ६६ ॥ वरुण, वायु, इंद्र, ईशानु, । अग्नि, यमु आणि नरवाहनु, । सुरवरांच्या कोटी देती मानु । तो वाचस्पतिहि वदे. ॥ ६७ आपुलालिया युक्तिमनुसार । स्तविती देव ऋषि विद्याधर, । हाहा हूहू गंधर्व जे निरंतर । यशें देवांचीं गाती. ॥ ६८ ॥ समश्रुति ताळ, मृदंग । विणे, यंत्रें, विशेष उपांग, । इयें सामग्रीसि होत सुधांग । नृत्यें नायिका करिती. ॥ ६९ ॥ बहुयज्ञ बहुपुण्य बहुकष्ट । करितां स्वर्गवासी जालेया संतुष्ट । तरीचि या होती दृष्ट । अष्टनायका त्यांसी. ॥ ७० ॥ जयांचा कटाक्षवाणीं । विबुधां तपोधनांचिया अक्षौहिणी । कडतरोनि पडल्या धरणीं । नाडले बहुत. ॥ ७१ ॥ ज्यांचेनि सौंदर्यें स्वर्गु । सदा साजिरा सुरवरां भोगु, । आंगीं नित्य हेलावे यौवनरंगु, । गोंढीचा निधी जैसा. ॥ ७२ ॥ त्याचें कार्य जाले महाघोर । स्वामी पावले अधिकार । म्हणोनि नृप करिती पूर । आवाहाती आनंदाचे. ॥ ७३ ॥ शचीश सुरेश मागुता । उपकारबद्धें जाला बोलता । जैसा मेघु वृष्टी करित असतां । वोमरूनि वृष्टि करी. ॥ ७४ ॥ समुद्राचे ऊर्मिभरितें । वोहटोनि ओटे मागुतें । कां जैसें कुशाळ कल्पांतें । थाकावरी थाक तोडिजे. ॥ ७५ ॥ अमरनाथु ऐसिया परी । रायाप्रति जोडली करीं । बोलता जाला तिये अवसरीं । भक्तिपुरःसर. ॥ ७६ ॥ म्हणे "भुवनपति, मंगळमूर्ति, । आदिदेवा, दयार्णवा, तुझे कीर्ति- । चादिणें कांती । दिग्गजांच्या धवळेलिया. ॥ ७७ ॥ त्या राक्षसाऱ्णपर्यंकरूनी । त्रैलोक्यदेवींचा वदनीं ।

कळा तुटलिया तैंलागोनी । अस्तपर्याय जाला. ॥ ७८ ॥ रावणपक्षांत अमावास्या संपली । बिभीषणराज्यप्रतिपदा पाहिली । आतां त्रैलोक्यदेवींचां मुखचंद्रमंडळीं । कळावृद्धी मागुती. ॥ ७९ ॥ तुझां अवतारपूर्णपक्षें । शुद्धबीजकृपाकटाक्षें । नित्यानंदु वाढला तेणें लक्षें । मेदिनीं ब्रह्मांडापरती. ॥ ८० ॥ ऐसा हा समयो पाहिला स्वामी, । आतां निजाधिकारा देव आम्ही । आज्ञा जालेया जाऊन तुम्हीं । जाइजे अयोध्येप्रती. ॥ ८१ ॥ तरी हे उचित वेळा दयाब्धि, । मज काहीं आज्ञा प्रयाणाआधीं । धावीं सर्वथा ते सिद्धी । पावेन येचि काळीं. " ॥ ८२ ॥ ऐसी इंद्राची विज्ञापना । जैसी परम सखियाची प्रार्थना । परिसोनि श्रीरामु वचना । प्रीतीनें देता जाला. ॥ ८३ ॥ म्हणे " प्रथमचि गा अमरनाथा । तूं चुकलासि नाहीं सर्वथा । निजसारथी आणि निजरथा । युद्धकाळीं पाठविलें. ॥ ८४ ॥ तिये रथीं आरूढौनि आम्ही । जय पावलों संग्रामीं । आतां कार्यसिद्धी जाहली तुम्ही । स्वर्गाप्रती जावें सुखें." ॥ ८५ ॥ ऐसें आइकौनि आनंदरूपी । पुरंदरू बोले पुनरपि । म्हणे " स्वामी काळु सर्वव्यापी । स्वभावेंचीकरूनि. ॥ ८६ ॥ तव नाभिवारिजापासाव । विरिंचीसी झाला उद्भव । सृष्टिरचनेची लावण्यठेव । काळस्वभावेंचि झाली. ॥ ८७ ॥ काळस्वभावेंचिकरूनी । तत्वें झालीं तत्वांपासूनी । चारी खाणी वाणी जीवनयोनी । काळस्वभावें जाळिया. ॥ ८८ ॥ परिमाणापासुनि घटिका प्रहर । दीन पक्ष मास अयनें संवत्सर । युगें कल्प प्रळय सागर । काळस्वभावें जालें. ॥ ८९ ॥ सकळ प्रपंचु जितुका भासे । तितुका वर्ततचि नासे । हा काळाचा भावो असे । सहजचि स्वामी. ॥ ९० ॥ ऐसा काळ जी रघुपती, । तो तुझेया विराटस्वरूपाची गती । तें न कळे जी महामती । ब्रह्मादिकांसी. ॥ ९१ ॥ ऐसेया सर्वथा श्रीरामा । विपरितो वचनीं आम्हां । चाळविसी सार्वभौमा । असद्गुणीं निरुपमा. ॥ ९२ ॥ देवा बोलिलेती तुम्ही । जे तुम्हां रथु पाठविला रणभूमीं । तेणें जयो जाहाला संग्रामीं । रावणु वधिला. ॥ ९३ ॥ तरी आणिकाचें तारक तारूं । तरत असतां सागरू । त्यासि विरजळेयाचा आधारू । हें तंव न घडे स्वामि ! ॥ ९४ ॥ वृक्षासि पक्षियांचा आश्रयो । कां विश्वचक्षु सूर्यासी उदयो । तैसा आमुचेनि तुम्हां जयो । हें न घडे जी. ॥ ९५ ॥ बिण-

करें फाडिला पट्ट । कुलालें फोडिला घट्ट । शिल्पियें मोडिला काष्टमट्ट । हें अपूर्व न घडे जी. ॥ ९६ ॥ चितारेनि पुसिलें लेप । माळियें उपाडिलें रोप । सूत्रधारियें तोडिलें काष्टरूप । हें तव अपूर्व नव्हे जी. ॥ ९७ ॥ म्हणोनि तैसेंचि स्वामी तुम्हीं । रावणु वधिला संग्रामीं । हें आश्चर्य नव्हे आम्हीं । अपूर्व काय मन. ॥ ९८ ॥ या गगनाचिये खोपे । गंधर्वनगरी दिसुनि लोपे । तैसा हा प्रपंचु होऊनि हारपे । तुजचिमध्यें मागुता. ॥ ९९ ॥ सूर्यबिंबभावें मेदिनीं । मिथ्या मृगजळ भासे नयनीं । तैसा मिथ्या प्रपंचु तुजमाजीनी । असमान्य उद्भवला. ॥ १०० ॥ यामधील तो रावण एकु । दशाननचि कीटकु । तुम्हीं लीलावतारें वधिला तें लोकु । आश्चर्य करी. ॥ १ ॥ हें बोलणें असो आता । चोटी निवडे ते नये बोलता । अनंतावतारा अनंता । आज्ञा मज देई कांहीं. ॥ २ ॥ वर दयाब्धि इयें समयीं । जें प्रिय असे सर्वांच्या हृदयीं । ते आज्ञा मज देई । म्हणोनि वधाजळी केली" ॥ ३ ॥ ऐसें वदे इंद्रु । परिसोनि संतोषला रामचंद्रु । उचंबळला क्षीरसमुद्रु । पौर्णिमेसि जैसा. ॥ ४ ॥ मग सुशब्दीं हास्यवदनें । देवेंद्राप्रती राजीवनयनें । बोलिजे जैसें विद्याधनें । विद्यार्थियाप्रती. ॥ ५ ॥ कां लोकपूजनार्थ हस्तकाप्रती । गृहस्वामी बोले विवाहकार्यीं । नाना प्रधानेंसीं देशाधिपती । वदे प्रजाहित जैसें. ॥ ६ ॥ ऐसियापरी पुरुषोत्तमु । इंद्राप्रती बोले रामु । म्हणोनि सुरेशा परोपकारावर्मतुल्यु । न दिसे शास्त्रें शोधितां. ॥ ७ ॥ परोपकार नक्ष कपींलागीं । घडला आमचा कार्यप्रसंगीं । प्राणा दिधले रणरंगीं । राक्षसांचेनि हस्तें. ॥ ८ ॥ कार्यसिद्धी पावलों आम्ही । आणि आमुचे साह्यभूत समागमी । ते बहुत वानर रणभूमीं । प्रेतें होऊनि पडले. ॥ ९ ॥ आम्ही आता जाऊं सुखें । परि पडले त्यासि जाणें प्रळयामारिखें । यांची वार्ता आइकोनि दुःखें । कलत्र प्राण देती. ॥ ११० ॥ तरि आता इतुकें जालें पाहिजे । गतप्राण जितुके तेहीं जिजे । समरीं क्षेमें जाइजे । आपुलालिया स्थाना. ॥ ११ ॥ तरी हें शीन काळें सर्वथा । सिद्धी न्यावें देवनाथा, । गतप्राणा जीवरीं आणि व्यथा । निरसीं घायवटांची. ॥ १२ ॥ मृत घायवट उठती ऐसें । तुट पुट पुरी होते तैसें । आंगीं तिळतुल्य क्षत न दिसे । कोणाचिये त्वचेवरी. ॥ १३ ॥ यांचीं

जियें वसतिस्थानें । पर्वतप्रदेश वनें । तियें अरिष्टरहित आनंदगहनें । निरंतर असावीं. ॥ १४ ॥ वृक्षवल्ली सदाफळ । सचीत असावें सकळ । नदी तडागें सरोवर पूर्णजळ । निर्मळ असावें. ॥ १५ ॥ ऐसी हे उपकारकरणी । अविलंबें करीं वज्रपाणी, । लंकेशा कपीशाचे अंतःकरणीं । प्रीती सर्वदा असे." ॥ १६ ॥ ऐसा कृपानिधी, तिये प्रसंगीं । आज्ञा वदे अमरेशाल्यागीं । जैसा आदिपुरुषु बोले इच्छारंगीं । श्रुतिपूर्वी प्रजाप्रती. ॥ १७ ॥ श्रीरामाचें वचन ऐकोनी । समस्त सुख पावले मनीं । सर्वथा हो जी म्हणोनी । हस्तक इंद्रें जोडिले. ॥ १८ ॥ इंद्र म्हणे " करुणामूर्ती । जें जें होतें माझे चित्तीं । ते आज्ञा तुमची भाग्यगतीं । पावलों इये समयीं. ॥ १९ ॥ समयोचित स्वामि सांगणें । सांगिजे जरी सेवकाकारणें । तरी परम श्लाघ्यता परम भूषणें । मिरविजे लोकामध्यें." ॥ १२० ॥ इतुका शक्रासवें साचा । सवादु ज्याशीं स्वादु अमृताचा । जाला जेणें वानरांचा । भाग्योदय फळला. ॥ २१ ॥ असो गतकथा इतुकी संपली । ते सविस्तर श्रोतीं परिसिली । जैसी वन्हाडियां जेवणावळी । झाली पूर्व दिवशीं. ॥ २२ ॥ का पूर्वनृत्यें रंगसोहळा । सभालोकीं देखिला डोळां । नाना प्रमातपुष्पाच्या परिमळा । मधुकरीं भोगिलें. ॥ २३ ॥ का पूर्वप्रहराची शार्वरी । चांदिणें भोगिलें चकोरीं । ना ते पूर्व सात विद्याधरीं । पाहिली अध्ययनाची. ॥ २४ ॥ रामकथा ऐशियापरी । कथिली ते महाचतुरीं । परिसली आतां पुढारी । पुढिलची वदों. ॥ २५ ॥ इति श्रीरघुनाथकथारगु । ऋषिकृत युद्धकांडउत्तरभागु । तो पुढील परिसा प्रसंगु । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १२६ ॥

---

## प्रसंग अडसष्टावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नम । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ आज्ञा दिधली रघुनाथें । मग शक्रें आपुलेनि सामर्थ्यें । अमृतधेनुसी अभीप्सितें । दोहों आरंभिलें. ॥ १ ॥ तत्काळ तिये अवसरीं । मेघु पीयूषाचा गगनोदरीं । निर्मिला जैसी मोहरी- । विद्यावंतु कळा रची. ॥ २ ॥ पाहतां

एकसरें अभ्र व्योमीं । दाटलें छाया पडली भूमीं । आच्छादला सहस्ररश्मी । शीतळ वायु सुटला. ॥ ३ ॥ दिशांबरी पडलें वडप । पश्चिमे प्रगटलें रेखाचाप । पूर्वे लखलखीत तळप । अमोघ विद्युल्लतांचे. ॥ ४ ॥ घनीं गर्जना मांडिली गंभीर । तेणें नादें विहंग वनचर । तल्लीन झाले आणि मयूर । नृत्य करूं लागले. ॥ ५ ॥ जैसें वर्षाती पुनर्वसु पुष्यीं । वरुषता अभ्र असे आकाशीं । तैसा मेघु वोळला सुधारसीं । वृष्टी करूं लागला. ॥ ६ ॥ उदारपणाचेनि स्वभावें सैरा । सुटल्या मोकळिया अमृतधारा । वृष्टी जाहली प्रेतसागरा । कपि ऋक्षांवरी. ॥ ७ ॥ तैसें मुहूर्तार्धे तत्काळ । भिजलें भूमंडळ । तेणें मरणपात्र ते सकळ । ऋक्ष वानर उठिले. ॥ ८ ॥ ऐसी महा अपूर्वता जाली । अमृतवृष्टी वोसरून गेली । सृष्टी आनंदें उचंबळली । अमरवार्धे लागली. ॥ ९ ॥ ऐसा देखोनि कथापंथु । श्रोतयां उपजला पृच्छास्वार्थु । म्हणती "कैसें हा वक्तेया ग्रंथु'। वदसि आपुलेनि रंगें? ॥ १० ॥ अपूर्व कथेचें चातुर्य । परी येक वाटतें अति आश्चर्य । समर्थी बोलतां न धरे धैर्य । म्हणोनि बोलतों आम्ही. ॥ ११ ॥ वानर ऋक्ष कोट्यानुकोटी । प्रेतें होऊनियां पडलीं रणवटीं । ते समयीं इंद्रें उठविले शेवटीं । अमृतवृष्टी करूनी. ॥ १२ ॥ पूर्वी वक्ता वदला ऐसी वाचा । जे बहु संहार जाला वानरांचा । तरी त्यांच्या शरीरांसी ठावो कैंचा । छिन्न भिन्न जाले. ॥ १३ ॥ राक्षसांच्या संघट्टनीं । विदारिले धरणीं । अस्थि चूर्ण जालिया विखरौनि । वाळुऐसे जाले. ॥ १४ ॥ एकांचीं समुद्रीं पडलीं शिरें । त्यांसि गिळुनी गेलीं जळचरें । श्वापदीं कितीएकांचीं शिरें । तोडूनि नेलीं. ॥ १५ ॥ रणीं पडलेयां भूतावळी आली । तेंहीं बहुतें प्रेतें भक्षिलीं । रणगीधीं वरचेवर नेलीं । करचरण फाडोनी. ॥ १६ ॥ महा संग्रामाचा समयीं । छेदले राक्षसांच्या शस्त्रायीं । उचमार्गेही सव्ही ठायीं ठायीं । कबंध अंतरले. ॥ १७ ॥ कितीएक सहस्र यांहीवेगळे । कुंभकर्णे ग्रासिले सगळे । जैसे नवनीताचे गोळे । त्यांसि ठावोचि नाहीं. ॥ १८ ॥ पडले जे कुंभकर्णाचां उदरीं । त्यांसि निर्गम नव्हेचि बाहेरी । मृत लवु जित अंध विवरीं । तैसी गती त्यांसी जाली. ॥ १९ ॥ शेल्दरीं पडिले दग्ध श्वापदीं । कां पाषाण बुडाले हृदीं । नाना तळपतीं म्हणती जिये नदी । तियेमध्यें रत्नें जैसीं. ॥ २० ॥

ऐसी नानापरी जाहली वानरांतें । त्यांसि कैसे जिवविलें अमृतें । भिंतीचि नाहीं तेथें । चित्र निर्मिलें कैसें ? ॥ २१ ॥ जे निर्जीव संचले होते देहीं । ते अमृतें उठविले हें घडलें कांहीं । जयांसि सर्वथा ठावो नाहीं । ते जिवविले हें आश्चर्य. ॥ २२ ॥ आणिक आइका याहीवेगळें । संग्रामभूमीचें रण खळे । त्यामध्यें मळणी एकमेळें । जाली कपिराक्षसांची. ॥ २३ ॥ जैसें एका घाणेयांचां पोटीं । दोपरिंचीं काटें लाटेचे संवटीं । चूर्ण होउनि गेलेयासेवटीं । एकभेंड होती. ॥ २४ ॥ कां एकावन वयासरिसे । बहु जातिवृक्ष दग्ध एकमुसे । एकत्र कृष्णवर्ण कोळसे । ढीग होवूनि पडले. ॥ २५ ॥ ऐसी परी जाली कपिराक्षसांतें । मिळोनि जुडोनि पडलीं प्रेतें । तेथें मेघ वर्षला अमृतें । इंद्राचेनि वैभवें. ॥ २६ ॥ जालें पीयूषवृष्टीचें पर्व । तेणें भिजलें प्रेतमंडळ सर्व । ऋक्ष वानरचि उठिले हें अपूर्व । नुठतीचि राक्षस. ॥ २७ ॥ प्रेतें होतीं एकवाटें । वरी अमृत पडलें परिपाटें । ऋक्ष वानरची उठिलें हें मोठें । आश्चर्य वाटे. ॥ २८ ॥ जरी अमृताचा सेवटीं गुणु । गेला परतोनि आणि प्राणु । तरि जीतीचि ना राक्षस हा कवणु । अभिप्रावो कां न कळे. ॥ २९ ॥ नदी चालत उचंबळत तटाकें । ते तीरस्थातें निववी उदकें । शाखुनि पाडी पारकीं कटकें । ऐसें कदा न घडे. ॥ ३० ॥ इक्षुदंडरसु घाणीआंतुन लोटे । तो गुव्हारियासी गोड वाटे । पारकेयां मुखीं कडुवटे । ऐसें कदा न घडे. ॥ ३१ ॥ उदयाचळीं उगवोनि रवी । तो पवित्रातें प्रकाशु दावी । अंत्यजातें अंधकारीं गोवी । हें कदा न घडे. ॥ ३२ ॥ उत्तमाधम नौकारूढ जाले । उत्तम तरूनि पैलतीरा गेले । अधम मध्येंचि बुडाले । हें कदा न घडे. ॥ ३३ ॥ म्हणोनि ज्यातें सात्विक गुण । त्यासि पालट करूं शकेल कोण । नाहीं सर्वथा वैरमित्रपण । भेदबुद्धी कैंची ? ॥ ३४ ॥ येणें न्यायें आमुचां चित्तीं । आश्चर्य वाटे पुढतपुढती । अमृतासि गुणभेदु जाला गती । कोण हे न कळे. ॥ ३५ ॥ कपिराक्षसांचीं प्रेतें पृथ्वीवरी । एकवाट पडलीं त्यांसी अमृतधारीं । सिंचन योजिलें परी । वानर उठविले." ॥ ३६ ॥ ऐसें नवल करूनि श्रोते । सभामंडळीं जाले बोलते । ज्यांचिये पृच्छालक्षणसरिते । तरतां परम कष्ट. ॥ ३७ ॥ बोलिल्यानंतर सभाचतुर । वक्ता देता जाला उत्तर । म्हणे "श्रोते हो हें अभ्यंतर

तुम्हांसिचि कळलें. ॥ ३८ ॥ सभाचिये पाठीमरी । पुतळिया खेळती कुसरीं । परी वागविता कळाशेरी । तो वेगळा असे. ॥ ३९ ॥ आइका हो ज्या इंद्राकारणें । अवतार धरिला नारायणें । तयाचें हें अवर्ये करणें । लीला करूनि. ॥ ४० ॥ कपि उठविले पर्जन्यामृतें । हें यशचि दिधलें इंद्रातें । पाषाण तारिले नळाचेनि हातें । त्याचि परी. ॥ ४१ ॥ जैसें द्रव्य देउनि आपुलें । समर्थें प्रीतिपात्राहस्तें वांटविलें । तैसें इंद्राकरूनि उठविलें । ऋक्षवानरांतें. ॥ ४२ ॥ ज्यानिमा इच्छेकरूनि उदंडें । होती प्रपंचगर्भब्रह्मांडें । पुनरपि अळतारूखंडें । विघसुनि जाती. ॥ ४३ ॥ तेणें धरिला लीलावतारू । केला दुष्टांचा संहारू । फेडिला पृथ्वीचा भारू । सुख देत साधूतें. ॥ ४४ ॥ राक्षस संहारूनि साविले । कपि ऋक्ष कृपा उठविले । इच्छा ईश्वराची न कळे । कदापि कोणासही. ॥ ४५ ॥ जैसा चंद्रें स्वकिरणीं । सोमकांता द्रावी अवकणीं । परी कृष्णवर्ण पाषाणीं । कोरडेंचि राहिजे. ॥ ४६ ॥ मेघु गर्जनाशब्द सांडी । तेणें वायाच्या वळती मुरकुंडी । परी मयूर नाचती दुपाडी । पसरूनि पिच्छें. ॥ ४७ ॥ म्हणोनि कर्ता करविता श्रीरामु । अनातसकळकामु । सर्वांमा सर्वोत्तमु । भक्तांसी प्रसन्न. ॥ ४८ ॥ बुडाले संग्रामपुरप्रवाहीं । वानर तरले तितुकेही । पूर्विलापरिस दिव्यदेहीं । जाले हृष्टपुष्ट. ॥ ४९ ॥ ऐसा प्रतापमहिमा रामाचा । शेषादिकांसि न वर्णवे याचा । का शतकोटिसिंधुबुद्बुदांचा । वदला वाल्मिकऋषी.' ॥ ५० ॥ असो ऐसें वक्ता बोले । परिसौनि श्रोते संतोषले । आता पुनरपि कथा चाले । सहस्ररदना जैसी. ॥ ५१ ॥ इतुकें जालियाउपरी । कथा कैसी वर्तली । पुढारी ते परिसावी चतुरीं । चित्त देउनि ठायीं. ॥ ५२ ॥ किष्किंधेहूनि काळे ऋक्ष कपी । तितुकेही कल्याणरूपी । समुद्र तरोनि जावें पुनरपी । इच्छिती रामासरिसे. ॥ ५३ ॥ सकळ देव जोडले हस्तीं । रामासी विनती करिती । ऐसी "जें अयोध्येप्रती । गेलें पाहिजे. ॥ ५४ ॥ सर्व कार्यसंपादणी । जाली जी शरासनपाणि । आतां विलंबू न कीजे प्रयाणीं । पुष्पकारूढ होआवें. ॥ ५५ ॥ आपुलीये आज्ञेचिये समयीं । सुमनें आम्हांसि देई । तिये धरूनि आम्ही मस्तकाचां ठायीं । स्वर्गारोहण करूं. ॥ ५६ ॥ वडेनि चरणापोरें । अधिकारी राहों सुखें थोरें" ।

ऐसें विबुधीं वदतां कृपासागरें । बोलिजे देवांप्रती. ॥ ५७ ॥ म्हणे "सुर हो आतां परमानंदें । पावा आपुलीं अधिकारपदें । समवेत प्रियपात्रवृंदें । भोग भोगीत असा. ॥ ५८ ॥ होते रावणादिक राक्षस । तंववरी कष्टलेती बहुवस । पूर्वस्थिती निर्दोष । निजधामीं सुखें राहा. ॥ ५९ ॥ अत्यानंदें निजाश्रमीं । निर्भयें राज्य करा तुम्ही । विसरों नका आतां आम्ही । अयोध्येप्रती जाऊं." ॥ ६० ॥ ऐसें रघुनाथें बोलिलें । देव आनंदें रचंबळले । जयजयकारें गर्जिन्नले । पिटिली टाळी. ॥ ६१ ॥ आज्ञा जाली श्रीरामाची । सुदर्प करूनी त्रिश्वनाथ विरिंची । उठिले, सकळ सुरांची । सभा विसर्जली. ॥ ६२ ॥ सर्वोत्तमासि सव्य घालुनी । निगाले आरूढोनि निजवाहनीं । लागल्या दिव्य वाद्यध्वनी । मेरुमार्ग लंघिती. ॥ ६३ ॥ उन्हाचे चान्ही दिवस जाले । वन्हाडी आपुलाल्या गांवासि चालिले । तैसे सुर समस्त गेले । संतोषें स्वर्गाप्रती. ॥ ६४ ॥ काम करूं गेलिया त्रिवेणीतटाक । सांडूनि पन्हा जाये सकळीक । तैसे लंकाप्रदेशींनि कटक । सुरांचें स्वर्गा गेलें. ॥ ६५ ॥ ऐसें जालियाउपरी । बिभीषण जोडिलां करीं । रामासन्मुख प्रिय उत्तरीं । बोलता जाला. ॥ ६६ ॥ म्हणे "सर्वोत्तमा इये अवसरीं । सीते सौमित्रासहित निजमारीं । चालावें जी लंकेभीतरीं । पवित्र करावें या. ॥ ६७ ॥ मंगळस्नानें करूनि स्वामी । वस्त्रालंकार अंगीं करावे तुम्हीं । उच्छिष्ट प्रसादु द्यावा ऐसें मी । प्रार्थितु आहें जी. ॥ ६८ ॥ शुभें मुहूर्तें यानंतरें । प्रयाण करावें कृपासागरें । पुष्पकारूढ समभारें । चालावें अयोध्येप्रति." ॥ ६९ ॥ ऐसीं बिभीषणाचीं वचनें । परिसिलीं पुंडरीकनयनें । मग तयाप्रती हास्यवदनें । बोलता जाला. ॥ ७० ॥ म्हणे "समयींचें उचित लंकानाथा । तूं तरी बोलिलासी समर्था । परी हें न घडेल कथा । किंचित परिसावें. ॥ ७१ ॥ आम्ही वनवासा आलों त्रिवर्गे । पिता परलोकासी गेला मागें । भरत शत्रुघ्न मातुळींहूनी वेगें । आणविले होते. ॥ ७२ ॥ तेंहीं विपरीत आइकोनी । अत्यंत दुःख धरिलें मनीं । बहु प्रार्थिलें पुरोहित प्रधानीं । परी न घेतीचि राज्य. ॥ ७३ ॥ प्रीतिपडिभरू आमचा ठायीं । गुरुहोनि आणावें हृदयीं । धरूनि राज्यैसि चालिला पायीं । आमचिये शुद्धी येत. ॥ ७४ ॥ पुढें वाल्मीकाश्रमीं

चित्रकूटीं । त्यांसी आम्हां झाली भेटी । आपुतें देखिलें जैसें दृष्टीं । तेचों दीक्षा घेतली. ॥ ७५ ॥ धरिलीं वल्कलें योगपट्टा । वटदुग्धें कवळिल्या जटा । न जायेचि अयोध्येचे वाटा । नंदिग्रामीं राहिला. ॥ ७६ ॥ भाप घेतली असे आमची । अवधी केली चतुर्दश वर्षांची । वाट पाहतसे जैसी गौची । वत्स पाहे. ॥ ७७ ॥ आम्हांकारणें तेणें भरतें । इथे स्थिती असिजे उदासचित्तें । तरी त्यावाचुनि आधीं कोणें मतें । मंगळस्नानें करावीं. ॥ ७८ ॥ भरताचिये भेटीचां अर्ती । मंगळस्नानें सकळांसी होती । ऐसें आहे गा लंकापती ! । आता एक करीं. ॥ ७९ ॥ तुझिये हृदयींचा जो भावो । तो सर्वथा सिद्धी जावो । कपिसहित किष्किंधरावो । प्रियवादें पुजावा. ॥ ८० ॥ मंगळस्नानें करावीं । दिव्य भूषणें अंबरें द्यावीं । दिव्य खाद्यें समर्पावीं । नाना रुचिचीं पैं. ॥ ८१ ॥ सुग्रीवाची करिसी पूजा । ते आम्हांसी पावेल लंकानाथा । जैसी ब्राह्ममुखें अनंतभुजा । तृप्ती होतसे जाण. ॥ ८२ ॥ हा सुग्रीव स्नेहाचा निधी । वीरू धीरू उदार महाबुद्धी । याचेनि साह्यसंगें सिद्धी । बहु कार्यें गेली. ॥ ८३ ॥ हें तरी बिभीषणा मानसीं । चतुरा तू सर्वही जाणसी । सुग्रीवाचा उपकारू आम्हासी । उत्तीर्ण न होईल. ॥ ८४ ॥ रातला आमचिये मैत्रीचेनि रंगें । पुत्र कलत्र राज्य सांडिलें मागें । केवढी करणी संग्रामप्रसंगें । याचि तुवां देखिली डोळां." ॥ ८५ ॥ ऐसा सर्वेशु राजाधिराजु । बोलिला बिभीषणा उजु । तिये काळीं तपनाचा तनुजु । आनंदें उचंबळला. ॥ ८६ ॥ आपुलें यश कीर्तन मुखें । आइकतां वाटे पीयूषासारखें । तुकिता उपजलेनि सुखें । मेरूमंदर हलु. ॥ ८७ ॥ पुढील आपली स्तुति करी । धन्य जिणें हाचि लाभ संसारीं । आणि परमुखीं अपकीर्ति तरी । परम हानिमध्यें. ॥ ८८ ॥ म्हणौनि सुग्रीव बहु भाग्याचा । श्रीरामु आपुलिया मुखाचा । कीर्ति वदला जो देवांचा । आदिदेवो होय. ॥ ८९ ॥ असो हें कृपार्णवाचें बोलणें । आइकौनि भक्तें बिभीषणें । प्रार्थिलें कपींद्राकारणें । समस्तां कपींसहित. ॥ ९० ॥ म्हणे "चला हो लंकेभीतरीं । कृपा करावी सेवकावरी । मी माग्याचा तुम्ही उपकारी । मज जोडलेति सखे. ॥ ९१ ॥ बोलौनि स्नेहाचीं उत्तरें । सुग्रीव धरिला आदरें करें । सकळ कपींसी गजरें । नियाला बिभीषण. ॥ ९२ ॥ लंकेमध्यें आणूनि परिवारेंसीं ।

अनुक्रमें पृथक् पृथक् पूजा । करिता जाला कपींची राजा । नूतनु राक्षसांचा. ॥ ९३ ॥ मर्दिलों दिव्यपुष्पतैलें । पूर्ण उष्ण जलें मार्जन जालें । नूतन अंबरें देऊनि बैसविले । समस्तांसि आसनीं. ॥ ९४ ॥ लाविलें चंदनपरिमळ । वाइलें भूषणांचे झळाळ । दिव्य पुष्पमाला खाद्यें तांबूळ । समर्पिलीं सर्वांसी. ॥ ९५ ॥ ऐसें कपिराया गौरविलें । हस्त जोडुनि प्रार्थना बोले । "परम सदैव मी मज जोडले । मित्र तुम्हांऐसे. ॥ ९६ ॥ पाहा हो शुभकाळाची गती कैसी । रत्नें डोळां देखिलीं तुम्हांऐसीं । मज थोर केलें मेरूसीं । मी तुळना पावलों." ॥ ९७ ॥ ऐसा विभीषण बोले बोल । किती नम्रता बहुसाल । सकळांसि वाटलें गोड । अमृतपानाहुनि. ॥ ९८ ॥ अति भक्तिभावो विभीषणाचा । देखोनि सुग्रीव वदे वाचा । "तूं सखा जन्मांतरींचा । ऋणानुबंधें भेटलासि. ॥ ९९ ॥ पूर्वजन्मीं गुप्त दान घडे । तरी इये जन्मीं ठेवणें सांपडे । तैसें पूर्विल्या ऋणानुबंधें । जोडे मित्र पुत्र कलत्रादिक. ॥ १०० ॥ आपुलेनि भाग्ययोगें । आणि समर्थांचेनि संगें । तूं सखा जोडिलासि स्नेहरंगें । रातलों तुझेनि." ॥ १ ॥ वधूवरांचिये मिळणीं मंडपीं । सुहृद सखे आनंदरूपी । स्तुती बोलती तैसे कपी । आणि राक्षस प्रेमें. ॥ २ ॥ विभीषण सुग्रीवाप्रति आगळी । वदोनि प्रियवचनबोली । सभा विसर्जुनि रामाजवळी । तत्काळ समग्र आले. ॥ ३ ॥ नरेंद्रासन्मुख अवघे जनीं । नमस्कार घातले साष्टांग धरणीं । पुढें विभीषण जोडुनि पाणी । उभा राहिला असे. ॥ ४ ॥ तयाप्रति बोले दयासिंधु । म्हणे "बैस गा तूं आमचा पंचम बंधू । परम वैष्णवु परम साधु । सदाकाळ सुखी असें. ॥५॥ राज्य करीं तूं लंकेसी राहें । जंववरी गंगा पृथ्वीवरी वाहे । आणि माझी कथा आहे । लोकत्रयामध्यें. ॥ ६ ॥ मंद, बुध, गुरू, अंगारकु, भृगुनंदन, केतु, राहो, शशांकु । गगनीं आहे आणि अर्कु । तंववरी राज्य करीं. ॥ ७ ॥ आतां तूं राहें आम्हां आज्ञा देईं । सुस्मरण असों दे गा हृदयीं । आम्ही प्रयाण करूं इये समयीं । सुमुहूर्त असे." ॥ ८ ॥ ऐसी कृपार्णव बोले वाचा । वोघु वाहतु अमृताचा । परी विभीषणु स्नेहला गहिंवराचा । पानला पुरू. ॥ ९ ॥ आंगीं रोमांच उभे राहिले । उचंबळोनि डोळे दाटले । कंठू सद्गदितु जाला, बोले । रघुनाथाप्रति.

॥ १० ॥ "चातका जीमूतीजीवनाची अनिच्छा । गोक्षीरपानें विटु वाटे वच्छां । वारनिधीचा उबगु ये मत्स्या । हें कैसें घडे जी ! ॥ ११ ॥ दरिद्री घरी द्रव्याचा कंटाळा । क्षुधिता अमृतान्न ना आवडे डोळां । तापला पळे छायेवेगळा । हें कैसें घडे जी ? ॥ १२ ॥ म्हणोनि जिवाचा जीवनु तूं स्वामी । तुज कैसियापरी विसरैनें मी । निरंतर अंतर्यामीं । ठाणें केलें आहे. ॥ १३ ॥ सुख तुझिये चरणारविंदीं । ऐसें नाहीं विरिंचिपदीं । तुम्हा सन्निध अमृतनदी । अखंड वाहती आहे. ॥ १४ ॥ तव चरणाश्रियें सुखावरुनी । नानासुखें सांडावीं वोवाळुनी । सनकादिक त्यांचाळे ध्यानीं । ध्याती सर्वदा. ॥ १५ ॥ अहो जगज्जनका जानकीरंगा । दयाब्धि भक्तभवभंगा । तुझा अगाध पदमहिमा गंगा । जेथोनि पुण्यतोया. ॥ १६ ॥ शापें अहिल्या जाली शिळा । ते तत्काळ जी तमाळनीळा । चरणस्पर्शे दिव्यदेहकळा । पावोनि गेली. ॥ १७ ॥ परम पुरुषु तूं पुरातनु । महामायातीत षड्विकारविहीनु । लीलाचरित्र दाखविसी जनु । जैसा वर्तनु आहे. ॥ १८ ॥ असो ऐसिया जीवा परमानंदा । तुम्हावेगळें नव्हतें कदा । चित्त चरणीं रातलें सदा । सन्निध असतें वाटे. ॥ १९ ॥ पारि मन मागोदयो नाहीं इतुका । परतें सांडिलें देउनि लंका । आतां इच्छा तुझी रघुनायका । ठेविसी ठाऊन तैसें. ॥ २० ॥ आतां प्रयाण करा सुमुहूर्तें । मी बोळवित येईन सांगातें । भेटाल शत्रुघ्न भरतातें । तें कौतुक पाहीन. ॥ २१ ॥ अनळोकीन अयोध्यानगर । तुम्हीं राज्यासनीं होमाल स्थिर । तो समारंभु सविस्तर । देखैन डोळां. ॥ २२ ॥ सुग्रीवादिक समस्त कपी । आज्ञा पावती आनंदरूपी । तैसा मी देवा पुनरपी । आज्ञा वंदीन तुमची." ॥ २३ ॥ ऐसा विभीषणु बोले । जे भक्तिरसें आर्तले । ते परिसोनि सकळ संतोषले । साधु साधु म्हणती. ॥ २४ ॥ रघुपतु म्हणे "सर्वथा । अयोध्येप्रति यावें लंकानाथा । समारंभु देखसी ते जाउनि कथा । आठवीतु राज्यीं रहें. ॥ २५ ॥ ऐसा जालिया वचनवोळी । तेंव विभीषणाचा मंत्री तये काळीं । पुष्पक विमान भूमंडळीं । आणोनि ठेविलें. ॥ २६ ॥ तें विमान अति विस्तीर्ण पसरट । जैसें पृथ्वीसमान दरेयाचें तकट । क्षीराब्धि मथुनि चोखट । नेणों रिघाले आहे. ॥ २७ ॥ सुग्रीवळ भन्न

सुंदर । सुख देतें रम्य मनोहर । पुण्यरूप पवित्र गुणगंभीर । वाहन वैश्रवणाचें. ॥ १२८ ॥ असो देखिये पुष्पकीं । तर्जनी लाउनि मस्तकीं । रघुनाथु आरूढ, अंकीं । जानकी बैसविली. ॥ १२९ ॥ आतां श्रीरामाचिये आज्ञेकरूनी । समस्त बैसते जाले विमानीं । ते कोणकोण किंचित वचनीं । कथीं श्रोतयांपुढें. ॥ १३० ॥ इति श्रीयुद्धकांडकथा इतुकी । जाली ते वदला वाल्मीकी । पुढें वर्तेल तें परीसावें प्रश्निकीं । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ १३१ ॥

---

## प्रसंग एकुणसत्तरावा.

ॐ श्रीरामसचिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ भरताग्रजाचा दक्षिणभागीं । बैसला जाली लक्ष्मणालागीं । तैसाचि आपुलेनि अंगलगीं । सुग्रीव आरूढला. ॥ १ ॥ आणी आतमदळेंसि अंगदु । बैसला नक्षत्रेंसीं जैसा इंदु । नीळु सेनापती आणि मैंदु । स्वसेनेसीं बैसले. ॥ २ ॥ बैसला नीळु शिल्पतारकु । बैसला जांबुवंतु ऋक्षनायकु । बैसला हनुमंतु ज्याचा जनक । लोकपाळु वायु. ॥ ३ ॥ बैसला कपि प्रभंजनु । बैसला ऋक्ष सनादनु । बैसला पावकलोचनु । आणि हेमकूटु. ॥ ४ ॥ सुखेनु बैसला वेद्यराजु । बैसला गवाक्षु आणि गजु । विनतु, क्रथनु, फनस, प्रभजनु । दळेंसि बैसले. ॥ ५ ॥ बैसला गंधमादनु, द्विदु । बैसले केसरी, कुमुदु । ज्याचा मेघासम शब्दु । तो दधीमुखु बैसला. ॥ ६ ॥ बैसले सुमुख, दुर्मुख, रंभु । बैसला गोमुख, ऋषभु । तळपन, ध्वजु आणि शरभु । हेही बैसले. ॥ ७ ॥ ऐसे ऋक्ष आणि वानर । आपुलाला दळेंसि महावीर । विमानें बैसले अवतार । जे देवाचे अवतरले. ॥ ८ ॥ ऋक्ष, वानर कोट्यानुकोटी । जितके होते भूतळवटीं । तितुकेही पुष्पकारूढ, पोटीं । परमानंदु झाला. ॥ ९ ॥ तरावयालागीं सागरू । रत्नीं संपूर्ण झालें तारूं । तैसा कपिदळवेष्टित रघुवीरू । पुष्पकारूढ झाला. ॥ १० ॥ कां गगनाचा उदरीं । तारागणें वायुचक्रशिरीं । तैसें श्रीरामेंसह वानरीं । मिरविजे पुष्पकीं. ॥ ११ ॥ नाना मेरूचें पाठारमस्तक । त्यावरी जैसें वासनाचें कटक । तैसे श्रीरामा वेष्टित सकळिक । वानर विमानारूढ.

॥ १२ ॥ सहस्रसंख्या किरणें नभपंथीं । आदित्य आरूढ एकचक्ररथीं । तैसा पुष्पकीं दाशरथी । शोभता झाला. ॥ १३ ॥ मग ऐसे कपी विमानावरी । हरुषें नादु केला तिये अवसरीं । आणि दिशा जयजयकारीं । दाटलिया दहाही. ॥ १४ ॥ आहे जे रघुनाथाचे मनीं । समग्रांचे इच्छेकरुनी । पुष्पक विमान गगनीं । प्रवेशलें झालें. ॥ १५ ॥ पूर्ण चंद्रबिंब प्रकाशलें । तें उदयाद्रीहुनी पश्चिमे चालिलें । तैसें पुष्पक वेगें निघालें । उत्तरें आकाशपंथें. ॥ १६ ॥ पुष्पकावरी वेष्टित घंटावळी । तियेचा घणघणाटु लागला निराळीं । मिरवती मुक्ताफळांच्या जाळी । हेलावती रत्नघोस. ॥ १७ ॥ ऐसें पुष्पक जात असे । गंधर्वनगरासारिखें दिसे । प्रभंजनु पुढां नेतसे । जळराशी वरुणी जैसी. ॥ १८ ॥ परमप्रीतिपात्र जानकी । राघवें बैसविली अंकीं । तियेप्रती बोले ह्मणे "अवलोकीं । अवघें क्षितिमंडळ. ॥ १९ ॥ पैल विशाळ त्रिकूटगिरी । सुवर्णमय याचे पाठारीं । दशकत्रय योजनें लंकापुरी । अपूर्व प्रिये पाहें. ॥ २० ॥ इये प्रदेशीं पैल रणमंडळ । युद्ध जालें तेथें तुंबळ । आटले राक्षस सकळ । घोर घोर वीर. ॥ २१ ॥ वल्लभे ज्यांचेनि भेणें । देवीं धरिलीं दांतीं तृणें । कुबेरापासुनी पुरुषार्थपणें । लंका हें पुष्पक घेतलें. ॥ २२ ॥ ते सहारिले सर्वही । बळसागर वज्रदेही । मेद मांस रुधिरें हे मही । बहुसाल भरिली. ॥ २३ ॥ येथें पडला प्रहस्तु प्रबळु । वज्रदंष्ट्री, धूम्राक्षु, अकंपनु । विरूपाक्ष, मकराक्षेचनु । इये रणभूमिसी पडले. ॥२४॥ सुपार्श्व, महापार्श्व, मोहोदरु, । अतिकाया वीर्यसागरु । त्रिशिरा बळाचा मेरु । ऐसे इये भूमीं पडले. ॥ २५ ॥ मत्त, महामत्त, युद्धोन्मत्त । कुंभ, निकुंभ वीर्यवंत । देवांतक, नरांतक, राजसुत । सर्वेही संहारिले. ॥ २६ ॥ दशाननाचा मुख्य बंधु । त्रैलोक्यपीडकु निद्रासिंधु । घोरसंग्रामु केला बधु । जाला इये स्थानीं त्याचा. ॥ २७ ॥ बहुत निधा कापटकळा । इंद्रजितु पुरुषार्थे आगळा । तो लक्ष्मणें वधिला निकुंभळा । ते पाहे पैल प्रिये. ॥ २८ ॥ टाकिती बहु शस्त्रास्त्रें । रामु नाहीं युद्ध रात्र अहोरात्रें । जाहेया देहो दशानर्ने । इयें स्थळीं ठेविला पाहें. ॥ २९ ॥ बहुती वेष्टित बहुपरी । शोक करिते हे मंदोदरी । तें पैल पाहे सुंदरी, । निमरणस्थळ. ॥ ३० ॥ कांते पाहें पां याउपरी । आम्हीं यादियों तो हा सुवेळाद्री । समुद्र अवलोकें जयावरी ।

नलें सेतु बांधिला. ॥ ३१ ॥ उत्तरतीर निहाळीं आतां । दर्भशय्ये मज नेमु होता । समुद्रु मूर्तिमंतु ससरिता । भेटला आम्हां येथें. ॥ ३२ ॥ पैल मलयाचळ, विंध्याचळ दिसे । पुढें किष्किंधा पाहें राजसे । पूर्वी येथें अंगदाचा पिता वसे । आतां सुग्रीवासी प्राप्त. ॥ ३३ ॥ वाळी वधिला इये भूतळवटीं । सुग्रीवा आम्हां जाली भेटी । तो हा ऋष्यमूक पर्वतु दृष्टीं । देखें दुसरा माल्यवंतु. ॥ ३४ ॥ हनुमंतु भेटला तो हा द्रुमु । पुढें पाहें शबरीचा आश्रमु । एथें कबंधू वधिला जया नेमु । सांपुडलें ग्रासीं. ॥ ३५ ॥ सीते पाहें गोदावरी ईचे तटीं । हेममृगु मारिला कपटी । पैल गुंफा पंचवटिका पाहें दृष्टीं । तुज येथूनि नेलें होतें. ॥ ३६ ॥ खर दूषणादिक राक्षस होते । समस्त वधिले येथें । पाहें शरभंगाचें स्थान गुणसरिते । येथें विरोधु वधिला. ॥ ३७ ॥ दिसे अगस्त्याश्रमु जानकी । त्याच्याही अनुजाचा अवलोकीं । चित्रकूट निहाळीं वाल्मीकी । जेथें वास्तव्य करी. ॥ ३८ ॥ आम्हीं कितीएक काळु येथें क्रमिला । भरतु भेटावेया होता आला । तो पुनरपि परतोनि गेला । राज्यें सहवर्तमान. ॥ ३९ ॥ भागीरथी उतरोनि आलों । आणि ये आश्रमीं राहिलों । आतिथ्यें परम सुख पावलों । येथें भरद्वाजु असे. ॥ ४० ॥ पाहें श्यामोदक कालिंदी । पाहें दुसरी शुभ्रजळनदी । हे भागीरथी मागुता जन्म नेदी । तटीं देहत्यागु जालेया. ॥ ४१ ॥ वृक्ष असती बहुसाळ । ते गुहकाची पाहें शृंगवेळ । पुढें नंदिग्राम पाहें पैल । जेथें भरतु आहे. ॥ ४२ ॥ इंदुवदने आतां पाहें । पुण्यतोया शरयू वाहे । इयेच्या तीरीं झळाळीत आहे । ते अयोध्या आपुली." ॥ ४३ ॥ ऐसा स्नेहार्णव नभमार्गीं । विमानीं जानकीयेलागीं । बैसविलें असतां वामांगीं । शब्दें सुख देतसे. ॥ ४४ ॥ सकळात्मा वदे वाचा । जैसा उचंबळे सिंधु सुधारसाचा । कां मेघु तो पीयूषाचा । अमृतबिंदु वर्षे. ॥ ४५ ॥ नित्यानंदु नरोत्तमु नरेंद्रु । राजाधिराजु बोले रामचंद्रु । तंव तंव सीतेचा सुखसमुद्रु । मर्यादा सांडी. ॥ ४६ ॥ लंकेपासोनि अयोध्यापर्यंत । सीतेसी दाखविलें समस्त । तंव पुष्पक आलें विराजित । भारद्वाजाश्रमासि. ॥ ४७ ॥ यानंतरें देवाधिदेवें । ऐसें इच्छिलें राघवें । जें भारद्वाजाश्रमीं उतरावें । भरतु बोलावूं येथें. ॥ ४८ ॥ ऐसें कल्पोनि चित्तीं । सौमित्रेंसी सवादु दे सुकीं । जैसा अरुणाप्रति भगवती । समयासारिखें

वदे. ॥ ४९ ॥ रावणें जें योजिलें । तें सुग्रीवादिकांसी आणिलें । मग विमानासि आज्ञापिलें । उत्तर म्हणोनी. ॥ ५० ॥ पुष्पक जात आपुलेनि वेगें । तें आज्ञेसरिसें स्थिरोनि उगें । अधोपथें वट्ट वेगें । भूतळासी आलें. ॥ ५१ ॥ भारद्वाजाश्रमानिकट । गति कुंठित जालें उद्भट । जैसें पयोधिचें अकस्मात तट । रत्नगर्भ पुढें पाहे. ॥ ५२ ॥ पक्ष पसरूनि गगनापोटीं । क्रमुनि गरुड क्षीरार्णवापोटीं । वैसता होये तैसें तळवटीं । पुष्पकु स्थिर जालें. ॥ ५३ ॥ कां रविबिंब उघूनि आकाशा । लागे वारुणीचिया कडवसा । तैसें ऋषिआश्रमप्रदेशा । पावलें पुष्पक. ॥ ५४ ॥ अलंकार जैसा मिरवे ग्रंथीं । तैसा पुष्पकीं शोभे दाशरथी । तो सकळ कपींसी भूपथीं । उतरूनि उभा राहिला ॥ ५५ ॥ सिंधुमथनांतीं सुरभारसरिसें । मध्यें लक्ष्मीनारायणु भव्य दिसे । तैसा कपिचक्रमुखीं शोभतसे । राम सीतेसहित. ॥ ५६ ॥ असो, अकस्मात आश्रमप्रदेशीं । अपूर्व देखिलें भरद्वाजशिष्यीं । आनंदु न समाये आकाशीं । गुरूतें शिघ्र सांगों गेले. ॥५७॥ ह्मणती "परिसा हो स्वामी । व्योमींहूनि विमान आलें भूमी । पृथ्वी आच्छादिली प्लवगमीं । स्त्रीसरें नरेंदु एकु." ॥ ५८ ॥ ऐसें विद्यार्थिया वदोन पुरे । तव भरद्वाजु उठिला त्वरें । ह्मणे "चाला हे सामोरे । आला रघुनाथु" ॥ ५९ ॥ ऐसें बोलोनि उतावेळा । सरिसा शिष्यांचा मेळा । आश्रमप्रदेशा आला तव डोळां । असमान्य देखिलें. ॥ ६० ॥ असख्यात ऋक्ष कपि पुढिलेंगें । राम लक्ष्मण जानकी त्रिवर्गें । देखिलीं जैसीं ध्यानयोगें । सर्वदा ध्यात होता. ॥ ६१ ॥ अतरंगीं असे नादतु । तैसा बाह्यरंगीं भासे मूर्तिमतु । ऐसेनि ऋषि आनंदें उचंबळतु । भाक्तरसें पानला पुरू. ॥ ६२ ॥ शीघ्र निकट आले ऋषीश्वरू । पुढें समस्तीं केला नमस्कारू । येरु कल्याण कल्याण म्हणे आदरु । चित्तीं भेटावयाचा. ॥ ६३ ॥ रामु जाऊनी उनवाहीं । त्यापासी उभा राहिला बाहीं । आलिंगना निघाला प्रेमडोहीं । मन सुराले ऋषींचें. ॥ ६४ ॥ यानंतरें सुमित्रासुतातें । भरद्वाजें स्नेहें बहुतें । आलिंगन दिधलें सकळातें । शब्दें सुख दाखविलें. ॥ ६५ ॥ मग भरद्वाज ह्मणे "रघुनाथा । धन्य अवतारु तुझा समर्था । तुटली त्रैलोक्याची व्यथा । भलें कार्य संपादिलें ॥ ६६ ॥ दंडकारण्यीं गोदातटाक । वसोनि केलें तुवा निष्कंटक । वधिले त्रिभुवनपीडक । रावण, कुंभकर्ण. ॥ ६७ ॥

घोर श्रम पावलों द्विजें आम्ही । जयवंत राज्यासि आले जी तुम्ही । चतु
र्देश वर्षे पंचमीं । आजि निगुतीं जालीं." ॥ ६८ ॥ ऐसा भारद्वाजाच
सुशब्दीं । राम म्हणे "जी तुमच्या आशीर्वादीं । कार्य संपादिलें अधिका
पदीं । विबुध बैसले." ॥ ६९ ॥ ऐसी गौरवश्री रामाची । जियेलागीं गग
नापरीस उंची । फळरसीं विशेषरु, विरचीं । लंकाप्रदेशीं गुप्त झाले
॥ ७० ॥ जियेचिये छायेच्या तळवटीं । गळित पावल्या सुरांच्या कोटी
कपिऋक्षांसि महामोठी । पुष्टी जाली. ॥ ७१ ॥ ऐसिये गौरववृक्षींचें
फळें । रामें ऋषींसीं अर्पिलीं रसाळें । जयाचें माधुर्य आगळें । अमृता
परीस. ॥ ७२ ॥ उपरी ऋषी रामातें म्हणे । "आजि धन्य दिनु तुम्
आले । आता आश्रमा चाला सुलक्षणे । सीतेसहित." ॥ ७३ ॥ ऐस
ऋषींचा शब्दसमारंभु । परिसौनि बोले वैदेहीवल्लभु । म्हणे "जि तुमच
आम्हांपरी लोभु । जनकाचियेपरी. ॥ ७४ ॥ प्रथम आम्ही येणें मार्गे
दंडकारण्यें जाता त्रिवर्गें । तैं तुमचां आश्रमीं प्रसंगें । पाहुणेरू जाला बहु
॥ ७५ ॥ तेणें शकुनें आम्ही मागुतें । क्षेमें आलों घेउनि सीते । पुनरपि
तुमचिये प्रीतीसरितें । तृप्ति पावलों. ॥ ७६ ॥ आता जो लाभु द्याल तुम्ही
तो सर्वथा घेऊन आम्ही । येणें कल्याणसुखें सदा आम्ही । आनंदमय
असों." ॥ ७७ ॥ ऐसें बोले विप्रप्रिय राजेंद्रु । उचंबळे ऋषींचा सुखस
मुद्रु । पुढें हनुमंताप्रती रामचंद्रु । बोलता झाला. ॥ ७८ ॥ म्हणे "अहे
कपि महाबुद्धी । तुवां महंत कृत्य नेलें सिद्धी । गुण वर्णवतीना तुझे, अधि
स्नेहाचा होसि. ॥ ७९ ॥ तरी आइकें गा मारुति । आजि राहाणें जाले
ऋषीं प्रीतीं । तरि तुवा जावें शीघ्रगती । तया पुढें सांगावया. ॥ ८० ॥
शृंगवेळेवरूनि होआवें । आम्ही आलों हें गुहकासि म्हणावें । मग नंदिग्रामा
जाउनि सांगावें । भरतासि समूळ. ॥ ८१ ॥ भावो कैसा त्याचा हृदयीं ।
तो अभिप्रावो अवघा घेईं । स्नेहो असाधारण आमचा ठायीं । कीं साधारण
आहे. ॥ ८२ ॥ कळेल उपकारि अनुवादीं । कोणें बैसावें राज्यपदीं । शत्रु
घ्नाची वासनानदी । वाहातसे कोणीकडे? ॥८३॥ ऐसें मत घेउनि हनुमंता ।
सामोरा येईं मागुता । तव अरुणोदय होतां । प्रयाण करू." ॥ ८४ ॥
ऐशी आज्ञा कपीप्रती । देता झाला करुणामूर्ती । हें सर्वांसी मानिलें, मारुती ।
तैसाचि निघाला. ॥ ८५ ॥ जातु पितयापरिस पथीं । उतरला यमुना,

भागीरथी । शृंगबेळ पावोनि गुहका दाशरथी । आले म्हणोनि सांगे.॥८६॥ रामु आले ऐसें आइकतक्षणीं । लोटला वज्रवपूचे चरणीं । आनंदु उदेला तेणें दाटणी । दश दिशां जाली.॥ ८७ ॥ भक्त जाणोनि हनुमंतें । आलिंगिला उचलिलेनि हस्तें । जैसें वहुकाळें भेटलेया मागुतें । प्रीतिपात्र आलिंगिजे. ॥ ८८ ॥ गुहकें तृणासन घातलें । आदरें कपिसी वैसविलें । पादप्रक्षाळुनि घेतलें । जळ मुखीं मस्तकीं. ॥ ८९ ॥ पुसिल्या रामाच्या चरित्रगोष्टी । येरें कथिल्या जैशा अमृताच्या मोटी । त्या परिसोनि संतृप्त परी पोटीं । भेटीची आर्ती. ॥ ९० ॥ गुहकु म्हणे "या तुजवरूनी । हें उत्तमांग सांडावें ओवाळूनी । परि रामु देखणें असे लोचनीं । वाट पाहें वहु दिवस. ॥ ९१ ॥ अयोध्याधीशु तो समर्थु । आत्मा माझा रघुनाथु । आला पुरला मनोरथु । जो होता हृदयीं. ॥ ९२ ॥ आतां उठीं या न लावीं उशीरु; । तव म्हणे वायुतनुज वीरु ।। "चला भरतासि श्रुत करूं । नंदिग्रामाप्रति जावें." ॥ ९३ ॥ ऐसें बोलोनि जोडलों हस्तीं । उठूनि त्वरें गुहक मारुती । चालिले नंदिग्रामाप्रती । पात्रळे मुहूर्तार्धे. ॥ ९४ ॥ प्रवेशले विस्तीर्ण पर्णकुटी । हनुमंतें भरतु देखिला दृष्टीं । रामपादुका जटाजूटीं । वाधोनि वैसलासे. ॥ ९५ ॥ तृणासनीं वल्कलधारी । शैव मुद्रा विभूती शरीरीं । धारणा योगियाच्या परी । शांत वसे सदोदितु. ॥ ९६ ॥ भरताचें साधुत्व देखिलें एवढें । हनुमंतु वोले वचन गाढें । म्हणे "जि रामु आले मज पुढें । सांगों पाठविलें तुम्हां." ॥ ९७ ॥ ऐसा कपिमुखांतुनि निघे शब्दु । जैसा सुधारसु गाळी इंदु । की तो अमृताचा हृदु । उचंबळोनि लोटला. ॥ ९८ ॥ भरतासि वाटलें ऐकोनि ऐसें । मग आसनींहूनि उल्हासें । धांवोनि हनुमंता एकसरिसें । क्षेमालिंगन दिधलें. ॥ ९९ ॥ परम हर्षे प्रीतिकरूनी । हनुमंतासी करीं धरूनी । सन्मुख वैसविलें आसनीं । भरतु बोलता जाला. ॥ १०० ॥ म्हणे "अमृतसिंधूचा अमृतपाटु । आणि क्षुधानिपापुढें मिष्टु । तैसा तूं शुभवार्ता सुमटु । घेऊनि आलासि कपी. ॥ १ ॥ सुधाविंदीहूनी चकोरांचा हारिणु । चकोराजवळ आला निजगणु । तैसा श्रीरामापासोनि सुलक्षणु । भेटों आलासि तूं. ॥ २ ॥ आतां कपिश्रेष्ठा स्नेहाळा दूता । सांगा हो समूळ शुभवार्ता । क्षेम राम, लक्ष्मण, सीता । कोण स्थानीं आलीं. ॥ ३ ॥ वाल्मीकाश्रमीं चिरकूटीं । मज रामाचि जाली

होती भेटी । तें यावें याची अवधी केली मोठी । चतुर्दश वरुषांची. ॥ ४ ॥ चित्रकूटपासौनि पडलें अंतर । दिवस गेले कठिण थोर । मुहूर्त पालटतां संवत्सर । वाटला मजलागीं. ॥ ५ ॥ तरी नवपंच वरुषांचा सिंधु मी । आजि पूर्ण तरलों पंचमीं । आतां श्रीरामु माझा स्वामी । मज भेटेल केधवां? ॥ ६ ॥ अष्टाविंशती अयनें चित्त आर्तलें । आतां चक्षुद्वयीं देखतांचि पाडलें । म्हणेन 'राज्य सांभाळीं आपुलें' । करिन नमस्कारू. ॥७॥ कैकयीनें मिथ्याभिलाषें वृथा । महादुःख दिधलें दशरथा । राज्यास न देतां रघुनाथा । वनवासा पाठविलें. ॥ ८ ॥ राज्य रामाचें, राम सर्वांचा स्वामी । आज्ञाधारक अनुज या आम्ही । हें सत्य धाचा साक्षी सूर्य भूमी । जन्मवरि जाण. ॥ ९ ॥ जे चतुर आमची जननी । विचारू न धरिंचि मनीं । म्हणे ठेवा परती मूर्ती । गुरुकासि पूजा करा. ॥ १० ॥ पूज्य मूर्ती करूनि वेगळी । पूजका समर्पी पुष्पांजळी । मुख्य वरू सांडुनि वळी । मृदंगीयासि ओवाळा. ॥ ११ ॥ ऐसी कैकयी नेणेचि कांहीं । पडली कुमतीनदीच्या प्रवाहीं । तियेसि प्रेरिलें पापरूप तेही । मंथरा दासी. ॥ १२ ॥ जालें होणारासारिखें । परी कैकयीकरणीचेनि दुःखें । देहो दशरथें ठेविला जगमुखें । तियेसि अपयश आलें. ॥ १३ ॥ वना गेलेया राम, लक्ष्मण, जानकी । राज्यासि जाली निर्नायकी । मग चित्त माझें वसिष्ठादिकीं । परोपरी संबोखिलें. ॥ १४ ॥ कळंकु बैसेल रविमंडळीं । पाप प्रवेशैल गंगाजळीं । तरि मज इच्छा कोणे काळीं । राज्याची होईल. ॥ १५ ॥ पूर्वजपरंपरा आपली । बहुप्रीतीं अयोध्या भोगिली । परी हे कोणा सांगातीं नाहीं गेली । जैसीचि आहे. ॥ १६ ॥ अहो राज्य भोगणें हेंची थोर । जें भलें म्हणती ज्ञाते चतुर । वरकड पाहतां सर्वही नश्वर । विरंचीपदपर्यंत. ॥ १७ ॥ रामु वनवासा गेल्यासेवटीं । मी राज्य न पाहेंची दृष्टीं । पादुका ठेवूनी जटाजूटीं । ये नंदिग्रामीं राहिलों. ॥ १८ ॥ तरी वाट पाहतां आला रघुनाथु । पुरला माझा मनोरथु । आतां येथुन हाचि स्वार्थु । जे सेवा घडेल त्याची."॥१९॥ ऐसीं भरताचीं वचनें । जैसीं विवेकसमुद्रींचीं रत्नें । कीं तीं ये बुद्धिभूमीचीं निधानें । प्रकट जालीं. ॥ २० ॥ कीं सत्वनंदनवनींचीं शतपत्रें । कीं वैराग्यव्योमिचीं नक्षत्रें । नाना तियें तीर्थें पवित्रें । ज्ञानगंगेचीं. ॥ २१ ॥

कीं तियें चातुर्यतडागींचीं पद्में । कीं तियें धर्मचंद्रींचीं रश्में । नाना भक्तिमार्गींचीं सुगमें । विश्रांतिस्थळें. ॥ २२ ॥ हनुमंतु आइकौनी अंतःकरणीं । म्हणे हा साधुमुकुटमणी । मग भरताप्रती मधुरा वाणी । वदता जाला. ॥ २३ ॥ म्हणे "अहो राजराजात्मजा । अहो राजराजानुजा । अहो राजतनयाग्रजा, सुबुद्धिसमुद्रा ! ॥ २४ ॥ समर्थ आठवी कृपासिंधु । म्हणे कीं भरतु एकु माझा बंधु । माझी दीक्षा धरूनि साधु । राज्यातीत राहिला. ॥ २५ ॥ ऐसें बोले वेळोवेळां । तें आजि म्यां देखिलें डोळां । उत्तम दशावृत्ती लीळा । योगियाची जैसी. ॥ २६ ॥ भरता निजपुण्याद्रिपासुनि पाहें । प्रीतिलक्षणनदी निगाली आहे । ते भक्तिभूमीवरि अमळ वाहे । कृपार्णवीं मेळा मिळलासे. ॥ २७ ॥ तुझिये हृदयींचा स्वार्थु निघाला । जैसा सर्पु विळावाहेरी गेला । अपयशाचा तंतु तुटला । उर्णतंतु तुटे जैसा. ॥ २८ ॥ तूं अवतारपुरुष महामति । मी किती करीन तुझी स्तुति । तूं एकु परि तुझी कीर्ति । चतुर सिंधु पावली. ॥ २९ ॥ दिवली रामराज्याची सांडणी । ऐसा परिसिला नाहीं कोणीं । युद्ध करूनि समरांगणीं । राज्य घेती गोत्रज. ॥ ३० ॥ अप्रसंगें पडलें बोलणें । आइका हो सुग्रीवें आणि बिभीषणें । श्रीरामाकरवीं राज्याकारणें । निजबंधु वधविले. ॥ ३१ ॥ म्हणौनि ऐसा हा राज्याभिलाषु । याचेनि स्वार्थे बहुतां लागला द्वेषु । परी तूं वीरपुरुषु । आजि देखिलासि." ॥ ३२ ॥ ऐसें बोलौनि कपिवीरू । भरतापुढें सर्व रामाचारू । कथिला चरित्रसागरू । रघुनाथाचा. ॥ ३३ ॥ पुनरपि वदे वायुतनुजु । म्हणे "ब्रह्मर्षि भरद्वाजु । तयांच्या आश्रमीं रघुराजु । येऊनि राहिले. ॥ ३४ ॥ आजिचे दिनीं प्रीतिपूर्वक । रघुनाथु कपि आणिक । राहिले परी उदेक । प्रयाण करूनि येती." ॥ ३५ ॥ ऐसें वायुतनयो बोले । तेणें बंधुत्व आनंदलें । तेणें प्रांत पूर्ण जाले । दिग्मंडळांचे. ॥ ३६ ॥ तदुपरि तिये अवसरीं । भरतु शत्रुघ्नासि आज्ञा करी । म्हणे "शीघ्र शृंगारीं पुरी । अयोध्या राजधानी. ॥ ३७ ॥ सांगावें सुमंता प्रधाना । चालवावी चतुरंगसेना । प्रीतिप्रबुद्धा जना । सरिसें घेऊनि निघा. ॥ ३८ ॥ कौसल्या मुख्य करूनि माता । शिबिकारूढ चालवा समस्ता । प्रथम पुढें करूनि पुरोहिता । गुरुवसिष्ठासि. ॥ ३९ ॥ अरुणोदया पूर्ण एकसरें । समारंभ

श्रीरामा सामोरें । समस्त सहपरिवार त्वरें । चालवा दक्षिणमार्गें."॥ ४० ॥ ऐसें भरतु सांगे शत्रुघ्नाप्रती । येरें तितुकेंही धरिलें चित्तीं । परमानंदें शीघ्रगती । अयोध्येसी गेला. ॥ ४१ ॥ मार्गीं नंदिग्रामीं भरतु हनुमंतु । सांगतां श्रीरामाची मातु । क्रमित राहिले जंववरी प्रांतु । शार्वरीचा होये. ॥ ४२ ॥ आतां प्रात:काळ जालेया सकाळिक । श्रीरामा सामोरें चालेल कटक । तो समारंभु महाकौतुक । वदलासे वाल्मीकु. ॥ ४३ ॥ इति श्रीरामायणु ऋषिनिर्मित । उत्तरभागु कथा पृथक् प्राप्त । ते परिसा सज्जन हो सुचित्त । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ १४४ ॥

---

## प्रसंग सत्तरावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ ऐसें भरतु चढलेयावरी । शत्रुघ्न प्रवेशला पुरी । चित्तवृत्तीसी लोटती लहरी । आनंद-सिंधुचिया. ॥ १ ॥ पितयाचा पुरातनु । सुमंतु नामें ब्राह्मणु । तो सकळ राज्याचा लोचनु । बुद्धीं बृहस्पती जैसा. ॥ २ ॥ त्यासि श्रीरामाचे ठायीं । परम प्रीति असे हृदयीं । पूर्वरंगु स्मरोनि समयीं । वियोगें खेदु मानी. ॥३॥ दशरथें रघुनाथातें । राज्यपद देवों मांडिलें होतें । हे सुमंतानुमतें । विचारणा जाली. ॥ ४ ॥ पुढें कैकेयीचिया कुबुद्धी । तिये काळीं राहिली राज्यासनविधी । आणिक जावें होतें सिद्धी । म्हणोनि विपरीत जाहलें. ॥ ५ ॥ कैकेयीप्रसंगें राजा अनर्थी । पडलेया वनवासपंथीं । त्रिवर्गें बैसऊनि रथीं । सुमंतें लाविलीं. ॥ ६ ॥ गुहकाचिये शृंगबेळपर्यंत । रथेंसि गेला समवेत । तिये समयींचें उचित । तितुकें संपादिलें. ॥ ७ ॥ बोळवूनि वातलें रघुनाथा । परततां वाढली लज्जा व्यथा । मग पाळवें झाकोनि मौथा । पुरी प्रवेशला. ॥ ८ ॥ पुढें निर्नायकी जाली राज्यीं । शून्य पडले नगरामाजी । म्हणौनि धरिली चिंता काळजी । सुखातीतु सर्वदा. ॥ ९ ॥ रामु कै येईल मागुता । म्हणौनि सुमंताची मनोदेवता । वाट पाहे जैसि वनिता । विदेशीया पतीची. ॥ १० ॥ ऐसा तो मंत्री सुमंतु । परम कुशळु पवित्रु । सर्वांसि प्रिय जगन्मित्रु । राज्य रक्षिलें बरवें. ॥ ११ ॥ सकळ

चाल्कु प्रधानु । त्याप्रति शीघ्र येऊनि शत्रुघ्नु । बोलता जाला " रघुनंदनु । समीप आले हो." ॥ १२ ॥ ऐसें शत्रुघ्नाचेनि सुशब्दें । सुमंतु उचंबळला आनंदें । रोम राहिले उभे नेत्रारविंदें । सुखाश्रु सांडिले. ॥ १३ ॥ स्वामी आला आयकोनी । सुधानदी वाहों लागली मनीं । मग शत्रुघ्नाप्रति सुवचनीं । वदता जाहला. ॥ १४ ॥ म्हणे " आला स्वामी रघुनाथु । पुरला सकळ मनोरथ । आतां राज्य आपुलें समर्थु । सांभाळूनि राहो. ॥ १५ ॥ चतुर्दश वरुषेंवरी । आम्ही चिंतार्णवामीतरी । वसत होतों आजि तीरीं । टाकिलें अत्यानंदाच्या. ॥ १६ ॥ अहो सुभाषित सुमित्रातनया । वृद्धबुद्धि बालवया । श्रीरामु सर्वांचिय सजाया । कोणा स्थानासि आले ? ॥ १७ ॥ भरतु आहे नंदिग्रामीं । तेथुनि आलेति तुम्ही । काये आज्ञा देता ते मी । ठेविन मुकुटावरी." ॥ १८ ॥ ऐसीं वचनें मंत्रियें सुमंत्रें । वदलेयावरि सुमित्रासुतें । बोलिजे पुनरपि सुमित्रें । प्रीतिस्तव जैसीं. ॥ १९ ॥ म्हणे "परिस समता महामति । राजहस्तका सेनापति । पूर्वदिनीं अस्तु होता गभस्ती । नंदिग्रामीं दूत आला. ॥ २० ॥ देहधारिया तो वानरु । स्थूळ दीर्घ जैसा मेरु । शास्त्रसंपन्नाहूनि चतुरु । गुणवंतु बहुत. ॥ २१ ॥ अकस्मात् येऊनी । भरताप्रति सुवचनीं । रामु आले जी म्हणौनि । वदला वेदवत. ॥ २२ ॥ अयोध्या त्यजिलेया रघुनंदनें । जाली अष्टाविंशती अयनें । महत् चरित्र केलें तें मुखवचनें । सर्व कपिनें सांगितलें. ॥ २३ ॥ वधिले बहुत निशाचर । राक्षस आणिक घोर घोर । अधिकारी स्थापिले सुरवर । त्रैलोक्य सुखी केलें. ॥ २४ ॥ उपरी दशदिशांप्रती । गेली निर्दोष कीर्ती । मग सरिसी सीता युवती । स्वराज्या राम आले. ॥ २५ ॥ सरिसा सौमित्र अनुज । सपरिवारीं नक्तंचरेंद्र कपिराजु । जेय ब्रह्मऋषि भरद्वाजु । पुष्पकारूढ तेथ आले. ॥ २६ ॥ रामु राज्येश्वरु आमुचा स्वामी । आला कृतार्थ जालों आम्ही । आतां भरताज्ञा तुम्ही । परिसा ऐसी. ॥ २७ ॥ आरती राघवासि सामोरे । पुढें जातसों त्वरें । तुम्हींही शीघ्र माघारे । मेणें प्रश्नोसि. ॥ २८ ॥ कौसल्याप्रमुखा समस्ता । शिबिकारूढ चालवा माता । मुख्य वसिष्ठा महंता । प्रथम पुढें करणें. ॥२९॥ गज रथ, तुरंग, सकळ । सरसें च्यावें चतुरंग दळ । नगर नागरिक लोकपाळ । समवेत असों देणें. ॥ ३० ॥ शृंगारा अयोध्येलागीं । अत्यंत अपूर्वता राजमार्गीं । गगनचुंबित

उभयमार्गीं । पताका उभवणें." ॥ ३१ ॥ ऐसें सुमित्रेचेनि पुत्रें । वदतां अंगिकारिलें सुमंत्रें । जैसे दोहणारें उडविलेनि पात्रें । गोक्षीर घेइजे. ॥३२॥ कां दातेनि दानकाळीं । हेमगर्भमुष्टी केली मोकळी । तेथेंचि याचकें वोडविली अंजुली । घेइजे दीर्घानंदें. ॥ ३३ ॥ कां समर्थे पाहुणेनि गोमटी । वस्तु सख्यालागीं आणिली भेटी । तियेसी तो अंगीकरी पोटीं । हेलावे हर्षु. ॥ ३४ ॥ ऐसियापरी तेणें प्रधानें । आज्ञा दिधली जे शत्रुघ्नें । ते अंगीकरूनि वचनें । वदे सेवकांप्रति. ॥ ३५ ॥ म्हणे रे "अव्यवधानें तत्काळ । सिद्ध हीं सांगा चतुरंगदळ । जे जयांचे शृंगार सकळ । ते करावे मनोहर. ॥ ३६ ॥ शृंगारा अपूर्व राजधानी । तोरणीं पताकीं रंगीं रत्नीं । रचना दिसों द्या ऐसी जियेवरूनी । इंद्रपुरी ओंवाळीजे." ॥३७॥ ऐसी सुमंताची सांगणी सेवकीं । अत्यानंदें वंदिली मस्तकीं । जैसी देवआज्ञा लोकपाळादिकीं । मुकुटीं ठेविली. ॥ ३८ ॥ सुमंतें सेवक आज्ञापिले । ते तत्काळ कार्यसिद्धीसि गेले । जैसें हंसीं उड्डाण केलें । मानसपाळीवरूनी.॥३९॥ मग सुमंतु आणि दाशरथी । उठिले शीघ्र कृतार्थी । कर्मपल्लवीं पाहूनी ग्रंथी । राजगृहीं प्रवेशले. ॥ ४० ॥ कौसल्येचें मंदिर प्रवेशले । हास्यमुखें एक एकापुढें बोले । म्हणती "माताहो, रामलक्ष्मण आले । पुत्र तुमचे दोघे. ॥ ४१ ॥ मुख्य जानकी आहे सरसी । जान्हवीतीरीं काल्हचे दिवसीं । राहिले होते म्हणोनि नंदिग्रामासी । दूत पुढें सांगों आला." ॥ ४२ ॥ ऐसा उभयवर्गा ते समयीं । वदले हर्षे उचंबळले हृदयीं । कौसल्या, सुमित्रा एके ठायीं । दोघी ऐसें आयकिलें. ॥ ४३ ॥ आइकतक्षणीं दोघी जणी । न सांभाळीत धाविन्नल्या धरणीं । ते समयीं त्यासि गमलें आंगणीं । सुधासिंधु लोटला. ॥ ४४ ॥ ब्रह्मांड भरलें परम सुखें । समर्थ तत्काळ जाली सुखें । प्रेम वोसंडलें पीयूषासारखें । अष्ट भाव उदैले. ॥ ४५ ॥ दोघां पुत्रांलागीं दोघी माया । अति उत्कंठित भेटावया । जैशा वत्साकारणें दाटलिया । ओरसें धेनुवा. ॥ ४६ ॥ त्यासी पुत्रांचेनि वियोगें । दशरथु गेले त्यामागें । घटिका जाति युगें । जैसीं कल्पकल्पींचीं. ॥ ४७॥ रामाची वाट पाहतांक्षणीं । चक्षु स्रवति कंकणीं । सृष्टि शून्य वाटे धरणी । उदास लागे पोटीं. ॥ ४८ ॥ दोघीं शरीरीं जालिया कृशा । मंदोनि गेलिया क्षुधा तृषा । पुत्रआगमनाची पिपासा ।

लागली बहुत. ॥ ४९ ॥ टाकिलिया मंचकीं मुकुंडी । उष्ण श्वास भ्रमती तोंडीं । अहोरात्र पुढें चिंता मांडी । विपरीत संकल्प. ॥ ५० ॥ ऐसिया त्या अजपुत्रप्रमदा । वियोगें पुत्राकारणें सर्वदा । उद्वेगरूप होत्या तिया परमानंदा । पावलिया कैसिया ?॥ ५१ ॥ प्राणाहूनि प्रिय वस्तु होती। ते हातींची गेली दैवगतीं । तियेची परती आलेया मागुती । महाद भरें हरुषें. ॥ ५२ ॥ तैसे पुत्र प्राणांहुनी आगळे । जवळी होते तें निवती डोळे । ते कैकेयीप्रसंगें वेगळे । चिरकाळ जाले होते. ॥ ५३ ॥ आलेया आयकोनि तयांसी । सुखाब्धि हेलावला मानसीं । मग बोलत्या जालिया शत्रुघ्नासी । परमार्तेकरूनि. ॥ ५४ ॥ म्हणे "रे वत्सा, राज-तनया । चतुरा, सुमति, गुणाढ्या । सुखीं सर्वथा अस, विजया । घेईं शत्रु संघट्टुनि. ॥ ५५ ॥ वा रे तुम्ही उभयवर्गबंधु । परम ज्ञाते परम साधु। राज्य राजेनि दिधलें परि संबंधु । लेशुहि लागों नेदाचि. ॥ ५६ ॥ वन-वासु प्राप्त जाला रघुनाथा । हें आयकोनि तुम्ही सर्वथा । दुःखार्णवीं पडल्या माथां । अपयश आलें म्हणोनि. ॥ ५७ ॥ परि यश कीर्ति जोडिली तुम्हीं। योगदीक्षा धरूनि नंदिग्रामीं । राहोनि रातलेति रामीं । पादुका पुजोनि ॥ ५८ ॥ तुम्ही बुद्धिभूमीचीं निधानें । तुम्ही विवेकसमुद्रींचीं रत्नें । तुम्ही वैराग्यवनींचीं सुमनें । धन्य धन्य विश्वमुखीं. ॥ ५९ ॥ वारे आतां राम लक्ष्मण आले । तेथ भेटों चाला वहिले । धैर्य न धरवे उतावीळ जाले। आमचे नयन." ॥ ६० ॥ कौसल्येचें बोलणें ऐसें । स्नेहान्वित भरतें जैसें। परिसौनि शत्रुघ्नें सरिसें । प्रत्युत्तर केलें. ॥ ६१ ॥ म्हणे "माता हो आइका तुम्ही । याचि कारणें शीघ्र आलों आम्ही । भरतें सांगितलें नंदिग्रामीं। आणि तो पुढें जाला. ॥ ६२ ॥ आतां तुम्ही सकळ माता । शिबिकारूढा समस्ता । चतुरंग सेना सिंधु होता । तो सिद्ध जाला असे. ॥ ६३ ॥ वसिष्ठासि पुढें करूनि । समवेत बहु वाहिनी । माता हो जावें गर्जत वाद्य-ध्वनीं । श्रीरामासमोर." ॥ ६४ ॥ ऐसें शत्रुघ्न अमृतासारिखें । बोले, त्या माता सतोषे सुखें । मर्यादा सांडिली सुखें । दिशाचीं पूर्ण जालीं. ॥ ६५ ॥ मग तैसाचि तत्काळ वसिष्ट । बोलाविला गुरुश्रेष्ठ । समाचार सांगितला संतुष्ट । तोही बहुत जाला. ॥ ६६ ॥ उपरी तैसेंचि तिये प्रसंगीं । शुद्ध केलें कैकेयीलागीं । म्हणती "चाला घो शिबिकारूढ मार्गीं । रामलक्ष्मणां

ामोरे." ॥६७॥ ऐसें परिसौनि कैकेयी मातों । म्हणे "बहु बरवें जालें आतां ।
ायोध्येसि येणें होईल भरता । संपत्ति भोगावे. ॥ ६८ ॥ राज्यातीत
ोऊनि उदास । कष्ट भोगिले बहु दिवस । दीक्षा रामाची धरूनि वास ।
दिग्रामीं करीत होता. ॥ ६९ ॥ वर्जले मिष्टान्न मंगळस्नान । त्यजिले
ळंकार वहुरत्न । दिव्याबरें सांडौनि परिधान । वल्कलें केलीं होतीं.
७० ॥ वटदुग्धें करूनि चिकटा । वळलिया भरतकींच्या जटा ।
भूती सर्वांगीं लावुनी जोगवटा । घालोनि बैसला होता. ॥ ७१ ॥
ाळीं चतुर्दश वरुषें । लागलें रामाचें थोर पिसें । आतां वरवें
ालें रामासरिसें । राज्य भोगेल सुखें." ॥ ७२ ॥ ऐसी कैकेयी
रतजननी । स्वार्थबुद्धी आपुल्या मनीं । श्रीरामु आला म्हणौनी । थोर
तोषली. ॥ ७३ ॥ कैकेयीचि बुद्धि नव्हे बरवी । म्हणौनि विश्व बोल
वी । तरि हे कोण वापुडी देवी । कळा निर्मिली होती. ॥ ७४ ॥
ज्यपद देतां रघुनाथा । देवीं आपुलिया स्वार्था । रचिला विपरीत तुल्या ।
ैकेयीमतिमार्गें. ॥ ७५ ॥ प्रथम मंथरा नाम दासी । देवीं क्रूर घातलें
िच्या मानसीं । ते प्रेरक जाली कैकेयीसी । दुष्टबुद्धि दिधली. ॥ ७६ ॥
हें होणारासारिखें कैसें । कैकेयीनें केलें अनारिसें । दशरथु गोविला
ापें जैसें । मृग सुढारां पडे. ॥ ७७ ॥ तरी हेही कोणाची कळा ।
ववी श्रीरामाची लीळा । इच्छाअवतार चरित्रमाळा । दाखवीत आहे.
७८ ॥ होणार सरितेच्या प्रवाहीं । जगत्रय पडलेनि गुणाहीं । कोणासि
ोणीं हो काहीं । किमर्थ शब्दु ठेवणें. ॥ ७९ ॥ म्हणौनि ते हे कैकेयी
ापुडी । रामासी राज्य देतां बुद्धी कुडी । केली पुत्राचिया आवडी । हें
ारूढलें लौकिकीं. ॥ ८० ॥ ज्या रामाचेनि पादप्रसादें । ब्रह्मादिक पावले
दें । तो हा विश्वात्मा विनोदें । चरित्र खेळतु असे. ॥ ८१ ॥ मेघु निज-
मार्गें वृष्टि करी । तेणें सरितापूर पृथ्वीवरी । अमर्याद धांवती सागरीं ।
र्जित मिळतीं. ॥ ८२ ॥ तरी या मेघाची आणिकें । तृषा हरिजैल घटो-
कें । हें कैसें घटेल हो लोकें । बोलिजेल तें सर्व वृथा. ॥ ८३ ॥
्हणौनि सफळेश्वर्य रामु । अवाप्तसमस्तकामु । कर्ता करविता हा नेमु ।
सकळ शास्त्रें घोषितीं. ॥ ८४ ॥ असो आतां हें बोलणें । श्रीरामा सामोरें
ासि जाणें । माडिली दरा पाचारणें । परमानंदें निघे काळी. ॥ ८५ ॥

आतां प्रयाणसमारंभु । पुढें श्रीरामभेटीचा लाभु । समस्तांसी होईल, लभु ।
आनंदें भेटे. ॥ ८६ ॥ इति श्रीरामायण रामचरित्रसिंधु । युद्धकांडकथा-
संबंधु । पुढें सेवा वाल्मीकमुखमधु । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ ८७ ॥

---

## प्रसंग एकाहत्तरावा.

रामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुएकाशिराजाय नमः ।
परिसा राजधानीचें दळ । छिद्र जालें शीघ्र सकळ । ज्याचें बहु
वारिधितुल्यबळ । असंमाय्य दखवेना. ॥ १ ॥ शृंगारमंडित चतुरंगभार ।
सुंदर मनोहर भयंकर । महावृष्टी सरिता पूर । ऐसें गर्जत चालिलें. ॥ २ ॥
पदातिदळ चालिलें पुढें । कल्पांताग्निचें मीरेत जेवढें । कौतुकें
गर्जना करित गाढें । प्रळयमेघासारिखें. ॥ ३ ॥ बहु चित्रांबरीं बावडि-
कासा । काळेंसी मिडों पाहातो, हा विश्वासा । स्वतेजें आकाशा । उजळीत
आहेती. ॥ ४ ॥ आपाद मस्तकवरी । खेटकें धरिली वामकरीं । चुरें
विरुद्धांकुश शिरीं । मिरवताती कैसे. ॥ ५ ॥ ऐसें परमानंदयोगें ।
पदातिदळ चालिलें वेगें । तरिसें चतुरंग मागें । मकचाली चालिलें. ॥ ६ ॥
रत्नाभरणीं शृंगारिले । अवघे पृष्टासनीं तंगिळे । दिव्यांबरपट वरी
घातले । रमय मार्गी सुचित्र. ॥ ७ ॥ गुणरहित साजिरे । पुढें शाह-
गिर्या हस्ती वागदोरे । कुशळ गतीकरूनि त्वरें । असंमाय्य चालिलें. ॥ ८ ॥
ऐसा मोकळा अश्वभारू । निगाला जैसा शृंगारसागरू । विहंगु
उठिला तेणें मेरू । धरभरूं लागला. ॥ ९ ॥ त्यांचेनि पृष्ठिभागीं ।
अश्वारूढ चालिले कैसे । ज्यांतें पाहातां हृदयीं वसे । भय आश्चर्य क-
रंदु. ॥ १० ॥ लावण्यसिंधु पृथ्वीवरी लोटला । तैसा अश्वारूढ भर
चालिला । अमर्याद न वचे लक्षिला । संख्या कोटीच्या कोटी. ॥ ११ ॥
त्यांमागें मदोन्मत्त स्थूळ । जैसे चतुष्पद कुळाचळ । चालिले अति
अगाध बळ । ऐरावतीसरिसे. ॥ १२ ॥ मंडित मनोहर दिव्याभरणीं ।
चालतां डळमळी श्रमें धरणी । घंटानादें दिग्गजां कर्णीं । बिहती वंड
शब्द. ॥ १३ ॥ महावत बैसले पृष्ठीवरी । चित्र दंड अंकुश करीं ।

ज्यांचेनि दर्शनें धरायरीं । मानस कृतांताचें. ॥ १४ ॥ ऐसे असंभाव्य गजभार । किंकाटें पूर्ण होतसे अंबर । प्रळयीं फुटले सप्तसागर । चालिले ऐसे.—॥ १५ ॥ ऐसियां गजभारां पाठींसीं । आच्छादुनि अभ्रमंडळासी । रथ चालिले जैसीं । शृंगारसमुद्रींचीं तारवें. ॥ १६ ॥ सुवर्णाचिया रत्नखचित । ध्वजा पताका सुशोभित । वरी बैसले धनुर्वंत । धीरोदार वीर. ॥ १७ ॥ सारथियांचेनि मनोरंगें । जुंतिले तुरंगम चालिले वेगें । चक्रवाटियांचेनि मार्गें । धरणी विदारत. ॥ १८ ॥ ऐसें चालिलें चतुरंग दळ । तेणें रजवटलें दिग्मंडळ । आनंदु सर्वांचा हृदयीं तुंबळ । वाद्यें वाजूं लागलीं. ॥ १९ ॥ धडकल्या चंद्राननभेरी । ज्यांचा नादु न माये अंबरीं । शंख ञाहाटिले तेणें धरारी । पुढें पृथिवीतळ. ॥ २० ॥ गौंडी बोंडी वाजतां करिती डाहो । चेळकां टाळां पडला वादकल्लहो । श्रृंगें मोहरीमहानादें मोहो । दिग्गजां पडला. ॥ २१ ॥ पणव आघुळेयां सुस्वरांसरिसें । हरिती बककुळांचीं मानसें । पंचरसांचीं तगटें बहुवसें । काष्टमेळें गर्जती. ॥ २२ ॥ मुखद्वयाचे महाघोर । मृदंग वाजती मनोहर । चडजेंगटे चंग चातुर । झणझणीत असती. ॥ २३ ॥ ऐसे करितां शब्द सुघड । वाजविती बहु वाद्यांचे जोड । तेणें एकनादें गगना वाड । संपूर्ण जालें. ॥ २४ ॥ असो क्षीराब्धि पृथ्वीवरी पसरे । तैसें शुभ्रमय कटक उरे । चालिले बंदीजन पुढारें । सूर्यवंश वाखाणिती. ॥२५॥ ऐसेया कटकाचां पृष्ठिमार्गीं । वसिष्ठ, शत्रुघ्न, सुमंत त्रिवर्गीं । रथारूढ चालिले मार्गीं । मिश्रित जनांमध्यें. ॥ २६ ॥ वाहकस्कंधांवरी शिबिका । रत्नविराजित संतोषकारका । तेथ आरूढ माता सकळिका । कौसल्या, कैकेयी-प्रमुखा. ॥२७॥ चालिल्या पूर्णानंदचित्तें । दासींचीं सहस्रें परिवेष्टितें । जाणवती नां उपभोगातें । मार्गीं क्षणक्षणां. ॥ २८ ॥ ऐसें श्रीरामासामोरी । चालिली अवघी अयोध्यापुरी । सकळांच्या हृदयाभीतरी । हर्षार्णव हेलावे. ॥ २९ ॥ नंदिग्रामीं एके ठायीं । निशा क्रमुनि अरुणोदयीं । भरतु उठिला हृदयीं । उत्कंठा रामभेटीची. ॥ ३० ॥ मस्तकीं श्रीरामाच्या पादुका । धरिल्या वरी छत्र चामर पताका । पुढें वाद्यें वाजतीं तियें लोकीं । परमानंद देती. ॥ ३१ ॥ ऐसेनि समारंभें भरतु । चरणचाली सवें असे हनुमंतु । निघाला जैसा उचंबळतु । नदु नदीश्वराप्रती. ॥ ३२ ॥ पडली करपल्लवां ग्रंथीं ।

घाटती भरतु हनुमंत पंथीं । जैसे अर्थप्रार्तीलागीं अर्थी । उत्कंठा फळति त्वरें. ॥ ३३ ॥ क्रमुनि मार्ग सांडिला मार्गु । तुळिता पवनाचा मंदे वेगु । मन पुढें धांवे पृष्टिभागु । स्पर्शत जाती त्याचा. ॥ ३४ ॥ तंव मार्गे येत गरुत वंधु । समस्तांसि सारिसा सैन्यसिंधु । ते गर्जना देखोनि स्तब्धु । चंद्रार्क जाले. ॥ ३५ ॥ आइका पूर्वदिनीं वरविया परी । रामाचें आतिथ्य सर्पावारीं । भरद्वाजें केलें ते शार्वरी । तेथेंचि क्रमिली. ॥ ३६ ॥ उपरि प्रातःकाळीं शुभदिनीं । भरद्वाजाची आज्ञा घेऊनी । सकळांसहित विमानीं । श्रीरामु बैसला. ॥ ३७ ॥ गगन क्रमित शांत शुभ्रतेज । तैसें विमान अयोध्या उजु । निघालें सुखदायक रघुराजु । पाहातसे उत्तरे. ॥ ३८ ॥ ऐसें विमान गर्जत गगनीं । क्रमित थरिलवें मेदिनीं । तें येत देखिलें नयनीं । दुरोनि हनुमंतें. ॥ ३९ ॥ ज्या पुष्पकाची अद्भुत शोभा । क्रमतां सांजिरें करी नभा । ज्याचि चंद्रिकेतुल्य प्रभा । पडली पृथ्वीवरी. ॥ ४० ॥ ऐसें विमान येत असतां । हनुमंतु जाला बोलता । म्हणे "हमें पाहा जि भरता । निहाळा नभा उजु." ॥ ४१ ॥ तंव तेथ तैसाचि भरतु । थवकला ऊर्ध्व पाहातु । देखता जाला जैसा पर्वतु । येत आकाश क्रमित. ॥ ४२ ॥ सत्यांयसीं सहस्त्र योजनांटुका । मंडळी विस्तारु शशांका । तैसेंचि गर्जती घंटिका । भरतें देखिलें डोळां. ॥ ४३ ॥ मग भरतु हनुमंतासि पुसे । "हें कायहो असंभाव्य येतसे । चित्रविचित्र अर्थी दिसे । गंधर्वनगर जैसें." ॥ ४४ ॥ ऐसें भरतु जंव बोले । तंव कपि म्हणे "रामु आले । हें पुष्पक विमान येथें वैसले । समस्तही वरी." ॥ ४५ ॥ ऐसें सांगों न पुरे हनुमंतें । तंव तैसेंचि तेथ भरतें । नमस्कारिलें प्रेमचित्तें । साष्टांग पृथ्वीवरी. ॥ ४६ ॥ "धन्य सभाग्य कृतकृत्य रघुतळें" । ऐसें म्हणोनि नमस्कार मोकळे । पुनःपुनः घालुनि लोळे । भरतु पृथ्वीवरी. ॥ ४७ ॥ पवारूनि दोन्हीं नयन । चकोरू पाहे ऊर्ध्ववदन । तैसें पाहातसे विमान । भरत पुढें चाले. ॥ ४८ ॥ हस्त धरूनि हनुमंताचा । मग पुनः पुनः बोले वाचा । म्हणे "धन्यधन्य मी माग्याचा । आगमन देखें रामाचें." ॥ ४९ ॥ हनुमंत म्हणे "जि महामती । वृक्ष आपुलां काळीं फळा येती । तैसें सत्पुरुषांचे फळती । इच्छिले मनोरथ. ॥ ५० ॥ तुम्हीं निष्कपट पुण्यरूप । आचरलेती धुरंधर तप । तें फळलें तुम्हां अमूप । यश

जोडिलें आहे." ॥ ५१ ॥ ऐसें कपिसमागमें। बोले भरतु अढळ प्रेमें। तंव लक्षितां विमानारूढ रामें। अयोध्या देखिली. ॥ ५२ ॥ नववैडूर्याचां सुखांकीं। आनंदपूर्ण वैसली जानकी। तियेसि धरूनि हस्तकीं। अयोध्या दाखवी. ॥ ५३ ॥ तंव लक्ष्मणें तिये अवसरीं। देखिली आपुली पुरी। आनंदाब्धिच्या ल्हरी। अमर्याद लोटल्या. ॥ ५४ ॥ तारकासरवर्ती। पुरंदर पावे अमरावती। तैसा दाशरथी हरुषे चित्तीं। निजग्राम देखिलेया. ॥ ५५ ॥ बिभीषणा, सुग्रीवा समस्तां। सौमित्रु जाला सांगता। "पैल पहा हो अयोध्या, सरिता। शरयू दिसती असे." ॥५६॥ ऐसें लक्ष्मणु सांगों पुरे। तंव समस्त पाहाती उत्तरे। पुढें देखते जाले एकसरें। कळस लंक्षावधी. ॥५७॥ धनें उपवनें निबिडें। गगनचुंबित पताका झाडें। असो आतां ते वर्णिजैल पुढें। प्रवेशप्रसंगा. ॥ ५८ ॥ अयोध्या देखोनि लोचनीं। आनंदु वाटे सर्वां मनीं। तैसेंचि राघवें मेदिनीं। विमान आज्ञापिलें. ॥५९॥ तें विमान पुष्पक। आरूढलेयांचें आज्ञाधारक। तत्काळ भूमीं आलें हें कौतुक। भरतु पाहातु आहे. ॥ ६० ॥ विमान भूतळा येवोन पुरे। तंव तें देखोनि भरतु चालिला त्वरें। आर्ते उचंबळत नावरे। धैर्य क्रमितां भूमी. ॥ ६१ ॥ विमान आलिया पृथ्वीवरी। रामें सीता धरुनि करीं। उतरुनि साष्टांग सपरिवारीं। नमस्कारी अयोध्येसि. ॥ ६२ ॥ जननी जान्हवी जन्मभूमिका। या तिन्ही दुर्लभ तिन्हीं लोकां। देखिलेयानंतरें आदिका। नमस्कारु करावा. ॥ ६३ ॥ धर्मशास्त्रमार्गीं विध्युक्त प्रकारें। संत आचरिजे आपण ईश्वरें। तेचि चालवी लीलावतारें। दीक्षा सुबुद्ध जनां. ॥ ६४ ॥ म्हणोनि रामु धन्यावतारु। जगत्पाळ जगद्गुरु। अयोध्येसि करूनि नमस्कारु। विमानारूढ झाला. ॥ ६५ ॥ पुनरपि पुष्पक पुण्यरूप। उचळलें आपोआप। तंव हनुमंतासहित समीप। भरतु धांवोनि आला. ॥ ६६ ॥ अष्ट सात्विक भावीं संदोदित। नमस्कार घालीत घाले दंडवत। पुढां दृष्टादृष्टी जाली बहुत। 'निकट आला कैसा ?' ॥ ६७ ॥ रामु सीतें सौमित्रासि पुढें। बैसलें मार्गें एकचक्र जेव्हढें। देखोनि ब्रह्मांडीं न माये एव्हढें। भरतासि सुख वाटलें. ॥ ६८ ॥ सायंकाळीं गोकळपी। जैसें वत्स मोकळें जननीसि टिपी। तैसा भरतु भूमी आटोपी। धांवोनि झाड घाली. ॥ ६९ ॥ देशांतराहुनि आलेया बापु। कुमारु अकस्मात् देखे

समीपु । तें धांवोनि पडतें तैसा रघुद्वपु । भरता स्पर्शला. ॥ ७० ॥ भरतु पुष्पकातळवटीं । धांवोनि पाउलें उखाटी । त्यावेळीं तंव दोहीं मणगटीं । कपार्थेनें धरिला. ॥ ७१ ॥ अमावास्येच्या अहोरात्रीं । सूर्य शशांक एकसूत्रीं । राहत संस्था एकत्रीं । होऊनि आलिंगन दोजे. ॥ ७२ ॥ क्षीरसमुद्राचिया लहरिया । उचंबळोनि एकवटलिया । तैशा आलिंगना रिगालिया । बंधुद्वयांच्या तनु. ॥ ७३ ॥ एकी पीयूषगाहिनींचा पोटीं । वेगळीक जाली गर्भवेटीं । त्या ओघांसि पुढें होये भेटी । तैसे भेटले आते. ॥ ७४ ॥ अद्वैतशास्त्रीं द्वैताचा अर्थवादु । पाहतां एक वाटे संवादु । तैसे जानकीजीवनकंदु । आणि भरतु भेटले. ॥ ७५ ॥ कां द्रुयें रत्नगर्भे गोमटीं । दोघें मिळालीं संतोषमोटी । तैसि भरता भार्गवजिता भेटी । जाली पुष्पकावरी. ॥ ७६ ॥ सुमनवाटिकेमाजुतें । भृगुनंदनें आणि सौमञुतें । भेटिजे तैसें राम भरतातें । सुखें भेटतें जालें. ॥ ७७ ॥ समान संतोष दोहींचां ठायीं । अष्ट भाव आविर्भवले हृदयीं । वियोगअवस्था ती ये समयीं । दिक्चक्राबाहिरी गेली. ॥ ७८ ॥ इच्छाआलिंगन दोघां जनीं । दिसलें परमप्रीतीं अंतःकरणीं । सुखवृत्ती जाली परि घणी । बाणली नाहीं. ॥ ७९ ॥ ऐसा भरतु आणि सीतावल्लभु । भेटले आनंदें भरलाभु । तो समस्तीं समारंभु । देखिला डोळां. ॥ ८० ॥ सुग्रीव, बिभीषण तिये समयीं । परम आश्चर्य करिती हृदयीं । म्हणती " कोण मर्यादा यांचा ठायीं । अगाध प्रीति यांसी. ॥ ८१ ॥ कैसा यांचा ऋणानुबंधु । धन्य धन्य स्नेह दोघे बंधु । मला भरतु परम साधु । दीक्षा धरिली कैसी ! ॥ ८२ ॥ इंद्रपदापरिस अपूर्व । राज्य तृणतुल्य केलें सर्व । तंव श्रीरामीं आगमन पर्व । चिंतित बैसला होता. ॥ ८३ ॥ धन्य भरतु धरातळीं । कीर्ति विस्तारली दिग्मंडळीं । तैसाचि लक्ष्मणही स्नेहाळु । देखिला असे. ॥ ८४ ॥ परम दास्य अग्रजाचें सुबुद्धीं । केलें प्राणाशा न धरिचि युद्धीं । इंद्रजितु, येणें वधिला तरि सिद्धी । सर्व कार्ये गेलीं. ॥ ८५ ॥ धन्य धन्य बंधुत्रयाचागीं । प्राणांहूनि प्रिय एकाहूनि एक जगीं । कीर्ति लोकोत्तर युगानुयुगीं । पवित्र राहिली यांची. ॥ ८६ ॥ नाहीं तरी आम्ही बंधु वृथा । अपकीर्ती घेतली माथां । एकएकाचे स्वार्थे सर्वथा । प्राणघातक जालों. ॥ ८७ ॥ मन्मथों, मूढ मातेचे

उदरीं । धिक् धिक् भाव भूमीवरी । मत्स्य मत्स्यातें भक्षितसे परी । आम्हीं जाली कैसी ? ॥८८॥ हे लीळा तरि ईश्वराची । ललाटीं लिखित विरंची । गती तरी होणारची । परि निमित्तधारी जालों. ॥ ८९ ॥ मित्र तरी हें जालें मोटें । परि विचारितां अगाध गोमटें । देवो सानुकूळ जाला उफराटें । दूषणचि भूषण जालें.॥९०॥ जैसा वेदवळें सोमयागीं । श्रेष्ठ श्रोत्री मान्य जगीं । पशुवधी ऐसें त्यालागीं । दुर्नाम आलें नाहीं. ॥ ९१ ॥ अश्वोत्तमाचिये प्रीवेतळीं । असे देवमणींचि मंडळी । त्यांखालीं दुष्ट खोडींच्या वोळी । लोपल्या सकळ. ॥ ९२ ॥ म्हणोनि आम्ही कुळनिंद्य राहाटलों '। परि रघुनाथाचे स्थापित जालों '। प्रस्तुत साधुनि ठेलों । ऐहिक आणि परत्र." ॥ ९३ ॥ ऐसा सुग्रीवा, बिभीषणा । सत्वगुण उपजला दोघां जनां । असो हें, अग्रजा आलिंगोनि चरणां । सौमित्रें भरतें वंदिलें. ॥ ९४ ॥ देखतांचि डोळेयां डोळे । उभयतां गहिंवरु उचंबळे । आविर्भाव विंबला तिये वेळे । जनकजेसि ऐसा. ॥ ९५ ॥ देखोनि वत्साचि तनु । वोरसें दाटे पैं धेनु । कां विदेशोनि आलेया नंदनु । माता वोसंडे हरुषें. ॥ ९६ ॥ यानंतरें उतावीळलोभें । आलिंगनालागीं लक्ष्मणें उभें । ठाण मांडिलें जैसें सीतावल्लभें । आर्ते मांडिलें होतें. ॥ ९७ ॥ शीघ्रवंत तिये समयीं । होतां दृष्टी दृष्टीचे ठायीं । बाहिया पसरूनि हृदयीं । क्षेम एकएकांसी दिधलें. ॥ ९८ ॥ बहुतां दिवसां जाली भेटी । परम प्रीति हेलावे पोटीं । क्षेमालिंगनभावें दृष्टीं । अश्रुकण आले. ॥ ९९ ॥ भरतें भावना केली मनीं । म्हणे "मी परम सदैव मेदिनीं । गेलीं निधानत्रयें नयनीं । देखिलीं मागुती." ॥१००॥ असो आलिंगोनि लक्ष्मणातें । वोसरूं न पुरे भरतें । तंव श्रीराम बोले सुग्रीवातें । भेटें भरता. ॥ १ ॥ ऐसें आज्ञाकल्हार अग्रजाचें । मस्तकीं पडतांचि चित्त नाचे । भरतासि सुख वाटलें साचें । मेरुपरिस मोठें. ॥ २ ॥ सुखें प्रीतिचेनि अवलोकनें । भरतु पुढारला हास्यवदनें । तंव शीघ्र पैं मित्रनंदनें । चतुष्पदें येणें केलें. ॥ ३ ॥ भरताच्या चरणांवरी । कपींद्रु नमस्कारु करी । तंव धरिला वरच्यावरी । कैकेयीतनुजें. ॥ ४ ॥ दोघे आलिंगना निघाले । जैसे मित्र बहुतां काळीं भेटले । पुनरपि रामु बोले । बिभीषणासि भेटावें. ॥ ५ ॥ आज्ञा रामाचि होऊन पुरे । तैसाचि भरतु भेटों पुढारे '। तंव लंकापती पुढें त्वरें । भरतांघ्री नमिले. ॥ ६ ॥

तंव भरतें उचलोनि भुजा । मानपुरस्कर वोजा । आलिंगोनि राक्षसराजा । परमानंदु दिधला. ॥ ७ ॥ मग मागुतें बोळिजे रघूत्तमें । जैसि कल्पिलें फळें दांजबी कल्पद्रुमें । कां चकोरमंडळावरी सोमें । सुधाकण सांडिजेति ॥ ८ ॥ कां कोटिध्वजु विवाहकृत्यीं । द्रव्य समर्पी याचकां हस्तीं । नान उदार जळधारा जीमूतीं । धान्यावारि वर्षे. ॥ ९ ॥ ऐसा वागिरवार मधुर । भुवनराज भरतासमोर । वदे "वत्सा साचार । कपि अवतार पुरुष. ॥ ११० ॥ म्हणसि अवतार कोणाचे । तरी हे सकळही सुरांचे यश कीर्तिगुण प्रताप याचे । वदवेति ना वाचा. ॥ ११ ॥ प्रीती प्रस्तु माझ्या ठायीं । तैसिचि धरनियां हृदयीं । आलिंगन सर्वांसि देईं । सत्व गुणाढ्या." ॥ १२ ॥ इतुकें बोलिलें नरवेंद्रूयें । ज्याचे अंगुष्ठीं कोटिकाम सौंदर्य । तुकेलिना आणिकें धैर्य । महा रणकर्कशांचीं. ॥ १३ ॥ रघूत्त माचीं शब्दरत्नें । त्यालागीं मस्तकु कैकेयीनंदनें । वोडविला जैसा षडाननें शिवाज्ञा होतां. ॥ १४ ॥ तिये वेळीं ऋक्षकपींच्या मनोदेवी । क्रीडा करि सुखार्णवीं । पुढें भरतु आलिंगनें बरवीं । अनुक्रमें देता झाला. ॥ १५ जांबुवंत, सनादनु, आंगदु । द्वीद, दधीमुख मैंदु, । फनसु, केसरी कुमुदु, । सुमुख, दुर्मुख, गोमुख. ॥ १६ ॥ हेमकूट, तळपन, ध्वजु वितत, क्रथनु, प्रभंजनु । नळ, नीळ, गंधमादनु, गजु । गवाक्ष ऋषभ, सरभ. ॥ १७ ॥ पावकलोचनु, महाबळ वीरु । सुखेनु, सुग्रीवाचा श्वशुरु । अनेक ऋक्ष, कपिसागरु । ऐसे आलिंगिले. ॥ १८ ॥ अ गिक बिभीषणाचे प्रधान । अनळ संपातिप्रमुख सुमन । ऐसेयां समस्तां क्षेमालिंगन । भरतें दिधलें. ॥ १९ ॥ ऐसा भरतभेटीचा सोहाळा । र कळीं देखिला डोळां । आनंद करूनि दिग्मंडळा । संपूर्णता जाली. ॥१२० गुरुही.तिये काळीं रघुनाथा । चरणांवरी ठेविला माथा । अष्टमार्गी संत मनोरथा । त्याचेया सिद्धी जाली. ॥ २१ ॥ तिये काळीं गुहकाचेया हर्षासि तुळितां देवपदें तृण तैसीं । परमानंदें उचंबळत मानसीं । सीता सौमित्रु वंदि ॥ २२ ॥ समस्तांचेया हृदयामीतरी । लोटति आनंदाब्धिच्या लहरी । तव । मान पृथ्वीवरूनि उपरी । गगनमार्गें निघालें. ॥ २३ ॥ लागली चक्रघंटा ध्वनी । नादु भरत दिशावदनीं । नंदिग्रामासमीप मेदिनीं । उतरलें शी ॥ २४ ॥ पुष्पक स्थिरावलें भूमंडळीं । आसि रत्नखचित.पाइरियांनि

बोळी। श्रीरामें सीतेचि धरुनि आंगोळी। तेणें मार्गे उतरला. ॥ २५ ॥ पुढें अंगदु। हनुमंतु। दक्षिणे लक्ष्मणु, भरतु। पृष्टिसीं धरुनि हस्तें हस्तु। सुग्रीव, बिभीषण.॥ २६ ॥ उपरी ऋक्ष वानरांच्या कोटी। उतरल्या भूतळ-वटीं। त्या असंभाव्य दूरदृष्टी। शत्रुघ्नें देखिलिया. ॥ २७ ॥ पुढें स्थिर देखोनि विमाना। संतोषु वाटला रघुनंदना। मग आज्ञा दिधली म्हणे निजस्थाना। जायें कुबेरापासीं. ॥ २८ ॥ ऐसी आज्ञा होतां तात्काळ। पुष्पकें सांडिलें भूमंडळ। उदयाचळोनि सुशीतळ। चंद्रबिंब उचललें जैसें. ॥ २९ ॥ घंटा गर्जत चालिलें गगनें। सकळही पाहाति ऊर्ध्व वदनें। तंव योजनांतर योजनें। विमान आक्रमुनि गेलें. ॥ १३० ॥ पुष्पक गेलेया-चारि मार्गे। पहात होते स्तब्ध आश्चर्यरंगें। सुखार्णवामध्यें सर्वांगें। बोल्हावलीं त्यांचीं. ॥ ३१ ॥ असो इतुकी जाली गतकथा। आतां गुरु माता भ्राता रघुनाथा। भेटतील ते वदों व्यथा। जेणें तुटेल भवबंधाची. ॥ ३२ ॥ रघुनाथचरित्रकथागंगा। वाल्मीकप्रसादें प्राप्त जाली जगा। हा तरणोपाय आला उपयोगा। श्रवणकीर्तन करिती जे या. ॥ ३३ ॥ प्रथम वदला आदिकवी। तेचि कथा कौतुकाची ठेवी। करिजते ते श्रोतीं परिसावी। कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ ३४ ॥ इति श्रीरामायणयुद्धकांड। याचा उत्तरभागु कथाखंड। ज्याचेनि रसरुचीं ब्रह्मांड। भरलें संपूर्ण. ॥ १३५ ॥

---

## प्रसंग बाहात्तरावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः। श्रीगुरुकाशिराजाय नमः। विस्तीर्ण प्रदेशीं नंदिग्रामीं। मृदु मंडळी समभूमीं। रामु राहिला प्लवंगमीं। वेष्टित वस्ती केली. ॥ १ ॥ ऋक्ष राक्षस कपि परम हर्षें। तैसा राहिले यथा-वकाशें। तंव महाभेरींचेनि चंडघोषें। दिशा संपूर्ण जालिया. ॥ २ ॥ अयोध्ये उजु पाहती सकळ। तंव रजें भरलें रविमंडळ। क्षीराब्धींचें भरितें तैसें दळ। येत महावेगें. ॥ ३ ॥ थोर पर्वणी पाहतां थोडी। तीर्थराजाप्रती पहाया तांतडी। चाले तैसें कटक पर्वडी। नंदिग्राममार्गे येत. ॥ ४ ॥ लग्नघटिका आलिया समीप। वरु वऱ्हाडी धांवती मंगळरूप। कीं तृषा-

क्रांत गोधनकळप । वेगें येत नदी उन्हू. ॥ ५ ॥ तैसा शत्रुघ्न सकळेसीं । भेटी श्रीरामाची ध्यात मानसीं । मनाचा पाठीटाग करिजे तैसी । त्वरा मार्गी चालतां. ॥ ६ ॥ भरत नंदिग्रामासमीप आले । तंव भरतु रामाप्रती बोले । " स्वामी शत्रुघ्न आला पाउलें । शीघ्र पहावया. ॥ ७ ॥ जननिया कौसल्या, सुमित्रा । दोघी गंगे गौतमीहूनि पवित्रा । त्या तुम्हां भेटों राजीवनेत्रा । अगाध प्रीतीं आलिया. ॥ ८ ॥ तुम्हांसि वना जातां भेटी । एक वेळ जाली चित्रकूटीं । तेथोनि अंतर पडलें पोटीं । चिंताचक्र भ्रमे त्यांचें. ॥ ९ ॥ नव पंचवर्षे तिहीं । ढदक स्वीकारिलें नाहीं । अंबुजकांहूनि कांहीं । अश्रु तुटले नाहींती. ॥ १० ॥ करुनि करचरणांचीं पेंडी । शय्येवरी टाकिल्या मुर्कुंडी । भगति प्राणी तोंडीं । उष्णच्छ्वास श्रीरामा. ॥ ११ ॥ वाट पाहतां काचळे डोळे । राम, लक्ष्मण म्हणतां वाळले गळे । उद्वेग-अवस्था उदर पिळे । क्षणक्षणां दोघींचें. ॥ १२ ॥ बोळखवेतीना अयोध्याधीशा । ऐशा अत्यंत जालिया कृशा । आतां तुझेया क्षेमालिंगनाची पिपासा । त्यांसि लागली बहु. ॥ १३ ॥ ऐसिया कोमळमानस माया । तुझे आगमना आलिया । आणि कैकेयी ही अन्याया । पात्र जाली, असे. ॥ १४ ॥ आणि चतुराननंदनु । पूर्वजांचा पुरोहितु पुरातनु । तो श्रीगुरू आला आणि प्रधानु । सुमंत सर्वसेनेसिं. ॥ १५ ॥ प्रीति तुझां ठायीं ते भले भले । नगरलोक भेटों चालिले;" । ऐसें भरतु सांगे तंव आले । भार चतुरंगणींचे. ॥ १६ ॥ शत्रुघ्न सुमंत पाहाती नयनीं । तंव नंदिग्रामप्रदेशीं मेदिनी । आच्छादुनि असमान्य वाहिनी । आहे कपि-कपींची. ॥१७॥ दृष्टादृष्टीं जालेया परस्पर । सुमंतासि म्हणे "सुमित्राकुमर । पैं पहा हो कपिसैन्य सागर । श्रीरामु राहिले येथें." ॥ १८ ॥ हो जी म्हणोनि मंत्री बोले । मग शीघ्र पुढें जाले । आनंदसिंधु उचंबळले । दोहींच्या हृदयांमध्यें. ॥ १९ ॥ चातकें देखिला जीमूती । कां चकोरीं पाहिला निशापती । नाना चक्रवाकीं गमस्ती । उदयाचळावरी. ॥ २० ॥ सुमंतें, शत्रुघ्नें ऐसियापरी । श्रीरामु कपिचक्रामीतरीं । देखिलेया हर्षलहरी । मर्यादावाहिरी गेली. ॥ २१ ॥ तुळितां मेरु होये धाकुटा । ऐसा मनोल्हास दोहींसीं मोटा । निवचा तेणें, सैतुष्टा । दिग्देवता आलिया. ॥ २२ ॥ मग दोघी भक्ति-

पुरस्सर । साष्टांगीं रामासमोर । मोकळे घातले नमस्कार । अष्टभावमय जाले. ॥ २३ ॥ तियें समयीं प्रेमें वेल्हाळे । जैसे मयूर, मृग मेघच्छाये निवाले । कां ग्रीष्मीं माध्यान्हीं सुस्नात जाले । मार्गस्थ गंगाह्रदीं. ॥ २४ ॥ ऐसे ते परम आल्हादें । शीघ्र चालिले उचलित पदें । मळपें देवों लागलीं दोंदें । मनोदेवतांचीं. ॥ २५ ॥ गधपर्थे पुष्पवनपाळी । षट्पदें झेंप आगळी । घातली तैसा रामाजवळी । शत्रुघ्न आला वेगें. ॥ २६ ॥ हास्यमुखें रघुनाथु बोले । या जी म्हणे तव येरा अश्रू आले । जियें वध विबुधांसि पाउलें । त्यांवरी ठेविला माथा. ॥ २७ ॥ तत्काळ प्रीति रघुराजा । दुणाविली धरिल्या दोन्ही भुजा । क्षेमालिंगन अनुजा । शत्रुघ्नालागीं. ॥ २८ ॥ क्षेमालिंगन दयाब्धिनें गाढें । दिधलेया शत्रुघ्नासि पुढें । ब्रह्मांडीं न मावे एवढें । सुख वाटलें. ॥ २९ ॥ मग तैसा सुमित्रासुतें । नमस्कारू केला जानकीतें । सारिसाचि स्नेहाळा कृपाचित्तें । आशीर्वचन दिधलें. ॥ ३० ॥ याउपरी तिये पगती । सौमित्रें शत्रुघ्नें परम प्रीतीं । क्षेमालिंगन दिधलें चित्तीं । संतोषु समुद्राऐसा. ॥ ३१ ॥ उपरी भरतासि जैसीं श्रीरामें । आज्ञा दिधलिया समस्तांसि क्षेमें । दिधलीं तैसि अनुक्रमें । शत्रुघ्नेंहि ते समयीं ॥ ३२ ॥ भरतानुजासि सीतावल्लभु । भेटला हर्षे भरला नभु । तैसाचि बानया सगमलाभु । सारिखा सुमतु होता. ॥ ३३ ॥ तेणें भेटतांचि तत्समयीं । मस्तकु ठेविला स्वामिचिया पायीं । उठउनि परम प्रीतीं ह्रदयीं । करुणाब्धीनें धरिला. ॥ ३४ ॥ बघुचिया परी उदार चित्तें । क्षेमालिंगन दिधलें प्रधानातें । ते काळीं सुमतांचें सुखभरितें । सामवेना ब्रह्मांडीं ॥ ३५ ॥ याउपरी सुमतें सीता । नमस्कारिली जैसी कुळदेवता । सवेंचि सुमित्रासुता । जवळी होऊनि वदिलें. ॥ ३६ ॥ सरिसेंचि लक्ष्मणें लवलाहीं । आलिंगन दिधलें धरुनि बाहीं । महासुखसरिताप्रवाहीं । उभय चित्तें क्रीडती. ॥३७॥ याउपरी पुढें पाहतां । मत्री सुमतु जाला बोलता । म्हणे "रघुपती, वसिष्ठ आणि माता । पैल वाहनें त्यांचीं ॥ ३८ ॥ ऐसें मत्री बोलों सरे । तव दाशरथासी धीरु न धरे । आर्त उचबळलें त्यें । चालिले पुढें. ॥ ३९ ॥ पक्ष पसरूनी दोनी । अरुणानुजु चाले मेदिनीं । तैसा रामु चाले वाहिनी । सरिसी दोहीं भागीं. ॥ ४० ॥ तिये काळीं पाच पाउलें । रामें भूमडळ

क्रमिलें । तंव पुढें येवों सरलें । वाहन वसिष्ठाचें. ॥ ४१ ॥ परस्परें जाली दृष्टादृष्टी । परम आर्त उचंबळलें पोटीं । बाहु स्फुरों लागले भेटी । अगाध प्रीतीस्तव. ॥ ४२ ॥ वाहन तत्काळ त्यजुनि गुरू । पुढें जाला कैंचा धीरू । आल्हादाचा पावला पुरू । डोळेयां दैव आलें. ॥ ४३ ॥ सत्यलोकेशासि सनत्कुमार । देखोनि करिती नमस्कार । तैसा दाशरथी भक्तिपुरस्कर । श्रीगुरुसमीप आला. ॥ ४४ ॥ एतत्क्षणींची रासु पुढें जाला । दंडवत नमस्कारु घातला । तत्काळ उचलुनि आलिंगिला । वसिष्ठें हृदयीं. ॥४५॥ म्हणे "बारे दुर्लभ दर्शन तुझें । अवतरलासि फेडावया भूभोझें । मी गुरू तुझा म्हणतां माझें । मन लज्जा पावतसे. ॥ ४६ ॥ गुणवार्धि विपरीत गोठें । सर्वथा वाटे उफराटें । वृद्धाहुनि वृद्ध ते धाकुटे । आपणासि म्हणविती. ॥ ४७ ॥ पूज्य तो पूजकासि अर्ची पैं गा । माता रिगे अपत्याचां वोसंगा । विपासाक्रांता गंगा । उदक मार्गों ठाके. ॥ ४८ ॥ म्हणौनि तैसें सर्वोत्तमा । अवाप्तसकळकामा । तूं जगद्गुरू आणि महिमा । मज गुरुत्वाची देसी. ॥ ४९ ॥ तुज न वर्णवे सहस्त्रां वदनीं । शंकरादिक लागले ध्यानीं । धन्य अवतार नयनीं । लीळा दाखविली भक्तजनां." ॥ ५० ॥ तंव रामु म्हणे "गोसावि जी । तुम्हीं वांधिल्या आमुच्या मुंजी । तुम्हांसि पूजिलें पूर्वजीं । रघुपूर्वपरादिकीं. ॥ ५१ ॥ म्हणौनि तुमचां कृपाआशीर्वादीं । नित्य कीर्ती आमुतें वंदी । जैसे याज्ञिकां अधिकार सुरपदीं । प्रसन्न वह्निप्रसादें. ॥ ५२ ॥ गुरु तुमचा आशीर्वादकल्पद्रुमीं । मनोरथनामें सदा फळें स्वामि । तियें सेवित असों आम्ही । वंशपरंपरा. ॥ ५३ ॥ ऐसें राघवाचें वचनीं । सुधाब्धि वसिष्ठा मनीं । हेलावतु नयनीं । सुखाश्रु उचंबळले ॥ ५४ ॥ ऐसा वसिष्ठ आणी वैदेहीपती । गाढ आलिंगन देउनि परम प्रीती । वेगळे झाले भित्ती । प्रेम थांबलें असे. ॥ ५५ ॥ जैसें उपवासाउपरी । जेवितां सुख संक्रमे उदरीं । तैसेंची सुख थांबलें असे शरिरीं । जेवण; जाउनंतरें. ॥ ५६ ॥ कां त्रासभोगानंतरें हे राहे । प्राप्त समयीं जें सुख होत आहे । तेंचि सुख पुढारें राहे तैसें वसिष्ठा वाटे यानंतरें. ॥ ५७ ॥ मग सुमित्रानंदनें । प्रीतिपूर्वक सौमुख्यें । सलिध होऊनि हास्यवदनें । गुरु नमस्कारिला. ॥ ५८ ॥ तं भक्तश्रेष्ठि कल्याण हो । म्हणत उचंबळला स्नेहो । धरूनि हृदयां

बाहीं । क्षेमालिंगन दिधलें. ॥ ५९ ॥ समयींचें उचित तेच क्षणीं । वसिष्ट वदे गौरववाणी । म्हणे धन्य " गा सौमित्रा, करणी । केली लोकोत्तर. ॥ ६० ॥ श्रीरामाचिये संगतीं । वनांतरीं केली वस्ती । राज्यभोगाचा अभिलाषु चित्तीं । तिळतुल्य विवेचिना. ॥ ६१ ॥ आविर्भवला सानुरागु । धरिला अग्रजदीक्षामार्गु । जननी, जनकु, जाया त्याचा त्यागु । तत्काळ केला. ॥ ६२ ॥ दासानुदासाच्या परी । स्नेहार्णवआज्ञा शिरीं । धरूनि सर्वदा उपचारीं । सेवावृत्ती केली. ॥ ६३ ॥ दीन केले जेहीं स्वर्गींचे विबुध । ऐसे राक्षस प्रसिद्ध । ते तुवा वधिले महायुद्ध । पुरुषार्थें केलें. ॥ ६४ ॥ नाना बाळदशा वय धाकुटें । परि बुद्धिवैभव अगाध मोठें । ज्याचिये राहाटीचेनि परिपाटें । शास्त्रें माथें तुकिती. ॥ ६५ ॥ विविध स्थळीं बहुवश । भोगिले असाधारण क्लेश । जोडिलें निर्दोष यश । लोकोत्तर लक्ष्मणा. ॥ ६६ ॥ ऐसें ब्रह्मऋषी महातपी । उचित शब्द समर्पी । परिसोनि सर्वेंचि निरूपी । सौमित्रु प्रत्युत्तर. ॥ ६७ ॥ म्हणे "परिसु ज्याचे करकर्णीं । तो काय लेईल काचमणी । नित्य पंचामृत जेवणीं । तो तृणबीज न भक्षी. ॥६८॥ श्रीराघवियेच्या भाशा । नव्हे देशांतरकूपाची इच्छा । नुठी वासना कामधेनुवत्सा । अजाकळपीं बसावेयाचि. ॥ ६९ ॥ जो असे कल्पद्रुमातळवटीं । तो उबगु धरूनि पोटीं । खदिरवनांत बांधौनि पर्णकुटी । वसैल हें न घडे. ॥७०॥ म्हणौनि या हो श्रीगुरु स्वामी । श्रीरामचरणावेगळा मी । भोगीत राहीन अयोध्येची लक्ष्मी । होईल ऐसें कैसें ? ॥७१॥ श्रीरामचरणाश्रयीं जो आनंदु । तो नाना सुखाचा मूळकंदु । अनुवादवेना वाचा स्वादु । जैसा मुकेया शर्करेचा." ॥ ७२ ॥ ऐसीं सुमित्रागर्भरत्नें । बोलिलीं कीर्तिजनकें वचनें । परिसौनि सर्वांचीं मनें । सुखार्णवीं मुराली. ॥ ७३ ॥ वसिष्ठ म्हणे ' भली रे भली । तुझी बुद्धिनदी उगमली । ते रामचरणसुखाब्धी मिळाली । मुरडैल कैसी ?" ॥ ७४ ॥ श्रीगुरु सौमित्रें पुसियापरी । क्षेमालिंगनाचा अवसरीं । प्रियवादु केला ज्याभीतरीं । सकळ शास्त्रांचें सार ॥ ७५ ॥ पुढें तदुपरी तेचि क्षणीं । जानकी जोडूनि पाणी । रघुवंशगुरुचरणीं । नमस्कार केला. ॥ ७६ ॥ ऐसें देखोनि सीतेसी । "कल्याण कल्याण" म्हणे ब्रह्मऋषी । "रामेंसीं राज्य करीं जैसी । अवघी माया ब्रह्में. ॥ ७७ ॥ भाग्य आमचें आलें फळा । पुनरपि निधान देखिलें

डोळां । अपूर्व समारंभसोहळा । तुमच्या आगमनाचा. ॥ ७८ ॥ जनकजे तुझा तारकमहिमा । अपार न वर्णवे आम्हां । जेणेंकरौनि श्रीरामा । सदा निजानंदु. ॥ ७९ ॥ तुझेनि प्रसादें जनकपुत्रि, । पीडक पडले काळचक्रीं । सुखें शैव्यसुता, शची, सावित्री । स्वामिसीं राज्य करिती. ॥ ८० ॥ महत्कृत्य सिद्धी गेलें । त्रैलोक्य सुखी जालें । कीर्ती ख्याती रूढलेयां पुरलें । कोडें समागमियांचें. ॥ ८१ ॥ ऐसिये धन्यावतारे सीते । पवित्र दर्शन तुझें पतिव्रते । नांव घेतलेया प्रभातें । दोष दग्ध होती." ॥ ८२ ॥ ऐसा वसिष्ठाचा अनुवादीं । उत्तर दे सीता सुशब्दीं । "गोसावियांचां आशीर्वादीं । सकळ शुभचि जालें. ॥ ८३ ॥ वृक्षगर्भी फळें असती । परी अवकाळीं न दिसती । काळनेमें प्रकटती । आपल्याचि शाखापल्लवीं. ॥ ८४ ॥ म्हणौनि तैसें यथार्थ । न चळतां परमार्थाचे पंथ । पूर्ण होताति मनोरथ । सामर्थ्यवंता जनाचे." ॥ ८५ ॥ ऐसा वैदेहीचा वाग्विलासु । जैसा सुराला सुवासु । परिसौनि परम संतोषु । वसिष्ठासि जाला. ॥ ८६ ॥ असो इतुकी टीप प्रसंगाची । कथिली प्रश्निकांपुढें रुची । आतां भेटी होईल मातांची । तें सविस्तर सांगिजेल. ॥ ८७ ॥ इति *श्रीरामायणी कथा* । युद्धकांडउत्तरभागु सर्वथा । पुढें परिसा पंडित हो ग्रंथा । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ८८ ॥

---

## प्रसंग त्र्यांद्दत्तराचा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । पुढें पाहातां तेचि क्षणीं । चतुरंग कटकाच्या अक्षोहिणी । येवों सरल्या धरणीं । सिंधु लोटला जैसा. ॥ १ ॥ त्या मायामुखीं त्वरा बहुता । सेवकीं सुजनीं वेष्टिता । शिबिकारूढ उत्कंठिता । जननिया आलिया कैशा ? ॥ २ ॥ सरिता पुरें उचंबळती । धेनु वोरसें धांवती । कां पिलेयांपासि झेंपावती । पक्षिणी पाखरिया. ॥ ३ ॥ संसारसंबंधु मायामोहो । सिंधुपरिस आगळा स्नेहो । चित्त द्रवताविलें पाहो । पुत्रभेटीचां. ॥ ४ ॥ क्षेमालिंगनाकारणें । भुजांसि होती स्फुरणें । लोचनें स्रवती सुलक्षणें । स्नेहाचां आनंदातें. ॥ ५ ॥

ऐसिया माता तिघी जणी । सकळ राज्याच्या स्वामिणी । त्यांचेया वाहनापुढें वेत्रपाणी । गर्जती धावती. ॥ ६ ॥ चतुरंग चक्र येत मार्गे । संपूर्ण सुतस्नेहरंगें । त्या पुढेंचि पावलिया वेगें । आर्ते उचंबळत. ॥ ७ ॥ शीघ्र येतों सरला त्याचा यावा । जैसा क्षीराब्धीचा हेलावा । शत्रुघ्न सांगता जाला राघवा । स्वामी माता आलिया. ॥ ८ ॥ ऐसें भरतानुज बोले । आइकोनि सर्व एकचित्त जाले । पूर्ण हर्षे पुढारले । रामु भेटावया ॥ ९ ॥ दृष्टादृष्टी जाली तिये काळीं । हाकिलीं वाहनें भूमंडळीं । ठेवितांचि शीघ्र जवळी । राम लक्ष्मण आले. ॥ १० ॥ देखतांचि दोघांही पुत्रां । पारणें जालें दोहींच्या नेत्रां । उठवलाहें कौसल्या, सुमित्रा । शिबिकातळीं उतरल्या. ॥ ११ ॥ पुढें राम, लक्ष्मण दोघां जणीं । मस्तक ठेविले माताचरणीं । तंव त्या "बा रे" म्हणौनि तत्क्षणीं । आलिंगना रिगालिया. ॥ १२ ॥ पूर वाहावला गहिंवराचा । उभारणी जाली रोमांचा । सद्गदित कंठ भरले वाचा । येसवलिया कैसिया ॥ १३ ॥ वियोग होता बहुकाळावरी । अवस्था उचंबळली उदरीं । ते फूत्कारस्वरें मुखाबाहेरी । आति मानें आली. ॥ १४ ॥ नयनातुनि अश्रु पडती । तेणें पृष्ठिभाग भिजती । कृशांगी कौसल्या बोलती । जाली ते समयीं ॥ १५ ॥ बा रे "वत्सा रघुनाथा । वना गेलेया तुझी वियोगव्यथा । न साहवेचि दशरथा । तत्काळ देहो टाकिला ॥ १६ ॥ हृदयींचें जीवित्व हरिलें । तैसें मजपासौनि तुज नेलें । जळचर जळवेगळें पीडैलें । तैसें आजि वरि मज. ॥ १७ ॥ कल्पतरू आंगणींचा उपडिला । चिंतामणी गृहींचा गोफणिला । परिसु पाळविचा टाकिला । तैसें रायासि घडिलें. ॥ १८ ॥ दुष्टकर्मनामा नदी । ते बाधा करी प्रवेशतांचि पदीं । राजेनि प्रवेशौनि तियेचा हृदीं । जळक्रीडा केली ॥ १९ ॥ तेणें पुढें बाधिलें कैसें । जेणें खेदु पावलीं जनमानसें । अघटित घडलें अनारिसें । जिवेंसि साटी जाली. ॥ २० ॥ बा रे चंदनाचा मुळीं । होती सर्पिणी काळी । का निधानकुंभाजवळी । विवसी वसती ॥ २१ ॥ स्वार्थु केला दुष्ट बुद्धी । परि तो केवा पावैल सिद्धी । जग निंद्य जालें आणि निधी । गृहींचा गेला ॥ २२ ॥ राजेयाचि तरी धन्य सुमती । सकळ प्रियकार्य घरिलें चेत्तीं । पुढें भ्रष्ट जाला कुसंगती । भापापाशें बाधिला. ॥ २३ ॥

ऐसें विपरीत जाहलें, बा रे रामा, । राज्य सांडूनि तूं सर्वोत्तमा । वनवासीं असतां श्रमा । पात्र जालासि बहु. ॥ २४ ॥ सकळ जिवांचा तूं जीवनु । राजसु राजीवनयनु । सकुमार सुंदर तुझीया तनु । दिव्यांवेंविण होती. ॥ २५ ॥ उष्ण शीत पर्जन्य वात । त्यांचा भोगु जाला बहुत । चतुर्दशवर्षेपर्यंत । मंगळस्नान जालें नाहीं. ॥ २६ ॥ सुकुमार तुझे चरण । अरण्यमार्गीचे कंटक पाषाण । कोमळ तळीं बाळंडां कठीण । चुबकळे असती." ॥२७॥ ऐसी कौसल्या मायामोहें । गहिंवराचेनि प्रवाहें । क्षेमालिंगन दे स्नेहें । बोलिली बहुसाल. ॥ २८ ॥ रामु उत्तर दे म्हणे " माये, । होणारासि कोण काळि काये ? । मान्य आमचें थोर जे तुझे पाये । देखिले पुनरपी. " ॥ २९ ॥ आतां असो हा वाग्विलासु । रामभेटीचा परम संतोषु । तेथें काइसा करुणारसु । हा बोलिजा न पाहिजे. ॥ ३० ॥ रामु आलिंगिला कौसल्या । आनंदें दिशा दाटलिया । हृदयीं वाहों लागलिया । सुखामृतसारिता. ॥ ३१ ॥ तियाचि परि प्रियप्राणु । सुमित्रा हृदयीं धरिला लक्ष्मणु । जैसें अनुं आणिलेया सुवर्णु । चिंततेनें आलंगिला. ॥ ३२ ॥ कौसल्या आणि सुमित्रा । गंगा, गौतमी ऐशा पवित्रा । दोघी भेटलिया दोघां पुत्रां । पूर्णानंदें ॥ ३३ ॥ वियोगचिंता चित्तीं होती । ते गेली दिक्चक्रापरती । जैसी स्वप्नपीडा जागृती । घातली ब्रह्मांडाबाहेरी. ॥ ३४ ॥ दोही मातांचे संतोषसागर । सप्तार्णवांपरिस थोर । मर्यादा कैंची उदर । मळलें भूगोलावरी ॥ ३५ ॥ यानंतरें रघुपती । निजमातेऐसी परम प्रीतीं । सुमित्रा नमस्करूनि आर्ती । क्षेमालिंगन दिधलें. ॥ ३६ ॥ तैसेंचि लक्ष्मणें । नमस्कारें कौसल्येकारणें । घालूनि आनंदपूर्णें । क्षेमालिंगन दिधलें. ॥ ३७ ॥ भेटी कैंचा कौसल्येसी । लक्ष्मणावरी प्रीती रामाऐसी । तनु कुरवाळूनि म्हणे " प्रवासी । बा रे कष्टलासि बहु. ॥ ३८ ॥ धन्य धन्य पत्ता वेल्हाळा बरवी तुझी गुणलीला । तुझेनि यशें धवळला । खमंडपु दिसतु. ॥ ३९ ॥ तुज सुमंद्र ऐसी प्रीति हृदयीं । रामासी समर्पी समयीं । सांभाळिलें धनाचा ठायीं । सेवा थोर केली." ॥ ४० ॥ उपरी लक्ष्मणें उत्तर दिधलें " माये, तुझिया कृपा कल्याण जालें । मानप थोर जें तुमचीं पाउलें पुनरपि देखिलीं." ॥ ४१ ॥ पुढें शीघ्रचि यानंतरें । सुमित्रेनि भेटी

रघुवीरें । सतोषें सन्मानें आदरें । कैकेयी नमस्कारिली. ॥ ४२ ॥ भेद-बुद्धी कैंची रघुराजा । परम प्रीतीं उचलुनि भुजा । क्षेमालिंगन दिधलें वोजा । कौसल्येसि जैसें. ॥ ४३ ॥ कैकेयी आलिंगनाचा सगभीं । म्हणे "बा रे अपयशा पात्र जाहियें मी । परी कुसुमांचा मस्तकु कुसुमीं । पुनरपि भरला. ॥ ४४ ॥ होणार होऊनि गेला पूर्वरगु । निर्माण तरी तुम्हीं भोगिला भोगु । परी मी लोकांनिंद्य जाहलें डागु । मज थोर लागला. ॥४५॥ परि तूं सर्वज्ञमौळिमणी । रामा, जाणसी अतःकरणीं । मी निमित्तधारी आहें वाणीं । परिहारू वदतां नये. ॥ ४६ ॥ आजि सकळांची मनोरथसिद्धी । जाली भेटलासि गुणनिधी । कृपा पाहें म्हणौं तरी भेदबुद्धी । तुज सर्वथा नाहीं ॥ ४७ ॥ भूमि, चदन, वायु, ईंदु । आदित्यु, अमृत, गंगाऱ्हदु । यासि सुष्ट दुष्ट नाहीं भेदु । तैसाचि तुज रामा!" ॥ ४८ ॥ कैकेयी समयीं बोलिली ऐसें । राघवें उत्तर सरिसें । देइजे अमृतरसें । बोले प्रिय मनोहर. ॥ ४९ ॥ म्हणे "बो माते तुज काहीं । जाण सर्वथा शब्द नाहीं । या जीवाचीं शुभाशुभें प्रवाहीं । पडलीं काळाचिये. ॥ ५० ॥ जो जियें काळीं भोगु ज्यातें । तो करिजेत कर्में बळवंतें । निमित्त ठेवावें पुढिलातें । हें परमार्थी न मिळे. ॥ ५१ ॥ कितीएक कार्य होणार होतें । म्हणौनि वनवासु घडला आमतें । माझेनि ऐसें जालें हें मागुतें । वाचेसि आणू नको" ॥ ५२ ॥ ऐसें श्रीरामें कैकेयीलागीं । शब्दसुख दिधलें तिये प्रसगीं । जैसें अन्यायी त्यासी सुखरंगीं । समर्थें क्षमा केली ॥ ५३ ॥ उपरी तैसाचि सौमित्रु । सर्वां प्रिय तो पवित्रु । कैकेयी नमस्कारी पुत्रु । क्षेमालिंगन दिधलें. ॥ ५४ ॥ पुढें तेचि समयीं रघुनाथु । जगत्रयजीवनु समर्थु । सकळ अयोध्यावासी त्याचा मनोरथु । पूर्ण करिता जाला. ॥ ५५ ॥ महानुभाव धार्मिक । सदाचार नागरिक । त्यां सर्वांसि पृथक । क्षेमालिंगन दिधलें. ॥ ५६ ॥ तयाचिया मनसुखसरिता । ब्रह्मानंदसमुद्रीं जळीं मिश्रिता । लक्ष्मणु तैसाचि भेटली सीता । सकळीं नमस्कारिली ॥ ५७ ॥ रामु कौसल्येसि भेटलेयावरी । तैसीचि जानकी जाली सामोरी । कौसल्येच्या पायावरी । मगळ मस्तकु ठेविला. ॥ ५८ ॥ तव कौसल्या झाली बोलती । दिधला आशीर्वादु प्रीतीं । म्हणे "होई वो माते पुत्रवती । क्षेमालिंगन देईं" ॥५९॥ थोर प्रीतीचा प्रवाहीं । सीतेसि धरूनि दोहीं बाहीं ।

कौसल्येनें उचलाही । उदरोसें धरिलें. ॥ ६० ॥ म्हणे "दैवें देखिलीसि माये जानके । सुंदरे सुकुमारे सुमनकळिके । तुवां दुष्ट दिन भोगिले जितुके । तैसे न भोगावे वैरी. ॥ ६१ ॥ राजसे वो राजकुमरी । नवपंच वर्षेंवरी । अंतरली होतीसि दूरी । प्राणांहूनि प्रिये. ॥ ६२ ॥ आतां रामासरिसी विद्वद्वृंदीं । नांद वो तूं राज्यपदीं । ऐसें कौसल्या वदे नदी । वाहे अमृताची. ॥ ६३ ॥ करांगुळी धरूनि सीतेची । मुद्रिका स्वकरकनिष्टेची । अमोल्य नवरत्नांची । लेवविली प्रीतीनें. ॥ ६४ ॥ याउपरी तैसोंचि जानकीया । सुमित्रेसमीप होऊनियां । कर जोडूनि तिच्या पायां । नमस्कारू केला. ॥ ६५ ॥ "ये ओ माये" म्हणोनि करीं धरिली । आशीर्वाद देऊनि आलिंगिली । म्हणे "शिणलीसी वो, प्रवासें जाली । कृश काया बहुत." ॥ ६६ ॥ ऐसें बोलोनी विवेकाळीं । दिधली कंठींची रत्नावळी । यानंतरें मैथिली । कैकेयीप्रती चालिली ॥ ६७ ॥ क्षीराब्धितटींच्या देवता । त्यातें पृथक् पृथक् विष्णुकांता । तैसें त्या सामुचातें सीता । नमस्कारिती जाहली. ॥ ६८ ॥ जानकी सालंकार वचचवित । चाले तिकडे भूमि उजळत । जैसी प्रदीपिका हिंडतां झगझगत । तेज पुढें पुढें. ॥ ६९ ॥ पदाळकारीं सहज गर्जनें । हरिलीं जनमात्राचीं मनें । एकरस जालें असे, वदनें । दिशांचीं दाटलीं सुखें. ॥ ७० ऐसें पुढें कैकेयीजवळी । हंसगतिका गुणवंती मैथिली । समीप येऊन करकपोळीं । नमस्कार केला. ॥ ७१ ॥ तव कैकेयीनें बाह्यरंगीं । लौकिक राखिले तिये प्रसंगीं । क्षेमालिंगन जानकीलागीं । देऊनि बोलती जाहली ॥ ७२ ॥ म्हणे "वनवासी घडलें दुकराटें । सीते, वय तुझें धाकुटें । प चारित्र जाहलें मोठें । त्रिभुवनामध्यें. ॥ ७३ ॥ सीते, तुझेनि लावण्यपणें माळलीं हारकांचीं हरिणें । देवदर्प हरिले जेणें । तो भाग्यवान् जाहला होता ॥ ७४ ॥ असाधारण त्याची लीला । शचि, सावित्रीसी दुर्लभ डोळा । परी तु तेथींचा सोहळा । समग्र देखिला. ॥ ७५ ॥ तुझेनि निमित्यें वो जानकी पुरुषरूपती त्याची लोकीं । तो जाऊनि राहिला तटाकीं । मंदाकिनीचिये. ॥ ७६ ॥ ऐसें कैकेयी विरस बोलिली । सीता स्तब्ध असे उगली मग तेथींचि सुरखोनि बैसली । जेथें कौसल्या, सुमित्रा. ॥ ७७ ॥ कैकेयी दूनी सुमित्रा, कौसल्या । काहीं एक अंतरें बैसल्या । परी त्या ति

नमस्कारिल्या । सुग्रीवें, विभीषणें. ॥ ७८ ॥ चतुरंग दळें मेदिनीं । रामलक्ष्मणांसि लोचनीं । पाहोनि साष्टांग धरणीं । नमस्कारू घातले. ॥ ७९ ॥ असो ऐसी आत्मयारामाची । धन्य भेटी परमानंदाची । जाहली समस्तांसी त्या रुची । ब्रह्मांड भरलें. ॥ ८० ॥ पुढें प्रसंगु ऐसा असे ग्रंथीं । समस्तांसहित दाशरथी । नंदिग्रामीं वसले तिथी । तद्दिनीं पष्ठी प्रवेशली. ॥ ८१ ॥ राघवें अयोध्येहूनि प्रस्थान । करूनि क्रमिले प्रवासीं दिन । त्यांसी गणना पंचसहस्रमान । अधिक चत्वार दशक. ॥ ८२ ॥ इतुका काळवरी रामलक्ष्मणें । त्यागिलीं राजोबरें भूषणें । तरुअंतरत्वचा तेणें । शरिरें वेष्टिलीं होतीं. ॥ ८३ ॥ योगियांची दशा ठाकली देहीं । श्मश्रुकर्म न घडेचि कांहीं । तैलाभ्यंग जालें नाहीं । कोणेही दिवसीं. ॥ ८४ ॥ मस्तकींचे कबरीभार । वळिले ठाउनि वटक्षीर । ते आजिवरी जुडे साचार । सोडिले नाहींती. ॥ ८५ ॥ ज्याचेनि कृपाकटाक्षेंकरूनी । देवांसी दिव्यभोग दिव्यभुवनीं । तो रामु हे लीला धरूनी । चरित्र दाखविलें. ॥ ८६ ॥ रामलक्ष्मणीं अंगीकारिलें । तेचि दीक्षेसी भरतें धरिलें । राज्य न पाहेचि दृष्टी, ठेविलें । मस्तकीं रामपादुकांसी. ॥ ८७ ॥ तेणेंही अष्टाविंशती अयनें । राज्य निहाळिलें नाहीं नयनें । श्मश्रुकर्म मंगळ स्नानें । तनु अमळ न करीचि. ॥ ८८ ॥ अपूर्व बंधुत्व चतुर्वर्गाचें । हृदय साचार एकएकाचें । त्रैलोक्य विचारितां कैचें । ऐसें आणिके ठायीं. ॥ ८९ ॥ आतां रामु सर्वोत्तम सर्वेशु । उदें करील अयोध्याप्रवेशु । आजि नंदिग्रामीं केला वासु । ऐसेया कारणें हो. ॥ ९० ॥ श्मश्रुकर्में मगळ स्नानें । कौरजती दिव्यांबर परिधानें । उत्तमें गंधें चंदनें । उटणें कपाळीं आंगीं. ॥ ९१ ॥ सकळ सर्वांसी राजोपचार । दिव्य भूषणें अलंकार । नाना रसयुक्तें खाद्यानें साचार । अमृततुल्यें अनेकें. ॥ ९२ ॥ तैसें उन सुशीतळें जळें । परिमळमय कर्पूर तांबूळें । घेइजतीळ यतनीळें । सर्वांधव सकळेंसीं. ॥ ९३ ॥ ऐसें अहोरात्र सीतापद्मुभें । क्रमूनि प्रभातें मुहूर्तें शुभें । समस्त सहपरिवारें समारंभें ।

अयोध्या प्रवेशिजेल. ॥ ९४ ॥ तो तो कौतुककल्हरीप्रसंगु । कवि-
वाग्विलासचतुर चांगु । परिसतां होतसे भंगु । महापातकांचा. ॥ ९५ ॥
इति श्रीकथा रामायणीं । युद्धकांड वदली वाल्मीकवाणी । तें परिसतु
पंडित गुणी । कृष्णदासु मुद्गलु म्हणे. ॥ ९६ ॥

---

## प्रसंग चौऱ्याहत्तरावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ धन्य नंदिग्रामाचा प्रदेशी । वस्ती झाली रघुनाथासी । समुद्र भेटों आला तैसा । वेष्टित वाहिनीदळें. ॥ १ ॥ पूर्णचंद्रामवतीं तारागणें । कां सूर्यबिंब-सारिसीं किरणें । नाना दोंदें पुरुषाश्रित राहणें । जैसें कर्मकळापांसि. ॥ २ ॥ शैराचे स्वेच्छा दक्षिणभागीं । वस्ती जाहली ऋक्षकपीलागीं । बिभीषणु पूर्वे आप्तवर्गी । सावकास राहिला. ॥ ३ ॥ रत्नेरेकडे सम मंदिनीं । राहिली चतुरंग वाहिनी । सकळ महंतीं अयोध्याजनीं । पश्चिमे वस्ती केली. ॥ ४ ॥ मध्यें मंडळीं रघुनाथु । वसिष्ट, माता सबांधव समर्थु राहिला पूर्ण मनोरथु । सकळांचा करूनी. ॥ ५ ॥ दिसे रत्नाचिये पाळीं । कल्पनद्वी कल्पद्रुमाजवळी । तैसी निकट असे मैथिळी । श्रीरामासमीप. ॥६॥ आतां शत्रुघ्नें आणि सुमंतें । कापडी गृहें चित्रविचित्रें । उभारिलीं सकळां सूत्रें । विस्तीर्ण अति विशाळें. ॥ ७ ॥ जीमूतानें अंबर धावळे । कीं गरुडें पक्षातें पसारिलें । तैसें मंडपासी ओटूनि दीधलें । अति उंच आकाशीं. ॥८॥ त्या तळीं चंद दंट उभारिले । चंदनाचे हेमपात्रीं बांधाविले । रत्नखचित रंगीं ढवारिले । असती सुंदर. ॥ ९ ॥ दिव्य पट्टकूळें सकुमारें । सुचित्रें अति मनोहरें । यांचें अंतर चांदवे परिकरें । बांधिले अपूर्व. ॥ १० ॥ वेष्टित चित्रपर्णाच्या वोळी । आणीक रत्नपुंजांच्या जाळी । लाविले अधोमुख मुक्ताफळीं । घोंस ठायीं ठायीं. ॥ ११ ॥ गृहें अंतरगृहें सुंदरें । पट्टशाळा चित्रशाळा मंदिरें । बांधिलीं ज्यांवरी मनोहरें । चित्ररूपें लिहिलीं. ॥ १२ ॥ अपूर्व अंबरगृहाची रचना । जे तुच्छ करी निमुरना । देवतांचि गर्वाभिमाना । विश्वकर्मयाचिया भंगी. ॥ १३ ॥ ऐसीं कापडमंदिरें

लक्षावधी । उभाविलीं शत्रुघ्नें सुमंतें बुद्धीं । मार्गमर्यादा नेटकी आधीं । शीघ्र संमार्जनें जालीं. ॥ १४ ॥ ठायीं ठायीं विस्तीर्ण समें । चित्रविचित्रें आसनें उत्तमें । बैसाविया पसरिलीं मनोरमें । बाह्य लोकांकारणें. ॥ १५ ॥ अंतर मंदिरें सपुरें । मंचक घातले साजिरे । वरी हंसतुळिका घातलिया रुरे । ज्यांवरी प्रभु जन्माचा. ॥ १६ ॥ पुष्पजाती कर्पूरतांबूलें । विविधें हर्म्यांची खाद्यें फळें । चंदनें जळें सुपरिमळें । पूर्णपात्रें सिद्ध केलीं. ॥ १७ ॥ ऐसी समयासारिखी सर्व सिद्ध । सामग्री गृहीं बहुविध । करूनि ठेले कुशळ सुबुद्ध । शत्रुघ्न, सुमंत. ॥ १८ ॥ पुढें श्रीरामें सीतारमणें । सुग्रीव बिभीषणाकारणें । गृहें देवविलीं तेणें । ते विश्रांती पावले बहु. ॥ १९ ॥ सकळ परिवार सुखावले । इंद्रपदातुल्य करूनि ठेले । म्हणती कोण भाग्य आमचें जालें । प्राप्त अलौकिक भोग. ॥ २० ॥ आणीक जितुके अयोध्यावासी । कापडगृहें वसावया त्यांसीं । दिधलीं ज्यां ज्यां योग्य जैसीं । सिद्धसामग्रीयांचीं शुभें. ॥ २१ ॥ उपरी रघुनाथु राजेश्वरू । राजगृहविशाळमध्यमेरू । तेथ बंधु माता गुरू । यांसमवेत राहिला. ॥२२॥ अंतरगृहीं प्रभु भार्या । मुख्य नायका जनकतनया । त्यांचे हृदयीं वाहाती नदिया । सुखामृताचिया. ॥ २३ ॥ परस्परें स्नेहसरिता । हरपें उचंबळती गुणवंता । प्रीतिमान बोलती देवता । जैशा देवांगनाचि वा. ॥ २४ ॥ बंधु माता गुरू एकें ठायीं । बैसोनि गोष्टी तत्समयीं । कीर्ती उचंबळत हृदयीं । परमानंदु त्यांतें. ॥ २५ ॥ असो हें, तिये अवसरीं । मंगलस्नानाचि वरवेयापरी । आइती आरंभिली आज्ञाधारीं । सुमंत वदतक्षणीं. ॥ २६ ॥ विशाळा कढैया कनकाचिया । जैशा कुक्षी न्हदाचिया । त्यांनीं क्षीरोदकें पूर्ण केलिया । गंधपर्णीयुक्ता. ॥२७॥ तत्काळही सेवक जनीं । योगु पात्रकांचा सुइंधनीं । केला कढैयांतळीं वन्ही । धडधडीत ज्वाळा सांडी. ॥ २८ ॥ आणिके बहु पात्रें थोरें । भरिलीं सुशीतळें नीरें । तिये जैसीं सरोवरें । ठेविलीं विशाळालागीं. ॥ २९ ॥ वृक्षविशेषफळांचा रसु काढिला । त्यांचा कनकपात्रीं पाकु केला । तो सिद्ध समीप ठेविला । तेलसंबंधु निरसावया. ॥ ३० ॥ तेथ बैसण्या चौकं घरणाचे । चित्रांग चौरंगमाचे । जे दुर्लभ इंद्राचे । मंदिरीं नाहींती. ॥ ३१ ॥ ऐसी सामग्री केली सेवकीं । तंव राज-अंगरंग नापिकीं । परिमळ चर्चूनि हस्तकीं । रामासमीप आले. ॥ ३२ ॥

मन्यरूपी ते इंद्राऐसे । रत्नखचित दंडांचे आरिसे । काढिले तेजोराशी जैसे । खालऊनि मस्तक. ॥ ३३ ॥ धूर्त कुशळ ते महाबुद्धी । मुख्य वसिष्ठप्रमुखांसि आधीं । दर्पण दाखऊनि कृपानिधी- । जवळी अविलंबें आले. ॥ ३४ ॥ कोटिकंदर्पलावण्य घनश्यामें । दर्पण निहाळिला श्रीरामें । रुपतीं बंधुवर्गा अनुक्रमें । दाखविते जाले. ॥ ३५ ॥ नापिक राजसेवक भले । श्मश्रु करावया सिद्ध जाले । तंव दयासिंधु ऐसें बोले । तयांप्रती तत्समयीं. ॥ ३६ ॥ म्हणे "अरे तुम्ही कितीएक । कुशळ मर्दनिये नापिक । बिभीषण, सुग्रीवादिक । यांची सेवा करा त्यांची." ॥ ३७ ॥ "हो जि स्वामी म्हणोनि" आपुले । अंगलग नापिक आज्ञापिले । ते बहुसाल तत्काळ गेले । सेवा करावया त्यांची. ॥ ३८ ॥ आणी सर्वेशु- तिये अवसरीं । सुमंतातें आज्ञा करी । म्हणे "मंगळ स्नानें उपचारी । करवा सुग्रीवा, बिभीषणा." ॥ ३९ ॥ ऐसी समर्थाची आज्ञा जाली । ते शीघ्र सुमंतें सिद्धी नेली । मग श्रीरामें प्रार्थना केली । तिये समयीं गुरूसी. ॥ ४० ॥ म्हणे "पूर्वजपुण्य हें स्वामी । श्मश्रुकर्म मंगळ स्नान तुम्हीं । कीजे, मग बंधुवर्गा आम्हीं । करूं तुमचिया आज्ञा." ॥ ४१ ॥ ऐसें बोले रघुनंदनु । तंव उत्तर दे पुरोहितु पुरातनु । म्हणे "धन्य राया आजचा दिनु । आज्ञा तुमची प्रमाण. ॥ ४२ ॥ आम्ही कर्म करित असों समर्था । ते तुझीच आज्ञा रघुनाथा । विरिंचि वाहातु आहे माथां । आणि काळूही धरितो." ॥ ४३ ॥ ऐसें वसिष्ठ बोलों सरे । तंव मर्दनिये महाले पुढारें । होऊनि वोनिलें जळ धारें । ऋषिपाद प्रक्षाळिले. ॥ ४४ ॥ श्मश्रुकर्म करूनि नेटकें । मग शुद्ध तैलें मस्तकीं हस्तकें । मर्दुनी आगें आंगीं निकें । उटणें गंधपिष्टें केलें. ॥ ४५ ॥ उपरी हेमासनीं सेवकीं । ऋषी बैसवूनि रत्नपात्रीं मस्तकीं । चर्चूनि उष्णोदकीं । तनुप्रक्षाळण केलें. ॥ ४६ ॥ इक्ष्वाकुकुळराजा बोजा । अभ्यंगु जाला मुनिराजा । दिव्यांबरें घेऊनि सहजा । पवित्रासनीं बैसला. ॥ ४७ ॥ लाविलें उत्तम चंदन । तंव रघुनाथु बोलिले वचन । "म्हणे जितुके अयोध्यावासी सुजन । तितुकीं मंगळस्नानें करावीं. ॥ ४८ ॥ आज्ञा समर्थाची जाहली । समस्तांसी मंगळस्नानें मांडलीं । तैल गंधें पृथ्वी धाली । उष्णोदकें वाहली नदी. ॥ ४९ ॥ ऐसा अभ्यंग जाहलियानंतरें । सर्वांसी दिधलीं उत्तमांबरें ।

सुग्रीवा, बिभीषणा मनोहरें । लेणीं लुगडीं दिधलीं. ॥ ९० ॥ पुनरपी बोले रघुपती । "माता हो तुम्हीं आणी समस्तीं । स्नानें अंतरगृहाप्रती । जाऊनि आतां करावीं." ॥ ९१ ॥ तंव कौसल्या म्हणे "स्नेहाळा । बा रे तुज देखिलें डोळां । पुरला समग्र सोहळा । तुम्ही मंगळस्नानें करा." ॥ ९२ ॥ मग रामु म्हणे " आतां । मज लक्ष्मणा, शत्रुघ्ना, भरता । मंगळस्नानें होती प्रथमतां । तुम्हीं हो होऊं दीजे." ॥ ९३ ॥ ऐसें रामु बोले तिये समयीं । मग कौसल्या, सुमित्रा, कैकेयी । जाऊनि अंतरगृहाचे ठायीं । मंगळाभ्यंग आरंभिलें. ॥ ९४ ॥ भरताप्रती यानंतरें । बोलिलें रामें राजेश्वरें । जैसीं कल्पिलीं फळें कल्पतरें । देइजेती समयीं. ॥ ९५ ॥ कां क्षुधेली वेळा जाणोनी । भोजनासि बैसवी जननी । नाना सोमु सुधाबिंदु सांडी वदनीं । चकोराचे शुक्लबीजे. ॥ ९६ ॥ ऐसियापरी बोलिजे राजीवनेत्रें । म्हणे " भरता तुवां, शत्रुघ्नें, सौमित्रें । श्मश्रुकर्मे करूनि पवित्रें । मंगळस्नानें करावीं. ॥ ९७ ॥ यावरी आनंदें तिये काळीं । भरतु उभा राहोनि बद्धांजळीं । वदता जाला जैशा बोली । शास्त्रवाक्याचिया. ॥ ९८ ॥ "जी जी राजधानीं राजा । आराध्यदेवतांची नव पूजा । दासु भोगीं प्रवर्तल्या सहजा । सुकृतासी क्षयो होणार. ॥९९॥ स्वामी, प्रथम विहित कर्म असे । तें पाळटितां उचित न दिसे । कळाटीं गंध न लावितां कैसें । नाभीसि प्रथम लावावें. ॥ ६० ॥ म्हणोनि अग्रजाप्रती आधीं । श्मश्रुकर्म मंगळ स्नान द्यावधी, । तुमचें जालेयावरी सिद्धी । आमचेंही जाईल. ॥ ६१ ॥ देवा पुण्यापाठीसि सरिसें । न पाचारितां फळ येत जैसें । तुमचेया भोगानंतर तैसें । आम्हांसि सर्वथा भोग. ॥ ६२ ॥ स्वामी, सुरकार्यप्रसंगें । तुम्हीं आपलेनि औआरंगें । स्वराज्य सांडिलें मागें । पितृमर्यादा रक्षिली. ॥ ६३ ॥ दिव्यालंकार दिव्यांबरें । सांडूनि धरिलीं तरुचिरें । भ्रमूं गेलेति वनांतरें । मज पाडिलें परतें. ॥ ६४ ॥ हें मज देखवेचिना डोळा । मग तुझी दीक्षा दयाळा, । अलादरें धरिली मंगळा । पादुका ठेऊनि माथां. ॥ ६५ ॥ वाट पाहतां आजिवरी । अवधिसमयीं रावणारी, । आलेती सुख जालें उदरीं । न मायें भूगोळाचियें. ॥ ६६ ॥ आतां तुझा मंगळ स्नानसोहळा । पहिलें प्रेमें मी पाहीन डोळां । दिव्यांबरें भूषणें सुगधमाळा । धराल स्वरूपेंसीं.

॥ ६७ ॥ तिये समयीं राजीवनयनो । मी स्वसुखें मरेन त्रिभुवना । उपरी तुझी आज्ञा जगज्जीवना । वाहीन मस्तकावरी. ॥ ६८ ॥ लक्ष्मण, शत्रुघ्न आणी मी । मंगळस्नानें करून स्वामी । मग आम्हांतें निहाळावें तुम्हीं । जैसी कच्छपी जठरजातें." ॥ ६९ ॥ ऐसें भरतु बोलिला । तंव वसिष्ठ म्हणे "भला रे भला । तेणें पूर्णानंदु आनंदें उचंबळला । जैसा अब्धि उचंबळे. ॥ ७० ॥ मग मिथिळामनानाथु । भरताचा पूर्णकर्ता मनोरथु । श्मश्रुकर्माकारणें समर्थु । बैसला उत्तमासनीं. ॥ ७१ ॥ नापिक नागर सुबुद्ध । राजमंगळगा कळाविद । सेवेकारणें आतले सिद्ध । सन्निध उभे जाले. ॥७२॥ पारिमळ चर्चित हस्तीं । जेणें परमाण देव तृप्त होती । नापिकनायक तेणें गभस्ती, । ऐसा आदर्श काढिला. ॥ ७३ ॥ झळाळीत तेज अति गाढें । माजी ब्रह्मांड बिंबत जेवढें । तो रघूत्तमाच्या मुखापुढें । दाखविला कैसा ? ॥ ७४ ॥ यंत्रें सुतेजाळीं चोखटें । फिरतां पवनापरी सदळुटें । तियें काढूनियां बोटें । पुसिलीं चतुर नापिकें. ॥ ७५ ॥ महाद्या मही पुण्यरूप न सहस्रमुखें न वदवे त्याचें तप । धन्य तो श्रीरामचरणासमीप । बैसला परमानंदें. ॥ ७६ ॥ तेणें आपुलिया कळाकुसरी । रघुपतीचें बरवियापरी । श्मश्रुकर्मसुमन करीं । आदरिलें योजा. ॥ ७७ ॥ सहज समाग्याचे कर कोमळें । बोटें स्पर्शी जैसीं कमळदळें । कवरीमळु काढितां डोळे । निववी निद्रिकरूनि. ॥ ७८ ॥ पाहिजे तैसें सुमती । श्मश्रुकर्म केलें निगुती । नखामें फेडूनि सुहस्तीं । सर्वांगसख दिधलें. ॥ ७९ ॥ ऐसी सेवा करून दर्पणधरू । हरुषें हेलावे जैसा सागरू । मागुता तो आदर्श मनोहरू । रामचंद्रीमुखा दाखवी. ॥ ८० ॥ कोटि कंदर्पाचे पुतळे । तयांचें लावण्य एकवाट मिळे । त्यांहूनि सौंदर्य तिये वेळे । श्रीरामस्वरूपी शोभे. ॥ ८१ ॥ यानंतरें तत्काळ । राजमर्दनिये फटाकुशाळ । चरणक्षाळनार्थ जळ । उष्ण आणिलें हेमपंत्री. ॥ ८२ ॥ उभे सन्निध आसनातळवटीं । रघुराजपदांबुजें गोमटीं । घेऊनि पसरां पाणिपुटीं । मळक्षाळन मांडिलें. ॥ ८३ ॥ एक सुगंध संतोषकारक । श्रीचरणांवरी उष्णोदक । घालूनि निवविती हस्तक । देती धारे तळवटीं. ॥ ८४ ॥ बहुतकाळ देशांतरीं । गमन केलें पायें पृथ्वीवरी । कांतें असतां पुरी । वैसिजे महजें. ॥ ८५ ॥ अहो मळले श्रीरामाचे पाये । ऐसा शब्दु बोलूं नये ।

ज्यांचेनि स्मरणें गळ जाये । जन्मांतरींचा. ॥ ८६ ॥ पुण्यांच्या कोटी जिये चरणीं । सकळ सिद्धींच्या खाणी । ब्रह्मादिकां आश्रयो, महिमा वाणी । वदवेना सहस्रमुखा. ॥ ८७ ॥ त्यां हो रघुपतीचां पदीं । जन्मस्या पुण्यतोयानदी । ज्या स्वर्गी बैसउनि गवांदी । घालती ब्रह्मानंदाचि. ॥ ८८ ॥ अहल्या शापें दग्ध शिळा होती । ते रामचरण लागलिया मागुती । दिव्यदेह जाली हें चारित्र गाती । भाग्यवंत त्रिभुवनीं. ॥ ८९ ॥ रामचरणनदीची रुची । जाणे मनोवृत्ति योगियांची । ज्याचेनि आधारें विरंची । सत्यलोकीं सुखें नांदे. ॥ ९० ॥ ऐसे श्रीचरण श्रीरामाचे । महिमेचा पारू बोलतां न वचे । सेवकीं प्रक्षाळिले त्यांचे । मनोरथ पूर्ण जाले. ॥ ९१ ॥ पाद प्रक्षाळिले तें पुण्यतोय । संचित सुवर्णपात्रीं तीर्थमय । त्यासी माधुर्य जैसें पय । सिंधूद्भव धेनुचें. ॥ ९२ ॥ श्रीरामचरणोदकमहिमा । जाणे कमळासन ब्रह्मा । नित्य वंदना आचमनार्थ उत्तमा । कमंडळामाजि धरिलें. ॥ ९३ ॥ आणि पूर्ण महिमा सर्वथा । रामपादोदकाची विश्वनाथा । कळली म्हणोनि माथां । धरिलें जटागर्भी. ॥ ९४ ॥ समर्थ ऐसें रघूत्तमाचें । दुर्लभ चरणतीर्थ प्राप्त कैंचें । सुपात्रीं संचित सुभाग्य ज्याचें । त्या भरतें भावना केली. ॥ ९५ ॥ उठोनी चरणोदकाजवळी । येऊनि घेतलें अंजुळी । घातलें मस्तकीं मुखकमळीं । अत्यानंदेंकरूनी. ॥ ९६ ॥ तापलें गंगान्हर्दी बोल्हावे । श्रमलें तें सर्व सुख पावे । तैसा भरतु आनंदें निवे । बाह्याभ्यंतरीं. ॥ ९७ ॥ तैसेंचि शत्रुघ्नें सौमित्रें । अग्रजपादोदक करपात्रें । घेउनि सारिसें पवित्रें । केली वंदना आचमनीं. ॥ ९८ ॥ रविवंशवराचें पायवणी । ज्यासि अमृतापरिस रुचि दुणी । तें समस्तीं सेविलें तत्क्षणीं । परम आवडीं परिवारें. ॥ ९९ ॥ याउपरी रामाअंगलगीं । करक्षाळना मुखमार्जनालागीं । जळ देउनि त्रयोदशगुणरंगी । सकर्पूर दिधला. ॥ १०० ॥ पुढें नरचक्रचूडामणी- । कारणें उत्तमांबर पडदणी । शत्रुघ्नें दिधली साडणी । जाळीवल्कलांची. ॥ १ ॥ हेममय रत्नविराजमान । चतुरचरणांचें उत्तमासन । बैसला गुणनिधान । मंगळाभ्यंगाकारणें. ॥ २ ॥ दुर्लभ त्रैलोक्याकारणें । तैसी रत्नवाटिका तियेचीं किरणें । गगना रंगु देती पाडउणें । पाहातां मौल्य पृथिवीचें. ॥ ३ ॥ ऐसिये वाटिकेभीतरी । पुष्पेल भरिलें सुखावरी । तो सुगंधु पसरला बाहेरी । दिग्देवता घालिया. ॥ ४ ॥ ऐसी स्नेहवाटिका हस्तकें । धरिली सुलभ

मूर्धनीं । उत्तमें सुवासें गंधेंकरूनी । उटणें सेवकीं केलें. ॥ २ ॥ परि मळवंत चोखणिया माथा । माखुनि मळ काढिला सर्वथा । जैसें मंगलस्नान जालें रघुनाथा । तैसेंचि त्रिवर्गी केलें. ॥ ३ ॥ उष्ण संतोषदायकें । शरीरक्षाळणाचीं उदकें । दिव्यांबरें प्रावर्णे परिधानेंकें । वेढीं येऊनि बैसले रत्नासनीं श्रीरामसन्मुख. ॥ ४ ॥ ऐसिये कल्याणकाळीं । दिव्य चंदनाचीं कचोळीं । ठेविलीं दासजनीं जवळीं । आरिसे दिधले करीं. ॥ ५ ॥ गंध कुंकुमवर्ण पिवळें । तेणें रेखिलीं कपाळें । शुभ्र चंदनें शीतळें । भुजांगीं उटी घेतली. ॥ ६ ॥ दिव्य भूषणें अलंकार । त्रिवर्ग लेइले मनोहर । उपरी उठौनी केले नमस्कार । आदि गुरू श्रमजासि. ॥ ७ ॥ रत्नझारिया पूर्ण उदकीं । पुढें दिधलिया सेवकीं । सर्वांधवीं सकळिकीं । संध्याकर्मे सारिलीं. ॥ ८ ॥ सखे सोइरे सुहृज्जनें । समस्तीं केलीं मंगळस्नानें । आतां भोजनसमयो जाला मिष्टान्नें । निपजलीं सिद्धें. ॥ ९ ॥ गृहांतराभीतरूनी । मुख्य कौशल्या जननी । आली जेथ पृथक् आसनीं । पुत्र सुशीतळ बैसले. ॥ १० ॥ मंगळ करूनि घवघवीत । दिव्यांबरालंकारीं शोभित । सविष, सहस्रावधी समस्त । सुहृज्जन बैसले. ॥ ११ ॥ मुख्य वसिष्ठ विप्रवृंदें । बैसलीं पवित्रें पूर्णानंदें । सुगोष्ठी करिताती सुशब्दें । परस्परें साधुजन. ॥ १२ ॥ ऐसा कौसल्या समारंभु । देखिला हरुषें भरला नभु । मनीं मानिला परम लाभु । पुत्र पुनरपि भेटले. ॥ १३ ॥ स्वरूप श्रीरामाचें सांवळें । लावण्यसिंधूहूनि सौंदर्य आगळें । परूनि वोवाळुनि सांडणें वेगळें । कोटि कामांचें सांडिलें. ॥ १४ ॥ दशरथकुळोत्पन्न कुमारू । राजा सकळ राज्यासी अलंकारू । हा आनंद्रु आपुला मेरू । महिमेचा श्रीरामु. ॥ १५ ॥ सर्वथा त्रिभुवनामाजी । मी एकी देवाचि धन्यदैवु आजी । माझा मज भेटला रामु राजी । आतां सुखें राहे. ॥ १६ ॥ ऐसी संतोषें क्षायता मनीं । मानिती जाली रामजननी । तंव समयोचित सुवचनीं । वसिष्ठ वदता जाला. ॥ १७ ॥ म्हणे "ब्रह्मोदकर्मा चउघनतु । ज्याचेया दिवसांतु नव पंच मनु । होऊनि जाती तो एकटा दिवु । युगें सहस्र चारी संख्या. ॥ १८ ॥ ऐसिची रात्री त्याचि वेगळी । ऐसा ब्रह्मा तो ज्याचा नाभिकमळीं । जन्मोनि अमर होता नाभि-

नवों । आपुलीं शतवरुषें. ॥ १९ ॥ शतवरुषें संख्या ऊर्ध्वगती । आला मग जाली उत्पत्ती । पुढें ईश्वरआज्ञेंतव महामती । सृष्टी रचुनि राहिला. ॥ २० ॥ परी तूं परम धन्य, परम भाग्याची । जननिया रघुनाथाची । आम्हीही सदैव तूं आमची । यजमानिनी कौसल्ये. ॥ २१ ॥ ऐसेया ब्रह्मेया व्यापाधुनि जन्मु । जाला तो आदिपुरुष उत्तमु । तोचि हा श्रीरामु । तुझ्या उदरीं अवतरला. " ॥ २२ ॥ ऐसें वसिष्ठें समयासारिसें । बोलिलें कौसल्येचेनि मनसुखें । विस्तारू धरिला, तेणें सुखें । दिशाचीं दाटलीं. ॥ २३ ॥ परि कौसल्या वदे सुशब्दीं । " श्रीगुरु तुमचां आशीर्वादीं । मनोरथ पुरला पदीं । बैसलें मागुतें भाग्याचां. " ॥ २४ ॥ ऐसा सुशब्दांचा सोहळा । जाला अमृतापरिस आगळा । आतां भोजनं करावेयाची वेळा । अपराण्ह प्रवर्तलें. ॥ २५ ॥ तंव तिये समयीं रघुपती । बोले सुमंत्रियाप्रती । म्हणे " बहुपात्रें पाकनिष्पत्ती । पर्वडी पूर्ण भरा. ॥ २६ ॥ सुग्रीवा विभीषणाकारणें । सपरिवार तृप्ती होये जेणें । इतुकें मिष्टान्न पाठविणें । दधि, पय, मध्वाज्ययुक्त. ॥ २७ ॥ आज्ञा स्वामीची होऊनि पुरे । तंव प्रधानें सहस्रावधि म्हणियारे । पक्वान्नपात्रें देऊनि त्वरें । चालविले कैसे ? ॥ २८ ॥ अमृतापरिस अधिक गोडी । ऐसेया रसाच्या कावडी । घृतामधाच्या दुडी । बहु बहुतीं घेतलिया. ॥ २९ ॥ ऐसी भक्ष्यसामग्री सेनानाथें । शीघ्र चालविली सुपंथें । असंभाव्य आणि जेथें । सुग्रीव, विभीषण. ॥ ३० ॥ वरविया ओजा पर्वडी । त्यांसि समर्पिलें त्यांच्या आवडी । जेथ प्रसाद केलेया गोडी । अधिक अमृताहुनि. ॥ ३१ ॥ जनामध्यें नाहीं जोडिलें । ऐसें सर्वांसी इच्छाभोजन जालें । होऊनि पर्वततुल्य उरलें । मिष्टान्न एकीकडे. ॥ ३२ ॥ सेविलीं सुशीतळें जळें । घेतलीं सकर्पूर तांबूळें । निजासनीं सुखांडले, आगळें । सुख समुद्राहुनि जालें. ॥ ३३ ॥ असो सुग्रीवा, बिभीषणालागीं । अन्न पाठविलें तेची पूर्वप्रसंगीं । रघुनाथासहित सुहृद्वर्गीं । भोजनाकारणें बैसिजे. ॥ ३४ ॥ विशाळ सुशाळेभीतरीं । पंगती बैसलिया चतुरपारीं । जैसिया मानससरोवरीं हारीं । हंसाचिया. ॥ ३५ ॥ का क्षीरार्णवाचिया पाळीं । पराभुती राजा बळी । अमृतपानालागीं बोळी । सुरगणांच्या बैसलिया. ॥ ३६ ॥ ऐसे पगतीकर सहस्रावधी । बैसला मुख्य नायकु गुण-

निधी । विस्तीर्ण हेमपात्रीं सिद्धीं । घालूनि तेय आणिल्या. ॥ ३७ ॥ वाटियांचीं कनकताटें । सोमसूर्यासारखीं पसरटें । पृथक् पृथक् मांडूनि चोखटें । माजि मिष्टान्नें वाढिलीं. ॥ ३८ ॥ शाका लवणशाकांचीं शतें । आज्यें विविधा परींचीं बहुतें । लेह्यें पेयें चोष्यें, परतें । जियें अमृतासि म्हणती. ॥ ३९ ॥ मुद्गांचीं मिळणी केली । एकांतु शर्करा पचविली । पूर्णब्रिंबापरिस ओढविली । शोभा कोरडीयांची. ॥ ४० ॥ ओदन वाढिला मध्यमंडळीं । महिमा मेरूहूनि आगळी । सुवासु उदेला बहुवस दाळी । वरान्न मिरवे माथां. ॥ ४१ ॥ कथिका आपुलांचे रुची । आणिका अन्नासि म्हणे 'परतेंची' । वटक बहुतां परिचे ज्यांची । देखांसि दुर्लभता. ॥ ४२ ॥ कैंचा जळलेशु तें पवित्र शुद्ध । आणिलें कामधेनूचें दुध । बोलिजे परमानंद प्रसिद्ध । क्षीर अति उत्तम. ॥ ४३ ॥ स्वेच्छा जेवितां परवडी. । विविधा परींचीं अन्नें गोडी । अधिक पीयूषापरिस आवडी. । आरोगिती मोक्षें. ॥ ४४ ॥ मुगधें निर्मळें, शीतळें । रत्नविराजित झारियांतिल जळें । जेवणारांसि देती अनिळें । निववितीं जन पाणी. ॥४५॥ इच्छाभोजनाचां अंतीं । स्वादिष्टें तक्रें दधीं वाढिती । असो ऐसीं भोजनें तृप्ती । सकळांसी जाली ॥ ४६ ॥ उपरि उत्तरापोषणें तिये काळीं । जाळेया विशाळपात्रें उष्ण जळीं । पूर्ण करूनि खळाळीं । आचमनें जालीं. ॥ ४७ ॥ मुखशुद्धी कर्पूरफोडी दिधलिया । सुचित्रें दिव्यासन गादिया । सर्वांसी संपूर्ण पुरे बैसावया । ऐसें घातलें सुशाळेसीं. ॥ ४८ ॥ नागर खंडपर्णाचे जुडे । करें कातटाळेतिना एवढे । कर्पूरयुक्त पोफळी दिधले विडे । साजिरे समस्तांसी. ॥ ४९ ॥ मुक्ताफळांचा त्रिभागु । नवनीतापरिस चोखट चांगु । जयाच्या उजळपणें डागु । चंद्रबिंबासी लाविला. ॥ ५० ॥ केतकी खदिर चतुर्थभागु । मुखमंडळीं मिरवे ज्याचा रंगु । दिधला लवंगा येला दोन्हीं योगु । सरिसाचि, समर्पिला. ॥ ५१ ॥ ऐसेचि तांबोल समस्तांसि समर्पिलें । उपरी मनोहर गंधाक्षता जाहले । पुष्पें देउनी गौरविलें । अंबरीं, अलंकारीं. ॥ ५२ ॥ ते समयीं सकळ घोरावले । ब्रह्मानंदहेलावें गगन घाटिलें । ऐसें देखोनि पावले । मेळ फळावंतीचे. ॥ ५३ ॥ एक गायन करिती सुस्वरीं ।

यंत्र वाजविती अति कुसरीं । तिहीं आपुली कळा गंधर्वावरी । त्रिदें वांधलीं असती. ॥ ५४ ॥ सभाजन जितुके बैसले । त्यांचा मनोहर करून एकरूप केलें । उपरी रघुनाथ सुमंतासी बोले । "धन बहु दीजे यांसी." ॥५५॥ मग बंदीजन उंच हात करून तेथ । आले ब्रह्मत्व पढत । गंभीर वाचा वाखाणित । अद्भुत कीर्ति, प्रताप रघुनाथाचा. ॥ ५६ ॥ त्यांसीही प्राप्त जाहला अर्थु । पुढें क्रमित नभपंथु । पश्चिमे पावला रविरथु । सायंकाळ वर्तला.॥५७॥ तंव प्रदीपकारांचीं शतें । त्यांनीं उजळिलें गगनातें, । तेंहीं जाळिलें प्रदीपिकांतें । लखलखाट तेजें. ॥ ५८ ॥ तेज चौपासीं पसरलें असे । पृथ्वी हाटकवर्ण दिसे । अंधकार कोठेंही न दिसे । गेला दिग्गजां आड. ॥ ५९ ॥ ऐसे प्रदीपिकांचे बंबाळ करीं । धरून दिवटे ते अवसरीं । आले मस्तक खालाउनी हारीं । उभे राहिले दोहीं भागीं. ॥ ६० ॥ सुभाषित कथाचर्चा । पंडित कीरती मधुरा वाचा । ऐसा शुभकाळ समयो रात्रिचा । प्रथम प्रहर जाहला. ॥ ६१ ॥ आतां विश्रांतिवेळ जाहली । ह्मणउनी सकळ सभा विसर्जिली । अंगलगीं शय्या सिद्ध केली । अंतरगृहीं श्रीरामाची. ॥ ६२ ॥ रत्नखचित मंचकावरी । हंसतुलिका मृदु साजिरी । दिव्य पासोडा आहाटिला क्षीरसागरीं । धुतला तैसा तो. ॥ ६३ ॥ देठ फेडुनियां निगुती । उत्तम पुष्पजाती । फरीं विखरुनी दिधले असती । सुढोई सुखदायक. ॥ ६४ ॥ अंबर मंदिरसाल मनोहर । धूप नागर दिधले प्रचुर । भागद्वयदीप प्रकाशकर । रत्नठाणवयांवरी. ॥ ६५ ॥ ऐसे सुचित्र शालेभीतरी । गोमटिया कापडगृहांतरीं । शय्या मंगळ साजिरी । ते सर्वोत्तमा सुख दावी. ॥ ६६ ॥ तेथें रघुनाथ येउनी । पहुडले संतोषोनी । स्वजायासमागमीं रात्रिमानीं । विश्रांति पावले. ॥ ६७ ॥ तैसीच पृथक्पृथक् शय्या । मनोहर मंदिरीं स्वजाया । परम सुखें निद्रा केलिया । बंधुवर्गीं भरतादिकीं. ॥ ६८ ॥ माता कौसल्या मुख्य करूनी । भिन्नभिन्न मंचकीं शयनीं । पहुडल्या, सुखनिद्रा नयनीं । बहु दिवसां आली. ॥ ६९ ॥ पवित्र परिकर देव्हारां चौकीं । ते सुमंदिरीं सुमंचकीं । उत्तम शय्या सुकुमार निकी । वसिष्टें निद्रा केली. ॥ ७० ॥ ऐसेचि स्थळोस्थळीं लोक । विश्रांति पावले सकळिक । बिभीषण, सुग्रीवादिक । ऐसेंचि सुख पावले. ॥७१॥ राजमंदिरीं परिवेष्टित । बलिये बैसले जागत । सैन्य समुद्रापरी वेष्टित ।

वरटीं महावीरांचीं. ॥ ७२ ॥ हाकारे करिती वेळोवेळां । तेणें भरिलें दिग्मंडळा । वानती वायें दिवटीया बंबाळा । फिरती ठाईं ठाईं. ॥ ७३ ॥ असो ऐसें रात्रिमान । जात विश्रांति पावले सर्व जन । इतुकें आलें कथासंधान । परिसिलें संतीं. ॥ ७४ ॥ पुढें ऐसा कथारसु । वाल्मीकीचा वाग्विलासु । प्रभाते अयोध्याधीशु । अयोध्या प्रवेश करील. ॥७५॥ इति श्रीकथा रामायणी । नवरस शब्दांची खाणी । नाम इचें चतुर्वेणी साचार सर्वथा. ॥ ७६ ॥ ऐसें परिसोनी भले भले । श्रोते तात्काळ आक्षेपिते झाले । म्हणती वक्तया काय हें बोले । तुझी वाग्देवता. ॥ ७७ ॥ येकसरें हा प्रसंगीं । अमृतनाम कथेलागीं । चतुर्वेणी ठेविलें जगीं । कोण्या अभिप्रायें. ॥ ७८ ॥ येकी त्रिवेणी प्रसिद्ध आहे । पुण्यतोया पृथ्वीवरी वाहे । जिचें दर्शनें न राहे । पातक जन्मोजन्मींचें. ॥ ७९ ॥ यमुना, भागीरथी, सरस्वती । एकवटलिया पुण्यक्षितीं । म्हणोनियां त्रैलोकीं बोलती । त्रिवेणी ऐसें. ॥ ८० ॥ तरी कथाग्रंथ शुद्ध वाटे । परी अपूर्वहीं घटे । तरी प्रकट जेणें फिटे । संदेह श्रोतयांचा. ॥ ८१ ॥ ऐसें श्रोतीं सभामंडळीं । माडिली पृच्छा अक्षरांची वोळी । तें देखोनि बद्धांजुळी । वक्ता वदता जाला. ॥ ८२ ॥ म्हणे "पंडितराजे, हो तुमचिया । ख्याती दिशांतरीं पावलिया । जैशा मर्यादा लंघोनि गेलिया । सरिता समुद्रामधें. ॥ ८३ ॥ बोलतां तुम्हां ज्ञातयांपुढें । परम दुस्तर समुद्रायेवढें । वाग्देवी वरद होय गाढें । तरीच निस्तरिजे. ॥ ८४ ॥ समर्थ तुमचें आक्षेपणें । सर्वथा हेंचि लागेल सांगणें । न सांगतां आजिरवाणें । अन्याय केलियासारिखें. ॥८५॥ आता सुजन हो, बोलिलेती सुवाणी । जें कथेसी नाम ठेविलें कैंचे चतुर्वेणी । याचें उदाहरण ऐका कर्णी । सादरता देऊनियां. ॥ ८६ ॥ पवित्रता, चातुर्यता, प्रगल्भता । चतुर्थ बोलिजे पक्वता । या चहूंचा आहे एकवाट आतां । निवडोनि वदों. ॥ ८७ ॥ पवित्र बोलिजे ऐसी । श्रवणमात्रें पातकांतें नाशी । चतुरता चतुरांसी । शब्दचातुर्य निवडी. ॥ ८८ ॥ प्रगल्भता तरी महामोठी । श्रेष्ठ सर्वांहूनी हातकोटी । पक्वता येणेंचि प्रकारें मोटी । परिपूर्ण पक्व. ॥ ८९ ॥ ऐसी चतुर्थ प्रकारें इयां मिळणी । म्हणोनि नाम ठाके चतुर्वेणी । हें नाम च्यार गुणीं । ये कथेसि घडों शके. ॥ ९० ॥ जरी निविजे

आपुलां मनीं । तरी महत्वार्थ पदार्थ ईपासुनी । पाविजेती सर्वथा सुजनीं । क्षण एक चित्त देणें. ॥ ९१ ॥ चारी पदार्थ म्हणाल कैसे । धर्म अर्थ काम मोक्ष ऐसे । ज्या आवडी जैसे । पावती ईपासूनी. ॥ ९२ ॥ धर्म, अर्थ, काम, मोक्ष चारी । एकवटले ये कथेचे उदरीं । म्हणोनि चतुर्वेणी नाम जरी । कथा रामायणी." ॥ ९३ ॥ असो ऐसी श्रोतीं । वक्ता बोलोनि करी विनंती । म्हणे " पंडित हो तुम्ही महंतीं । विरपन्न विद्याधर जी. ॥ ९४ ॥ माझे आरुष बोल केव्हढे । धिटीव करतों तुम्हांपुढें । घडे न घडे जेव्हढें । वदें वाचाळपणें. ॥ ९५ ॥ आतां हेंचि प्रार्थितों तुम्हां । किंचित दोष देखिला तो करा क्षमा । अपार रामकथेचा महिमा । यामाजी मिश्रित म्हणोनियां. ॥ ९६ ॥ जैसें पर्जन्य पडलियावरी । शुद्ध अशुद्ध जळ गंगेभीतरी । मिळोनियां सामाने चतुरीं । अवघें गंगाजळ. ॥ ९७ ॥ असो हा अडखळा उगा । खोळंबा जहाला पुढिलिया प्रसंगां । तो चालवूं आतां, गंगा । जैसी चाले समुद्रा उजु." ॥ ९८ ॥ इति श्रीयुद्धकांडकथासार । वाल्मीकीविरचित मनोहर । पुढें परिसावें सविस्तर । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ ९९ ॥

---

## प्रसंग शहात्तरावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः ॥ सुखनिद्रा भास्करवंशभूषणें । केली असतां सर्वजनाचीं अंतःकरणें । व्यापिलीं पंचबाणें । आसक्त पुरुषाचीं. ॥ १ ॥ आणि स्त्रिया होय अवस्था । संयोगा उत्कंठित प्राणनाथा । तेणें व्याप्त विरहव्यथा । आलिंगनाकारणें. ॥ २ ॥ ते चतुराननांचे पती । जवळी निरंतर त्यांच्या चित्तीं । सुखवृद्धि होतसे जैशी उत्पत्ती । शुक्रसुधामरीची. ॥ ३ ॥ आतां सहज प्रसंगासारिखें । रसु आला तो कवीनें मुखें । बोलिला पाहिजे सर्वथा सुखें । श्रोतीं श्रवण करावें. ॥ ४ ॥ कथितां कथाप्रसंगा । वाहे नवरसांची गंगा । माजि अडथळाचिया तरंगा । उठतां वेळु नलगे. ॥ ५ ॥ शर्करा अमृतेसीं तुके । तो जेवितां गुळवटी ठाके । म्हणोनि भोक्तयादेही चित्त चामके । राही

तयावरी हो. ॥ ६ ॥ आतां हा परिवार पुढें । ब्रह्मादिकपर्यंत प्राणी जेव्हढे । त्यां विषयीं संक्रमण झालें गाढें । जर्जर स्मराचे शरीं. ॥ ७ ॥ म्हणोनि दंपत्यें परस्परें । भोगार्थी उत्कंठित निरंतरें । संयोगसुखापरित थोर । म्हणती आणिक नाहीं. ॥ ८ ॥ प्रगल्भा मध्यमा आणि मुग्धा । आणि ऐशा नारी त्रिविधा । त्यांचिया मनोमंदिरीं सिद्धा । वृत्ती ऐसिया असती. ॥ ९ ॥ सायंकाळीं दिन माल्यें । बाळ मुग्धा मात्र बोसावे । सचित चकिताचित्त थांबे । दश दिशांप्रति. ॥ १० ॥ पुरुषदृष्टी गाढ भय । शय्यासंयोगीं कैंचें धैर्य । आकुंचे तयाचें हृदय । अंतरीं उदासता वेती. ॥ ११ ॥ अपक्व तैसें कांचें । त्यासि रसेंवीण माधुर्य कैंचें । तैसें मनोवृत्ति मुग्धेचे । बाळदशा देहीं चाले. ॥ १२ ॥ लघु लघु बळीवीं कोमळा । त्या वातचक्रीं होती विव्हळा । तैसे पुरुषसंगें विकळा । मुग्धा खेद मानिती. ॥ १३ ॥ मध्यमांगना पुरुषदृष्टीं संतुष्टा । परी क्रीडाविषयीं नव्हती धीटा । कामरंगाची अति उत्कंठा । किंचित्काळ ज्यां वर्तत. ॥ १४ ॥ जैसें पक्व ना पूर्ण फळ । राजस गौल्य ना अंबिळ । तैसा मध्यमांगनेचा भाव केवळ । वर्तत हृदयामध्यें. ॥ १५ ॥ पुरुषेंसीं भर्ति, प्रीतिपदिमह । परी सुरतसंघट्टणीं नाहीं धीर । जैसा कंटक वाटला वोळसरू । कठिण ना कोमळ. ॥ १६ ॥ कीं चीकमरी झालें कणीस । रसकणाची बांधली मूस । पूर्ण निढारलें नाहीं मानस । तैसें मध्यांगनेचें. ॥ १७ ॥ सिंधुमार्गें मर्यादेसी मिळे । तें शीघ्र सरितेची मार्ग चळे । तैसी मध्यमांगनेची वासना पळे । पुरुषासन्निधि असतां. ॥ १८ ॥ क्षुधा बहुसाळ पोटीं । परी सांकडीचि जेवणीं शंका दाटी । मध्यांगनेची वासना ये परिपाटी । असतां पुरुषापासीं. ॥ १९ ॥ आतां प्रगल्भा जित-क्रिया नारी । पुरुषसंयोगें शय्येवरी । त्या हृदयसिंधुलहरी । दिशांचे प्रांत पावती. ॥ २० ॥ सुरतसंभोगीं त्यांची लज्जा । उठे आड करून दिग्गजा । इच्छेसि निघती सहस्रभुजा । आर्त मानसीं नाचे. ॥ २१ ॥ प्राणपतीस देखे जें आर्त उठी । प्रगल्भांचीं चित्तें त्याचि परिपाटी । परम प्रीति वैसे कंठीं । चंद्रा मिठीसारखी. ॥ २२ ॥ गाढी आलिंगीं निवालिया वपु । मावितो पति नोसंडु येक कल्पु । भुजबंधनाच्या ग्रंथी अंतर्पु । दृढ देताति राहे. ॥ २३ ॥ येटोमेटो परम आवडी । करिती चुंबनाची परवडी ॥

अधरामृताची गोडी । स्वइच्छा नाथासि देती. ॥ २४ ॥ संभोगीं कुशळता बहूत । कामिकां पुरुष तयां रत । परि मानभारें विरक्त । ते अळित तेथें. ॥ २५ ॥ ऐसी शार्वरीच्या तृतीय प्रहरीं । अधिक येक मुहूर्ताउपरी । जागृति होउनि अंतरीं । राघवस्मरण झालें. ॥ २६ ॥ त्यासि निद्रेमध्यें रामध्यान । तया जागृति काय आन । म्हणौ अयोध्यावासी जन । तत्पर रामध्यानीं. ॥ २७ ॥ रामध्यानाचें अमृत । तेणें विश्व झालें जागृत । असो ऐसी प्रभात । सर्वांसि जाहली. ॥ २८ ॥ प्रातःकाळ जाहलियावरी । सुमंत प्रवेशे अयोध्यापुरी । म्हणे " बहुविध कुसरीं । शृंगारा राजधानी." ॥ २९ ॥ ऐकोनि प्रधानाचें उत्तर । वेगीं धाविन्नले राजहेर । त्यांनीं शृंगारिलें नगर । कैसिया रीतीं. ॥ ३० ॥ निरज केलिया भूमिका । सडे संमार्जनें रंगमाळिका । भिंतीचेनि तेजें मयका । आणिती उणें. ॥ ३१ ॥ ठायीं ठायीं गणेशमूर्ती । लिहिल्या ऋद्धिसिद्धि सहितीं । हंसासनीं सरस्वती । लिहिली असे. ॥ ३२ ॥ लिहिलें शिवाच्या आख्यानातें । लिहिलीं शक्तिरूपें बहुतें । लिहिलें चतुर्दश भुवनातें । कुसरीं रंगरचनेंकरूनी. ॥ ३३ ॥ सह विस्तार विचित्र । आणि दशावतार । पवित्र लिहिले असती विचित्र । नाना रंगीं. ॥३४ ॥ चारियावरी कळस वर्तुळ । रत्नसुवर्णमय झळाळ । त्यांची कांति फांकतसे किरळ । नगरावरी. ॥ ३५ ॥ मठ मंडप दामोदरें । तेथें गुढिया तोरणें मखरें । चित्रविचित्र संवरें । लाविलीं असती. ॥ ३६ ॥ ठायीं ठायीं लाविले आदर्श । तयांचा काय वर्णूं प्रकाश । नाना रघुनाथाचें यश । बिंबलें आंत. ॥ ३७ ॥ चित्रविचित्र बरवे । बांधले ठायीं ठायीं चांदवे । अपूर्व चतुष्कोणी मिरवे । काळाची शोभा. ॥ ३८ ॥ आणि लाविले घोंस मुक्ताफळांचे । जैसें संमोहन नक्षत्राचें । देखतांचि युक्तीचे । पाग फिटती. ॥३९॥ स्तंभावरी पुतळिया । हातीं घेउनी मंगळार्तिया । ओंवाळाविया रघुराया । येणें रूपें. ॥ ४० ॥ मदळसाखचित वैडूर्यी । तेजेंकरूनि तेज सूर्यी । तळवट तो ठेवे चौधार्यां । रचिले विचित्र. ॥ ४१ ॥ हाट हाटवटिया चौबारे । ठायीं ठायीं व्यवसायी व्यवहारें । बैसले ज्यांचे निदर्शनें हेरे । संसारवेधा. ॥ ४२ ॥ वाणी, वाणिज, सुसारी, । तेली, तांबोळी, फुलारी । चाटे, दलाल, जोहरी । आणि नाणवटी. ॥ ४३ ॥ पाहाळी,

खाती, जिनकर । शिंपी, रंगारी, सुवर्णकार, । गंधवादी मनोहर ।
वैसले असती. ॥ ४४ ॥ रजक, चर्मिक, धनगर, । गांधी,
नापिक, बर्बर, । साळी, कोष्टी, कुंभार । आणिकही नाना जाती.
॥ ४५ ॥ ऐसे नगरनागरिक । पुण्यपरायण धार्मिक । आता मी सांगेन
आणिक । ते ऐकावें. ॥ ४६ ॥ वेदपाठक विद्वांस । याज्ञिक,
पुराणिक बहुवस । आणिक शास्त्रव्याख्याते, ज्योतिष । जाणती
बरवें. ॥ ४७ ॥ वैदिक विद्यापूर्ण । केलें पुरतें त्यांही ज्ञान ।
त्यांचे निदर्शनें मरण । कदा न पाहिजे. ॥ ४८ ॥ गायक,
वैष्णव, वयकार । नट नटवे मनोहर । आणिक बंदीजन इतर । रघुनाथीं
भक्तिनिष्ट. ॥ ४९ ॥ ऐसे धर्मपरायण लोक । महापवित्र पुण्यश्लोक ।
व्यवसाय करिती अनेक । परि भजन रघुनाथाचें. ॥ ५० ॥
तेथील हाचि व्यवसाय । जे सर्व मूर्ती भगवद्भाव । निरंतर
रामकथा चाव । वाणों नेदित काळ. ॥ ५१ ॥ पाहतां माजि
त्रिभुवना । अनुपम्य अयोध्येची रचना । असो वर्णितां चतुराननां ।
मौन्य पडिलें. ॥ ५२ ॥ सप्त पुरीं प्रथम । अयोध्या ऐसें जिचें नाम ।
विशेषु तेथें श्रीराम । जन्मला म्हणौनि. ॥ ५३ ॥ बोलिलें वाराणसी क्षेत्र ।
त्रैलोक्यामाजि पवित्र । परी मरणांती तारक ब्रह्ममंत्र । उपदेशु होये. ॥५४॥
तेथें साक्षात् भवतारकु । नांदतसे रघुटिळकु । म्हणौनि समाग्याचा तो
लोकु । अयोध्येचा. ॥ ५५ ॥ मिथिळेचा राजा जनकु । विदेही एकु पुण्य-
श्लोकु । परी अयोध्येचा सफळ लोकु । तो आत्मनिष्ठ. ॥ ५६ ॥ तेथील
लोकांचा उद्यमु । तेथें लाभु रोकडा श्रीरामु । जेथें तुटो तुटौनि गेला भ्रमु ।
दुरेंचि संसाराचा. ॥ ५७ ॥ ऐसी सरयूतीरनगरी । जीवरूनि ओवाळिजे
अमरपुरी । जी स्मरणमात्रें निवारी । जन्ममरणातें. ॥ ५८ ॥ नगरीं दुःखाचा
नाहीं प्रवेशु । निरंतर परम संतोषु । सर्वदा यज्ञादिकु । स्मरण करिती
रामाचें. ॥ ५९ ॥ श्रीरामरूपेंवांचौनी । आणिक नाहीं त्यांचा मनीं । असो, वर्णितां
मौनी । पडलो शेषा. ॥ ६० ॥ बोलिजे राज्य रामाचें । तें त्यासीचि घडलें
साचें । तें बोलतां नये मनीचें । बळ थोडें. ॥ ६१ ॥ आतां रामराज्य म्हणिजे
कैसें । तरी परिसावें सावधान मानसें । युक्तीसारखें कोण्हासें । सांगेन मी.
॥ ६२ ॥ तरी रामराज्याची स्थिती ऐसी । तेथें दंड हा बोल छत्र-

चामरांसी । बंधन तरी पुष्पांसी । गुणींकरूनि. ॥ ६३ ॥ मारू तरी सारिचा । मोहो तरी स्त्रीपुरुषाचा । पदबंध तरी कवित्वाचा । गद्यपद्ययुक्त. ॥ ६४ ॥ रक्षण तरी सत्वासी । जाचु तो कामक्रोधांसी । बाहिरी घालणें कीर्तीसी । ब्रह्मांडापरतें. ॥ ६५ ॥ सुकाळु तरी करतळामळ मोक्ष । पातकांचें अत्यंत दुर्भिक्ष । सदाफळ वृक्ष । असती घरोघरीं. । ६६ ॥ कामधेनूचीं दुभणीं । दामोदरें सप्त द्वादशखणी । नगरामाजि दुखणीं । असतीचि ना. ॥ ६७ ॥ ठायीं ठायीं धर्मशाळा । चित्रविचित्र सोज्ज्वळा । उभउनी विश्वकर्मेन कळा । दाखविली बहु. ॥ ६८ ॥ बोलतां नगराचा विस्तारू । भवता चौफेर आवारू । चरिया रत्नखचिता तेणें दिनकरू । लोपौनि जाये. । ६९ ॥ द्वारमाथा कळस वर्तुळ । जावुनदाचे निखळ । रत्नविराजित मोळ । फांकत नगरावरी. ॥ ७० ॥ आणीक पाटजोडाची शोभा । नाभे उच चुंबित नभा । जे देखतांचि उभा । तेथ न टके काळु. ॥ ७१ ॥ नगरद्वारासन्मुख । गणेश क्षेत्रपाळ प्रमुख । शुभदायक देतसे सुख । नगरवासियांसी. ॥ ७२ ॥ नगरांभवतीं उद्यानें । शोभती वनें उपवनें । पुष्पवाटिका गहनें । विश्रांतिस्थळें. ॥ ७३ ॥ जो काळु सर्वांतें नक्षी । तो अतिप्रयत्नें अयोध्येसि रक्षी । नाना श्वापदें आणि पक्षी । निरसग क्रीडती. ॥ ७४ ॥ ठायीं ठायीं शिवालयें । महाप्रासाद मंगळमयें । माजि कासिमरी लिंगें जियें प्रियें । राघवासि. ॥ ७५ ॥ रामु तो परम शांभवु । म्हणौनि तेथ राहिला सदाशिवु । कां जे त्याचा जिवातिल जीवु । तो रामचंद्र. ॥ ७६ ॥ रामु जिवाचा जिवाळा । तेथें शिव कैसा करू वेगळा । आता असो तुझेया वचनमाळा । ते दोघे एकचि पैं. ॥ ७७ ॥ रंक म्हणती हें आकाश । दुसरें स्वप्नींही अदृश्य । जैसा अळंकाराचा भास । सुवर्ण दिसे ॥ ७८ ॥ नाना तरणीतेजें मृगजळ । का शुक्ती का रजतचि केवळ । नाना रज्जुचि प्रबळ । सर्पाकार भासे. ॥ ७९ ॥ नाना जळ तरंगाकारें । कीं मृत्तिका घटप्रकारें । जैसा ततुचि पटविकारें । भासतु दिसे. ॥ ८० ॥ तैसा प्रपंचाकार ब्रह्म । प्रपंचु म्हणिजे हा भ्रम । अभेद पाहातां नाम । उभयतां लटिकें. ॥ ८१ ॥ जैसें एके भिंतीवरी । रूपें लिहिलीं नानापरी । पारि भिंतीची निर्धारीं । जाणतेयासी. ॥ ८२ ॥

एका धान्याचे अपार । निफळति नानाप्रकार । तैसी एकी वस्तू चराचर । निर्धारिसी. ॥ ८३ ॥ असो या बोलांचा गाया । बोलतां न सिमे सर्वथा । म्हणौनि जेणें चाले रामकथा । तेंचि बरवें. ॥ ८४ ॥ तरी हें वर्णन नगराचें । नगर तेंही राघवाचें । श्रोते आक्षेपिती म्हणौनि त्याचें । मन धरूनि बोलिलों. ॥ ८५ ॥ असो ऐसीं स्थिरस्थानकें । नगरप्रदेशीं अनेकें । आणि सरयूनदी अमृतोदकें । वाहाती असे. ॥ ८६ ॥ जिचें होतां दर्शन स्पर्शन । पतित होती पुण्यपावन । केलेया स्नान आचमन । साधन मोक्षाचें. ॥ ८७ ॥ तीरीं योगी सन्यासी । वानप्रस्थ ब्रह्मचारी तापसी । स्नानसंध्या सारूनि नेमेंसीं । रामपूजनीं बैसले. ॥ ८८ ॥ एक जपती स्तुतिस्तोत्रें । एक जपती मूळमंत्रें । एक ध्यानडीचीं विचित्रें । ध्यानें करिती. ॥ ८९ ॥ एकीं इतुकेंही सारूनी । वृत्तीचा लयो करूनी । निश्चळ राहिले निरजनीं । विश्रातिध्यानीं. ॥ ९० ॥ एक अष्टांगयोगेंकरूनी । क्लेश करिती वायुसाधनीं । षट्चक्रें भेदुनि मूर्ध्नी । दशम द्वारें. ॥ ९१ ॥ तेथें अनुहातध्वनिनादें । परम सुखें आनंदें । कैवल्यादिकपदें । मळपताती. ॥ ९२ ॥ एक कर्मकलापीं तत्पर । साधिती अर्घ्यकाळ निरंतर । एक गायत्रीमंत्र अपार । जपत बैसले. ॥ ९३ ॥ एक शोधिती आसन जयो । करूनि मनासि निग्रहल्यो । तेथें सुषुम्नानाडी वायो । ऊर्ध्व होत असे. ॥ ९४ ॥ एक हटयोगेश्वर । फळें मूळें करूनि आहार । एक शुष्क पत्रें, निराहार । एक राहिले. ॥ ९५ ॥ एक सहज राजयोगी । दुराग्रहो नाहीं पडिले प्रसंगीं । एक पुराणश्रवणारागी । बैसले असती. ॥ ९६ ॥ एक करिती आत्मचर्चा । जो मतितार्थ उपनिषदाचा । एकाच्या बोलतां शिणलेया वाचा । म्हणौनि मौनेंसि राहिले. ॥ ९७ ॥ यापरि रामागमन । चिंतीत बैसले मुनिजन । तयाचें फळें अनुष्ठान । जें श्रीरामु आला. ॥ ९८ ॥ असो ऐसें अयोध्यानगर । पवित्र आणि परिकर । तें शृंगारिलें मनोहर । सुमनें ,आणि वस्त्रें. ॥ ९९ ॥ इति श्रीयुद्धकांड विचित्र । नगरवर्णन परम पवित्र । पुढें परिसावें रामचरित्र । कृष्णदास मुद्गल म्हणे ॥ १०० ॥

---

# प्रसंग सत्याहत्तरावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुकाशिराजाय नमः । नगर शृंगारूनि अपूर्व । सुमंतु, शत्रुघ्न आणि सर्व । शीघ्र आले जेथ राम । पाहिले वानरेंसि. ॥ १ ॥ "म्हणती जी रामा अवधारीं । तुमची आज्ञा वंदूनि शिरीं । जाहानि शृंगारिली पुरी । अयोध्या राजधानी." ॥ २ ॥ आइकोनि तयाचें वचन । संतोषलें रामाचें मन । नगरप्रवेशा व्यवधान । न करावें आता. ॥ ३ ॥ इये समर्थांचे मुहूर्त । उत्तमोत्तम अद्भुत । धाडोळिता अनघे या दिनात । ऐसें साधेंचि नाहीं. ॥ ४ ॥ ऐसें परिसोनि श्रोता जनीं । आक्षेपिलें मधुरा वचनीं । हां जिव्हा नामस्मरणेंकरूनी । कल्याणरूप सर्वदा. ॥ ५ ॥ तें रामध्यानामृत निवोट । घेवोनि जाणे एकु नीळकंठ । भवानीसहित निकट । होऊनि ठेला. ॥ ६ ॥ मारुता कपिरूपें रुद्र । सर्वदा बोळगे रामचंद्रु । आणि ब्रह्मादिक इंद्रु । ध्याती निरंतर. ॥ ७ ॥ ध्रुवादिक नक्षत्रें । नवग्रह गाती स्तुतिस्तोत्रें । नारदु मनसा वक्त्रें । स्मरण करितसे. ॥ ८ ॥ हाहा हूहू गण गंधर्व । सिद्ध चारण सनकादिक सर्व । सनत्कुमार अति अपूर्व । प्रसिद्ध गायक जे. ॥ ९ ॥ आणीक वेदाध्याही श्रुती । पुराणें व्याकरणें स्मृती । आगम निगम सिद्धांतीं । प्रतिपाद्य जो. ॥ १० ॥ आणीक सहस्रमुखें शेषु । बोलता न पुरे लक्षांशु । जिव्हा चिरूनि त्रासु । पावला बहुत. ॥ ११ ॥ असो तेंचि बोलिजे सुलग्न । जें श्रीरामचरणीं होइजे मग्न । जरी केलेया कोटि यज्ञ । तरी दुर्लभ तें. ॥ १२ ॥ तोचि बोलिजे सुदिनु । जें वाचेसि ये रघुनंदनु । आणि रामचंद्रु बळेंकरूनु । कल्याणरूप सर्वदा ॥ १३ ॥ तोचि बोलिजे सुदिनु । ज्याचे हृदयीं श्रीराघवु । तेथें भवासुराचा उद्भवु । कदा उद्भवेना. ॥ १४ ॥ तेंचि सद्विद्येचें फळ । जें रामचंद्रीं होइजे निश्चळ । जेणें जन्ममरणाचें मूळ । नि:शेख तुटे. ॥ १५ ॥ ऐसी श्रीरामचरणाची प्रशंसा । जे अनुभवसिद्ध महेशा । आणी वाल्मीकमुनिसा । वर्णिता शत कोटी ॥ १६ ॥ ऐसेया रामा भुवनपाळा । शुभ लग्न मुहूर्तवेळा । हें आइकों मन उत्ताविळा । श्रोतेयाचा पृच्छेलागीं. ॥ १७ ॥ आइकोनि वक्ता प्रत्युत्तर । म्हणे " तुमचें या प्रश्नाचें एकैक अक्षर । सकळ शास्त्रांचें

पाकनिष्पत्ति जालेयावरी। स्थिरता दृढ शरीरीं। उत्कंठा निवावयाची थोरी। प्रानी विलंबु न साहे. ॥ ५८ ॥ जननी निजकार्यें असता। बाळक्रीडेसी स्थिरता। परि बोसमा रिवता। धीर कैसा स्तनपानीं? ॥ ५९ ॥ तैसे जी जनकजापती। वरुषें चतुर्दश जालीं असती। अत्यंत उत्कंठा आमच्या चित्तीं। महाभिषेक पहावयाचि" ॥ ६० ॥ यानंतरें जो श्रेष्ठ वसिष्ठ। ब्रह्मऋषि महानरिष्ट। तो बोलता जाला स्पष्ट। अर्थु महागुह्याचा. ॥ ६१ ॥ म्हणे "जी रामचंद्रा अवधारीं। परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी। शिणल्या वेदश्रुती परी। निर्धारीं अगम्य ॥ ६२ ॥ दृश्य, दर्शन, द्रष्टे-याचा। देखणा तू, हे सत्य वाचा। ऐसा विवादु उपनिषदाचा। परम प्रसिद्ध. ॥ ६३ ॥ ऐसा अव्यक्त अक्षरु। तो तू मूर्तिमंत अगोचरु। नरोत्तमु अगोचरु। अयोध्यापुरीचा. ॥ ६४ ॥ तरी शीघ्र हो महेंद्रा। सिंव्हासनीं वैसाव रामचंद्रा। तेणें आमुच्या सुखसमुद्रा। भरितें तुवळैल." ॥ ६५ ॥ ऐसीं वसिष्ठाचीं वचनें। आइकोनि बोलिजे रघुनंदनें। जैसें वृहस्पतिवाक्य सहस्रनयनें। मस्तकीं वंदिजे ॥ ६६ ॥ म्हणे "सज्जन उत्कंठित। राज्याभिषेकाचें आर्त। पहावया उदित। सर्वांचे नयन जाले. ॥ ६७ ॥ तरी तुमचेनी कृपाबळें। सिद्धि गेलीं कार्यें सकळें। आता अवश्यमेव शीघ्र काळें। आज्ञा वद्रु मस्तकीं." ॥ ६८ ॥ ऐसेनि समारंभें। कल्याणरूप मंगळसूत्रें। वैसिजे वैदेहीपद्मे। सिंहासनावरी. ॥ ६९ ॥ ऋषिश्वरीं केला महाभिषेकु। द्विजमुखीं वेदघोषु। ऐसियापरी सर्वेशु। राज्यीं वैसला. ॥ ७० ॥ ते काळीं नाना याचकां। दानकोटी जालिया सकळिका। ऐसिये परी रघुनायका। होत पट्टाभिषेकु ॥ ७१ ॥ विद्याधर, गंधर्व, गायक,। नारद, तुंबर, सनकादिक,। यतिविशेष येऊनि सकळिक। गायन आरंभिलें. ॥ ७२ ॥ ठायीं ठायीं हरिकीर्तनें। आदरें येकिजे रघुनंदनें, । नेणें वैष्णवांचीं मनें। सुखार्णवीं हेलावत ॥ ७३ ॥ श्रीमंत गानि शिवचरित्रें। पढती द्विज श्रुत स्तोत्रें। आणिकें नाना विद्यापात्रें। आनंदें नाचतातीं. ॥ ७४ ॥ रंभा आदि करूनि मुख्य नायिका। उर्वशी, तिलोत्तमा, मेनका। नृत्यांगना सकळिका। महा-नृत्य करिताती. ॥ ७५ ॥ पुढे वागडे नाचती। नामपाठक सावडें गाती। अमरें गोदळे गोंधळ घालती। दिव्यिया दर्शनें घेऊनी. ॥ ७६ ॥ एकी

घेतलिया चिपळिया । एकी पिटिती टाळिया । पायीं बांधोनि घागरिया । मुखीं नाम गाताती. ॥ ७७ ॥ ऐसें आपुलालिया परी । कळा दाखविती कुसरीं । जयजयकारें अंबरीं । न्याहा उठिला थोरू. ॥ ७८ ॥ ऐसियापरी रघुनंदनें । दिधलीं कळापात्रांसी दानें । तेणें चतुर्दश त्रिभुवनें । हर्षें दुचंबळलीं. ॥ ७९ ॥ याउपरी सर्व कपिजनीं । हातीं पुष्पांजुळिया घेउनी । जयजयकार म्हणौनी । आनंदें गर्जिन्नले. ॥ ८० ॥ अयोध्येचे सकळ लोक । धर्मपरायण पुण्यश्लोक । स्तवन करिताती अनेक । रघुत्तमरायाचें. ॥ ८१ ॥ उपरी समस्तांसी रघुवीरें । अंसुकेतें स्वकरें । पुरें म्हणौनि अत्यादरें । वारिता जाला. ॥ ८२ ॥ म्हणे "तुम्हीं सर्व जनीं । बैसावें आपुलालां अधिकारस्थानीं" । आइकौनि संतोष मनीं । जाला समस्तांसी. ॥ ८३ ॥ याउपरी सेवकीं । परिमळद्रव्यें पुष्पीं अनेकीं । ललाटीं कस्तुरिका निकी । लाविली समस्तांसि. ॥ ८४ ॥ केसराचिया द्विबोटिया । माजी अक्षता मिरवलिया । उटी सर्वांगीं घेतलिया । चंदनकर्पूरामिश्रित. ॥ ८५ ॥ शुभ्र नागरखंडें पर्णें । कर्पूरमिश्रित युक्त चूर्णें । पूगीफळें बोलिलीं चतुर्दशगुणें । अलंकारीं साजिरिया सर्वांच्या वपु शोभती. ॥ ८६ ॥ आणिकें दिव्यांबरें । समस्तांसि दिधलीं चिरें । मग वसिष्ठादिकांसि आदरें । प्रार्थना केली. ॥ ८७ ॥ म्हणे "स्वामी श्रीगुरुराजा । आम्हांसि राज्याभिषेकु जाहला वोजा । सर्व जी केली तुमची पूजा । ते फळली आजी. ॥ ८८ ॥ दशरथाचिये आज्ञेकरूनी । होतों चतुर्दश वर्षें वनीं । आता तुमचे आशीर्वचनीं । सिंव्हासनीं बैसलों. ॥ ८९ ॥ मातापिता विउनि उत्तीर्ण । परी राउळें प्रतिपाळू केला पूर्ण । हें त्रैलोक्या कर्णोपकर्णे । ठाऊकें आहे. ॥ ९० ॥ आतां बोलिजे तो उपचारु । लटिकाचि बोलाचा पसरू । परी सत्य कृपाळु श्रीगुरु । अनुभवसिद्ध." ॥ ९१ ॥ ऐसें अनुवादे रामचंद्रु । तेणें संतुष्टला मुनींद्रु । जैसा मर्यादा लंघुनि समुद्रु । उचंबळला. ॥ ९२ ॥ अनुक्रमें ऋषीश्वर । संतोषले अपार । म्हणती "साचार । बोलिलेति राघवा. ॥ ९३ ॥ राया बोलिलेती जे बोल । ते सप्त पातालांहूनि खोल । तरी हें बोलणें नवल । नव्हे कांहीं. ॥ ९४ ॥ अनंत ब्रह्मांडें तुम्हां उदरीं । तेथें पाताळखोलिवेची कोण परी" । असो, ऐसी स्तुति ऋषीश्वरीं । समस्तीं केली. ॥ ९५ ॥ स्तुति परिसौनि रघुवीरें ।

पुढतीं योजिलेली स्नेहउपचारें । म्हणे "असो येणें उपचारें । पुढें कार्यां चित्त दिजे. ॥ ९६ ॥ आतां स्नानसंध्या करूनी । सत्वर होयावें देवतार्चनीं । नित्यनेम सारूनी । नैवेद्य करणें." ॥ ९० ॥ ऐसें रघुनाथें बोलिलें । येर आज्ञेसरिसे उठिले । नित्यनेम सारिते जाले । नेम आपुलाले. ॥ ९८ ॥ सिद्ध होऊनी पंक्तिकार । श्रीरामु आपण सादर । ताटें विस्तारूनि परिकर । सन्मानें बैसले. ॥ ९९ ॥ यापरी आरोगणा जाली । तांबूलें देऊनि आज्ञा केली । आतां निद्रा करिते जाली । विश्रांतिवेळा. ॥ १०० ॥ ऐसा राज्यीं बैसला रामराणो । निशाणा दिधला घावो । जाला त्रैलोक्यासि उत्सवो । राम राजा म्हणौनि. ॥ १ ॥ इति श्रीरम्य रामायणीं । वाल्मीकवाग्रत्नांचे खाणी । पुढें परिसावे विचक्षणीं । कृष्णदास मुद्गल म्हणे. ॥ १०२ ॥

---

## प्रसंग अठ्ठयाहत्तरावा.

ॐ श्रीरामसच्चिदानंदाय नमः । श्रीगुरुक्षत्रिराजाय नमः ॥ प्रातःकाळु जालेयावरी । रघुराजु नित्य नेम सारी । द्विजार्चन करूनि करी । दानें नानाविधें. ॥ १ ॥ दिधलीं गोसहस्रें बहुतें । दिधलीं नानारत्नें अनंतें । अलंकार नाना द्विजातें । देता जाला राघवु. ॥ २ ॥ वस्त्रें दिव्य विचित्रें । पटांबरें अतिपवित्रें । दिधलीं नलिनीपुष्पनेत्रें । ज्यां योग्य जैसीं. ॥ ३ ॥ गज शृंगारिले शृंगारसहित । झुली विचित्रा मुक्तीं विराजित । कर्णीं चामरें मिरवित । आणि घोंस मुक्ताफळांचे. ॥ ४ ॥ दंतीं जडलीं रत्नभूषणें । घातलीं घागरवेळे सुलक्षणें । घटाघोषु गाजे तेणें । भूगोलु गर्जे. ॥ ५ ॥ ऐसे मदोन्मत्त गज लक्ष । देता समर्थ रणदक्ष । जेणें उद्धरिले उभयपक्ष । सूर्यवंशीं जन्मोनी. ॥ ६ ॥ अश्व पाचारिले अनेक । देता उदार रघुनायक । ज्या नाममात्रें मोक्षदायक । तेथें अशक्य काय ? ॥ ७ ॥ असो, ऐसा दानविधी । सपादुनी पूर्णबुद्धी । वस्त्रालंकार लेउनि कृपानिधी । सिंहासनीं बैसला. ॥ ८ ॥ मग त्यावरी कपिराजे समस्त । नमस्कारूनि उभे तटस्थ । जोडुनियां द्वयहस्त । विनंती करिते जाहले. ॥ ९ ॥ वानर म्हणती " जी राघवा । आनंदें भूगोळ भरला अवघा । जैसें आळलेया

मघवा । मयूरां आनंदु. ॥ १० ॥ हा दृष्टांत एकदेशीं । बोलतां नये तुळनेसी । तूं आत्मपूर्ण होसी । सर्व जनांचा." ॥ ११ ॥ असो, बोलिजे तें न्यून । बोलतां वेदांसि पडलें मौन । जिव्हा चिरोनि सहस्रवदन । हिंपुटा जाला. ॥ १२ ॥ ऐसीं कपींचीं वचनें । ऐकोनि सतोषिजे रघुनंदनें । मग बोलिजे मधुरवचनें । समस्तां कपींप्रती. ॥ १३ ॥ म्हणे "तुमचेनि उपकारऋणें । बांधलों अवतारें येणें । उत्तीर्णता पदार्थें जेणें । होंतावया दिसत नाहीं. ॥ १४ ॥ तरी तुम्ही काया वाचा मनसा । धरिली नाहीं कुटुंबआशा । वैरी संव्हाराया फासा । घालुनी साह्य जालेती." ॥ १५ ॥ ऐसें बोलतां रामचंद्रा । भरिलें भरें कपिसुखसमुद्रा । क्षण एक धरुनि मौनमुद्रा । तटस्थ राहिले. ॥ १६ ॥ बाष्पें दाटलीं कंठीं । जाली अर्धोन्मीलित दृष्टी । तया सुखावरुनि कोटी । सर्व सुखांच्या ओवाळिजे. ॥ १७ ॥ म्हणती "तुझिया चरणावेगळे । नव्हिजे कोणेही काळें । परि मायावेष्टित आगळें । प्रारब्ध आमचें. ॥ १८ ॥ पाउलांचिये आज्ञेकरूनी । जाऊं आज्ञा मागोनी । ऐसें समस्तांच्या मनीं । आहे जी राघवा." ॥ १९ ॥ सुग्रीवादिक कपिजनीं । बिभीषणु मुख्य करूनी । प्रार्थिलें कर जोडुनी । रघुनाथासि. ॥ २० ॥ "आतां स्वामी आज्ञा दीजे । राउळें स्वराज्यीं सुखें राहिजे" । ऐसें बोलतां कपिराजें । रामु वदता जाला. ॥ २१ ॥ म्हणे "अहो जी हें बरवें जालें । तुमचे साह्य सिद्धी गेलें । आतां आरोगणा सारूनी वहिलें । प्रयाण करावें." ॥ २२ ॥ "हो जि" म्हणौनि रघुपती । नित्यनेमु सारिती जुत्पती । भोजना कारणें शीघ्रगती । सिद्ध जालें. ॥ २३ ॥ बिभीषण मुख्य सर्व । वसिष्ठादि मुनिवर्ग महानुभाव । बंधुसहित राघव । आरोगणेसि बैसले. ॥ २४ ॥ सुमित्रा, कौसल्या, कैकेयी माता । पंक्तीं बैसलिया समस्ता । वाढिती जाली पतिव्रता । जनकतनया. ॥ २५ ॥ अन्नें नाना पर्वडी । स्वहस्तें जानकी वाढी । काये वर्णू तेथिंची गोडी । जे दुर्लक्ष त्रिदशां. ॥ २६ ॥ सकळ भोजनांचा अर्थी । दध्योदन वाढिती । तक्रें स्वादिष्टें अतिप्रीती । आणि लवणशाखा. ॥ २७ ॥ पवित्र सरयूचें जळ । माजि मिश्रित सुपरिमळ । जें सेवितां केवळ । अमृताहूनि गोड. ॥ २८ ॥ याउपरी रघुवीरें । बोलिजे प्रीत्युत्तरें । म्हणे "ज्यासि जें इच्छामतें आदरें । मागौनि घेइजे." ॥ २९ ॥ येर

बोलती मधुरा बोली । "आजिचा भोजनीं तृप्ती जाली । परि उर्ध भवे उरली । कांहींएक स्वामी. ॥ ३० ॥ दहींभाताचिये इच्छेची उरी । राखिली दाटूनि अंतरीं । तो जे पुढें कृष्णावतारीं । धणी दिधली पाहिजे." ॥३१॥ असो, ऐसी इच्छा कपींचा मनीं । ठेविं याचि लागोनी । पुढें गोपाळवेषें जन्मुनि । आर्त पूर्ण करणें. ॥ ३२ ॥ असो, ऐसीं भोजनें जालीं । उपरांत उचापोषणें घेतलीं । उष्णोदकें सिद्ध होतीं केलीं । सेवकजनीं. ॥ ३३ ॥ आचवणें जालीं समस्तांसी । शीतोदकें देती आचमनासी । वाटपरी आणी मुखशुद्धीसी । तुळसीदळें दिधलीं. ॥ ३४ ॥ उपरी पूगीफळखंडें । समस्तां दिधली उदंडें । एलादोडे लवंगा जेणें तोंडें । सुपरिमळित जालीं. ॥ ३५ ॥ विडे उत्तमवर्णांचे शुभ्र बहुत । पूगीफळचूर कर्पूर-मिश्रित । मुक्तचूर्ण रंगा आणित । चौथा खदीरसार. ॥ ३६ ॥ वस्त्रालंकार समस्तांसी । दिधली रघुनाथें कोणासी । कैसीं तें सांगूं यों विस्तारेंसीं । पृथक् पृथक्. ॥ ३७ ॥ मुख्य किष्किंधे मुकपिराजु । जो गभस्तीचा आत्मजु । तयासी मुकुट तेजःपुंजु । मस्तकीं घाली श्रीरामु. ॥ ३८ ॥ म्हणे "सुग्रीवा तुझे उपकार । असाधारण अपार । घडले आम्हांसी थोर । तेणें ऋणी जालों." ॥ ३९ ॥ तंव कपींद्र म्हणे "रघु-त्तमा । तुमचेनि राज्य प्राप्त आम्हां । सिद्ध तुझा उपकार मेघश्यामा । आम्हांसि जाला." ॥ ४० ॥ ऐसें परस्परें प्रीतिपूर्वक । बोलतां प्रेम अधिका-अधिक । उपरी श्रीरामें उभयहस्तक । सुग्रीवामस्तकीं ठेविले. ॥ ४१ ॥ उपरी वानरें माथा चरणीं । पुनर्दर्शन चापपाणी । होआवें हे इच्छा अंतःकरणीं । ठेउनि जातसे. ॥ ४२ ॥ मव्य घालुनि सर्व समेसी । सुग्रीव निघे वानरेंसी । उपरी श्रीराम म्हणे "मानसीं । स्मरण असों यावें. ॥ ४३ ॥ मग अंगदकपी कर जोडुनी । सन्मुख उभा राहोनी । बोलता जाला मधुरां वचनीं । राघवाप्रति. ॥ ४४ ॥ म्हणे "स्वामी तुमचेनि स्मरणें । जन्ममरणांनिगळें होणें । तरी तुज विसरोनि काय भोगणें । मागुतें रौरव. ॥ ४५ ॥ तुज न विसरिजे हें सुख । सांडूनि विसरिजे हें दुःख । भोगावया कोण मूर्ख । असेल आत्मघातकी" ॥ ४६ ॥ ऐसे अनुतापाचेनि बोलें । मन रामाचें संतोखलें । मग कर्णींचीं काढूनि कुंडलें । अंगदाकर्णीं घातलीं. ॥ ४७ ॥

म्हणे "वाळिचेया आत्मजा । बहु आलासी आमचेया काजा । आतां स्थाना जावें वोजा । आमचें स्मरण करित." ॥४८॥ ऐसी रघुनाथु आज्ञा देतु । अष्टादश शतकोटी परिवारितु । सर्व्वे घालुनि वैदेहीकांतु । अंगद वीरू निघाला. ॥ ४९ ॥ यानंतरें ऋक्षाधिपती । जांबुवंतु करी विनती । म्हणे "स्वामी, तुम्ही बहुते रीतीं । सांभाळु केला. ॥ ५० ॥ आतां तुम्ही आज्ञा वंदुनि शिरीं । प्रयाण करूं सपरिवारीं" । रघुराजें तिये अवसरीं । चिरंजीव पद दीधलें. ॥ ५१ ॥ तेणें उचितें ऋक्षप्रभु । आनंदें पूर्ण भरिला नभु । म्हणे "स्वामी, पुनर्दर्शनलाभु । दिधला पाहिजे." ॥ ५२ ॥ तव उत्तर दे रामरावो । "पुढें द्वापारांतीं तुमचा भावो । असैल तो सिद्धी जावो । स्यमंतकहरणीं." ॥ ५३ ॥ ऐसी श्रीरामाची प्रतिज्ञा । मानली जांबवंतासी संज्ञा । मग मस्तकीं वंदुनि आज्ञा । सर्व्वे घालुनि चालिला. ॥ ५४ ॥ पुढें कुमुदनामा वानरू । सन्मुख होउनि तत्परू । तेणें स्तविला रघुवीरू । राजाधिराजु. ॥ ५५ ॥ स्तुति परिसौनि प्रभु । जो अवाप्तसकळकामु । उचिता येऊनि उत्तमु । हारु दिधला कंठींचा. ॥ ५६ ॥ तेणें उचितेंकरूनी । आनंद न मायें गगनीं । सर्वोत्तमासि सर्व्वे घालुनि । शत सहस्र कोटीसि निघे. ॥ ५७ ॥ तंव विंध्याचळीं वास्तव्य ज्याचें । रंभु ऐसें नाम त्याचें । तेणें स्तुति करूनि रामाचें । मन संतोषविलें. ॥ ५८ ॥ उचिता येऊनि रघुनायकु । दिला भाळींचा टिळकु । माथा ठेऊनि अभय हस्तकु । आज्ञा देता जाहला. ॥ ५९ ॥ येरु हर्षें उचंबळला । सर्व्वे घालुनि निघाला । सरिसा परिवारु चालिला । त्रिदशकोटी. ॥ ६० ॥ याउपरी शरभु । तेणें स्तविला अयोध्याप्रभु । उचिता येऊनि कंठींचा कौस्तुभु । दिधला प्रेमें. ॥ ६१ ॥ तया उचित आनंदाचा सोहळा । तेणें सुखें भरिलें भूगोळा । सर्व सहस्रनवसार्धदळा । निघे सर्व्वे घालुनि. ॥ ६२ ॥ विनत वानरू याउपरी । रघुरायाची स्तुति करी । म्हणे "परा पश्यंती मध्यमा वैखरी । बोलतां पारुपलिया. ॥ ६३ ॥ तो तू अमूर्त मूर्तिमंतु । अव्यक्त जालासि व्यक्तु" । ऐसें बोलतां विनतु । तेणें राघव संतोषला. ॥६४॥ पदक काढुनि घातलें कंठीं । येरु सर्व्वे घालुनि वीरजेठी । सर्वे वानर सहस्रकोटी, चालिले हरुषें. ॥ ६५ ॥ क्रथनु करी अगाध बळी । श्रीरामासन्मुख बद्धांजळी ।

स्तवी परिसोनि ते काळीं । श्रीरामु संतोषला. ॥ ६६ ॥ बाहुभूषणें रत्न-विराजितें । कंपना समर्पिलीं सीताकांतें । येरू सव्य घालूनि बहुत हर्षे । साठी सहस्रशतेंसि निघाला. ॥ ६७ ॥ पुढें प्रमाथीनामा हरी । तेणें रामु स्तविला स्तुत्युत्तरीं । उचित दिधलें तिये अवसरीं । कंठसूत्र कटीचें. ॥ ६८ ॥ उचितेंनि हर्ष उचंबळितु । सहस्र सतेंसि परिवारितु । सव्य घालूनि प्रणिपातु । वेगेंसि चालिला. ॥ ६९ ॥ याउपरी गवय-नामा । तेणें स्तुतीं संतोषविलें रामा । उचित दिधलें प्लवगमा । रत्नें कटीचीं. ॥ ७० ॥ उचितें हर्षला थोर । तेणें सव्य घालूनि रघुवीर । सहस्रशतें परिवारू । समवेत निघाला. ॥ ७१ ॥ यानंतरें वानर गजु । तेणें स्तविला रघुराजु । त्या उचित दे आत्मजु । कौसल्येचा. ॥ ७२ ॥ कंकण रत्नजडित । हातींचें काढूनि त्वरित । शतसहस्र कपीं-समवेत । सव्य घालूनि निघाला. ॥ ७३ ॥ ऋक्ष यातीचा धूम्रनामा । तेणें स्तविला परमात्मा । कटींच्या क्षुद्र घंटिका उत्तमा । त्या दिधल्या धूम्रासि. ॥ ७४ ॥ यावरी सुनादनु कपी । दीर्घ बळी दीर्घरूपी । तेणें स्तविला दीर्घप्रतापी । दीर्घभक्ती करूनि. ॥ ७५ ॥ स्तुति आइकोनि अत्यंत । तोडर दिधला उचित । येरु चाळीस कोटींसमवेत । सव्य घालूनि निघाला॥७६॥ तंव ऋषभु वानर बळवंतु । कर जोडोनि स्तवन करितु । उचिता येऊनि सीताकांतु । वाकी देता जाहला ॥ ७७ ॥ सुमुख कपी यानंतरें । स्तुति-अनुवादें जोडिलेंनि करें । म्हणे "चाड नाहीं अळंकारें । स्मरण देईं चरणाचें." ॥ ७८ ॥ विचारु पडला रघुनायका । मग उचित दिधलिया पादुका । येरें खालवोनि मस्तका । सव्य घालूनि निघाला. ॥ ७९ ॥ दुर्मुखें याउपरी । स्तवुनि संतोषविला रावणारी । उचित दिधलें जें करीं । होतें कमळ. ॥ ८० ॥ उचित-न माये आकाशीं । सव्य घालुनि सर्व समेसी । पुनर्दर्शनलाभु मानसीं । करूनि निघाला. ॥ ८१ ॥ अंगद ऋषि याउपरी अनुवादे । "ब्रह्म ब्रह्म ऐसें वेदु वदे । तोचि तूं इये मर्यादे । ब्रह्मादि स्तवू न शकती." ॥ ८२ ॥ हें आयकौनिया श्रीरामु । उचिता आला पूर्णकामु । म्हणे "तुझा हा निश्चयो तरी श्रमु । न राहो सुखाचा" ॥ ८३ ॥ असो, ऐसा अंगद ऋषी । पावोनि ब्रह्मपदवीसी । स्वेच्छा पृथ्वी ऐसी । सहज विचरों लागला. ॥ ८४ ॥ याउपरी गवाक्ष

राजा बोलता । "स्वामी, तुझी पूर्णता । जाणावया योग्यता । न दिसे भुवनत्रयीं.॥८५॥ तेथ शक्ति आपुली काइसी । जाणावया तुझिये स्वरूपासी" । हें सुमें आयकोनि त्यासी । सगुणध्यान दिधलें.॥८६॥ मस्तकीं ठेऊनि स्वहस्तु । रं जाला ध्यानस्थु । सव्य घालुनि काकुत्स्थु । झुळ्तु चालिला.॥८७॥ तळपन, ध्रजु प्लवंगमु । तेणें स्तविला श्रीरामु । बीज मूळमंत्रु अगम्यु । न्यासपूर्वक दिधला. ॥ ८८ ॥ जरनिष्ठा देऊनि तयासी । येरें सव्यें घालुनि रामासी । ळपतु निघालों वानरेंसी । निजस्थानाप्रति. ॥ ८९ ॥ याउपरी कपिळु । स्तवी विश्वकर्म्याचा बाळु । तेणें संतोषला कृपाळु । उचित देता जाहला. ॥ ९० ॥ म्हणे शरीरव्यापारें वर्तावें । परि मुखीं नाम असों द्यावें । येरेसि मानलें हें बरवें । उचित लाधलें. ॥ ९१ ॥ मग सेना घेऊनि आपुली । स्वामीसि प्रदक्षिणा केली । 'जय राम' हे बोलीं । बोल्तु निघाला. ॥ ९२ ॥ याउपरें निळु करी स्तुति । तेणें आनंदला रघुपति । कटीं होती भगवती । ते करीं समर्पिली. ॥ ९३ ॥ मग सव्यें घालुनि निळें । सरिसा चालिला वानरदळें । यानंतरें शीघ्र काळें । सुखेनु बोलता जाला. ॥ ९४ ॥ म्हणे " स्वामिया जी धनुर्धारी । परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी । शिणल्या वाचा चारी । तेथें आमुची युक्ति किती ? ॥ ९५ ॥ आतां बोलावयाकारणें । आधारु असे एक गुणें । तूं कृपाळु भक्तोद्धरणें । अव्यक्त व्यक्ती आलासी." ॥ ९६ ॥ भक्ताऐसें वदे सुखेनु । तेणें संतोषे सीतारमणु । म्हणे "तुज उचित धारया प्राणु । आणिक पदार्थु न दिसे. ॥ ९७ ॥ तथापि यानें काहीएक । जे उपकार सर्वांहूनि अधिक । तुझेनि दृष्टिमात्रें रोगी अनेक । आरोग्य होती. ॥ ९८ ॥ ऐसें वरद लाहोनी । आणिक निघाला सव्यें घालुनी । सरिसी वानराची वाहिनी । चालिली वेगें. ॥ ९९ ॥ इतुकें जालियावरी मैंदु । करिता जाला अनुवादु । म्हणे "तुज वर्णितां वेदु । पारु पावला नाहीं. ॥ १०० ॥ तेथ आपुली काय कथा । तुमची बोलावया समर्था । परी आपुलिया स्वार्था-। कारणें बोलावें." ॥ १ ॥ ऐसें परिसोनि राघवु । म्हणे "तुज उचित अर्पिजे जीवु । तरी हें तूं पावें गा अनुभवु । स्वात्मसुखाचा." ॥ २ ॥ ऐसें उचित श्रीरामें । मैंदासी दिधलें पूर्णकामें । येरु सव्य घालुनि सप्रेमें । स्वसैन्येंसी चालिला. ॥ ३ ॥ उपरांचा जाला

होऊनि तटस्थ । चरणीं माथा ठेविला. ॥ २२ ॥ "तुज विसरिजे हानि
री । निरंतर ध्यावें हाचि लाभु संसारीं" । परिसौनि एहीं उत्तरीं । संतोषे
रामु. ॥ २३ ॥ रामें मस्तकीं ठेविला हातु । येरु सर्व्वें घालुनि अवनि-
कांतु । निघे आनंदघोषें गर्जतु । "जय जय राम" म्हणौनि. ॥ २४ ॥
आज्ञा जालेयावरी समस्तासी । श्रीरामु बोले हनुमंतासी । म्हणे "तुजं यावया
चितासी । कांहीं दिसत नाहीं. ॥ २५ ॥ तरी, आतां तुज काय घ्यावें ? ।
तीचि होऊनि तुवां रहावें"। ऐसें, बोलिले राघवें । तें मानलें त्यासि. ॥२६॥
म्हणे "स्वामी जावें तुजपासौनी । ऐसें नव्हतें माझ्या मनीं । तैसेंचि तूं
दल्यासि वचनीं । येणें परम सुख पावलों. ॥ २७ ॥ सासुरगृहा जावें
ऐसी । वासना नसे बाळे मानसीं । याहीवरी माता पिता आदरेंसीं ।
राहावीति जैसी." ॥ २८ ॥ ऐसें हनुमंतासि जालें । रामें चरणापाशीं रा-
खिलें । म्हणे "आतां न विसरवें पाउलें । कवणियें काळीं." ॥ २९ ॥ ऐसा
हा दृढनिश्चयो । धरूनि असे अंजनीतनयो । तंव बोले जानकीप्रियो । हनु-
मंतासि. ॥ ३० ॥ म्हणे "अगा पैं मारुततनया । येणें निश्चयेंसि तू होई
विजया । तरी आतां राहावें वैष्णवराया । आम्हांजवळी." ॥ ३१ ॥ ऐसें
बोलिल्यावरी । सभा विसर्जुनि निजगृहाभीतरीं । संध्या [illegible] मानुनि
शय्येवरी । जानकीसहित पहुडले. ॥ ३२ ॥ उपरी येरे दिवशीं उठोनी ।
सकळ विधि संपादुनी । मग सिंहासनीं बैसोनी । श्रीरामु राज्य करी ॥३३॥
असो, ऐसें युद्धकांड पवित्र । दाशरथी रामाचें चरित्र । हें गातां आइकतां विचित्र ।
फळश्रुती बहुत असे. ॥ ३४ ॥ सकळ कामना पुरती । अंती सायुज्यमुक्ती ।
होये वैकुंठप्राप्ती । भावपूर्वक आइकतां. ॥ ३५ ॥ जें वाल्मीकें कथिलें । त्यातु
अग्निपुराणोक्त योजिलें । कां जें गुतलें तें उगविलें । कथानुसंधान ॥ ३६ ॥
क्वचित् श्रोतेयांचा आक्षेप पडवरू । तो युक्तिवादें केला परिहारू । ऐसाही
संदेह उपजे थोरू । तरि क्षमा कीजे. ॥ ३७ ॥ हे वर्णितां रामकथा । कवणा
असे समर्थता । समुद्र तुळो उपसितां । फवण दक्षु ? ॥ ३८ ॥ गगन फाटे
मुठी । कां गणवे प्रमाणु सृष्टी । तरिची आकळी महाराष्ट्री । रामचरित्र. ॥३९॥
आतां असो हें बोलणें । दूषण भूषण न विचारणें । श्रोतीं कृपा करणें । मार-
गर्भोक्तारि ॥ ४० ॥ इति श्रीयुद्धकांड रामायणीं कथा । वाल्मीकऋषि नाशी
भवव्यथा । समाप्त जाली भोगाथा । कृष्णदासु मुद्गल म्हणे. ॥ ४१ ॥